किरण ९ वें

# छन्दोरचना

रचणार

प्रा. माधव त्रिं. पटवर्धन, अेम्. अे.,

सदस्य, रविकिरणमण्डळ



कर्नाटक पब्लिशिंग हाउस, मुम्बअी २

खिस्तशके १९३७

मूल्य चार रुपये

## माधव-जूलियन् यांचे काव्यग्रन्थ

१ विरहतरङ्ग
२ सुधारक
३ द्राक्षकन्या
४ गज्जलाञ्जलि
५ स्वप्नरञ्जन



### प्रकाशित व्हावयाचे

१ नकुलालङ्कार
२ सुनीताञ्जलि



## प्रा. माधव त्रिं. पटवर्धन यांचे ग्रन्थ

१ फार्सी–मराठी कोश
२ छन्दोरचना (२ री आवृत्ति)
३ अुमरखय्यामकृत रुबाया



Printed by M. N. KULKARNI at the KARNATAK PRINTING PRESS, Chira Bazar, Bombay, and published by him at the KARNATAK PUBLISHING HOUSE, Chira Bazar, Bombay 2.

थोरले मामा

श्रीयुत महादेव विश्वनाथ सहस्रबुद्धे, बडोदें

यांस

सादर समर्पण

# INTRODUCTION

This work being intended mainly for students of Marāṭhī versification is written in Marāṭhī; but as it will be no less useful to students of Sanskrit prosody, I propose to give here in English a brief statement of what I have attempted.

From very ancient times writers on Metre have been content merely to give a list of metres with mnemonic descriptions and illustrations often composed by themselves for the occasion. For the first time an attempt is here made to go over the whole field of versification, Sanskrit and Marāṭhī, ancient and modern, in order to study historically metres already known and to discover others which have not been mentioned by prosodists but illustrations of which are met with in literature. In this book I have given all of these newly discovered metres along with others given in the works of Bharata, Piṅgala, Virahāṅka, Svayambhū, Hemacandra, Kedārabhaṭṭa and the ancient Kannaḍa writer Nāgavarma. Everywhere I have given references to authorities which are so necessary but which are so rarely given in these works. I have moreover, attempted to reduce the great confusion of names of metres caused by the vicious habit of calling one and the same metre by many names and many different metres by one and the same name. In classifying these metres the old system of classification according to the number of syllables in a line is rejected in favour of that of basing it on the nature of rhythm and the internal rhythmic structure of the line.

I have thus reached the fundamentals of prosody—the rhythms on which metres are founded and which, though casually, darkly hinted at by one obscure Marathi author, no one has ever elaborated upon. I have discussed various questions connected with metre, for instance, that of the relation of verse-rhythm with music and that of free verse. Metre is not a mere play of permutation and combination of short and long syllables. A line to be truly metrical has got to be rhythmic. These rhythms, I have found, are of

eight, seven, six or five Mātrās or syllabic instants. Once the fundamentals were grasped, I was able to co-ordinate all the three kinds of metrical composition: Vrttas, Jātis and Chandas, which have been always employed by Marāṭhī poets.

As for Jātis, three or four of them were mentioned by Marāṭhī prosodists who on the analogy of Vrttas merely counted the number of syllabic instants in a line. But more important than the number of syllables or syllabic instants in a line is its internal rhythm–structure, as also is the pattern of the stanza formed by lines. Two metres having the same number of syllabic instants in each line may yet be different from each other because of different internal rhythmic structures.

The same rules of rhythm are exemplified in the Chandas in which all syllables whether short or long are treated uniformly as long. This kind of verse does not appear in classical Sanskrit and though Vedic metres are called Chandas the difference of short and long appears to be observed in them. This type of versification, however, is common in modern Bengali.

In the field of vrttas my work has been mainly of compilation and re-classification, though I have discovered and emphasized the factor of internal rhythmic structure. Besides, I have collected a good deal of new material and made it available to students for the first time.

But my studies in the field of Jāti and Chandas and the general theoretical ground-work with which I have now provided the science of prosody—these I humbly submit as my contribution to the knowledge of metrics.

The author acknowledges his indebtedness to the University of Bombay for the substantial financial help it has granted towards the cost of publication of this book.

January, 1937.

**Madhav T. Patwardhan**

# सिंहावलोकन

सहज फिरायला म्हणून बाहेर पडावें आणि नादांतल्या नादांत कित्येक डोङ्गर नि दऱ्या ओलाण्डून अेखाद्या अुत्तुङ्ग शिखरावर चढावें; आणि तेथून सिंहावलोकन करितांना काय प्रदेश पादाक्रान्त झाला हा म्हणून सानन्द आश्चर्य करीत रहावें तशी माझ्या मनाची स्थिति हे शब्द लिहितांना झाली आहे. या प्रकरणीं किती परिश्रम घ्यावे लागणार आहेत याची यथार्थ कल्पना आरम्भीं आली असती तर मनाने कचच खाल्ली असती आणि मग हातून कांहींहि झालें नसतें. बेतापुरतें पुढे पाहून काम करण्यानेच सुखावह प्रगति होते असें दिसतें.

२०–२१ वर्षांपूर्वी बी. अे. ची परीक्षा आटोपल्यावर पुढील अभ्यासासाठी म्हणून मी स्वकष्टाने फार्सी छन्दःशास्त्राचा अभ्यास आरम्भिला. छन्दःशास्त्राशी असा हा माझा पहिलाच परिचय होता. तत्पूर्वी मी पद्यरचना केली होती पण छन्दःशास्त्राकडे ढुङ्कूनहि पाहिलें नव्हतें. फार्सी छन्दःशास्त्र म्हणजे निष्कारण कठिण करून टेविलेला अेक विषय आहे. मी प्रत्येक वृत्ताचे चार चार चरण तोण्डपाठ करावे, पुनः पुन्हा म्हणून त्यांना काही तरी अेक गोड पण साधी चाल लावावी, आणि दोन वृत्तांतील साम्यभेद ओळखण्याअितका कान सुसंस्कृत झाल्यावर अन्धुकपणें प्रतीत होणारा हा साम्यभेद पृथक्करण आणि तुलना करून स्पष्ट दृग्गोचर करून घेण्याचा प्रयत्न करावा. अशा रीतीने अभ्यास करीत असतांना फार्सी छन्दःशास्त्रांतील कित्येक दोष अुघडकीस आले. परन्तु त्या शास्त्राची मी म्हणजे अेका परकीयाने केलेली पुनर्घटना ही अिराणांतील लोकांना मान्य होण्याचा सम्भव नसल्याने मी त्या दिशेने अिङ्ग्रजींत अेक पुस्तिका लिहिण्यापलीकडे काही प्रयत्न केला नाही.

परन्तु हा अभ्यास करितांना पृथक्करण आणि तुलना करून शोध करण्याची जी सवय मला लागली ती फार हितकर ठरली. मराठी पद्यरचना मी अनेक वर्षांपासून करीत असल्याने माझें लक्ष जातींकडे म्हणजे मात्रावृत्तांकडे वळलें. विविध जातींत रचना प्राचीन काळापासून होत आली होती; पण दिण्डी साकी अित्यादि चार पाच प्रकारांपलीकडे छन्दःशास्त्रकारांची दृष्टि गेलेली नव्हती. चरणांतील मात्रांची सङ्ख्या मोजण्यापलीकडे त्यांनी काहीहि केलें नव्हतें.

चरणाच्या अन्तर्गत घटनेचा विचार केला पाहिजे, दोन चरण सममात्रक असूनहि अन्तर्गत घटनाभेदामुळे भिन्न होअूं शकतात या गोष्टीचा कोणाला पत्ता लागलेला नव्हता. मी या जातिरचनेचा अभ्यास आरम्भिला आणि ख्रिस्त शके १९२२, जानेवारी ८ या दिवशीं येथील शारदामन्दिरांत 'नवीन चलनी वृत्तें' या विषयावर अेक निबन्ध वाचला. तो नन्तर मी विविध-ज्ञानविस्तारमासिकाकडे पाठविला असतां सम्पादकांनी त्याला स्थान देअून मला अुत्तेजन दिलें. ज्ञानकोशकारांनीहि हा लेख आपल्या ज्ञानकोशांत समाविष्ट करून माझा अेकप्रकारें गौरवच केला. या गुणग्राहकांचा मी फार आभारी आहे. पुढे छन्दांचाहि मी थोडा अभ्यास केला आणि डॉ. केतकर यांच्या अध्यक्षतेखाली येथें भरलेल्या शारदोपासकसम्मेलनांत छन्दावर अेक निबन्ध वाचला तोहि अध्यक्षांना मनोरञ्जक आणि अुत्तेजनार्ह वाटला. परन्तु ग्रन्थनिर्मितीच्या दृष्टीने खरें अुत्तेजन अकल्पितपणें निराळ्याच ठिकाणाहून मिळालें. फर्ग्युसन् कॉलेजांतील संस्कृतविषयाचे प्राध्यापक डॉ. वासुदेव गोपाळ परान्जपे, अेम्. अे., अेल्अेल्. बी., डी. लिट्., यांनी आर्यसंस्कृति-मुद्रणालय नुकतेंच स्थापिलें होतें आणि त्या मुद्रणालयांतून गम्भीर विषयां-वरील पुस्तकें त्यांना प्रकाशित करावयाचीं होतीं. मी असें अेखादें पुस्तक लिहून देअूं शकेन का म्हणून त्यांनी प्रश्न टाकितांच मी छन्दःशास्त्रांतील जातिविचार हा विषय चालेल का म्हणून अुलट प्रश्न केला. त्यांच्याकडून होकारार्थी अुत्तर तत्काळ येतांच मी कार्याला आरम्भ केला. पुस्तक अितर दृष्टींनीहि विद्यार्थ्यांच्या आणि कवींच्या अुपयोगी पडावें म्हणून त्यांत वृत्त-विचारहि समाविष्ट केला, अरबीफार्सी वृत्तेंहि घालण्यांत आलीं आणि शेवटीं, ज्याचा छन्दःशास्त्राशी काही सम्बन्ध नाही पण काव्याशी आहे अशा 'पद्याची भाषा' या विषयाचीहि चर्चा करण्यांत आली. अेक वर्षाच्या अवधींत पुस्तक लिहून छापून होअून ते ख्रिस्तशके १९२७ मध्ये प्रकाशित झालें! प्रकाशनाचें आश्वासन न मिळतें तर ही ग्रन्थनिर्मिति न होती. तेव्हा या ग्रन्थाचें योग्य तें श्रेय डॉ. परान्जपे यांनाच दिलें पाहिजे. तो काल विशेषतः पद्यरचनेचा असल्याने ग्रन्थाला मागणीहि चाङ्गली आली आणि हा गम्भीर साहित्याला आश्रय देण्याचा प्रयत्न आश्रयदात्यांना भोवला नाही हें त्यांचें आणि माझें सुदैवच समजलें पाहिजे.

पण या ग्रन्थांत अनेक अुणीवा राहून गेल्या होत्या. प्राकृत पैङ्गलाचा अुपयोग करून घेण्यांत आला असला तरी प्राचीन संस्कृत छन्दःशास्त्रकारांनी वृत्तांची चर्चा कशी केली आहे आणि संस्कृत कवींनी त्यांची सम्भावना कशी केली आहे याचा विचार करण्यांत आलेला नव्हता. पुन्हा जाति आणि छन्द यांत आढळणारी आवर्तनात्मकता वृत्तांत कोठे आणि कशी आढळते याचाहि शोध घेण्यांत आला नव्हता. म्हणून छन्दोरचना प्रकाशित झाल्यानन्तर २–३ वर्षांनीच मी पुन्हा या विषयाचा अभ्यास आरम्भिला. भरतपिङ्गलादि संस्कृत छन्दःशास्त्रकारांचे ग्रन्थ अभ्यासून आणि संस्कृत नि मराठी प्राचीन–अर्वाचीन वाङ्मय डोळ्याखाली घालून, पुष्कळच नवीन सामग्री मिळवून, जुळवून आतां छन्दोरचना हा ग्रन्थ अथपासून अितिपर्यन्त नवीनच लिहून काढलेला आहे. याला पूर्वीच्या आवृत्तीचा आधार आहे आणि अेकदा प्रसिद्ध झालेलें नाव पालटण्यांत अर्थ नाही म्हणूनच छन्दोरचना हें नाव तसेंच ठेविलें आहे. ताडून पहाणाराला ही दुसरी आवृत्ति म्हणजे वस्तुतः जवळ जवळ नवीनच असा अेक ग्रन्थ आहे हें स्पष्ट दिसून येअील.

पद्य म्हणजे लयबद्ध अक्षररचना होय हें साधें तत्त्व जें पूर्वीच्या छन्दःशास्त्रकारांना सापडलें नाही आणि अेका आधुनिकाला अगदी पुसटपुसटच दिसलें तें मला परिश्रमान्तीं हळूहळू स्पष्ट होत गेलें. या तत्त्वाप्रमाणे, पद्यरचना ही वृत्तस्वरूप असो, वा जातिस्वरूप असो वा छन्दःस्वरूप असो, ती कशी सम, अर्धसम आणि विषम असू शकते हें या ग्रन्थांत विस्ताराने दाखविलेलें आहे. छन्दःशास्त्राची काहीतरी व्यापक आणि पायाशुद्ध अशी घटना आता निश्चित केलेली आहे. अश्वघोषापासून जगन्नाथरायापर्यन्तचे संस्कृत आणि अद्ययावत् मराठी प्रसिद्धअप्रसिद्ध कवि यांचा योग्य तो परामर्श घेण्यांत आला आहे. कोठे काही महत्त्वाचें वगळलें गेलें असल्यास तें अनवधानानेच वगळलें गेलें आहे याविषयी सन्देह नसावा. कोणाच्याहि श्रेयाचा अपहार करण्याचा प्रयत्न केलेला नाही. दिण्डी-शारदा अित्यादि ४–५ मात्रावलींचा विचार करितांना श्री. गोविन्दराव टेम्बे आणि श्री. वामनराव पाध्ये यांच्याशी मी विचारविनिमय केला होता ही गोष्ट येथे साभार साङ्गून टाकितों. तथापि मुख्य कार्य सारें मी अेकट्यानेच केलेलें आहे.

पण या अेवढ्या व्यापारापासून प्राप्ति काय असा प्रश्न करणारे केव्हा केव्हा भेटतातच त्यांना काय समजावून साङ्गावयाचें ?

बुभुक्षितैः व्याकरणं न भुज्यते
पिपासितैः काव्यरसो न पीयते
नच्छन्दसा केनचिदुद्धृतं कुलं
हिरण्यमेवार्जय निष्फलाः क्रियाः

या सुभाषिताचा अर्थ मलाहि कळतो. पण छन्दाला मोल नाही, गत्यन्तरहि नाही. अितक्या वर्षांच्या सहवासानन्तर अशी, हातावेगळी झाली तरी हृदयांत घर करून रहाणारी गोष्ट अितर जाणत्यांनाहि आवडली, मान्य झाली म्हणजे जें समाधान होअील तेंच साऱ्या श्रमांचें सार्थक होय.

ता. २३ जानेवारी १९३७ अिसवी.
डेक्कन जिम्खाना, पुणें ४.

**माधवराव पटवर्धन**

# अनुक्रमणिका

श्रीकृष्णकविकृत मन्दारमरन्दचम्पू ( ५५९ ), निरञ्जनमाधवाची सद्वृत्त मुक्तावली ( ५५९–५६० ), रामचन्द्रदैवज्ञाची छन्दोमञ्जरी ( ५६० ), परशुरामतात्यांचें वृत्तदर्पण ( ५६०–५६१ ), राजवाडेकृत मराठी छन्द ( ५६१–५६२ ), देशपाण्डेकृत छन्दोलङ्कार ( ५६२ ), जगन्नाथ-प्रसादकृत छन्दः प्रभाकर ( ५६२–५६३ ), रणछोडभाअीकृत रणपि-ङ्गला ( ५६३ ), छन्दोरचना ( ५६३–५६४ ).

---

# सङ्क्षेपांचें स्पष्टीकरण

दोन सङ्क्षेप जेथे कंसांत अेकापुढे अेक असे दिले आहेत तेथे त्याच्यामध्ये अवग्रहचिन्ह – घातलें आहे. ते या सूचींत वेगळे वेगळे पहावेत. अवग्रहापुढील सङ्क्षेप ग्रन्थाच्या नावाचा आहे. पुढील दोन अङ्कांपैकीं १ ला खण्डाचा वा ग्रन्थविभागाचा असून दुसरा पद्याचा वा सूत्राचा वा पृष्ठाचाहि आहे.

| | |
|---|---|
| अनेककविकृत कविता. ... ... | अकक |
| अनेककविकृत लघुकाव्यमाला. ... ... | अकलका |
| अमृतरायकृत कवितासङ्ग्रह ... ... | अकस |
| अभिनवकाव्यमाला. ... ... ... | अकामा |
| अनन्तकृत कुशलवाख्यान ... ... | अकुल |
| अनन्तकृत गरुडगर्वपरिहार. ... ... | अग |
| अमितगतिकृत धर्मपरीक्षा. ... ... | अधप |
| अज्ञातवासीकृत अज्ञातनाद. ... ... | अना |
| वि. वा. भिडेकृत अलङ्कारनिरूपण. ... | आनि |
| अमरचन्द्रसूरिप्रणीत पद्मानन्द. ... ... | अप |
| अनन्तकृत पदसङ्ग्रह. ... ... | अपस |
| अनिलकृत फुलवात. ... ... ... | अफु |
| अश्वघोषकृत बुद्धचरित. ... ... | अबुच |
| त्र्यं. रा. अभङ्गकृत मेजवानी. ... ... | अमे |
| अनन्तकृत सीतास्वयंवर. ... ... | असीस्व |
| अनन्तकृत सुलोचनाख्यान. ... ... | असु |
| अश्वघोषकृत सौन्दरनन्द ... ... | असौ |
| अज्ञातवासीची कविता. ... ... | अज्ञा |
| आनन्द ( वि. ल. बर्वे ) ... ... | आ |
| आगरकर गङ्गाधर काशीनाथ ... ... | आगका |
| आनन्दतनयकृत गोरसक्रीडा. ... ... | आगो |
| आनन्दतनयकृत पूतनावध. ... ... | आपू |

| | |
|---|---|
| आश्रमभजनावलि. ... ... ... | आभ |
| आनन्दमासिक. ... ... ... | आमा |
| वि. ह. आपटेकृत माला. ... ... | आमाला |
| आमोद. ... ... ... ... | आमो |
| आनन्दतनयकृत विश्वामित्रयज्ञरक्षण. ... | आवि |
| कु. अिन्दुमती, बी. अे. ... ... | अि. |
| अीश्वरदत्तप्रणीत धूर्तविटसंवाद. ... ... | अीधू |
| अुमरखय्यामकृत रुबाया. ... ... | अुखरु |
| अुपाध्ये जयकृष्ण. ... ... ... | अुज |
| जयकृष्ण अुपाध्येकृत पोपटपञ्ची. ... | अुपो |
| अुद्धवचिद्धनकृत भगवद्गीता. ... ... | अुभ |
| भट्ट अुत्पलाची बृहत्संहितेवरील टीका. ... | अुवबृ |
| अुत्साहतीर्थ महाजनकृत अुदात्तवाणी. ... | अुवा |
| रविकिरणमण्डळाचें तिसरें पुस्तक. ... | अुषा |
| खिस्ती अुपासनासङ्गीत. ... ... | अुस |
| अेकनाथ. ... ... ... ... | अे |
| ओङ्कारमुनिकृत लक्ष्मणास्वयंवर. ... ... | ओलस्व |
| कवनगुच्छ. ... ... ... ... | कगु |
| काशिकवि. ... ... ... ... | काक |
| अनन्तकाणेकरकृत चान्दरात. ... ... | काचा |
| कविदर्पण. ... ... ... ... | कद |
| करभार ... ... ... ... | कभा |
| कविसंमेलन ... ... ... ... | कस |
| काव्यकिङ्कर ... ... ... ... | काकि |
| के. नारायण काळे ... ... ... | काकेना |
| गिका पहा. ... ... ... ... | काग |
| अच्युत दामोदर कारेकृत नन्दादीप... ... | कान |
| काळेले रामचन्द्र अनन्त.... ... ... | काराअ |
| रा. अ. काळेलेकृत वाग्वसन्त. ... ... | कावा |

| | | | |
|---|---|---|---|
| काव्यविहारीकृत काव्यविहार. | ... | ... | कावि |
| कात्रे विश्वनाथ शङ्कर. ... | ... | ... | काविश |
| कालिदासकृत शृङ्गारतिलक | ... | ... | काशृ |
| के. ना. काळेकृत सहकारमञ्जरी | ... | ... | कास |
| काव्यविहारीकृत स्फूर्तिलहरी. | ... | ... | कास्फू |
| किरण ... ... | ... | ... | कि |
| समग्र किर्लोस्कर ग्रन्थ. ... | ... | ... | किग्र |
| किर्लोस्कर मासिक ... | ... | ... | किमा |
| किरात ( कृ. ल. सोमण ) | ... | ... | किरा |
| कुसुमाग्रज ... ... | ... | ... | कु |
| कुमुदबान्धवाची कविता ... | ... | ... | कुक |
| कुञ्जविहारीकृत गीतगुञ्जारव | ... | ... | कुगी |
| कुसुमाग्रजकृत जीवनलहरी. | ... | ... | कुजी |
| य. ख. कुळकर्णीकृत मानसनिश्यन्द. | | ... | कुमा |
| कुमारसम्भव ... ... | ... | ... | कुमार |
| कुमारयशोदकृत यशोदायिनी. | ... | ... | कुयशो |
| कृष्णकेशव. ... ... | ... | ... | कृके |
| केदारभट्टप्रणीत वृत्तरत्नाकर. | ... | ... | के |
| केशवसुत यांची कविता. ... | ... | ... | केक |
| केशवकुमार ( प्र. के. अत्रे ). | ... | ... | केकु |
| केशवकुमारकृत गीतगङ्गा. | ... | ... | केगी |
| केशवकुमारकृत झेण्डूंचीं फुलें. | ... | ... | केझे |
| वृत्तरत्नाकराची निर्णयसागरी आवृत्ति. | | ... | केनिया |
| न. चिं. केळकरकृत पद्यगुच्छ. | ... | ... | केपगु |
| केशवस्वामी भागानगरकर. | ... | ... | केस्वा |
| य. स. कोरेकलकृत काव्यकुसुमकलिका | | ... | कोका |
| श्री. कृ. कोल्हटकरकृत गुप्तमञ्जूष. | ... | ... | कोगु |
| कोलते दत्तात्रय भिकाजी ... | ... | ... | कोदभि |
| श्री. कृ. कोल्हटकरकृत प्रेमशोधन. | ... | ... | कोप्रे |

श्री. कृ. कोल्हटकरकृत मूकनायक. ... ... कोमू
प्रो. विष्णु भिकाजी कोलतेकृत लव्हाळी. ... कोल
क्षेमेन्द्रकृत दशावतारचरित. ... ... क्षेद
क्षेमेन्द्रकृत सुवृत्ततिलक. ... ... ... क्षेसु
ना. धों. खाण्डेकरकृत कविताकलाप.... ... खाक
ना. धों. खाण्डेकरकृत प्राकृत कविता. ... खाप्राक
माजूग पहा. ... ... ... ... ग
गङ्गादासप्रणीत छन्दोमञ्जरी. ... ... गछ
बाबा गर्दे. ... ... ... ... गबा
गाङ्गेय. ... ... ... ... गा
गायकवाड प्राच्यग्रन्थमाला. ... ... गाप्राग्रमा
गिरीशकृत अभागी कमल. ... ... गिअक
गिरीशकृत आम्बराई. ... ... ... गिआ
गिरीशकृत काञ्चनगङ्गा.... ... ... गिका
गिरीशकृत फलभार. ... ... ... गिफ
जयदेवविप्रणीत गीतगोविन्द. ... ... गीगो
गोविन्दकवीची कविता. ... ... ... गोक
गोदातटींचा गुञ्जारव. ... ... ... गोगु
गोविन्दराव टेम्बे. ... ... ... गोटे
गोपीनाथ तळवळकर. ... ... ... गोत
गोखले दत्तात्रय लक्ष्मण. ... ... ... गोदल
गोपीनाथ तळवळकरकृत दूर्वाङ्कूर. ... ... गोदू
गोरे पाण्डुरङ्ग श्रावण. ... ... ... गोपाश्रा
पा. श्रा. गोरेकृत बोबडे बोल. ... ... गोबो
विठ्ठलराव घाटे.... ... ... ... घा
त्र्यं. गं. घारपुरेकृत लीलेचा संसार. ... ... घाली
राजकवि चन्द्रशेखरकृत चान्द्रिका. ... ... च
चतुर्विजयकृत वर्धमानषट्त्रिंशिका. ... ... चव
कान्ता पहा चाग

| | | |
|---|---|---|
| कृष्णशास्त्री चिपळूणकरकृत पद्यरत्नावली. | ... | चिप |
| जगन्नाथप्रसादकृत छन्दःप्रभाकर. | ... ... | छप्र |
| जगद्धरकृत स्तुतिकुसुमाञ्जलि. | ... ... | जस्तु |
| जोशी अनन्त हरि. | ... ... ... | जोअह |
| गजानन गोपाळ जोशीकृत पद्यपुष्पहार. | ... | जोप |
| सीताराम बाळकृष्ण जोशीकृत वनमाला. | ... | जोव |
| जोगळेकर सदाशिव विष्णु. | ... ... | जोसवि |
| जोशी सीताराम बाळकृष्ण. | ... ... | जोसीबा |
| जोअिन्दुकृत योगसार. | ... ... ... | जोयो |
| ज्योत्स्ना. | ... ... ... ... | ज्यो |
| नारायण वामन टिळक यांची कविता. | ... | टिक |
| टिळक वि. सि. | ... ... ... | टिविसी |
| आनन्दराव टेकाडे. | ... ... ... | टे |
| टेकाडेकृत आनन्द गीत. | ... ... ... | टेआ |
| गजानन लक्ष्मण ठोकळ. | ... ... ... | ठो |
| डिम्भ ( कृष्णमुनि ) कृत रुक्मिणीस्वयंवर. | ... | डिरुस्व |
| तडफ. | ... ... ... ... | त |
| तण्डालं रामचन्द्ररावकृत सुदामभाग्योदयचरित. | ... | तरासु |
| भास्कर रामचन्द्र ताम्बे यांची समग्र कविता. | ... | तासक |
| दत्तांची कविता. ... | ... ... ... | दक |
| दशवैकालिक सूत्र. | ... ... ... | दवै |
| दडकर सुमतिबाअी. | ... ... ... | दसु |
| रघुनाथपण्डिताचें दमयन्तीस्वयंवर. | ... ... | दस्व |
| दाते शङ्कर गणेश सम्पादित मणिमाळ. | ... | दाम |
| दाते शङ्कर गणेश सम्पादित लोककथा. | ... | दालो |
| सौ. अपर्णा देशपाण्डे. | ... ... ... | देअ |
| देवनाथकृत कवितासङ्ग्रह. | ... ... ... | देक |
| सौ. कुसुमावती देशपाण्डे. | ... ... ... | देकु |
| देवलकृत झुञ्जारराव. | ... ... ... | देझु |

| | |
|---|---|
| गुणवन्त हनमन्त देशपाण्डे. — | देगुह |
| ना. घ. देशपाण्डे — | देनाघ |
| देशपाण्डे यांची निर्माल्यमाला. — | देनिमा |
| पुरुषोत्तम यशवन्त देशपाण्डे. | देपुय |
| देवलकृत मृच्छकटिक. | देमृ |
| वामन नारायण देशपाण्डे. | देवाना |
| देवलकृत विक्रमोर्वशीय. | देविक्र |
| सौ. विमलाबाआी देशपाण्डे. | देवि |
| देवलकृत शारदा. | देशा |
| देवलकृत शापसम्भ्रम. | देशाप |
| देवलकृत संशयकल्लोळ. | देस |
| द्रोणपर्व. | द्रोप |
| नरहरिकृत गङ्गारत्नमाला. | नग |
| नवजीवन मासिक. | नजीमा |
| कान पहा. | नदी |
| नयचन्द्रसूरिप्रणीत हम्मीरमहाकाव्य. | नह |
| नागवर्मकृत छन्दोम्बुधि | नाग |
| देनाघ पहा | नाघदे |
| के. नारखेडेकृत चन्द्रकला | नाच |
| के. नारखेडेकृत बालगीतमाला | नाबा |
| सौ. नावलेकरकृत भाव कुसुमाञ्जलि | नाभा |
| सौ. मनोरमाबाआी नावलेकर | नाम |
| नागेशकृत वन्यपुष्पें. | नाव |
| निरञ्जन माधवाची कविता. | निक |
| निरञ्जनमाधवकृत चिद्बोधरामायण | निचि |
| निशिगन्धकृत ज्योत्स्नागीत. | निज्यो |
| निशिगन्धकृत निशागीत. | निनि |
| निरञ्जनमाधवकृत सद्वृत्तमुक्तावली. | निस, निमास |
| श्री. पण्डितकृत चवथीचा चान्द | पचचा |

| | |
|---|---|
| पद्मदल. ... ... ... ... | पद |
| कु. पद्मा पटवर्धन. ... ... ... | पप |
| पदसङ्ग्रह ( निर्णयसागर ). ... ... | पस |
| भवानीशङ्कर पण्डितकृत पिचलेला पावा. ... | पपि |
| परमात्मप्रकाश जोअिन्दुकृत. ... ... | पप्र |
| श्रीधर सखाराम पण्डितकृत स्वैरालाप. ... ... | पस्वै |
| पार्थिव ( हरि काशिनाथ कुळकर्णी ). ... ... | पा |
| वा. भा. पाठककृत आशागीत. ... ... | पाआ |
| पाण्डुरङ्गकविकृत गयगन्धर्वाख्यान. ... ... | पाग |
| पाटणकर परशुराम नारायण. ... ... | पापना |
| पारिजात मासिक. ... ... ... | पामा |
| भा. दा. पाळन्दे यांची रत्नमाला. ... .. | पार |
| गणेश हरि पाटिलकृत रानजाअी. ... ... | पारा |
| पारिजात. ... ... ... ... | पारि |
| पालेकर सौ. शान्ताबाअी. ... ... ... | पाशा |
| पाण्डुरङ्ग कविकृत स्थालीपाककथा. ... ... | पास्था |
| पिङ्गलविरचित छन्दःशास्त्र. ... ... | पि |
| पिम्पळपान. ... ... ... ... | पिपा |
| पुष्पदन्तविरचित णायकुमारचरिअु. ... ... | पुणा |
| पूज्यपादकृत नन्दीश्वरभक्ति. ... ... ... | पून |
| पूज्यपादकृत योगिभक्ति. ... ... ... | पूयो |
| अुपो पहा. ... ... ... ... | पोप |
| शे. पोहनेरकरकृत बागशाही. ... ... ... | पोबा |
| प्रभाकर याची कविता. ... ... ... | प्रक |
| प्रफुल्लपद्माकर ( द. बा. पद्माकरकृत ). ... ... | प्रप |
| कुन्दकुन्दाचार्यकृत प्राकृत गुरुभक्ति. ... ... | प्रागुभ |
| प्राकृत पैङ्गलम्. ... ... ... ... | प्रापै |
| फटत्कार. ... ... ... ... | फ |
| फर्ग्युसन कॉलेज त्रैमासिक. ... ... ... | फत्रै |

| | |
|---|---|
| फाटक गणेश कृष्ण. ... ... ... | फागकृ |
| बीकृत फुलांची ओञ्जळ. ... ... ... | फुओ |
| बल्लवकवि. ... ... ... ... | बक |
| बालकवि ( ठोम्बरे ) यांची कविता. ... ... | बाक |
| बालबोधमेवा मासिक. ... ... ... | बाबोमा |
| बापट सारजाबाअी. ... ... ... | बासा |
| बृहत्स्तोत्ररत्नाकर. ... ... ... | बृस्तो |
| बेडेकर श्रीराम गोविन्द. ... ... ... | बेश्रीगो |
| श्री. रा. बोबडे. ... ... ... ... | बो |
| बा. भ. बोरकरकृत प्रतिभा. ... .. ... | बोप्र |
| भरतप्रणीत नाट्यशास्त्र. ... ... ... | भ |
| भट्टिकाव्यम्. ... ... ... ... | भका |
| भगवद्गीता. ... ... ... ... | भगी |
| भवभूतिप्रणीत मालतीमाधव. ... ... | भमा |
| भक्तिमार्गप्रदिप. ... ... ... ... | भमाप्र |
| भासकृत अभिषेक. ... ... ... | भाअ |
| भासकृत अविमारक. ... ... ... | भाअवि |
| भासकृत कर्णभार. ... ... ... | भाक |
| भागवतम्. ... ... ... ... | भाग |
| भालचन्द्र दत्त. ... ... ... ... | भाद |
| भासकृत प्रतिभा. ... ... ... ... | भाप्र |
| भावलेखा. — ... ... ... ... | भाले |
| भासकृत स्वप्नावासवदत्ता. ... ... ... | भास्व |
| वि. वा. भिडेकृत अलङ्कारनिरूपण. ... ... | भिअनि |
| वि. वा. भिडे जीवजाग्रति. ... ... ... | भिजी |
| भिक्षुकविकृत द्रौपदीवस्त्रहरण. ... ... | भिद्रौ |
| वि. वा. भिडेकृत मन्दारमञ्जरी अि० ... ... | भिम |
| भिडेकृत राघवीय परीवाह ( राम ). ... ... | भिरा |
| मञ्जुबाळ. | म |

मोरोपन्ती प्रकरणें. ... ... ... मोप्र
,, भीष्मभक्तिभाग्य. ... ... मोभीभ
,, मञ्जुरामायण. ... ... ... मोमञ्जु
शङ्कराचार्यकृत मोहमुद्गर. ... ... मोमु
मोरोपन्त कृत विराटपर्व. ... ... ... मोविप
,, विठ्ठलप्रणाधि. ... ... ... मोविप्र
,, विबुधप्रिय रामायण. ... ... मोविबु
,, विचित्र रामायण. ... ... मोविरा
,, विठ्ठलस्तुति. ... ... ... मोविस्तु
,, समग्र ग्रन्थ. ... ... ... मोसग्र
,, सवया रामायण उत्तरकाण्ड. ... मोसराउ
,, सार रामायण. ... ... ... मोसारा
,, सीता रामायण. ... ... ... मोसीरा
,, स्फुटकाव्यें ... ... ... मोस्फुका
यशवन्तकृत्त यशोगन्ध. ... ... ... यम
,, जयमङ्गला. ... ... ... यज
,, यशोधन. ... ... ... यध
,, बन्दिशाळा. ... ... ... यब
,, भावमन्थन. ... ... ... यभा
यशवन्त मासिक. ... ... ... यमा
युवराजप्रणीत रससदन भाण. ... ... युर
रघुवंश. ... ... ... ... रघु
न. शं. रहाळकरकृत पुष्पाञ्जलि. ... ... रपु
कु. रणदिवे मालती. ... ... ... रमा
रत्नाकरमासिक.... ... ... ... रमा
रत्नाकरकृत हरविजय. ... ... ... रह
राजशेखरकृत कर्पूरमञ्जरी. ... ... ... राक
रामदासकृत करुणाष्टकें, घाट्या, सवाया. ... राकघास
राघवकवि. ... ... ... ... राघव

| | |
|---|---|
| राजकवि चन्द्रशेखर. ... ... ... | राच |
| ( भिरा ) राघवीय परीवाह. ... ... | राप |
| राजाराम प्रासादी. ... ... ... | राप्रा |
| रामदासकृत भीमरूपी स्तोत्रें. ... ... | राभास्तो |
| क. मनोरमाबाओी रानडे. ... ... ... | राम |
| रामजोशीकृत लावण्या ... ... | राला |
| प्रो. श्रीधर बाळकृष्ण रानडे. ... ... | राश्री |
| रूपदेवकृत स्तवमाला. ... ... ... | रूस्तमा |
| रेन्दाळकरांची कविता. ... ... ... | रेक |
| लघुकाव्यमाला ... ... ... | लकामा |
| ललितविस्तर ... ... ... | लवि |
| ओलस्व पहा ... ... ... | लस्व |
| लक्ष्मण गणेश लेलेकृत तिलकनिधन ... ... | लेति |

| | |
|---|---|
| वकील व्यङ्कटेश शङ्कर... ... ... | वव्यश |
| वराहमिहिरकृत बृहत्संहिता. ... ... | वबृ |
| वराहमिहिरकृत बृहज्जातक. ... ... | वबृजा |
| वाग्भटकृत अष्टाङ्गहृदय अुत्तरस्थान... ... | वाअअु |
| ,, ,, चिकित्सास्थान. ... ... | वाअचि |
| वामनी ग्रन्थ. ... ... ... | वाग्र |
| वामनकृत द्वारकाविजय. ... ... ... | वाद्वा |
| वामनकृत भागवत रामायण. ... ... | वाभारा |
| दामोदरमिश्रविरचित वाणीभूषण ... ... | वाभू |
| वागीश्वरी मासिक. ... ... ... | वामा |
| वामन विराटपर्व. ... ... ... | वावि |
| वाङ्मयश्रीखण्ड—पद्यविभाग ... ... | वाश्रीपवि |
| वामनकृत हरिविजय. ... ... ... | वाहवि |
| विनायकाची कविता. ... ... ... | विक |

विठोबाअण्णा दप्तरदारकृत पदसङ्ग्रह ... विदप
विठ्ठलकृत पदसङ्ग्रह. ... ... ... विप
विरागीकृत मधुसम्भार. ... ... ... विम
विहङ्गम मासिक. ... ... ... विमा
विश्ववाणी मासिक. ... ... ... विमा
विठ्ठलकृत रसमञ्जरी. ... ... ... विरस
विठ्ठलकृत रुक्मिणी स्वयंवर ... ... विरुस्व
विविधज्ञानविस्तार मासिक. ... ... विविमा
विदर्भवीणा. ... ... ... ... विवी
विरहाङ्ककृत वृत्तजातिसमुच्चय. ... ... विवृ
वीरेश्वरकृत गजमुखचरित. .... ... ... वीगच
परशुराम तात्या गोडबोलेकृत वृत्तदर्पण. ... वृद
वेङ्कटाध्वरिकृत लक्ष्मीसहस्र. ... ... वेलस
,, विश्वगुणादर्शचम्पू. ... ... वेविच
शङ्कराचार्यप्रणीत गोविन्दाष्टक. ... ... शगो
शशाङ्क ( बा. मा. दाभाडेकृत ) मालती. ... शमा
शाङ्कर ग्रन्थावलि. ... ... ... शांग्र
शार्ङ्गधरपद्धति. ... ... ... शाप
शिशुपालवध. ... ... ... ... शिशु
श्रीधरस्वामी. ... ... ... ... श्रीस्वा
सहविचार द्वैमासिक. ... ... ... सद्वै
सरपटवार, नारायण माधव. ... ... सनामा
सञ्जीवनी पाक्षिक. ... ... ... सपा
सबनीस पाण्डुरङ्ग जिवाजी. ... .... सपांजि
सरन्जामे रघुनाथ दत्तात्रय. ... ... सरद
वि. ज. सहस्रबुद्धेकृत हुरूप. .... .... सहु
साधुदास. ... ... ... ... सा
सुहृत्चम्पाकृत साधना आणि अितर कविता. साआअिक
साधुदासकृत गृहविहार ... ... ... सागृ

| | |
|---|---|
| साहित्यदर्पण. — | साद |
| साधुदासकृत निर्माल्यसङ्ग्रह. | सानि |
| साधुदासकृत रणविहार. | सार |
| सावरकरकृत रानफुलें. | सारा |
| साधुदासकृत वनविहार. | साव |
| सुगी. | सुगी |
| सुमन्तकृत भावलहरी. | सुभा |
| सुभाषितावलि. | सुभाषि |
| सुमन्तकृत माझे दुर्दिन. | सुमादु |
| सुमन्तकृत मौक्तिकमाला. | सुमौ |
| सुमनहार. | सुहा |
| सूत्रकृताङ्ग. | सूकृ |
| सोहिरोबा अम्बिये यांचा पद्यसङ्ग्रह. | सोआप |
| के. म. सोनाळकरकृत कमलपराग. | सोक |
| सोपानदेव चौधरीकृत काव्यकेतकीनक. | सोका |
| सोपानदेव चौधरी. | सोचौ |
| सोमदेवकृत यशस्तिलकचम्पू. | सोय |
| स्नेहप्रभा. | स्नेप्र |
| स्फूर्ति मासिक. | स्फूमा |
| स्वयम्भूच्छन्द. | स्व |
| माजूस्व पहा. | स्वर |
| वि. प. पण्डितसम्पादित. स्त्रीगायनसङ्ग्रह. | स्त्रीगास |
| हरिचन्द्रकृत धर्मशर्माभ्युदयकाव्य. | हधश |
| हेमचन्द्रकृत छन्दोनुशासन. | हे |
| ज्ञानेश्वर | ज्ञा |
| ज्ञानप्रकाश दैनिक. | ज्ञाप्र |

# छन्दोरचना



## अध्याय १ ला

## काही छन्दोविषयक प्रश्न

" अये कविमनोभवे, सहजसम्भवे स्वामिनी,
सु-वर्णमयदेहिनी, नवरसात्मके, भामिनी,
प्रसाद-मयजीविते, अनुविचारसञ्चारिणी,
चमत्कृतिविलासिनी, रसिकसन्मनोहारिणी ! "

(च ११५)

अशा यथार्थ शब्दांनी ज्या 'कविता-रती'चें आवाहन राजकवि चन्द्रशेखर यांनी केलें आहे तिचा सहवास जितका हृदयङ्गम नि सरस असणार तितकाच तिच्या अवयव-रचनेचा म्हणजे छन्दःशास्त्राचा अभ्यास हा केवळ बुद्धिगम्य आणि रुक्ष वाटणार हें अुघड आहे. काव्यानुभूतीच्या पुढे जर काव्यमीमांसा ही नीरस आणि अनावश्यक वाटते तर पद्याच्या म्हणजे काव्याच्या शरीराच्याच रचनेचा विचार करणारी छन्दो-विचिति ही किती शुष्क आणि व्यर्थ वाटेल ! परन्तु छन्दःशास्त्राचें ज्ञान हें जितपत कवीला अवश्य आहे तितपत रसिक वाचकालाहि आहे. रसिक हा जाणता नि चिकित्सक होण्याला या शास्त्राच्या अभ्यासाचें साह्य होतें. मनुष्यप्राणी हा जसा सहृदय तसाच बुद्धिमानहि आहे. केवळ अनुभव घेअून तो स्वस्थ रहात नाही. अनुभवांचा तुलनात्मक अभ्यास करून मूलभूत नियम शोधून काढण्यांत मनुष्याला पराकाष्ठेचा आनन्द वाटूं शकतो. काही मनुष्यांच्या या शोधक प्रवृत्तीमुळेच विविध शास्त्रें निर्माण झालीं आहेत. छन्दःशास्त्राचीहि अुत्पत्ति अशीच असली पाहिजे.

## १ गद्य आणि पद्य

बहिरङ्गाकडे पाहिल्यास वाङ्मयाचे गद्य[1] आणि पद्य असे दोन प्रकार आढळतात. जें आपल्या नेहमीच्या बोलण्यासारखें ( ∠ गद् ) तें गद्य होय. गद्याचे अर्थपूर्तीच्या अनुरोधाने जे तुकडे पडतात त्यांना वाक्यें म्हणतात. गद्यांत या वाक्यांची लाम्बी किती असावी, आणि त्यांची अक्षररचना कशी असावी याविषयी, म्हणजे वाक्यांत अक्षरांची सङ्ख्या, लघुगुरुक्रम आणि विरामस्थान यांविषयी काही नियम नसतो. अर्थाकडेच लक्ष्य देअून ठिकठिकाणीं न्यूनाधिक विश्राम घेत जें आपण नेहमीच्या बोलण्याप्रमाणे, आणि केलाच तर स्वरांत किञ्चित् चढअुतार करून अुच्चारितों तें गद्य[2] होय. ज्याचे तुकडे म्हणजे पाद वा चरण हे गद्यांतील वाक्यांप्रमाणे अर्थपूर्तीच्या अनुरोधाने पडत नाहीत तर मुख्यत्वें नियमित अन्तराने येणाऱ्या विरामांच्या ठिकाणीं पडतात, आणि ज्याच्या चरणांतील अक्षररचनेला अक्षरसङ्ख्या आणि लगक्रम या गोष्टींत काहीतरी नियम असल्यामुळे जें स्वाभाविकपणेंच अर्थापेक्षा लयीकडे अधिक लक्ष्य देअून अेकन्दरीने सलगपणें, गळ्यावर, काही ठराविकच ठिकाणीं ठराविकच वेळ थाम्बत, म्हटलें जातें तें पद्य होय.

पद्य म्हणजे लयबद्ध अक्षररचना होय. पद्याची काही चाल असावी म्हणून पद्यांत ठराविक लाम्बीचे पाद[3] वा चरण म्हणजे अक्षरावली असतात. गद्याचें सारख्या लाम्बीचे तुकडे पाडून ते अेकाखाली अेक असे माण्डून त्याचें पद्य करितां येअील. पण हें दिखाअू पद्य होअील, त्याला छन्द-पण येणार नाही. लिहिल्यासारखा अुच्चार करीत थोडेसें गळ्यावर म्हणायला लागतांच जें गोड लागतें, आणि जें अन्तर्गत लयबद्धतेमुळे सहज अवगत होतें तेंच खरें पद्य होय. छन्द[4]पण हें या सहज लयबद्धतेंतच असतें.

१ " गद्यं पद्यमिति प्राहुर्वाङ्मयं द्विविधं बुधाः " ( गछ ६/१ )

२ " अनिबद्धं पदवृन्दं तथा चानियताक्षरम्
अथोपेक्षाक्षरयुतं ज्ञेयं चूर्णपदं बुधैः" ( भ १५/३५ )

३ " पादेन संयोगात् पद्यम् " ( हपि ५२ ).

४ " नियताक्षरसम्बन्धं छन्दोयतिसमन्वितम्
निबद्धन्तु पदं ज्ञेयं सतालपतनात्मकम् " ( भ ३२/२९ )

## २ पद्यरचनेचें व्याकरण

छन्दःशास्त्र हें पद्यरचनेचें व्याकरणच होय. हें शास्त्र पद्याच्या घटनेचा म्हणजे लयबद्ध अक्षररचनेचा विचार करितें. व्याकरण हें अर्थपूर्ण शब्द जोडून होणाऱ्या वाक्यांचा आणि त्या वाक्यांच्या घटकांचा विचार करितें तर छन्दःशास्त्र हें लघुगुरु अक्षरांच्या जोडणीने होणाऱ्या चरणांचा आणि ते चरण मिळून होणाऱ्या पद्याचा विचार करितें. व्याकरणाची घटना ही ज्याप्रमाणे वाङ्मयामागून होते त्याचप्रमाणे छन्दःशास्त्राची रचना काव्यनिर्मितीच्या नन्तर होते. वैय्याकरण हा दैनिक बोलींतील आणि लेखी वाङ्मयांतील वाक्प्रयोगांचें समालोचन करून शिष्टजनमान्य अतअेव रूढ अशा मनोगत नियमांना स्पष्ट करून माण्डतो तर छन्दःशास्त्रकार हा पूर्वकालीन कवींच्या कृतींचें पृथक्करण—वर्गीकरण करून कवींनी नकळत अनुसरलेल्या मनोगत छन्दांना स्पष्ट करितो. कवीच्या विविध मनोगत स्वरान्दोलनाला अनुकूल अशी रचना तो अक्षरसङ्ख्या, लगक्रम आणि यति अित्यादिकांनी नियमबद्ध करून ठेवितो. व्याकरणाच्या घटनेनन्तर ज्याप्रमाणे व्याकरणबाह्य प्राचीन प्रयोग हे व्याकरणाच्या पूर्वीचे म्हणून क्षम्य तथापि अननुकरणीय मानण्यांत येतात त्याचप्रमाणे प्राचीन कवींचे छन्दोदोष हे क्षम्य पण अननुकरणीय गणायचे असतात. भाषा ही जिवन्त आहे तोंपर्यंत ती अेखाद्या व्याकरणाने नि कोशाने सर्वथैव बद्ध होअू शकत नाही, आणि तिच्यांत नवनव्या वाक्प्रयोगांची भर पडत राहते; त्याचप्रमाणे काव्य हें जिवन्त आहे तोंपर्यन्त तें ठराविक छन्दःप्रकारांत पूर्णपणें अडकून रहात नाही, तें नवनवे छन्दःप्रयोग करून पाहतें. प्रभावी लेखकांचे नवनवे वाक्प्रयोग परिणामकारक वठल्यास रूढ होतात त्याप्रमाणे कवींचे नवनवे छन्द, कविता सरस आणि चटकदार अुतरल्यास अनुसरिले जाअून रूढ होतात. सुशिक्षितमान्य अतअेव शुद्ध अशा भाषेंत रचना करावयाची असल्यास ज्याप्रमाणे व्याकरणाकडे अवश्यमेव लक्ष्य द्यावें लागतें, त्याचप्रमाणे रूढ नि सहजगम्य अशा छन्दांत सुद्धा शुद्ध रेखीव रचना करावयाची असल्यास त्या छन्दांच्या घटनेचें ज्ञान अवश्य पाहिजे. बोलायला आपण केवळ अनुकरणाने, व्याकरण न शिकतांच, लागतों; पण शुद्धच बोलतों असें नाही. पद्यरचनाहि सहजच मनोगत आन्दोलनानुसार होअू लागते, पण ती रेखीव

नि शुद्ध होतेच असें नाही. व्याकरणाने ज्याप्रमाणे भाषेंतील अमुक शुद्ध नि तमुक अशुद्ध कां हें समजतें नि दुसऱ्याला समजावून देतां येतें त्याप्रमाणे अमुक पद्य शुद्ध कां नि तमुक अशुद्ध कां हें छन्दःशास्त्राने समजतें आणि दुसऱ्याला स्पष्ट दाखवितां येतें. व्याकरण शिकल्याने ज्याप्रमाणे फार तर चार वाक्यें शुद्धपणें बोलतां लिहितां येतील, पण आदर्शभूत जिवन्त गद्य लिहितां येअीलच असें नाही, त्याप्रमाणें छन्दःशास्त्राच्या अभ्यासाने अेक दोन शुद्ध पद्यें अतिक्लिष्ट वृत्तांतहि रचितां येतील, पण सरस प्रवाही काव्य हें निसर्गदत्त प्रतिभेविना, केवळ छन्दःशास्त्राच्या बळाने निर्माण करणें अशक्य आहे. अुत्कृष्ट काव्यरसाला छन्दःशुद्ध पद्याचें घाटदार पात्र अिष्ट आहे, परन्तु रसाची तहान घाटदार सुवर्णपात्राच्या दर्शनाने भागणार नाही. केवळ छन्दःशुद्ध पद्य म्हणजे काव्य नव्हे. पद्य हें काव्याचें केवळ शरीर[1] होय. तें सप्रमाण आणि सुरेख पाहिजेच. पण हें कलेने नटवायचें शरीर रमणीय भावार्थाने सचेतन हेंव; शृङ्गारलेलें कलेवर काय कामाचें ?

## ३ पद्यक्षेत्राचा सङ्कोच

सारस्वताचा म्हणजे संस्मरणीय वाङ्मयाचा आरम्भ पद्यांत होतो आणि काही कालपर्यन्त त्याची वाढहि पद्यांतच होते. मनुष्य हा गायनप्रिय असल्यामुळे काही पद्यरचना म्हणजे गेय शब्दरचना ही आपोआप सम्भवते; अथवा ओढून ताणून काही शब्दरचना गेय होअूं[2] शकते. तिच्याविषयी चमत्कार वाटतो. ती ध्यानांत ठेवावीशी वाटते आणि सहज ध्यानांत रहातेहि. तिचें अनुकरणहि करावेसें वाटतें. पद्य हें सहज तोण्डपाठ होअूं शकतें आणि दीर्घकाळपर्यन्त ध्यानांत राहतें हें पद्याच्या यशाचें अेक मुख्य

---

१ ‘ अिति वृत्तं तु काव्यस्य शरीरं परिकीर्तितम् ’ ( भ २१/१ )

२ अेका चुरमुरे–विक्याने आपलें नेहमीचेंच वाक्य पण मारून-मुटकून ‘सुकुमार असुनि तू फार’ या पद्याच्या चालीवर बसविल्याने मोठें कुतूहल अुत्पन्न करून आत्मप्रसिद्धि मिळविलेली माझ्या पहाण्यांत आहे. त्याचें वाक्य असें,

“ शेङ्गदाणे, गरम चिरमुरे, खारे फुट्टाणे—
फुट्टाणे खारे, चिरमुरे, गरम शेङ्गदाणे ! ”

कारण आहे. मुद्रणकलेच्या शोधापूर्वी आणि विशेषतः लेखनकलेच्या शोधापूर्वी, जेव्हा ज्ञानसंरक्षणाचा सारा भार स्मरणशक्तीवर पडे तेव्हा गद्यरचना क्वचितच होअी. संस्कृतांत वेद, पुराणें, स्मृति अित्यादि ग्रन्थ पद्यांत आहेत आणि आज सुद्धा मराठींत भूगोलव्याकरणाच्या कारिका आढळतात याचें कारण पद्य हें स्मरणसुलभ असतें हेंच होय.

सुधारणेच्या प्रगतीसङ्गे गद्याचें क्षेत्र वाढतें; पण पद्याचा प्रपञ्च अगदीच सम्पुष्टांत येत नाही. पद्याचा अुपयोग काव्यापुरता मर्यादित होतो. याचा अर्थ असा नाही की काव्य गद्यांत असूं शकतच नाही. काव्य रसात्मक, रमणीयार्थ-प्रतिपादक पाहिजे अेवढेंच साहित्याचार्य म्हणतात. गद्यांतहि रमणीय आन्दोलन असतें. अेखाद्या गद्यगङ्गाधराच्या भाषेंत, जेव्हा लेखन अेक प्रकारच्या केवळ समाधींतच झालें असावें असें वाटतें आणि भाषा ही कल्लोलिनीप्रमाणे भरपूर, ओढाळ आणि नादवती होते तेव्हा तींत अेक प्रकारचें श्रेष्ठ गूढ आन्दोलन प्रत्ययास येतें. परन्तु हें आन्दोलन अनियमित असतें. तेंच नियमित, आवर्तनात्मक आणि अनुकरणीय होअूं लागलें की त्याला पद्याचें व्यवस्थित स्वरूप आलें म्हणून समजावें.

## ४ पद्याची काव्यानुकूलता

काव्य जर गद्यांतूनहि प्रगट होअूं शकतें, आणि गद्य हें जर निवेदनाचें स्वाभाविक साधन आहे तर काव्याला तरी पद्याची आवश्यकता कां असावी? वाङ्मयांत जें हृदयङ्गम असतें त्याचा मनावर खोल ठसा अुमटतो. तें वाचतांना आनन्द होतोच परन्तु तेवढ्याने त्याचा सम्बन्ध सुटत नाही. मनुष्याला तें पुनःपुन्हा मनांत घोळून त्या आनन्दाची पुनरावृत्ति करावीशी वाटते. तो भावार्थ जर थोडक्यांत आणि पद्यबद्ध असेल तर तो आठवून मनांत घोळणें सोपें जातें. गद्य हें द्रव मानिलें तर पद्य हें केलासासारखें आहे. केलासाच्या आकृतिसौन्दर्याप्रमाणे पद्याचें बाह्यसौन्दर्य आल्हादकारक वाटते यांत शङ्का नाही, तरी रसास्वादांत मूलतः काही भेद पडत नाही; पद्य हें गद्याहून अधिक सोयीचें आहे अितकेंच. गायनाप्रमाणेच, स्वरांच्या आरोहावरोहाप्रमाणेच लयबद्धता ही भावना अुत्तेजित करण्यास फार अुपयोगी पडते; आणि ती पुन्हा

आकृतिसौन्दर्याप्रमाणेच आनन्ददायक आहे. काव्य ही अेक आनन्द देणारी कला असल्याकारणाने भावार्थाचें मनांत संरक्षण करणारी[1] आणि भावना अुत्तेजित करण्यास साह्य करणारी अेक आनन्ददायक गोष्ट म्हणून पद्य हें काव्याशी संलग्न व्हावें; तें काव्याचें शरीर व्हावें हें योग्यच होय.

## ५ पद्यरचनेची कृत्रिमता

पद्यरचना ही मुळीच कृत्रिम नाही असें मात्र नाही. "तुजविण गमे वृथा संसार" वा "लोळत कच मुखविधुवरि। त्यांसि तोंचि कर निवारि" अशा सारख्या पद्यांचे आरम्भ सहजस्फुरित असूं शकतात. तथापि या अुदाहरणांमध्ये सुद्धा तुजविण, गमे, मुखविधु, कर हे दैनिक-बोलीच्या बाहेरील शब्द आहेत आणि वरि, तोंचि आणि निवारि हीं दैनिक-बोलीबाहेरील रूपें आहेत. या गोष्टी कृत्रिमतेचीच छटा दाखवितात. मग अेकाच ठराविक आन्दोलनाच्या साच्याची सारी दीर्घ कविता प्रतिज्ञापूर्वक रचण्यांत किती कृत्रिमता येत असेल! पद्यरचना अगदी स्वाभाविक आणि सुकर नाही म्हणूनच कवीला अपरिचित शब्द वा रूपें योजण्याची नि प्रसङ्गविशेषीं व्याकरणाच्या नियमांचें अुल्लङ्घन करण्याची मोकळीक असते. ही मोकळीक अल्पतम घेण्यांत आणि कृत्रिमता दिसूं न देण्यांतच कवीचें कौशल्य प्रगट होतें. अभ्यासाने ज्याप्रमाणे व्याकरणशुद्ध रचना करणें स्वाभाविक होतें त्याचप्रमाणे छन्दोबन्धन हें कवीच्या मनवळणीं पडून गेलें की त्याची भाषा आपोआप छन्दोबद्ध नि छन्दःशुद्ध अशी येते. तिच्यांतील कृत्रिमता पार दृष्टी आड होते. निसर्गाचा आभास म्हणजेच कलेचा विलास होय.

पद्याच्या ज्या नियमित आन्दोलनामुळे वाचकाला अेक प्रकारची जागृत तन्द्रा लागून त्या तन्द्रेंत त्याला कवीची यक्षनगरी पहायला मिळते, आणि कवीचा भावनाप्रवाह नियन्त्रित होअून, सारखा चालत राहून त्यांत त्याच्या कल्पनाचक्राला सतत गति मिळते तें पद्याचें नियमित आन्दोलन सर्वच

१ छन्द या शब्दाची सुचविण्यांत आलेली व्युत्पत्ति मोठी बोधप्रद आहे. "छन्दयति आह्लादयति अिति छन्दः" असें कोणी म्हणतो, तर यास्क "मन्त्रा मननात् छन्दांसि छादनात्" या सूत्राने आच्छादन करणारे, रक्षण करणारे ते छन्द, असें म्हणतो.

ललितलेखनकारांच्या प्रकृतीला मानवतें असें नाही. पद्यामुळे कित्येकांची कुचम्बणा होते. पद्य हें लीलेने रचितां येत असलें तरी त्यामुळे कित्येकांची कल्पना कुण्ठित होते. अुदाहरणार्थ, श्री. वि. स. खाण्डेकर हे गद्य नि पद्य सारख्याच लीलेने रचूं शकतात; पण त्यांच्या गद्यांत जसा भावनेचा विकास आणि कल्पनेचा विलास आढळतो तसा तो त्यांच्या पद्यांत दिसत नाही.

## ६ छन्दोज्ञान काव्यप्रेरक नाही, पण काव्यशोधक आहे.

केवळ लगक्रमनिदर्शक चित्र डोळ्यांपुढे ठेअून सरस पद्यरचना करिता येअील काय? नाही. रचनाचित्राच्या साहाय्याने अेखाद्या अपरिचित वृत्तांत कविता लिहावयाचें कवीच्या मनांत आलें तर प्रथम त्याला त्या चित्राप्रमाणे निरर्थक का होअीना पण लघुगुरु ध्वनि गुणगुणून त्या पद्याला काहीतरी चाल लाविली पाहिजे. चाल अमुकच असली पाहिजे असें नाही; परन्तु कोणती तरी चाल मनांत बाणल्यावाचून सुसम्बद्ध पद्यरचना होअूंच शकत नाही असा अनुभव आहे. अुलटपक्षीं स्थूलमानाने अेखादी चाल मनांत बाणली असूनाहि पद्यरचनेकडे मूळचीच थोडीफार प्रवृत्ति असल्याविना पद्य-निर्मिति होअूं शकत नाही. चाल प्रत्यक्ष अैकायला मिळून अवगत झाली आणि स्वाभाविक प्रवृत्तीहि पद्यरचनेकडे असली तरी तेवढ्याने कार्यसिद्धि होत नाही. पद्यरचना होअील; पण अक्षरांचें मात्रामापन जर रेखीवपणाने ध्यानांत राहिलें नसेल आणि ताडून पहायला लगक्रमाचें चित्र जर डोळ्यापुढे नसेल तर झालेली पद्यरचना छन्दःशुद्ध असेलच असें निश्चयाने साङ्गतां येणार नाही.

अेखादी कविता कवीला आपल्या मधुरस्वरांत म्हणून दाखवितां येते आणि ती अैकून श्रोते प्रमुदित होतात अेवढ्याने त्या कवितेची छन्दःशुद्धता सिद्ध होत नाही. गोड स्वराने आपली कविता म्हणून दाखविणाऱ्या कवीची रचना शिथिलच असण्याचा सम्भव असतो हें आश्चर्यकारक वाटलें तरी दुर्दै-वाने अनुभवसिद्ध आहे. गायक कवि हा कोठे दीर्घस्वर ऱ्हस्वच अुच्चारील तर कोठे ऱ्हस्व स्वर लाम्बवून दीर्घ करील; प्रसङ्गविशेषीं दोन तीन अक्षरें न्यून-कालांत द्रुत अुच्चारील तर केव्हा अक्षरांची अुणीव तो निरर्थक स्वर लाम्बवून

भरून काढील; आणि पुन्हा अितर्कें करून आपण काय करीत आहों याची त्याला जाणीव होणार नाही. अैकणाऱ्यांपैकीहि सर्वांनाच ही जाणीव होते असें नाही. ज्याची श्रवणतुला सूक्ष्मवेदी झाली आहे, त्याला मात्र हे दोष जाणवून अुद्वेग वाटल्यावाचून रहात नाही.

“ जेम ण सहअि कणअतुला
तिल तुलिअं अद्ध अद्धेण ।
तेम ण सहअि सवणतुला
अवछन्दं छन्दभङ्गेण ” ( प्रापै १।१० )

अशावेळीं त्या गायक कवीला त्याच्या पद्याचें रचनाचित्र काढून दाखविल्याविना त्याचे दोष त्याला स्पष्टपणें दृग्गोचर होअूं शकत नाहीत. म्हणून छन्दःशास्त्राचें कामापुरतें ज्ञान कवीस अवश्य आहे.

## ७ छन्द आणि चाल

चाल म्हणजे छन्द नव्हे; चाल म्हणजे अेखादा छन्द गळ्यावर म्हणण्याची धाटणी होय. अेका छन्दाला अनेक चाली लावितां येतात; ज्याला चाल स्वाभाविकपणें लागत नाही तो छन्दच होत नाही. छन्द म्हणजे अक्षरांची तालबद्ध जुळणी होय. ही जुळणी तालबद्ध असली की चाल सहज लागते. चालीने विशिष्ट स्वररचनेचा बोध होतो. चाल बदलली की छन्द बदलला असें वाटतें, पण हा निवळ आभास होय. मङ्गलाष्टकांतील

“ लक्ष्मीःकौस्तुभपारिजातकसुराधन्वन्तरिश्चन्द्रमा
गावःकामदुघाः सुरेश्वरगजो रम्भादिदेवाङ्गना
अश्वः सप्तमुखो विषं हरिधनुः शङ्खोऽमृतं चाम्बुधे
रत्नानीह चतुर्दश प्रतिदिनं कुर्युः सदामङ्गलम् ”

हा श्लोक रामरक्षास्तोत्रांतील

“ रामो राजमणिः सदा विजयते रामं रमेशं भजे
रामेणाभिहता निशाचरचमू रामाय तस्मै नमः

रामान्नास्ति परायणं परतरं रामस्य दासोस्म्यहम्
रामे चित्तलयः सदा भवतु मे भो राम मामुद्धर ”

या रामनामाचीं विभक्तिरूपें साङ्गणाऱ्या सुप्रसिद्ध श्लोकापेक्षा निराळ्या चालीवर म्हणण्यांत येतो, पण वस्तुतः दोन्ही श्लोक शार्दूलविक्रीडित नावाच्या अेकाच वृत्तांतील आहेत. फार कशाला, ज्या श्लोकाचे चारी चरण अगदी सारखे असतात त्या श्लोकांतहि दुसरा चरण पहिल्या चरणाहून किञ्चित् निराळ्या रीतीने म्हटला जातो.[1] भूपाळी, लावणी या चाली आहेत, या भिन्न-भिन्न जाती नव्हत. ‘घनश्याम सुन्दरा श्रीधरा अरुणोदय झाला’ ही होनाजी बाळाची सुप्रसिद्ध भूपाळी लावणीसारखी म्हणतां येअील, तर अुलटपक्षीं प्रभाकराची ‘कधि ग भेटशिल अता जिवाचे जिवलग मैतरणी’ ही लावणी थेट भूपाळीसारखी म्हणतां येअील. आंतील विषयाला अनुकूल अशी चाल पद्याला लाविल्याने पद्याच्या सरसतेंत भर पडते. वैचित्र्याच्या रसपरिपोषक सूक्ष्म छटा या श्रुतिसिद्ध कवीच्या रचनेंत जशा येअूं शकतात तशा त्या धोपटमार्गी कवीच्या रचनेंत येअूं शकत नाहीत.

## ८ काव्यपठन आणि गायन

छन्दाला चाल लागत असली तरी छन्द वा काव्य म्हणजे सङ्गीत नव्हे. छन्द म्हणजे लयबद्ध अक्षररचना होय. ही अक्षरशः पहातां अष्टमात्रक, सप्तमात्रक, षण्मात्रक, पञ्चमात्रक आणि चतुर्मात्रक अशा आवर्तनाची असते. परन्तु गायकी तालांची सङ्ख्या पाचच आहे असें नाही. अक्षरशः पहातां भिन्न तालांत बसणारें पद्य गवअी मात्रा जुळवून घेअून निराळ्याच तालांत

१ पहिल्या व तिसऱ्या चरणांचा न्यास बहुतेक वृत्तांत ऋषभ स्वरावर होतो तर दुसऱ्या व चौथ्या चरणांचा न्यास षड्जावर होतो. अुदाहरणार्थ, अिन्द्रवज्रा म्हणतांना पहिल्या चरणांत सा सा रे ग म प म ग रे सा रे असा स्वरक्रम असतो तर दुसऱ्या चरणांत ग ग रे सा नि नि रे ग रे सा सा असा स्वरक्रम होतो; पण छन्दोदृष्ट्या दोन्ही चरण अभिन्नच असतात. अुलटपक्षीं स्वागता आणि रथोद्धता ही वृत्तें भिन्न भिन्न आहेत तथापि त्यांचें स्वरलेखन अेकच आहे. प्रो. ग. ह. रानडे यांचा लेख पहा. ( भारतीय सङ्गीत ३/२ )

म्हणूं शकतो. गायनांत त्याला तालाची चमत्कृति करूनहि विस्ताराने विविधता साधीत अेक विशिष्ट स्वरांचा थाट प्रतीत करून द्यावयाचा असतो. गायनाचें स्वारस्य अर्थापेक्षा सुरावटीवर, आलापावर आणि विस्तारावर अधिक अवलम्बून असतें. अर्थबोध मुळींच झाला नाही तरी रस अुत्पन्न होअूं शकतो. मनाला मोहनी पडते. असें नसतें तर अर्थशून्य तराणे कोणी गाअिलेहि नसते आणि कोणी अैकिलेहि नसते.

गीत म्हणून जो लघुकाव्यप्रकार कल्पिला आहे त्यांत अर्थस्वारस्य नि स्वरलालित्य हे गुण तुल्यबल असावे लागतात. रचना साधी, सोपी आणि सरळ असून घोळून घोळून म्हणायला आणि विस्तार करायला अनुकूल अशी असावी लागते. मराठी सङ्गीतनाटकांत मञ्जुळ चालींवर लिहिलेलीं लघुपद्यें अगणित असलीं तरी 'तुजविण गमे वृथा संसार'सारखी गीत या नावाला शोभतील अशीं फारच थोडीं आहेत. आणि हें गीत सुद्धा घोळून घोळून घटिका दोन घटिका म्हणायला जमणार नाही. यावरून अर्थस्वारस्य आणि गेयता हे दोन्ही गुण तुल्यबल ठेअून रचना करणें किती कठिण आहे हें स्पष्टपणें दिसून येतें. ज्या गीतांत सुरावट अधिक मोहक का अर्थ अधिक हृदयङ्गम हें साङ्गणें कठिण जातें अशीं गीतें रचून तीं योग्य पद्धतीने गाअून दाखवितां यायला, म्हणजे वाग्गेयकार व्हायला सङ्गीताचें ज्ञान अपरिहार्य आहे.[1] परन्तु कवीला वा रसिक वाचकाला या ज्ञानाची मुळींच

---

१ "प्रार्थना, वेदपठन, धार्मिक मन्त्र, पोथीवाचन, वृत्तरचना, दिण्डी, साकी, दोहा, पोवाडा, गळ्यावरचीं गाणीं, अभङ्ग, ठुमरी, टप्पा, धृपद, धमार, ख्याल अशा चढत्या क्रमाने लोकगानांतून शास्त्रीय गायनामध्ये सङ्गीताचें परिवर्तन झाल्याचें दिसून येतें. लोकगानाची सर्वांत अखेरची पायरी म्हणजे गणवृत्त अथवा मात्रावृत्त याचें गायन होय. अशा गानांत जास्तीत जास्ती नअू स्वर येतात. अशा गानांत बरेंचसें गेयत्व दिसतें. पण शास्त्रीय सङ्गीताप्रमाणे रागत्व किंवा ठराविक असा अेखादा राग निर्माण होत नाही. लोकगान व शास्त्रीय गायन यांमध्ये पहिल्यांत तालाचा अभाव असतो. पोवाडा हा लोकगान व भावनाप्रधान जोरदार भाषण यांमधील दुवा आहे." प्रो. ग. ह. रानडे ( पहा भारतीय सङ्गीत ३/२ ).

आवश्यकता नाही. कवितेंत अर्थाच्या रमणीयतेला प्राधान्य आहे. आपल्या कविता गळ्यावर म्हणून दाखविणारा कवि म्हणजे वाग्गेयकार नव्हे.

### ९ काव्य आणि गायन यांचें परस्परप्रमाण

प्रत्येक कवितेगणिक अेक ठराविक लाम्बीची रेषा घेअून, तिच्यांतील स्वरलालित्य आणि अर्थस्वारस्य यांच्या प्रमाणांत त्या रेषेचे दोन भाग केले, स्वरलालित्याचा भाग बिन्दुमालेने दाखविला, अर्थस्वारस्याचा भाग सलगरेषेने दाखविला आणि मग या साऱ्या रेषा शेजारीं शेजारीं अर्थ-स्वारस्याच्या चढत्या वा अुतरत्या प्रमाणाने रचिल्या की काव्याचें क्षेत्र गीतापासून ते ओवीपर्यन्त म्हणजे




जवंळजवळ गद्यच अशा पद्यापर्यन्त कसें पसरलें आहे हें स्पष्टपणें दिसून येते. गेयता आणि अर्थस्वारस्य यांचें अेकमेकाशीं प्रमाण व्यस्तच दिसतें. गेयपद्यांत अर्थस्वारस्य कमी होत होत शेवटीं तराण्यांत अर्थ लुप्त होतो, तर काव्यांत गेयता कमी होत होत शेवटीं ग्रान्थिक ओवींत वा चूर्णिकेंत छन्दपण नाहीसें होतें.

यावरून काव्यक्षेत्रांत गायनाचें वर्चस्व कसें नाही आणि तें कां असूं नये हें स्पष्ट होअील.

### १० चाल कशी असावी ?

काव्यरसाला क्लिष्ट स्वररचनांची आवश्यकता सुतराम् नाही. गायनांत अक्ष-रांची पाहिजे त्या तालांत वाटणी, गवअी आपल्या कुशल लहरीप्रमाणे करूं

१ "गायनामध्ये येणाऱ्या स्वरांची सङ्ख्या व त्यांचें सूक्ष्मत्व जसजसें वाढत जातें तसतसा भाषाप्रयोग अधिक आखूड होत जावून शेवटीं त्याचें महत्त्व पार नाहीसें झाल्याचें दिसून येतें. लोकगानांत रसाचा सम्भव सर्वस्वी शब्दनिष्ठ तर शास्त्रीय गायनांत तो सर्वस्वी स्वरनिष्ठ होअूं लागतो." प्रो. ग. ह. रानडे ( भारतीय सङ्-गीत ३/२ )

शकत असला तरी सामान्यतः चाल लावतांना, कवीचें पद्य सरळ वाचीत गेल्याने जो लय, जो तोल, जो ताल प्रतीत होतो, जो केवळ अक्षरानुसारी असतो तोच घ्यावयाचा असतो. या अक्षरानुसारी तालांत पद्य लगक्रमाप्रमाणें सरळ थोडेसें गळ्यावर म्हणत गेलें असतां जी चाल, जी स्वररचना आपोआप लयबद्ध आणि श्रुतिसुखद वाटते ती काव्यास अनुकूल, आणि रसास्वादास पुरेशी समजावी.

प्रसिद्ध वृत्तांच्या चाली परम्परेने आल्या आहेत. त्या कानावर पडून पडून सहज अवगत होतात. त्या बळेंच प्रयत्नाने बसवाव्या लागत नाहीत. तेव्हा अेखाद्या अपरिचित पद्यप्रकारास चाल लावायची झाली तर ती साधी नि सुलभ लावावी. ती अमुकच अेक असली पाहिजे असें नाही. पण दोनचारदा कानावर पडली असतां ती अवगत व्हावी, तिचें सहज अनुकरण करितां यावें अितकी ती साधी नि सुलभ असावी. अर्थावरून लक्ष्य अुडून तें स्वरलालित्यांत गुरफटेल अशी चाल काव्याला अगदी कामाची नाही.

## ११ पद्यप्रकार रूढ कसा होतो ?

अेखाद्या पद्यप्रकारांत अेखादी चटकदार कविता रचण्यांत आलेली दिसली आणि त्यांतून त्या कवितेला चित्ताकर्षक चाल लाविलेली अैकण्यांत आली की ताबडतोब अनुकरण व्हायला लागून तो पद्यप्रकार कविमान्य आणि रूढ होतो. ‘ अुद्धवा, शान्तवन कर जा ’ हें प्राचीन पद सुप्रसिद्ध असलें तरी आधुनिक मराठी कवितेंत या अुद्धवजातीची टूम ही गोविन्दाग्रजकृत ‘ राजहंस माझा निजला ’ याच कवितेने पाडली. मुद्रिका ही जाति ताम्बेकृत ‘ तू हुबेहूब साअुली त्याच मूर्तिची’ या कवितेमुळे कविप्रिय झाली; आणि ‘ मुद्रिके, राम टाकुनी अलिस तू कशी ’ या मूळ पद्याचें पहिलें कडवेंहि ज्यांना पुरतें ठाअूक नव्हतें असे कवि ‘ तू हुबेहूब साअुली’च्या चालीवर कविता रचून शिरोभागीं ‘चाल, मुद्रिके राम टाकुनी० या पदाची’ अशी सूचना देअूं लागले ! काहीतरी कारणाने कवीला अेखाद्या कवितेच्या चालीची चटक लागावी लागते म्हणजे मग तो त्या धाटणीच्या कविता रचितो. यामुळेच तर छन्दःशास्त्रांत वृत्तें अगणित दिसत असलीं तरी कविप्रिय आणि प्रचलित अशी थोडींच होतात.

## १२ अपठनीय पद्य म्हणजे विकृत गद्य होय.

अेखादें पद्य थोडेसें गळ्यावर म्हणण्याचा प्रयत्न करूनहि त्याला चाल लागली नाही तर तें म्हणावेसेंच वाटत नाही; आणि तें गुणगुणावेसेंच वाटलें नाही तर प्रायः त्या प्रकारची काव्यरचना पुन्हा होत नाही. संस्कृत छन्दः-शास्त्रांतील कित्येक वृत्तांचीं अुदाहरणें सुप्रसिद्ध कवींच्या कृतींत आढळत नाहींत अथवा अत्यन्त वैरल्याने आढळतात याचें मुख्य कारण हेंच की त्यांना अेखादी मधुर चाल सहज नि सरळ लागूं शकत नाही. झळझळीत गद्य गद्या-प्रमाणे वाचतांना काही वाटत नाही पण दिखाअू पद्य गद्याप्रमाणें वाचायची पाळी आली की तें असह्य होतें. वाटेल त्या वृत्तांत, मग तें कितीहि क्लिष्ट नि विचित्र असो, पद्यरचना करून लोकांना चकित करावयाचेंच अशा प्रतिज्ञेने कष्टणाऱ्या काव्यकोल्हाट्यावाचून कोणी क्लिष्ट आणि चमत्कारिक वृत्तांत रचना करण्याचा भयङ्कर खटाटोप करणार नाही.

## १३ रचनाशैथिल्याची अिष्टानिष्टता

हदग्यांच्या गाण्यांसारखीं परम्पराप्राप्त अशीं जीं लोकगीतें आहेत त्यांची रचना अतिशय शिथिल आहे. परन्तु त्यांच्या चाली परम्परेने जिवन्त ठेवि-ल्यामुळे रचनेचें शैथिल्य हें वाच्य कवितेला जसें घातक होतें तसें तें या पर-म्पराप्राप्त गीतांना होअूं शकत नाही. त्यांतून, त्यांचा सम्बन्ध हा अजाण वयाशी वा अशिक्षित वर्गाशी येत असल्यामुळे हें शैथिल्य वैरस्यकारक होत नाही. ही शिथिलरचना असंस्कृत लोकांच्या हातून वा छन्दःशास्त्राच्या पूर्वीच्या कालांत झालेली आहे हेंहि विसरून चालणार नाही. मुलांसाठी लिहिलेल्या काही आधुनिक पद्यांत हें शैथिल्य आढळतें; आणि तेथे बालबोलांतील बोबडेपणा-अितकेंच तें हृदयङ्गम वाटतें, पहा.

अेक होता मुलगा
त्याला सापडला हुलगा
हुलग्याची केली उसळ
जेवायला आलें मुसळ १

मुसळ झालें खूश
त्याला भेटली घूस
घुशीने केलें बीळ
त्यांत साठविले तीळ २

तिळाचें काढलें तेल
भज्यांची रेलचेल
तोण्डाला सुटलें पाणी
खाली अधाशावाणी ३

भजीं खाल्लीं फार
आओीने दिला मार
पोट गेलें फुगून
घूस गेली निघून ४

आनन्द मासिक, ( सप्टेम्बर १९०७ पृ. ५५ )

असेंच दुसरें अेक गाणें ' टाळ्या बाओी टाळ्या ' हें आनन्दाच्या १९१९ च्या फेब्रुवारीच्या अङ्कांत २११ पृष्ठावर आहे.

दोन तीन सुप्रसिद्ध आधुनिक गीतांत हें शैथिल्य सहेतुकपणें योजिलेलें दिसतें:—

( १ ) " गेलें तुझ्यावर जडून्, रामा मन गेलें तुझ्यावर जडून् ध्रु०
किति नटून् सजून् मी आलें !
किति अलङ्कार हे ल्यालें !
किति नाजूक गेलें बाओी होओून् ? " ( काग ८६ )

( २ ) " आला खुशींत समिन्दर, त्याला नाही धिर, होडीला देओिना ठरूं,
ग सजणे, होडीला बघतो धरूं ! ध्रु०
हिरवं हिरवं पाचूवाणी जळ,
सफेत फेसाचि वर खळबळ,
माशावाणी काळजाचि तळमळ,
माझी होडी समिन्दर, ओढी खालीवर, पाण्यावर देओिना ठरूं,
ग सजणे, होडीला बघतो धरूं " ( चारा ५५ )

( ३ ) " राना-रानांत गेली बाओी शीळ ! ! ध्रु०
राया, तुला रे काळयेळ नाही,
राया, तुला रे ताळमेळ नाही,
थोर राया, तुझ रे कुळशील ! " ( ओ २६ )

या गीतांपैकी पहिल्या गीतांत प्राचीन परम्पराप्राप्त स्त्रीगीतांच्या धाटणीचें अनुकरण आहे म्हणून, आणि दुसऱ्या आणि तिसऱ्या गीतांत भाषाच खेडवळ

आहे म्हणून हें शैथिल्य निषिद्ध वाटत नाही किम्बहुना थोडें अुचितच वाटतें. परन्तु हीं गीतें हृदयङ्गम वाटतात तीं या शैथिल्यामुळे मात्र नव्हे, या गीतांच्या गोड चटकदार चालींमुळेहि नव्हे तर या गीतांत भावार्थच तसा रमणीय आहे म्हणून. परन्तु यांच्या लोकप्रियतेचें रहस्य या शैथिल्यांत, ऱ्हस्वदीर्घांच्या प्रसरणसङ्कोचनांत आहे अशा भ्रामक समजुतीने या शैथिल्याचेंच अनुकरण होअूं पहात आहे! वस्तुतः आधुनिक भाषासंस्कृतीच्या काळांत असें शैथिल्य वैरस्यकारकच होतें.

अक्षरांचे हाल करून, पद्यास मारूनमुटकून चाल लाविली तरी विरस होतो; आणि पद्यास चाल लागूंच शकली नाही तर अपेक्षाभङ्ग होअून, ना धड गद्य ना धड पद्य असें काहीतरी मिश्रण वाचल्यासारखें वाटतें. लिखिताप्रमाणे सरळ अुच्चार करून वाचतां वाचतां ज्याची चाल लागते तें पद्य अिष्ट होय; आणि पद्यांतील शब्दांचें अुच्चारानुसारी लेखन हें गद्यांतील त्या शब्दांच्या लेखनाशी होतां होअील तितकें जुळतें असावें. आधुनिक मराठी कवितेंत, ‘फुलांची पखरण’ ( केक ८१ ), ‘फुलपाखरूं’ ( केक ९२ ) आणि ‘गुलाबाची कळी’ ( केक १८५ ) या तीन केशवसुतांच्या कवितांची चाल नीट लागत नाही. हीच स्थिति बीकृत ‘वेडगाणें’ ( फुओ ११ ) आणि ‘चाफा’ ( फुओ ३५ ) या कवितांची आहे, अुदाहरणार्थ पहा.

( १ ) “ टिप् फुलें टिप्! माझे गडे ग ! टिप् फुलें टिप्!
पहा फुलांचि पखरण झिप् ध्रु०
किति सुखाचि सकाळ
किति मौजेची ही वेळ
दिशा या फाकती
फुलें ही फुलती
पक्षी हे बोलती
सगळ्याही सृष्टीने पहा निद्रा ती टाकिली
प्रीती ती आशेसङ्गे खेळाया लागली
तर आनन्दें या झाडाखाली
टिप् फुलें टिप्! ( केक ८१ )

(२) "टला ट रीला री—ग
जन म्हणे काव्य करणारी !
आकाशाचीं घरें
त्याला प्रकाशाचीं दारें
ग्रहमालांच्या वर अडसरी—ग
जन म्हणे काव्य करणारी !" (फुओ ११)

## १४ लय म्हणजे काय ?

पद्याला कोणतीहि चाल लाविली तरी चालते. चालीने विशिष्ट स्वरक्रमाचाच बोध होतो. गळ्यावर पद्यच काय गद्यहि म्हणतां येतें. तेव्हा पद्य म्हणजे लयबद्ध पद्यरचना होय. आता लय म्हणजे काय याचा विचार केला पाहिजे. पुढील कविता म्हणून पहाः—

"। कशासाठी। पोटासाठी
। खण्डाळ्याच्या। घाटासाठी
। चला खेळूं। आगगाडी
। झोका अुन्च। कोण काढी ?
। बाळू, नीट। कडी धर
। झोका चाले। खालीवर
। अैका, कूकुक्। शीट झाली
। बोगद्यांत। गाडी आली
। खडखड। भकभक
। अन्धारांत। लखलख" (स्वर १०६)

ही कविता म्हटलेली अैकत असतांना स्वाभाविकपणेंच आपण मधून मधून टाळी वाजवीत रहातों; आणि कविता सम्पली तरी अेकदोनदा टाळी पुढे वाजवितोंच. कारण, कविता अमुक अेक ठिकाणीं सम्पणार आहे हें म्हणणाऱ्याला ठाअूक असलें तरी अैकणाऱ्याला ठाअूक नसतें. तो आपल्या तन्द्रींत, लागलेल्या लयांत टाळी देतच राहतो. गायनाचे वेळीं तबला वाजविणाऱ्याची हीच स्थिति होते म्हणून, काही गवअी गाणें सम्पत आलें की तब्ल्यावर हात ठेअून तबल्जीला योग्य वेळीं थाम्बवितात.

टाळी वाजवीत रहावें असें कां वाटतें? म्हटलेल्या गोष्टीचे समदीर्घ तुकडे पडून तुकड्यातुकड्यांनी आपल्याला त्या म्हणण्याची जाणीव होते म्हणून. हे तुकडे घाअीने म्हणजे द्रुत अुच्चारिले जावोत, वा सावकाश म्हणजे विलम्बित अुच्चारिले जावोत, ते तुकडे परस्पराशीं तुलना केली असतां सारख्या काळांत अुच्चारिले जातात. अेक तुकडा तीन पळांत अुचारिला गेला तर प्रत्येक तीन-तीनच पळांत अुच्चारिला जातो; अेका तुकड्याला जर चार पळें लागलीं तर प्रत्येक तुकड्याला चार-चारच पळें लागतात. तेव्हा अेक तुकडा अुच्चारायला किती वेळ लागतो या गोष्टीला महत्त्व नसून सारे तुकडे सारख्याच वेळांत अुच्चारिले जातात ही गोष्ट महत्त्वाची आहे.

आता अेखादा तुकडा, आणि जीं अक्षरें मिळून तो होतो तीं अक्षरें यांचा काय सम्बन्ध आहे तो पाहणें अवश्य आहे.

ज्या अक्षरावर टाळी पडते त्या अक्षराच्या मागे अुभी रेघ दिली आहे. यावरून दिसून येअील की सारे तुकडे चारचार अक्षरांचे आहेत. प्रत्येक चरणांत दोन तुकडे म्हणजे आठ अक्षरें आहेत. सारे तुकडे सारख्याच कालखण्डांत अुच्चारिले जातात; मग तो लागणारा कालखण्ड ऱ्हस्व असो वा दीर्घ असो. आता अशा रीतीने अेका तुकड्याला लागणाऱ्या वेळाची वाटणी चार अक्षरां-च्यामध्ये कशी होते? ही वाटणी अगदी सारखी होते; प्रत्येक अक्षर स्थूलमानाने सारख्याच काळांत अुच्चारिलें जातें.

आपल्या नेहमीच्या बोलण्यांत आपण सारीं अक्षरें सारख्याच वेळांत अुच्चारितों काय? नाही. काही अक्षरें अुच्चारायला थोडा वेळ पुरतो, काही अक्षरें अुच्चारायला अधिक वेळ लागतो. सध्या स्थूलमानाने अक्षरांचे दोन वर्ग कल्पून जीं अक्षरें अुच्चारायला थोडा वेळ पुरतो त्यांना **लघु** म्हणूं; आणि ज्यांना अुच्चारायला अधिक वेळ लागतो त्यांना **गुरु** म्हणूं. त्यांचें म्हणजे लघु-गुरूचें अेकमेकाशीं प्रमाण काय असतें याचा विचार मागाहून करूं, पण गद्यांत लघुगुरु-भेद असतो तो वर दिलेलें पद्य म्हणतांना आपण पाळीत नाही. हें पद्य म्हण-तांना आपण सारीं अक्षरें सारख्याच वेळांत म्हटलीं. पद्य आणि गद्य यांच्यामध्ये जो भेद आहे, त्या भेदाचाच हा अेक प्रकार आहे. सारीं अक्षरें सार-ख्याच वेळांत अुच्चारणें हें नेहमीच्या वहिवाटीहून वेगळें आणि म्हणून अस्वा-

भाविक असलें तरी तेवढ्यापुरतें तें आनन्ददायक होतें. पूर्वीपासून जें चालत आलें आहे त्याचा त्याग अेकाअेकीं अविचारें करूं नये.

या पद्याचें लक्षण कसें साङ्गतां येअील ? ज्या पद्यवर्गात सारीं अक्षरें सारख्याच कालांत अुच्चारायचीं असतात त्या वर्गातील हें पद्य असून, यांतील प्रत्येक चरण आठ अक्षरांचा आहे, आणि प्रत्येक चरणाचे चारचार अक्षरांचे असे दोन तुकडे पडतात. या पद्याला चतुरक्षरावर्तनी अष्टाक्षरी म्हणतां येअील. या लगत्वभेदातीत पद्यप्रकाराला छन्द् म्हणतात.

आगगाडींतून जातांना होणाऱ्या खडखडाटांत दोन प्रकारच्या आवर्तनांची जाणीव होते. केव्हा खडखड, खडखड, खडखड, खडखड असा ध्वनि होतो असें वाटतें; तर केव्हा खडड, खडड, खडड, खडड असा ध्वनि होतो असेंहि वाटतें. पहिल्या प्रकारच्या खडखडाटांत चतुरक्षरी आवर्तन असतें, तर दुसऱ्या प्रकारांत त्र्यक्षरी आवर्तन होतें. पुढील कवितेंत त्र्यक्षरी आवर्तन आहे.

“ । धडाड । धडाड
। खडाड । खडाड
। धावते । ही गाडी
। केवढी । धडाडी
। खाअून । रगड
। काजळी । दगड
। पाण्याचे । रान्जण
। घोटांत । पिअून
। फुस्फुसे । नागीण
। वाऱ्याची । बहीण ” ( स्वर १११ )

या पद्यांत जाणीव तीनतीन अक्षरांच्या तुकड्यातुकड्यांनी होते. प्रत्येक चरणांत दोन तुकडे आहेत. सारीं अक्षरें सारख्याच काळांत अुच्चारिलीं जातात. या पद्यप्रकाराला त्र्यक्षरावर्तनी षडक्षरी छन्द म्हणतां येअील.

अशा प्रकारच्या कोणत्याहि पद्यांत, मग तुकडे चारचार अक्षरांचे पडोत वा तीनतीन अक्षरांचे पडोत, सारींच अक्षरें सारख्या काळांत अुच्चारिलीं जातात;

परन्तु अेका पद्यांतील चार-अक्षरी तुकडा म्हणायला अेखाद्याला जितका वेळ लागतो तितकाच वेळ दुसरा कोणी दुसरें पद्य म्हणतांना तीन-अक्षरी तुकड्यासाठीहि घेअू शकेल. म्हणजे काय, सारीं अक्षरें जरी सारख्याच वेळांत अुच्चारायचीं असलीं तरी अेकाला अेका पद्यांतील अेक अक्षर अुच्चारायला लागणारा वेळ हा दुसऱ्याला दुसऱ्या पद्यांतील अेक अक्षर अुच्चारायला लागणाऱ्या वेळाहून न्यूनाधिक असू शकेल. मग कालमापनाचें काही परिमाण निश्चित करितां येअील की नाही ? येअील; पण तें परिमाण त्या त्या म्हणणाऱ्यापुरतें आणि पद्यापुरतें मर्यादित राहील. मग परिणाम हें व्यक्तिनिरपेक्ष कसें होअील ? तसें व्हायला तें पद्यविभागनिविष्ट केलें पाहिजे.

छन्दांत सारींच अक्षरें सारख्या वेळांत अुच्चारायचीं असतात; तेव्हा, अेक अक्षर अुच्चारायला लागणाऱ्या काळाला अेक मात्रा कां म्हणूं नये ? आणि मागे दिलेल्या पद्यांपैकी पहिल्या पद्याला चतुर्मात्रकावर्तनी आणि दुसऱ्या पद्याला त्रिमात्रकावर्तनी कां गणूं नये ? तसें करायला सकृद्दर्शनीं काही अडचण दिसत नसली तरी, अेक गोष्ट विचारांत घेतल्याविना गत्यन्तर नाही.

। “सारखी किति । वेळ
। अैकूं ये ती । शीळ
। किती मी पा-। हिलें
। अितकेंची दे-। खिलें
। अुरांत धड-। धडे
। धावतां मी । पडे” (तासक ८०)

याप्रमाणे या छन्दांच्या प्राचीन रचनेंत कित्येकदा मध्येच अेका अक्षराच्या ठिकाणीं दोन अक्षरें आढळतात. अर्थातच छन्द कितीहि घाअीने म्हटला, प्रत्येक अक्षर म्हणायला लागणारा वेळ कितीहि आखूड केला तरी तो वेळ, क्वचित् प्रसङ्गीं त्यांत दोन अक्षरें अतिशय द्रुत, पण म्हणतां येतील अितका घेतला पाहिजे. म्हणजे, अत्यन्त घाअीने म्हटलेल्या अक्षराला जो ऱ्हस्वतम वेळ लागेल तो अेक मात्रेचा असें परिमाण कल्पिलें तर छन्दांतील प्रत्येक अक्षर द्विमात्रक होअील, आणि छन्द हे अष्टमात्रकावर्तनी वा षण्मात्रकावर्तनी होतील.

## १५ छन्द अस्वाभाविक आणि नियमविरुद्ध नाही.

छन्दाची ही रचना कित्येकांना शिथिल आणि अनिष्ट वाटते; कारण, त्यांच्या मतें बोलण्याच्या भाषेंत लघु-गुरुभेद असतांना पद्यांत तो नष्ट करणें, आणि सारीं अक्षरें सारख्याच वेळांत अुच्चारणें हें कर्णकटु, अस्वाभाविक आणि नियमविरुद्ध आहे. परन्तु काही मर्यादित क्षेत्रांत छन्द हा कर्णकटु लागत नाही ही गोष्ट अनुभवसिद्ध आहे. छन्द म्हटल्याक्षणीं सारीं अक्षरें सारख्या काळांत अुच्चारायचीं हा नियमच होतो. तेव्हा या नियमाचें जोंपर्यन्त अुल्लङ्घन होत नाही तोंपर्यन्त छन्दांत नियमविरुद्ध, अशास्त्रीय असें काही नाही. छन्द हा अितर पद्यरचनेअितकाच स्वाभाविक आहे; कारण छान्दिष्टपणाने अहंप्रवर्तित दण्डक म्हणून कोणी हा छन्द समाजावर लादलेला दिसत नाही. तो कवींच्या मनोगत आन्दोलनानुसारच अुत्पन्न झालेला आहे. नेहमीच्या भाषणांत आढळणारा लघुगुरुभेद त्यांत पाळला जात नाही अेवढ्याच साठी तो अस्वाभाविक आहे असें म्हणायचें झाल्यास तशा रीतीचा दोषारोप अितर पद्यप्रकारांच्यावरहि होअू शकतो. कारण, गद्यभाषणांत लघुगुरुभेद असला तरी त्यांच्या कालांचें प्रमाण पद्यांतील लघु-गुरूंच्या कालांच्या प्रमाणासारखें रेखीव, म्हणजे गुरु-अक्षर अुच्चारायला लघु-अक्षराच्या दुप्पटच काळ लागतो असें नसतें. तेव्हा छन्द हा अितर पद्यप्रकाराअितकाच कृत्रिम वा स्वाभाविक आहे. तो आनन्ददायक आहे म्हणूनच त्याच्यांतील कृत्रिमता केंव्हा केंव्हा डोळ्यांवर आली तरी ती क्षम्य ठरते. अितर पद्यप्रकार हे छन्दापेक्षा लगत्वभेदाला अधिक अनुसरतात म्हणून अधिक स्वाभाविक नि आल्हादकारक वाटत असतील, तर छन्द हे रचनासौकर्यामुळे केव्हा केव्हा अधिक अिष्ट नि श्रेयस्कर वाटतात.

छन्दांत प्रत्येक अक्षर द्विमात्रक असल्याने छन्द अष्टमात्रकावर्तनी आणि षण्मात्रकावर्तनीच असू शकतात; परन्तु वृत्त आणि जाति या अितरप्रकारांत लघूची अेक मात्रा आणि गुरूच्या दोन मात्रा असें गणित असल्याने आवर्तन सात वा पाच या विषममात्रांचेंहि असू शकतें. अष्टमात्रक, सप्तमात्रक, षण्मात्रक आणि पञ्चमात्रक आवर्तनांच्या वृत्तांना अनुक्रमें **पद्मावर्तनी, अग्न्यावर्तनी, भृङ्गावर्तनी** आणि **हरावर्तनी** म्हणावें.

## १६ पद्यप्रवाहाची दिशा

पद्यरचनेच्या प्रवाहाकडे पाहिलें तर असें दिसून येतें की ओघ नकळत आलेल्या बहुविधतेकडून अेकरूपतेकडे वळतो, आणि नन्तर अेकरूपता कण्टाळवाणी वाटूं लागते म्हणूनच की काय, तो सहेतुकपणें सम्मिश्रणाकडे वळतो. छन्दःशास्त्रापूर्वी, कवी जेव्हा केवळ मनोगत आन्दोलनाला स्थूलमानाने अनुसरीत तेव्हा त्यांच्या रचनेंतील सारे चरण अगदी अेकसारखे येत नसत. अुदाहरणार्थ,

"अमी च त्वां धृतराष्ट्रस्य पुत्राः
सर्वे सहैवावनिपालसङ्घैः
भीष्मो द्रोणः सूतपुत्रस्तथासौ
सहास्मदीयैरपि योधमुख्यैः" (भगी ११/२६)

या चारी चरणांत अक्षरांची सङ्ख्या अकराच असली तरी लगक्रम वेगवेगळा आहे. पहिल्या चरणांतील आद्याक्षर लघु आहे तें गुरु असतें तर तो वातोर्मीचा चरण झाला असता; दुसरा चरण अिन्द्रवज्राचा, तिसरा शालिनीचा आणि चौथा अुपेन्द्रवज्राचा आहे. या श्लोकांतील चारी चरण समाक्षरक असले तरी

"आर्द्रं तृणं प्राप्य निवर्ततेऽग्नि-
र्गिरिकूटमासाद्य निवर्तते शरः।
वज्रं महीं प्राप्य अधः प्रयाति
अप्राप्य शान्तममृतं न निवर्ततेऽयम्॥ (लवि २१/पृ ३८९)

या श्लोकांत दुसरा चरण तेरा-अक्षरी सुदन्तवृत्ताचा असून चौथा चरण चौदा-अक्षरी वसन्ततिलकावृत्ताचा आहे.

संस्कृतांतील त्रिष्टुभ्‌जगतीपासूनच अिन्द्रवज्रा, उपेन्द्रवज्रा, शालिनी, वातोर्मि, वंशस्थ, रुचिरा अित्यादि वृत्तें अस्तित्वांत आलीं. त्याचप्रमाणे प्राकृतांतील 'वरमङ्गला' जातीपासून—म्हणजे,

"मणुयणाअिन्दसुरधरियछत्तत्तया
पञ्चकल्लाणसोक्खावली पत्तया

दंसणं णाणज्झाणं अणन्तं बलं
ते जिणा दिन्तु अम्हं **वरं मङ्गलं**" ( प्रागुभ १ )

यासारख्या जातिरचनेपासूनच स्रग्विणी, अुर्वशी, निशिपाल अित्यादि वृत्तें सिद्ध झालीं असावींत. या प्रकारांतील 'जनकतनया,' 'नवमधु,' 'विलोलनयना,' अित्यादि वृत्तांचें अेकअेकच अुदाहरण सापडतें. त्यांचा पत्ता प्राचीन छन्दःशास्त्रास न लागल्यामुळे या ग्रथांत त्या अुदाहरणांतीलच शब्दांचा अुपयोग करून त्यांचें नामकरण करावें लागलें आहे. विश्लोक, वानवासिका अित्यादि पद्यप्रकारांत काही भाग अचल असे आणि काही भागांत विकल्पाला वाव असे. हें त्यांचें अर्धवटपण नष्ट करून मोरोपन्ताने त्यांना पूर्णपणें निश्चित असें वृत्तस्वरूप दिलें आहे. अेका चरणासारखे चार चरण लिहायचे झाले की ते लगक्रमदृष्ट्या सारखे लिहायचे असें स्वाभाविकपणेंच वाटतें. या प्रवृत्तीमुळेच वैतालीयौपच्छन्दसिकांपासून वियोगिनी, अपरवक्त्र, मालभारिणी आणि पुष्पिताग्रा हीं वृत्तें अश्वघोषाच्याहि पूर्वी निर्माण झालीं असावींत.

## १७ सम्मिश्रणाची प्रतिक्रिया

पुढे वृत्तांतील अेकसारखेपणा जितका बन्धनकारक तितकाच कण्टाळवाणा वाटूं लागला म्हणूनच की काय, कवींचें लक्ष्य अुपजातीकडे आणि जातीकडे वळलें.

१ या प्रवृत्तीचें अेक अगदी आधुनिक अुदाहरण महामहोपाध्याय माधवशास्त्री भण्डारी यांच्या व्याख्यानांत मिळालें. काशी येथील महामहोपाध्याय गङ्गाधरशास्त्री मानवल्ली यांनी अेकदा समस्यापूर्ति केली. ती जातिरचनेंत होअूं शकली असती, पण अुपरिनिर्दिष्ट प्रवृत्तीमुळे ती वृत्तरचनेंत झाली. तो समस्यापूर्तीचा श्लोक असाः–

" सम्भिन्नो यो रामपत्त्रिणा पुरासमुद्रे पतनश्चकार
तं मारीचं प्राप्य भीरुकं दशाननः प्रागुदाजहार
सीतामीहे तत्त्वमद्य मे वने सहायो भवार्थकार—
'कुत्ता रोवे गुह्यदर्दसे, मिया कहे तुम् चलो शिकार' "

म्हणजे [।– – – –।– ⏑ – ⏑ –। ⏑ – ⏑ – –। ⏑ – ⏑ – –] हें अेक नवेंच वृत्त सिद्ध झालें. या समस्यापूर्तीच्या प्रथमचरणांतील अन्त्यगणांत भेद आहे. हा दोष मूळचा की स्मरणशक्तीचा हें ठाअूक नाही.

परन्तु संस्कृत कवींनी जातिरचना अवगत करून घेतली नाही आणि तिची वाढहि केली नाही. अिन्द्रवज्रा नि अुपेन्द्रवज्रा यांच्यातील भेद प्रथमाक्षरापुरताच असल्यामुळे छन्दांत फारसें अन्तर न पडतां, रचनेंत थोडी विविधता आणतां येअून कवीस तेवढी मोकळीक मिळते म्हणून अिन्द्रवज्रा नि अुपेन्द्रवज्रा यांचें स्वैर मिश्रण प्राचीन काळापासून रूढ झालें. या मिश्रवृत्ताला अुपजाति असें नाव देण्यांत आलें. हें मिश्रण समाक्षरक वृत्तांचें, वर्गबान्धवांचें असावें त्याप्रमाणे तें अिन्द्र-वंशा-वंशस्थ, शालिनी-वातोर्मि, असें होअूं शकतें. परन्तु अिन्द्रवंशा—वंशस्थांचें मिश्रणसुद्धा, भागवत वगळल्यास अितरत्र फारच दुर्मिळ आहे.

दोन भिन्न वृत्तांचें मिश्रण ( १ ) कक-खख वा ( २ ) कखखक वा ( ३ ) कखकख वा ( ४ ) कककख असें विविध प्रकारचें होअूं शकेल. तिसरा प्रकार अर्धसमवृत्ताचा असल्याने त्यांत तरी मिश्रवृत्तांची वाढ व्हायला हवी होती. शिशुपालवधाचा १२ वा सर्ग हा अिन्द्रवंशा-वंशस्थ मिळून होणाऱ्या ‘शिशिरा’ या अर्धसमवृत्तांत आहे पण त्याचेंहि अनुकरण झालें नाही. अेकन्दरीने पाहतां मिश्रण हें संस्कृत कवींना रुचलें नाही असें दिसतें. रामरक्षास्तोत्रांत शार्दूलविक्रीडित आणि स्रग्धरा या वृत्तांचें पहिल्या प्रकारचें मिश्रण आहेः—

“ रामं लक्ष्मणपूर्वजं रघुवरं सीतापतिं सुन्दरं
काकुत्स्थं करुणार्णवं गुणनिधिं विप्रप्रियं धार्मिकं
राजेन्द्रं सत्यसन्धं दशरथतनयं श्यामलं शान्तमूर्तिं
वन्दे लोकाभिरामं रघुकुलतिलकं राघवं रावणारिम् ”

ही गोष्ट कोणी[1] तिकडे लक्ष्य वेधीपर्यन्त, रामरक्षेचें दैनन्दिन पठन होअूनहि ध्यानांत येत नाही अितकें हें मिश्रण सम्यक् आहे. पिङ्गलाने शिखा म्हणून जो प्रकार साङ्गितला आहे त्यांत अचलधृति आणि विद्युन्माला यांचें असेंच मिश्रण आहे. पहिले दोन चरण अचलधृतीचे आणि शेवटले दोन विद्युन्मालाचे असल्यास पद्यास ज्योति ( पि ४।५० ) म्हणतात; आणि अुलट क्रम असल्यास पद्यास सौम्या ( पि ४।५१ ) म्हणतात. याचप्रमाणे जातिरचनेंत हरिभगिनी आणि साकी यांचें मिश्रण शङ्कराचार्यकृत लक्ष्मीनृसिंहपञ्चरत्नम् या स्तोत्रांत आहे.

---

१ पण्डित केदारनाथ ( हपि १११ टीप ).

" त्वत्प्रभुजीवप्रियमिच्छसि चेन्नरहरिपूजां कुरु सततम्
प्रतिबिम्बालङ्कृतिधृतिकुशलो बिम्बालङ्कृतिमातनुते
चेतोभृङ्ग भ्रमसि वृथा भवमरुभूमौ विरसायां
भज भज लक्ष्मीनरसिंहानघपद्सरसिजमकरन्दम्" (शांग्र १८/११)

जाणून वा नेणून झालेलीं अशीं मिश्रणाचीं अुदाहरणें त्या त्या वृत्तांच्या विवेचनांत पुढे वृत्तविहारांत दिलीं आहेत.

दुसऱ्या प्रकारचें मिश्रण आढळत नाही. अगदी अलीकडे केशवसुत कवीने इन्द्रवज्राच्या तीन चरणांस वसन्ततिलकाचा अेक चरण जोडून चौथ्या प्रकारचें मिश्रण करून वृत्तवैचित्र्य साधण्याचा अभिनंन्दनीय प्रयत्न केला आहे.

" मी पाहिली अेक सुरम्य बाला,
वर्णूं कसा त्या स्मरसम्पदेला ?
वृक्षावरी वीज जधी पडावी
त्याच्या स्थितींतचि तिची महती पहावी." (केक ६३)

केशवकुमार यांच्या 'झेण्डूंचीं फुलें' या सङ्ग्रहांतील 'कषायपेयपात्रपतितमक्षिकेप्रत' या कवितेंत अनेक वृत्तांचें मिश्रण आहे तें बहुशः सहेतुक नसावें, तथापि तें हास्यास्पद मुळींच नाही. कवि भ. श्री. पण्डित यांनी जाति आणि वृत्त यांचें मिश्रण करण्याचा नवीन अुपक्रम केला आहे. त्यांच्या पुढील कवितेंत दोहा आणि तोटकाचा अेक चरण मिळून कडवें सिद्ध होतेंः—

" बघ बालविभाकर ये अुदया,
तम जाय हळूहळु हें विलया. ध्रु०
अतुल तूलिका घेअुनी
निज किरणांची काय
कौशल्याने रङ्गवी
तो प्राचीचा काय ?
मय ही न करी असली किमया." १ (विश्ववाणी ३।८ पृ. ३२९)

परन्तु येथे आवर्तन सर्वत्र अष्टमात्रकच आहे. पुढील अुदाहणांत अक्षरशः पाहतां आवर्तनें भिन्न आहेत, तेव्हा सप्तमात्रक आवर्तनांत प्रत्येक वेळीं अेक मात्रा

वाढवून तें अष्टमात्रक तरी करून घेतलें पाहिजे अथवा तेवढा भाग म्हणतांना ठेका बन्द तरी ठेवायला पाहिजे.

" तुजवीण सखे, मज कोणि नसे;
प्रतिमाहि तुझीच हृदीं विलसे. ध्रु०
मी करीं पूजा तियेची भावपुष्पें वाहुनी,
आणि पुष्पें कोणतीं पूजेस अुची यांहुनी ?
परि ती न कधीच बघे हसुनी
भिजवी न कधी मन शान्तिरसें." १ (ग १०४)

वृत्त-वृत्तांचें वा वृत्त-जातींचें मिश्रण घोटाळा अुत्पन्न करीत नाही; कारण, अक्षरें जशीं लिहिलेलीं असतात तशींच वाचायचीं असतात. वृत्त आणि जाति दोन्हींतहि लगभेद आहे. परन्तु वृत्त आणि छन्द, वा जाति आणि छन्द यांचें मिश्रण युक्त नाही; कारण अेक भाग वाचतांना लगभेदाकडे लक्ष्य द्यावें लागतें तर दुसरा भाग वाचतांना, लिखित लघु असो वा गुरु असो प्रत्येक अक्षर गुरूच अुच्चारायचें असतें. म्हणून कारेकृत 'मेघाचें अश्रुगीत' या कवितेंतील

" येसि कधी घेअुनि ज्योत्स्ने, किरणपुष्पमाला ?
तिमिर भावरङ्ग पुसाया अन्तरीं रिघाला. ध्रु०
तरङ्गतां वाऱ्यावरी
चमकुनी परोपरी
सोनसळी जादू करी
क्रूर वञ्चनेंत परन्तू अन्ति लोटण्याला." (नदी ९५)

ध्रुवपद जातिस्वरूप, कडव्याचे पहिले तीन चरण छन्दःस्वरूप म्हणजे लगभेदातीत, आणि चौथा चरण पुन्हा जातिस्वरूप हें मिश्रण घोटाळा अुत्पन्न करणारें असल्याने अिष्ट नाही. 'येसि कधी घेअुनि' मधील क लघु अुच्चारायचा आणि 'सोनसळी जादू करी' मधील क गुरु अुच्चारायचा ही विसङ्गति अेकाच कवितेंत अिष्ट नाही. शुद्ध छन्द वा शुद्ध जाति यांच्या रचनेंत कवीला विविधता आणि मोकळीक हीं हवींत तितकी मिळूं शकतात.

अिन्द्रवज्रा-अुपेन्द्रवज्रा वा अिन्द्रवंशा–वंशस्थ यांच्या स्वैरमिश्रणांत स्वाभाविकपणा आहे. दोन वृत्तांच्या मिश्रणाचे सहजगत्या पडणारे चार प्रकार मागे साङ्गितलेच. परन्तु भेदैकदृक्, प्रस्तारप्रिय आणि परिभाषावर्धनेच्छु छन्दःशास्त्रकारांनी याचे जितके प्रकार होणें शक्य आहे तितके म्हणजे चौदा कल्पिले असून, अिन्द्रवज्रा–अुपेन्द्रवज्राच्या अुपजातिप्रकारांना चौदा आणि अिन्द्रवंशा-वंशस्थाच्या अुपजातिप्रकारांना चौदा मिळून अठ्ठावीस[1] संज्ञा दिल्या आहेत! परन्तु आख्यानकी, विपरीताख्यानकी नि शिशिरा या तीन अर्धसमवृत्तरूप अुपजातींतच सहेतुकपणें दीर्घ रचना केलेली आढळते. अितर प्रकारांपैकी कित्येकांची अुदाहरणें सुद्धा मिळत नाहीत.

राजानकरत्नाकरकृत हरविजयम् या संस्कृतकाव्याच्या सत्ताविसाव्या सर्गांत श्लोकमिश्रणाचा अेक विशिष्टक्रम आढळतो. पुष्पिताग्राचा अेक श्लोक, मग अुपजातीचा अेक श्लोक आणि मग वसन्ततिलकाचे दोन श्लोक या क्रमानें चारचार श्लोकांचे गट केलेले दिसतात.

## १८ पद्यांतील टुमी

काव्यांत कोणत्याहि काळीं काही पद्यप्रकार रूढ झालेले असतात तर काही पद्यप्रकार प्रयोगावस्थेंत असतात. काही प्रकार मागे पडणें, काही रूढ होणें आणि काही प्रयोगावस्थेंतच मान्यतेसाठी पुढे येत रहाणें हें भाषेच्या आणि प्रतिभेच्या जिवन्तपणाचेंच द्योतक आहे. गेल्या तीस वर्षांचाच अितिहास पाहिला तर दाशरथी, चन्द्रकान्त अित्यादि काही जाति मागे पडल्या; मुद्रिका, नववधू अित्यादि जाति रूढ झाल्या आणि आता स्वैरपद्यादि नवे प्रयोग मान्यतेसाठी झगडत

---

१ यांपैकी अिन्द्रवज्रा–अुपेन्द्रवज्राच्या अुपजातीच्या चौदा प्रकारांचीं नावें पुढील श्लोकांत दिलीं आहेत. " कित्ती, वाणी, माला, साला। हंसी, माआ, जाआ, बाला। अद्दा, भद्दा, पेम्मा, रामा। रिद्धी, बुद्धी, तासू णामा " ( प्रापै २/१२१ ). अिन्द्रवंशा–वंशस्थाच्या चौदा अुपजातिप्रकाराचीं नावें काशीसंस्कृतमालेंतील वृत्तरत्नाकराच्या आवृत्तीचे सम्पादक वैद्यनाथशास्त्री वर्कल यांनी ७९ व्या पृष्ठावर टीपेंत दिलीं आहेत; पण आधार दिला नाही. शिशिरा हें नाव त्यांनी दिलें आहे.

आहेत. पिङ्गलाच्यावेळींहि काही प्रकार प्रयोगावस्थेंत होते. त्यांना नावें पिङ्गलाने दिली असावींत. त्यांचा समावेश तो गाथाप्रकरणांत करितो.

## १९ मराठींतील पद्यरचनेचा अितिहास

पद्यरचनेचे छन्द, जाति आणि वृत्त हे जे तीन मुख्य प्रकार आहेत त्या तिन्ही प्रकारची पद्यरचना आजपर्यन्त मराठींत चालू आहे.

(१) **छन्द.**—अभङ्ग, ओवी, घनाक्षरी अित्यादि पद्यप्रकारांत लघुगुरु हा भेद नाही. स्थूलमानानें सर्व अक्षरें सारख्याच दीर्घ कालांत म्हणजे गुरूच अुच्चारायचीं असतात. अर्थात्, या पद्यप्रकारांत मुख्य नियमन अक्षरसङ्ख्येचें दिसतें. प्रत्येक अक्षरांचा काल दोन मात्रांचा असल्यामुळें या पद्यप्रकारांत अष्टमात्रक आणि षण्मात्रक अशा दोनच आवर्तनांची रचना होअू शकते. या लगत्वभेदातीत अक्षरसङ्ख्याक पद्यप्रकाराला काहीतरी पारिभाषिक नाव पाहिजे म्हणून वैदिकपद्यप्रकाराला असणारें **छन्द्** हें नाव दिलें आहे. कोणत्याहि नियमबद्ध पद्यप्रकाराला सामान्यपणें छन्द वा वृत्त म्हणतात, जसें पृथ्वी छन्द, वैतालीय छन्द, गीतिवृत्त अित्यादि. परन्तु वृत्तास जसा विशिष्ट पारिभाषिक अर्थ देण्यांत आला आहे तसा छन्द या शब्दास देण्यास प्रत्यवाय नसावा. अलीकडे छन्दांत रचना करण्याकडे कवींचें लक्ष्य अधिकाधिक जाअू लागलें आहे. विशेषतः यवतमाळचे विद्वान् आणि व्यासङ्गी कवि वामन नारायण देशपाण्डे हे सहेतुकपणे छन्दांत विविध रचना करितात.

(२) **जाति.**—जातिरचनेंत लगत्वभेद आहे. समरचनेंतहि अक्षरांची सङ्ख्या नि लगक्रम हीं अभिन्न नसतात. तथापि लघूची अेक **मात्रा**[२] आणि गुरूच्या दोन मात्रा या गणिताने मात्रांची सङ्ख्या सारखी भरते. मात्रांची सङ्ख्या हें अेकच काही या पद्यप्रकाराचें लक्षण नाही. या मात्रासङ्ख्या-

---

१ "अत्र शास्त्रे नामोद्देशेन यन्नोक्तं छन्दः प्रयोगे च दृश्यते तद्गाथेति मन्तव्यम्" (हपि १५५)

२ "मीयते अनया सा मात्रा"
"चाषस्तु वदते मात्रां, द्विमात्रं त्वेव वायसः
शिखी रौति त्रिमात्रं तु नकुलस्तत्वर्धमात्रकम्" (पाणिनीय शिक्षा ४९)

कजातींत अष्टमात्रक, सप्तमात्रक, षण्मात्रक वा पञ्चमात्रक आवर्तनें असतात. या मात्रासङ्ख्याक पद्यप्रकारास मात्रावृत्त वा मात्राच्छन्द म्हणतात; परन्तु वृत्त या शब्दाचा पारिभाषिक निश्चित अर्थ वेगळा असल्याकारणाने या मात्रा-सङ्ख्याक रचनेस पूर्वीपासून चालत आलेलें **जाति**[1] हें नाव स्पष्टपणें निश्चित करावें हें योग्य होय.

ही गेय जातिरचना मूळची प्राकृतांतील असावी. ही संस्कृतांत शङ्कराचार्योंच्या मोहमुद्गर काव्यांत, जयदेवाच्या गीतगोविन्द काव्यांत आणि रूपदेवाच्या स्तवमालेंत दिसते. मराठींत प्राचीन कालापासून अेकीकडे प्रौढ वाङ्मय छन्दांत रचिलें जात असतांना, मिराबाअी, सुरदास, कबीर अित्यादि अुत्तर हिन्दुस्थानांतील सन्तगीतकारांच्या अुदाहरणाने मराठींत 'पदें' होअूं लागलीं. ही सारी जातिरचना आहे. ज्ञानेश्वराचीं पदें अुपलब्ध नाहीत असें नाही. परन्तु मराठींतील पहिला मोठा पदें लिहिणारा गीतकार अेकनाथ हा होय. याची रचना शिथिल आहे. आ, अे, ओ हे स्वर केव्हा केव्हा लघु अुच्चारावे लागतात तर केव्हा केव्हा अ दीर्घ अुच्चारावा लागतो. पुढे संयुक्त व्यञ्जन (केवळ दृश्य नव्हे तर श्राव्य) आल्यास मागील लघूस निरपवादपणें गुरुत्व यायला हवें तें विकल्पाने येतें, म्हणजे कोठे तें येतें आणि कोठे तें येत नाही. लेखनपद्धति सर्वस्वी अुच्चारानुसारी नसल्यामुळे केवळ लेखानुसारी वाचन करून गीतांतील आन्दोलनाचा पत्ता लागत नाही आणि मग साहजिकपणेंच चाल लागत नाही. या मोठ्या दोषांमुळे प्राचीन पद्यसङ्ग्रहांतील किती तरी पदें पद्यदृष्ट्या दुर्बोध अतअेव निरुपयोगी होअून बसलीं आहेत. हें शैथिल्य गोविन्द बल्लाळ देवल यांच्या पदांच्या रचनेपासून म्हणजे आधुनिक काळांतच नष्ट झालें आहे.

---

१ "पद्यं चतुष्पदं तच्च वृत्तं जातिरिति द्विधा
अेकदेशस्थिता जातिर्वृत्तं लघुगुरुस्थितम्" (हपि ५२)

वा "पद्यं चतुष्पदी तच्च वृत्तं जातिरिति द्विधा
वृत्तमक्षरसङ्ख्यातं जातिर्मात्राकृता भवेत्" (गछ १/४).

**वृत्तांचे चरणाक्षरसङ्ख्येप्रमाणे जे अुक्तादि वर्ग कल्पिले आहेत त्यांनाच हेमचन्द्र जाति म्हणतो.**

हीं पदें बहुतेक सन्तकवींनी, थोडीं अितर कवींनी लिहिलीं आहेत. हीं धार्मिक स्वरूपाचीं असल्यामुळे भाबड्या भाविक समाजाने त्यांचें स्मरण ठेविलें आणि कीर्तनकारांनी तीं कीर्तनांत गाअून दाखवून त्यांचा प्रसार केला. आनन्दतनय आणि रघुनाथ पण्डित यांनी आपल्या विविध वृत्तांत लिहिलेल्या आख्यानांतून मधून मधून हीं गेय पदें विखुरलीं आहेत. मध्वमुनीश्वर, केशवस्वामी, नरहरि शिष्य वणीकर, देवनाथ, दयाळनाथ अित्यादकांची जातिरचना विपुल आहे. अमृतराय, रामजोशी (कविराय), होनाजी बाळ, सगनभाअू, प्रभाकर अित्यादि कवींनी कटाव, पोवाडा, लावणी अित्यादि जी गोन्धळी रचना केली ती सारी जातिरूपच्च आहे आणि ती बहुतेक शिथिल आहे. परन्तु रामजोशाची संस्कृत जातिरचना रेखीव नि शुद्ध दिसते. त्याचें 'तरुणि तवेदं कुचतटयतिगुरु कुरु मम हृदि सादरम्' हें केशवकरणी जातींतील पद्य या विधानाची यथार्थता पटवील. अण्णा किर्लोस्कर यांनी गीतांच्या चालींना कीर्तनांतून नि तमाशांतून सुशिक्षित रङ्गभूमीवर आणिलें; आणि त्यांची गोडी नवसुशिक्षित समाजासङ्गेच अुदयोन्मुख कवींना पटवून दिली. गोविन्द बल्लाळ देवल यांचीं बहुतेक पद्यें अितकीं सुरस, सुसंस्कृत, विविध आणि निर्दोष आहेत की आधुनिक मराठी कवितेंतील शैथिल्य नाहीसें करण्याचें श्रेय त्यांच्या लोकप्रिय अुदाहरणाला दिलें पाहिजे. जातिरचनेवर लिहूं अिच्छिणाऱ्याला देवलांच्या कृतीकडे दुर्लक्ष्य करितांच येणार नाही. केशवसुत, गोविन्द वासुदेव कानिटकर, नारायण वामन टिळक, दत्तात्रय कोण्डो घाटे, माधवानुज, विनायक जनार्दन करन्दीकर अित्यादि आधुनिक मराठी कवींनी जातिरचनेस सुसंस्कृत वाचनीय कवितेच्या क्षेत्रांत रूढ करण्याचें श्रेय सम्पादिलें. आधुनिक मराठी कविता ही बहुतांशी जातिरूपच्च आहे. मराठी सङ्गीत नाटकांत रा. कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर यांनी जी गायकी थाटाची क्लिष्टरचना आणिली ती काव्यरचनेस अनुकूल नसल्याने मराठी कवितेच्या बाह्यस्वरूपावर तिचा काहीच परिणाम घडला नाही.

( ३ ) **वृत्त.**—छन्द आणि जाति यांव्यतिरिक्त वृत्त हा अेक प्राचीन काळापासून चालत आलेला पद्यप्रकार आहे. संस्कृत वाङ्मयांत हाच विशेष रूढ आहे. व्याकरणमहाभाष्यांतील कारिकाहि काही वृत्तरूप आहेत ही गोष्ट विचारणीय आहे. वृत्तांत अक्षरांच्या सङ्ख्येचे बन्धन असतें अितकेंच नव्हे तर त्यांचा

लगक्रमहि निश्चित असतो. या प्रकारास अक्षरवृत्त वा वर्णवृत्त म्हणतात; पण यास केवळ **वृत्त**[1] म्हणावें.

मराठींत वृत्तरचना प्रथम केल्याचा मान महानुभाव कवींचा दिसतो. भास्कर कृत 'अीशस्तुती' मधील पुढील श्लोकावरून त्यावेळच्या रचनेची चाङ्गली कल्पना येअील.

"तें कैं देखौन डोळां परतर सुफळा सृष्टि हे जीवितेसी
कैश्या जङ्घा सुरेषा अुपर घणतरी जन्मभूमी अनङ्गा
सेला मध्ये प्रदेशीं मिरवतु सजनी मालगण्टीं पवेशा
वेठीला योगिराजें करवितु सहजें पारणें लोचनांसी"

भास्कर[2] म्हणजे कवीश्वर व्यास याने शके बाराशें पूर्वींच श्लोकरचना करण्यास आरम्भ केला; पण याचे श्लोक निर्यमक आहेत. या वेळेपासून महानुभाव ग्रन्थकार विविध वृत्तांत रचना करूं लागले. यापुढे शम्भर वर्षांनी सयमक-

१ निरञ्जन-माधव आधार देत नाही पण वृत्ताच्या ठिकाणीं 'व्यक्ति' ही संज्ञा देतो.

"व्यक्ति या समपादांतें पूर्वाचार्यीं निरूपिलें;
जातिव्यक्तिद्वयामध्ये छन्दःशास्त्र विरूढलें". (निमास २०–२१)

२ पहा वि. ल. भावे यांचा लेख वि. विस्तार ५५।५. वि. ल. भावे पुढे म्हणतात कीं "सुन्दर, मनोहर, मन्द्र, तरङ्गिणी, चित्रकला, सुरती, सम्भोगा, सुरमा, सुमुखी, विमला, सानन्द, रामा, रमण, पादाकुल, मुक्तवल्ली, चन्दनक, गन्धानक, फणीन्द्र, हीं त्यांतील वृत्तें अपरिचित अशींच आहेत." या वृत्तांचें ज्ञान व्हावें म्हणून मी रुक्मिणी स्वयंवराच्या प्रतीसाठी शोध केला. यवतमाळचे श्री. वामनराव नारायण देशपाण्डे यांच्या कृपेने या ग्रन्थाची जी अेक अपूर्ण सदोष प्रत मला पहायला मिळाली तिचा अुपयोग जो होअू शकला तो मी करून घेतला आहे. परन्तु कित्येकदा प्राचीन वृत्तांसच नवीन नावें दिल्याचा संशय येतो. शार्दूलविक्रीडित, दोधक, चामर आणि यूथिका यांस अनुक्रमें अिन्द्रकल्हार, चन्दनबळी, तुनी आणि वनीमाळा हीं नावें आढळलीं. स्रग्धरा आणि स्रविणी यांचे सर्गधारा आणि शृङ्गवेणी असे चमत्कृतिजनक अपभ्रंश आढळले !

रचना होअूं लागली. तेराव्या शतकाच्या शेवटीं तर श्लोकबद्ध सयमक-रचनेचा प्रघात पुष्कळच्च पडला आणि चौदाव्या शतकापासून ते नवीं नवीं वृत्तेंहि योजूं लागले. कृष्णमुनीने[1] शके १५७४ च्या सुमारास लिहिलेलें 'रुक्मिणी स्वयंवर' आणि ओङ्कारमुनीने शके १६३० च्या सुमारास लिहिलेलें 'लक्ष्मणा-स्वयंवर' या काव्यांत पाच-अक्षरी वृत्तापासून ते वीस-अक्षरी वृत्तांपर्यन्त अनेक वृत्तें योजिलीं आहेत.

मुक्तेश्वराने आपल्या रामायणाची रचना विविध वृत्तांत केली आहे तरी भुजङ्गप्रयाताचें प्रमाण मोठें दिसतें. शेवटीं शेवटीं पादाकुलक जातीचाहि अव-लम्ब त्याने केला आहे. मुक्तेश्वराची प्रतिभा वृत्तबन्धनांत जखडल्यासारखी वाटते. वामनाने अनेक वृत्तांत रचना करून मराठी भाषेला रुळविली आणि वृत्तरचनेला यमकानुप्रासांनी मण्डित करून 'सुश्लोक वामनाचा' सुप्रसिद्ध करून टाकिला. आधुनिक दृष्टीला वामनाची कृति शिथिल नि क्लिष्ट वाटते. वामनापासून चमत्कृतिजनक रचनेला विशेष महत्त्व येअूं लागलें. विठ्ठल नि आनन्दतनय यांची रचना दुर्बोध आणि चमत्कृतिजनकच विशेष आहे. रघुनाथपण्डिताची रचना मात्र जितकी सालङ्कृत तितकीच रसाळ आणि शुद्ध आहे; पण ती विपुल नाही. 'विद्वज्जीवन'कार विठ्ठल मुद्रालङ्काराने विविध वृत्तांचीं नावें ग्रथित करितो पण त्यांत ढोबळ चुका करितो. अनन्त कवीने देवराज, प्रमाणिका, विबुधप्रिया, विभावरी आणि श्येनिका या दुर्मिळ वृत्तांचा मोठ्या प्रमाणांत अुपयोग केला आहे. निरञ्जन-माधवाने विविध वृत्तांत चमत्कृतिजनक आणि विपुल रचना केली असून छन्दःशास्त्रावरहि सद्वृत्त मुक्तावलि ही पुस्तिका लिहिली आहे.

कवि हा भाषेचा पालक आहे ही जाणीव सदैव मनांत वागवून व्याकरण-शुद्ध, प्रौढ आणि सुसंस्कृत भाषेंत निरनिराळ्या कठिण वृत्तांतहि विपुल आणि सालङ्कृत रचना करणारा मोठा पद्यप्रभु म्हणजे मोरोपन्तच होय. दण्डकरचना

---

१ प्रो. वि. मि. कोलते यांचा 'महानुभावीय काव्यांतील कांहीं नवीन छन्द' (संधिकाल, ऑगस्ट १९३५ चा अंक) हा लेख पहा.

त्याच्याच काव्यांत आढळते. त्याने घनाक्षरी,[1] अभङ्ग या प्रकारची छान्दस रचना संस्कृतांतहि करून ठेविली आहे. परन्तु आश्चर्याची गोष्ट ही की जातिरचना करितांना त्याच्या हातून कर्णकटु यतिभङ्ग फार होतात. यावरून त्याला गाण्याचा कान नसावा.

आधुनिक मराठी कवींच्यापैकी भास्कर दामोदर पाळन्दे यांनी निरनिराळ्या वृत्तांची अुदाहरणें देण्यासाठीच की काय, अनेक वृत्तांत अीश्वराची रसाळ आळवणी केली आहे. विद्याधर वामन भिडे यांनी राघवीय परीवाहाच्या ११ व्या सगात आणि दण्डदण्डना काव्यांत भिन्न भिन्न वृत्तें अक्षरसङ्ख्येच्या वाढत्या क्रमाने दिलीं आहेत. त्यांच्या जीवजागृति या काव्यसङ्ग्रहांत अनेक दुर्मिळ वृत्तांचा परामर्श घेण्यांत आला आहे. परन्तु वृत्तांचीं नावें देतांना ते आधार देत नाहीत हें मोठेंच वैगुण्य आहे. त्यांनी ‘कमालिनी’ इत्यादि काही नवीं वृत्तें साधिलीं असून अेका अरबी-फार्सी वृत्ताला ‘सौदामिनी’ हें नाव देऊन तें वृत्त रूढ करण्याचा प्रयत्न फार पूर्वी केला आहे. अलीकडे त्यांनी अनेक अरबी-फार्सी वृत्तांतहि रचना करण्याचा प्रयत्न केला होता. त्यांची रचना वृत्तशुद्ध असली तरी सुबोध आणि सरस नसते. सुमन्तकृत ‘माझे दुर्दिन’ ही पुस्तिका केवळ काही दुर्मिळ आणि अपरिचित वृत्तांच्या अुदाहरणांसाठीच अवलोकनीय वाटेल. भागानगरकर यशवन्तरावजी कोरेकल यांनीहि विविध अपरिचित वृत्तांत सुबोध नि बोधप्रद पद्य रचण्याचा प्रयत्न केला आहे. वासुदेव वामन खरे, विद्याधर वामन भिडे आणि साधुदास यांनी प्राचीन महाकाव्याच्या धर्तीवर महाकाव्यें लिहिलीं आहेत. खण्डकाव्य हें मेघदूताप्रमाणे अेका वृत्तांतच लिहिण्याकडे कवींची प्रवृत्ति विशेष आहे. विठ्ठल भगवंत लेम्भे यांचें शोकावर्त पृथ्वीवृत्तांत आहे; तर राजकवि चन्द्रशेखरकृत वसन्तमाधव हें वसन्ततिलकावृत्तांत आहे. सारखें वृत्त बदलल्याने वाचकाला त्याच्या तन्द्रींत धक्के बसतात. गज़लांत योजिलीं जाणारीं अरबी वृत्तें हीं वृत्तें आहेत यांची जाणीव नसल्याने अण्णा किर्लोस्कर, वासुदेव नारायण डोङ्गरे, श्रीपाद कृष्ण कोल्हटकर, शिवराम महादेव परांजपे, कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर, वासुदेवशास्त्री खरे अित्यादि नाटककारांची गज़लरचना

१ अहल्योद्धार.

शिथिल झाली आहे. या प्रकरणीं झालेली विविध वृत्तशुद्ध रचना सारी प्रस्तुत ग्रन्थकाराच्या ‘ गजलाञ्जलि ’ या ग्रन्थांत प्रकाशित आहे.

## २० मुक्त पद्याचे प्रयोग

मराठींतील पद्यरचना वृत्त, जाति आणि छन्द या तीन प्रकारचीच नाही. अलीकडे मुक्त पद्याचा प्रयोग आणि पुरस्कार होअूं लागला आहे.

श्रीयुत यशवन्त भास्कर जठार यांनी कानडी कवि श्री. लक्ष्मीश याच्या जैमिनीभारताच्या पहिल्या सन्धीचें समवृत्त भाषान्तर करून मराठीस अेका परप्रान्तीय पद्यप्रकाराचा परिचय करून दिला आहे:—

“ श्रीवधूलोचनचकोरक खुलवित भक्तावलीहृत्कुमुदकोरक फुलवित जगतीवन्द्यविमलसौभाग्यरत्नाकरा आणीत भरती अति। तेवि अविरत सरस-करुणासुधाकलांनी विशदमधुहास्यकौमुदी पसरवित देवपुरलक्ष्मीरमणवदनचन्द्र आनन्द देवो अम्हांला ” ॥ १ ॥

## चूर्णिका

याला पद्य कां म्हणतात हें काही ध्यानांत येत नाही. हें पद्य आणि चूर्णिका यांत काही मौलिक भेद दिसत नाही. मराठी चूर्णिकेंत यमकें साधिलेलीं दिसतात तीं मात्र या कानडी पद्यप्रकारांत दिसत नाहीत. कानाला हें गद्यच वाटतें. गद्याला भरत चूर्ण म्हणतो ( भ १५/३५ ), पुढे गद्य टीकेला चूर्णी म्हणूं लागले; आणि शेवटीं विशिष्ट प्रकारच्या गद्यरचनेला चूर्णिका म्हणण्यांत येअूं लागलें.

“ अकठोराक्षरं स्वल्पसमासं चूर्णकं विदुः
तत्तुवैदर्भरीतिस्थं गद्यं हृद्यतरं भवेत् ” ( गछ ७।३ )

अमृतरायाच्या ध्रुवचरित्रांतून पुढे अुद्धृत केलेली चूर्णिका पहा.

“ साम्प्रत कल्किक अवतार झाला नसतांहि म्लेंच्छसंहारादि भगवच्चरित्रें व्यासाज्ञेने जयदेवादिकीं अष्टपदींत वर्णिलीं। तीं श्रोत्यांहीं ‘ साधु साधु ! ’ शब्दें अतिसत्कारें आकर्णिलीं। अधुनाहि भाविभगवद्गुणानुवादवर्णनपरिणालिका चालली। याचप्रकारें नारदें ध्रुवातें हरिकथापरिपाठी सङ्गितली। ‘ रे रे ध्रुवा

ताता, पूर्णपरब्रह्म रामकृष्णादि अवतार पुढे जन्मतील त्यांची लीला निःशङ्क गात जावी। लज्जा त्यजावी। चरित्रें पाठ करावीं। नामें दीर्घस्वरें अुच्चारावीं'। हे आज्ञा स्मरोनी ध्रुव मधुवनचारी, अुत्तमाधिकारी, यमुनातीरविहारी, कृतशौच दन्तधावनोत्तर प्रातःस्मरणपूर्वक स्नानसन्ध्यादिक आवश्यक आचरौनि हरि-कीर्तनीं रङ्गला। करतालिकायुक्त नर्तन, हावभावसहित नामावर्तन करूं लागला।" ( अकस ८ )

यावरून मराठींत **चूर्णिका** म्हणजे थोडें गळ्यावर म्हणावयाच, सुसंस्कृत समस्तपदप्रचुर, नादगौरवयुक्त आणि सयमक असें गद्य होय हें विशद होअील.

निरञ्जनमाधवाने आपल्या 'सुभद्रास्वयंवरचम्पू' काव्यांत ( निमाक ३।६६ ) चूर्णिकेचा अुपयोग ठिकठिकाणीं केला आहे. चूर्णिकेंत आवर्तनात्मक आन्दोलन नाही. तथापि पाण्डुरङ्गकविकृत स्थालीपाककथेंतील चूर्णिकेंत सप्तमात्रक आवर्तन असावेंसे वाटतें. हें सप्तमात्रक आवर्तन नकळतहि आलेलें असेल.

"येरिकडे ऋषिभार देखाति सारचोजगङ्गादिका। पञ्चपुरुषेंसि पतिव्रता भलि निर्मि नूतन ते कनकाम्बरा। सुन्दरा अतिपामरा मज वर्णवेल किति सत्वरा।" अित्यादि ( अकलका २।१२९ ).

याला शिथिल पद्य म्हणतां येअील; कारण पद्य म्हणजे लयबद्ध अक्षरप्रबन्ध होय. तालाचें बन्धन सोडल्यावर होणारी स्वाभाविक रचना म्हणजे गद्यच होय.

"अेका मुलग्याने
पाहिली कळी
गुलाबाची कळी बहु गुलजार
तिला भुलुनिया तो जवळी
गेला, होअुनि लम्पट फार!
गुलाबाची कळी
गुलाबाची कळी
गुलाबाची कळी बहारदार!" ( केक १८५ )

Goethe च्या The Wild Rose च्या या केशवसुतकृत भाषान्तरांतील काही ओळी पद्यावर्तनी आहेत आणि काही नाहीत. ज्या नाहीत त्या बसवायच्या

म्हटल्या की शब्दांचे हाल करावे लागतात आणि ते केल्यास कवितावाचनाने होणाऱ्या आनन्दांत तितकी न्यूनता येते. थोडा शाब्दिक फेरफार केल्यास हा दोष निघून जातो, पहाः—

अेक मुलाने पहा बघितली
गुलाबकलिका बहु गुल्जार
तिला भुलुनिया धावत जवळी
गेला होअुनि लम्पट फार
गुलाबकलिका, गुलाबकलिका,
गुलाबकलिका बहारदार !

हें अधिक आनन्ददायक वाटतें; यापासून बान्धेसूद सुबकपणा पाहिल्याचा आनन्द होतो. पद्यरचना जितकी शिथिल तितकी ती स्वाभाविक असते असें मानणें चुकीचें आहे.

## लयमुक्त स्वैरपद्य

परन्तु मराठींतील वृत्त, जाति वा छन्द यामध्ये प्रतिभेला मुक्त विलास करितां येत नाही या समजुतीने अिङ्ग्रजींतील मुक्तपद्याच्या ( Free Verse ) धर्तीवर काही रचना सहेतुकपणें मराठींत होअू लागली आहे. गद्यांतील शब्दांचा स्वाभाविक क्रम निष्कारण फिरवून, स्वैरपणानें त्याचे तुकडे तोडून, ते अेकाखाली अेक लिहून जें स्वरपद्य सिद्ध होतें तें अधिक स्वाभाविक कसें हें समजत नाही.

गोविन्दाग्रजांनी आपल्या वाग्वैजयन्तीची जी अर्पणपत्रिका लिहिली आहे ती स्वैरपद्याच्या दृष्टीने चिन्तनीय आहे.

" सत्–चित्–हृत्–महत्–
आनन्द–पदवी–प्रदान–वदान्या ॥ १
प्रीतीची पवित्रता, चिरन्तनाची चरित्रता,
सृष्टीची सचित्रता,
विश्वाची विविधता, अनन्ताची अगाधता,

अीश्वराचें अस्तित्व
या सर्वांच्या
अचल अैक्याची निदर्शना ॥ २

भूतकालांतली भावजीवना, वर्तमानांतली वरतराशा,
भवितव्यांतली भाग्यदेवी ॥ ३

हृदयाची स्फूर्ति, अिच्छेची पूर्ति,
माङ्गल्याची कीर्ति ॥ ४

श्री हृदयशारदा
ही सर्वस्वाने अर्पिलेली
वाग्वैजयन्ती
सदैव कण्ठांत धारण करो ॥ ५

—गोविन्दाग्रज

गोविन्दाग्रजांच्यावेळीं स्वैरपद्याची चळवळ असती तर हें स्वैरपद्याचें विडम्बनच आहे असें वाटलें असतें.

यानन्तर १९३० च्या जानेवारीमध्ये लिहिलेली सुहृत्चम्पा कवीची अेक कविता ‘ साधना आणि अितर कविता ’ या सङ्ग्रहामध्ये प्रकाशित आहे. ही सहेतुकपणं Free Verse म्हणून रचिलेली आहे.

“ पुनरावृत्ति
का अजुनी
लाजरें मुख ?
बघ इकडे—( “ अं हं ” )—
दिव्य जणूं माधुर्यच विकसलें,
नाही मी हासणार मग झालें ?
वद तर अेकदाच मधुबाले—
( “ मी नाही हं ” )—
“ कित्ती सुरेख ! ”—
नच लाजुनी.” ( साआिक १० )

हे कवि Free Verse ला ‘ सहज काव्य ’ म्हणतात; पण हें यांचें काव्य अितर कोणत्याहि कवितेइतकेंच सहज आहे ! अशा रीतीचें लयमुक्त दिखाअू स्वैर-पद्य हें गद्याहून मूलतः भिन्न, अधिक स्वाभाविक, सरस आणि सोयीचें कसें हें अद्यापि सिद्ध व्हावयाचें आहे.

अिङ्ग्रजी वाङ्मयांतील आधुनिक मुक्त पद्य ( Free Verse ) हें कसें असतें याची कल्पना यावी म्हणून E. E. Cummings याची ‘ Sun-set ’ ही कविता समग्र पुढे दिली आहे.

stinging
gold swarms
upon the spires
silver
        chants the litanies the
great bells are ringing with rose
the lewd fat bells
        and a tall
wind
is dragging
the
sea
with
dream
-s.

John Sparrow कृत Sense and Poetry या पुस्तकांत ११८ व्या पृष्ठावर या कवितेचें Robert Graves ने केलेलें स्पष्टीकरण आणि या पद्धतीचें समर्थन दिलेलें आहे, आणि पुढे त्या समर्थनाचा समाचारहि घेतलेला आहे.

## लयबद्ध स्वैरपद्य

मुक्तपद्याचे अेक पुरस्कर्ते रा. आत्माराम रावजी देशपाण्डे यांना पद्यांत लयबद्धतेची आवश्यकता वाटते. तेव्हा लय अष्टमात्रक असल्यास मुक्तपद्य कसें रचितां येअील याचा विचार करण्यासाठी विठोबा अण्णा दप्तरदार यांचें पुढील पद्य घेअूं.

"भक्तसखा गोविन्द हरी हा आनन्दाचा कन्द ॥ ध्रु० ॥ सजलनीरदश्याम तनू, नवरत्नखचित सौवर्ण मुकुट, शिरपेच, तुरा, वरि कल्गि विराजत, कुटिलालक, निटिलासि कस्तुरीतिलक, केशरी गन्ध" ॥ १ ॥

येथे कडव्याचा शेवट आणि ध्रुवपदाचा शेवट यांचा सम्बन्ध यमकाने जुळविला आहे. कडव्यांत अष्टमात्रक गणाचीं नऊ आवर्तनें असून दहाव्या आवर्तनांत सशब्द मात्रा तीन वा दोन आहेत. कडवें प्राचीन पद्धतीप्रमाणे सलग छापलेलें आहे. तें पद्य आहे हें दाखविण्यासाठी त्याचे पुढीलप्रमाणे चरण पाडून दाखवितां येतील:—

| सजलनीरदश्याम तनू,<br>
नव-| रत्नखचित सौवर्ण मुकुट,<br>
शिर-| पेच-तुरा, वर कल्गि विराजत,<br>
| कुटिलालक,<br>
निटि-| लासि कस्तुरीतिलक<br>
केशरी-| गन्ध.

गद्य वाचतांना अर्थानुरोधाने विराम घेत गेल्यामुळे त्याचे जसे तुकडे पडतात तसे तुकडे पाडून ते अेकाखाली अेक असे येथे छापले आहेत. चरणरचना अनियमित दिसत असल्यामुळे पद्य-मुमुक्षूंना ब्रह्मानन्द होअील; परन्तु पद्य म्हणून वाचतांना सामान्य वाचकांचा घोटाळाच व्हावयाचा. चरणान्तीं विराम आहे की नाही आणि असल्यास तो किती मात्रांचा आहे या गोष्टी निश्चित नाहीत म्हणून सहज ध्यानांत येत नाहीत. चरणांतील पहिली टाळी ही चरणारम्भींच पडते, का काही मात्रा झाल्यावर पडते, आणि तसें असल्यास किती मात्रा झाल्यावर पडते या गोष्टीहि निश्चित नाहीत. कटिबन्धाची रचना सलग वाचावयाची असते म्हणून ती सलग छापण्यांत येते; युक्त हेंच होय. आवर्तनान्तीं नुसते खटके येतात आणि खटक्याखटक्यांनी यमकें साधलेलीं असतात. तेव्हा खटक्याच्या अनुरोधाने तुकडे पाडून छापल्यास वाचकांचा निदान गोन्धळ तरी होणार नाही. वरील पद्यांतील दुसऱ्या कडव्याचे चरण खटक्याखटक्यांनी पुढीलप्रमाणें पाडतां येतील:—

कोटिकोटिकन्दर्परूपलावण्यदर्पहर
ध्यान मनोहर
अनन्तजन्ममनोमलपटलीनिर्मूलनकर
भक्तिगम्य तापत्रयभञ्जन
आसेचनक (?) ध्यानिं पहातां
वाटे जणु नयनांत भरावें
हुङ्गावें, [illegible] आलिङ्गावें
की चुम्बावें
विसरतसे संसार सर्वेही
सन्तत याचा पन्त विठ्ठला सहज लागला
छन्द ॥ २ ॥

येथे सर्वचरणारम्भीं टाळी पडत असल्याने आणि अन्त्य चरण वगळून अितर सर्व चरणांच्या अन्तीं नियमितपणें केवळ खटका आहे. चरण समदीर्घ नाहीत तरीहि येथे वाचकांचा घोटाळा होत नाही. या कटिबन्धप्रकारांत, आणि ज्या 'सहजस्फूर्त परन्तु बन्धनातीत काव्याला देखील मान्यतेच्या हक्काचें शिक्कामोर्तब मिळावें' असा रा० व्यङ्कटेश शङ्कर वकील यांचा आग्रह आहे त्या 'बेबन्दप्रकारां'त वस्तुतः काही भेद नाही. त्यांच्या यक्षकन्या कवितेंतील पुढील अुतारा पहाः—

“शेवटला ऽऽ
सूर विराला मञ्जुळवाणा
वनवायूने दूर पळविला
स्तब्ध जाहलें जिकडे तिकडे
अन्। तू मी दोघें
मन्नेत्रांमधि शङ्का व्याकुल
त्वन्नयनीं परि मिस्किल हासें
क्षणीं चमकलें
क्षणीं लोपलें
जणु। जलाशयामधि सुन्दर मासे

वरती आले
रविकिरणांमधि अहा चमकले
खोल पळाले
धडधडलें ना गे मम हृदयीं ?
अशी निर्दये, केंवि मुग्धता ?
बोल बोल गे
काय वाटलें खुलास हृल्लेंन्नमाङ्ग गडे गे ”

यक्षकन्या ( वागीश्वरी पृ ६२ )

या सतरा चरणांच्या कडव्यांत अर्ध्याहून अधिक म्हणजे आट चरण पादाकुलकाचे आहेत. पाच चरण अष्टमात्रक आहेत. अेकच चरण आणि तो शेवटला चोवीस मात्रांचा आहे. अेक चरण आणि तो पहिलाच सहा मात्रांचा असून त्याच्या अन्तीं द्विमात्रक विराम आहे. ‘ अन् तू मी दोघें ’ हा चरण दहा मात्रांचा आणि ‘ जणु जलाशयामधि सुन्दर मासे ’ हा चरण अठरा मात्रांचा आहे. या दोनच चरणांच्या आरम्भीं दोनदोन मात्रांचा आद्यतालकपूर्व गण असून त्यांच्या पूर्वीच्या चरणान्तीं आवर्तन पूर्ण होत असल्याने या दोन्ही ठिकाणीं लयभङ्ग म्हणजे छन्दोभङ्ग होतो.

तेव्हा ज्याला ‘ बेबन्द ’ म्हणून त्याचे ‘प्रणेते’ म्हणतात तो पद्यप्रकार जातिबद्ध असून त्यांत सोळा मात्रांचे आणि आठ मात्रांचे असे निर्यमक चरण स्वैरपणाने जुळलेले आहेत. परन्तु ही चरणविभागणी कोणत्याहि तत्त्वाला अनुसरून केलेली नसल्याने या लिखाणाचे चरण अधिक ‘बेबन्द’पणें निराळ्या रीतीने पाडून दाखविणें कठिण नाहीं; आणि ती नवी चरणरचना अधिक स्वाभाविक आहे असा आग्रहहि धरितां येअील !

रा. आत्माराम रावजी देशपाण्डे यांनी खिस्तशके १९२४ च्या जुलैमासीं जें काव्य अेका नव्याच छन्दांत रचायला आरम्भ केला त्यांतील अेका परिच्छेदाचें पृथक्करण करून पाहूं. या काव्यांत आवर्तन सप्तमात्रक [– ᴗ – –] अशा गणाचें आहे.

| "अन्तरींचे दिव्यशक्ती, सर्वगामी तेजवत्
सञ्-| चार तूझा, तू जगाची कोटिभास्करवत् प्रभा ऽऽ
| हृदयमानस ज्या प्रकाशें दिव्य जीवित भूवरी
स्वर्-| गांतलें अुपभोगिती ऽऽ
| अेक तव तेजास्वि कणही लागतां क्षणि पेटतो
आत्-| मा जशी की दिव्यज्योती
| जी जगाला दाखवीते मार्ग पुढचा."

या आरम्भींच्या सात चरणांपैकी तीन चरण [ ७।७।७।५ ] अशा आवर्तनाचे आहेत. अेक चरण [ २।७।७।७।५ ] असा आहे, अेक चरण [ २।७।५ ] असा आहे, अेक [ २।७।७ ] असा आहे, आणि अेक [ ।७।७।७ ] असा आहे. जेथे चरणारम्भीं दोन मात्रांचा आद्यतालकपूर्व गण आहे तेथे त्या दोन मात्रा पूर्वीच्या चरणांतील अन्य आवर्तनांत समाविष्ट होअू शकत असल्याने लयभङ्ग होत नाही. तथापि या लयभङ्गाचें अुदाहरण शेवटीं अेक आढळतेंच.

"| हृदयस्वर्गोतून कविच्या
ना।-वीन्यमय त्याचा प्रघात"

येथे 'ना'च्या दोन मात्रा मागील चरणांतील अन्त्य आवर्तनांत समाविष्ट होअू शकत नाहीत म्हणून लयभङ्ग होतो.

आता या कवितेची जी ही चरणरचना स्वाभाविक म्हणून दिली आहे ती अपरिहार्यपणें स्वाभाविक आणि अपरिवर्तनीय आहे का ? सारे चरण अगदी अेकसारखे नसल्याने अेकचअेकपण थोडें अुणें वाटतें हें मान्य; पण भावार्थाचा ओघ अप्रतिहत वाहात असतांना तो आवर्तनाच्या पाचव्या वा सातव्याच मात्रेवर खण्डित व्हावा हें चमत्कारिक नाही का ? तो आवर्तनाच्या दुसऱ्या वा तिसऱ्या मात्रेवर खण्डित कां होअू नये ? म्हणजे अन्त्यगण द्विमात्रक वा त्रिमात्रक कां नसावा ? शब्दांचा क्रम आहे तोच ठेवून चरणरचना निराळ्या रीतीने म्हणजे

"| अन्तरींचे दिव्य शक्ती,
| सर्वगामी तेजवत् सञ्चार तूझा

। तू जगाची कोटिभास्करवत् प्रभा,
। हृदयमानस ज्या प्रकाशें
। दिव्य जीवित भूवरी स्वर्गातलें अुपभोगिती,
। अेक तव तेजस्वि कणही
। लागतां क्षणि पेटतो आत्मा जशी की
। दिव्य ज्योती,
। जी जगाला दाखवीते मार्ग पुढचा "

याप्रमाणे केली तर ती अस्वाभाविक होअील का? ही चरणरचना अधिक सोयीची तरी आहेच आहे. प्रत्येक चरणांत टाळी चरणारम्भींच पडत असल्यानें वाचकाचा गोन्धळ होण्याचा सम्भव अगदी नाही. चरणरचनेचा प्रश्न क्षणभर कडेला ठेवून शब्दक्रमाचाच विचार केला तर तोहि अपरिहार्यपणें स्वाभाविक आणि अपरिवर्तनीय वाटतो का? लय साधण्यासाठी भावार्थोचित शब्द सोडून अुणा समर्पक असा शब्द योजण्याची आपत्ति आलीच नाही का? लयबद्धते-साठी वाक्यांतील शब्दक्रम फिरवावा लागला की नाही? भावार्थ हा लयबद्ध असला तरी भावनेच्या परिवर्तनाप्रमाणे निरनिराळ्या चरणांत निरनिराळ्या मात्रांचीं आवर्तनें कां येअू नयेत? केवळ समदीर्घ चरण लिहिण्याच्या बन्धनाने प्रतिभेच्या मुक्त विलासास अडथळा होतो तर सबन्ध दीर्घ काव्य एका ठराविक आवर्तनांत लिहिण्याच्या बन्धनाने अडथळा कां होअू नये?

अधिक अनुभवासाठी कवि भ. श्री. पण्डित यांनी षण्मात्रक आवर्तनांत रचलेलें पुढील स्वैरपद्य पहाः—

" मङ्गलमय सुप्रभात
अूठ ऽऽऽ
नीज अजुनि नयनांवर
मलुल म्हणुनि रजनिवदन
देशी अङ्गास तूहि
आळोखे का? ऽऽऽऽ
हळुहळु तम दूर सरे

सावरिशी मृदुल करें
विगलित कचनिचय विपुल
आणि करिशि
नयनांची अुघडझांक
कमलशी ऽ"

(वागीश्वरी ४ । ३)

या पद्य-परिच्छेदांत गुण हा आहे की कोणत्याहि चरणांत आद्यतालकपूर्व गण नाही. प्रत्येक चरणांतील पहिली टाळी पहिल्याच अक्षरावर पडते. यामुळे वाचकाचा गोन्धळ होत नाही. चरणांत कितीहि आवर्तनें असोत; विराम असलाच तर तो अन्तीं येतो. पण अुलटपक्षीं, भावार्थास अनुसरून विराम चरणामध्येच वाटेल तेथें, वाटेल तितक्या काळाचा आणि वाटेल तितके वेळा घेण्याची सोय या पद्यपरिच्छेदांत दिसत नाही.

अष्टमात्रक, सप्तमात्रक आणि षण्मात्रक आवर्तनांच्या रचनेचीं अुदाहरणें झालीं. पञ्चमात्रक आवर्तनाचेंहि स्वैरपद्य रचितां येअील. हीं सारीं अुदाहरणें जातिरचनेचीं आहेत.

## मुक्तच्छन्द

छन्दांतहि मुक्तच्छन्द लिहिण्याचे प्रयोग चालू आहेत. रा. वामन नारायण देशपाण्डे हे छन्दांचा सक्रिय पुरस्कार करितात. 'नन्दनवन मुकल्यावर' या त्यांच्या काव्यांतील पुढील अवतरण अष्टमात्रक आवर्तनाचें म्हणजे छन्दांत चार अक्षरांचें आहे.

"तम केव्हा सरे?" "हाय! केव्हा तें सरेल?
धडधडे अूर, वाटे आताच फुटेल.
झाक मुख केशीं, मीहि झाकीं अेका हातें,
तमोभय हो कमती मिटतां नेत्रांतें.
राहूं दे हा दुजा कर कटीस गुम्फून—"
"अन्त नच देवा, का रे तिमिरालागून?"

(प्रतिभा, विशेषाङ्क १९३५)

याला ते छन्द अक्षरलेखा शक्करी म्हणतात. चौदा अक्षरांच्या वृत्तांचा जो वर्ग त्याला शक्करी म्हणण्यांत येतें. वरील पद्याच्या प्रत्येक चरणांत चौदा अक्षरें आहेत हें मान्य; पण शक्करी हें नाव ज्यांतील चरण चौदा अक्षरी आहेत अशा कोणत्याहि रचनेला लागतें. हा छन्द मुक्त नाही. वरील पद्यांत तीन अष्टमात्रक आवर्तनें असून चौथ्या आवर्तनांत चार सशब्द मात्रा आहेत. अशा रचनेला ती जातिस्वरूप असल्यास आपण जाति साकी म्हणतो त्याप्रमाणे ती छन्दःस्वरूप असल्यास तीस छन्द साकी वा छान्दस साकी म्हणावें हें युक्त होय. चौदाच अक्षरांच्या पण ( ३।३।३।३।२ ) अशा मोडणीच्या रचनेला निराळें नाव द्यावें लागेल; पण तें असो.

या अवतरणांतील सारेच चरण सारख्या लाम्बीचे आणि घटनेचे आहेत. संवादांत प्रत्येकाचें भाषण चरणान्तीं म्हणजे चौदाव्या अक्षरावर सम्पावें असा नियम कृत्रिम होऔल, म्हणून वाक्यें जेथे चरणान्तीं सम्पत नाहीत तेथे ती सहाव्या वा बहुशः आठव्या अक्षरान्तीं सम्पविलीं आहेत. म्हणजे काय, वाक्य चरणांत वाटेल त्या ठिकाणीं सम्पत नाहीच. मग दीर्घ रचना करितांना जातीपेक्षा छन्दाचा अवलम्ब करण्यांत विशेष काय साधण्यांत आलें? चरणांत काही ठिकाणीं वाक्य सम्पवितां येण्याची सोय साकीजातींत आणि साकीसारख्या अितर जातींतहि आहे. अभागी कमल, आम्बराअी अित्यादि दीर्घ काव्यांची रचना पहातां वाक्य मध्येच कोठे आणि कसें सम्पवूं हीं अडचण गिरीशकवींना भासलेली नाही. जातिरचना ही छन्दोरचनेहून कठिण आहे अशीहि स्थिति नाही. आणि पुन्हा, छन्दांत अेक वैगुण्य आहे तें जातींत नाही. व्यवहाराच्या भाषेंत सुद्धा लघु-गुरुभेद आहे. हा लगत्व—भेद भाषेच्या हाडींमासींच नव्हे तर अगदीं स्वभावांत भिनला आहे. तेव्हा तो भेद ज्या पद्धतींत नाही त्या पद्धतीने काव्य लिहिण्याची परम्परा प्राचीन असली तरी मोठ्या प्रमाणावर तिचा अवलम्ब केल्यास ती कृति नेहमीच्या पद्धतीहून अगदीच भिन्न म्हणजे तेवढ्यापुरती तरी चमत्कारिक आणि कृत्रिम वाटल्याविना रहाणार नाही.

रा० आत्माराम रावजी देशपाण्डे यांनी आपल्या 'प्रेम आणि जीवन' या काव्यांत ज्या मुक्तच्छन्दाचा प्रयोग केला आहे त्याची चिकित्सा करून पाहूंः—

“ दोन दिवस अुलटुनि गेले,
दोन रात्री तशा सम्पून गेल्या,
अजून परी विषण्णताच मनास खोल व्यापून आहे,
हालत्या जलीं सावली जेवी दूरच्या ढगांची दडून राहे.
तुम्ही दोघे जण कोण, कोठले ?
मैत्री दूरच, नाही ओळखही,
ओझरतेंच असें कोठेतरी
दुरून पाहिलें अेकदोनदा,
पुसट चित्र कितीतरी तें !
मनांतहि माझ्या नाही राहिलें;
कशास वाटते खिन्नता मला
अितुकी बरें ?”

( प्रतिभा, विशेषाङ्क १९३५ )

यांतील प्रत्येक चरणाच्या आरम्भींच आवर्तनारम्भ असल्याने वाचकांचा घोटाळा होण्याचा सम्भव नाही. चरण अेकसारखे नाहीत. चरणमध्यावर द्विमात्रक विराम कोठे आहे आणि कोठे नाही यामुळे मात्र गोन्धळ होण्याचा सम्भव आहे. चरणांच्या दीर्घतेंत विविधता आढळते, परन्तु वस्तुतः ही विविधता अत्यल्प आहे. अमुक चरण आखूड कां आणि तमुक चरण लाम्ब कां याला काही सयुक्तिक मौलिक कारण दिसत नाही. तेव्हा या कवितेचे चरण पुढीलप्रमाणे अन्तर्गत आन्दोलनानुसारच पाडून पाहूं याः—

“ दोन दिवस ऽऽ
अुलटून गेले
दोन रात्री तशा
सम्पून गेल्या ऽऽ
अजून परी ऽऽ
विषण्णताच ऽऽ
मनास खोल ऽऽ
व्यापून आहे ऽऽ
हालत्या जलीं ऽऽ
सावली जेवी ऽऽ
दूरच्या ढगांची
दडून राहे ऽऽ
तुम्ही दोघे जण
कोण कोठले ऽऽ

मैत्री दूरच ऽऽ
नाही ओळखहि
ओझरतेंच ऽऽ
असें कोठे तरी
दुरून पाहिलें
अेक दोनदा ऽऽ
पुसट चित्र ऽऽ
कितीतरी तें ऽऽ
मनांतहि माझ्या
नाही राहिलें ऽऽ
कशास वाटते
खिन्नता मला ऽऽ
अितुकी बरें ऽऽ"

अशी चरणविभागणी केली तर सत्तावीस चरण होतात. प्रत्येक चरणारम्भीं टाळी पडते. १८ चरण म्हणजे अेकन्दर सङ्ख्येच्या दोन तृतीयांश चरण पञ्चाक्षरी असून त्यांच्या अन्तीं द्विमात्रक विराम आहे. ९ चरण षडक्षरी असून त्यांच्या अन्तीं विराम नसून केवळ खटका आहे. म्हणजे प्रस्तुत पद्यांत चरणांची विविधता नाही, केवळ द्विविधता आहे. या पद्यांत पञ्चाक्षरी आणि षडक्षरी चरणांची स्वैर जुळणी आहे.

## निष्कर्ष

या सर्व स्वैरपद्याच्या प्रयोगांचा विचार करितां काय दिसतें? दिसायला चरणांची लाम्बी जरी किती निरनिराळी दिसली तरी वस्तुतः ती तशी नसते; अथवा अपरिहार्यपणें ती तशी निरनिराळी असायला काही सयुक्तिक मौलिक कारण दिसत नाही. प्रतिज्ञापूर्वक बेबन्द पद्य लिहिणाऱ्याचेंहि पद्य लयबद्ध होतें. लयमुक्त पद्य म्हणजे निष्कारण विकृत केलेलें गद्य होय. स्वाभाविक आणि अर्थानुसारी आन्दोलनाची भाषा गद्यच असावयाची. क्वचित् प्रसङ्गीं अेखादें वाक्य लयबद्ध सुचलें तरी त्याच लयबद्धतेला अनुसरून सबन्ध काव्य रचणें म्हणजे मूलतः स्वाभाविकपणाचा त्याग करून कृत्रिमतेचा स्वीकार करणें होय. लय साधण्यासाठी काही शब्दांचा क्रम फिरविणें, काही अपरिचित शब्द वापरणें अित्यादि गोष्टी न्यूनाधिक प्रमाणांत अपरिहार्यपणें कराव्या लागल्यानन्तर चरण तेवढे निष्कारण न्यूनाधिक दीर्घ करण्यांत काही स्वारस्य नाही; निदान अेखाद्या आकृतीची रुचिरता प्रतीत करून द्यावयाची असती तर ती गोष्ट वेगळी होती. तेंहि स्वाभाविकतेला थोडेंफार सोडूनच साधतें. चरण अगदी अेकसारखे नसले तरी

वाचकांच्या सोयीसाठी, त्यांचा रसहानि करणारा घोटाळा होअू नये म्हणून अेक-दोन अटी पाळणें अवश्य आहे. प्रत्येक चरणांत आवर्तनांची सङ्ख्या ही अेक ठराविक असावी. अन्त्य आवर्तनांत सोयीप्रमाणे शेवटीं केवळ खटका ठेवावा वा निरनिराळ्या मात्रांचे विराम घ्यावेत. चरणारम्भीं आवर्तनारम्भ न ठेवतां आद्यतालकपूर्व गण ठेवायचा झाल्यास तो सव चरणांच्या आरम्भीं ठेवावा. म्हणजे, चरणारम्भीं विविधता नसावी. चरणान्त्य विराम भिन्न भिन्न मात्रांचे असल्याने कण्टाळवाणें वाटणारें अेकचअेकपण तितकें अुणावेल. चरणान्त सारखे नसल्याने यमकाची अडचण होअील; पण यमक काही पद्यास अपरिहार्य नाही.

“ आज पौर्णिमा मुखचन्द्राची, माथ्यावर चान्दणें
ढळल अुद्या मोत्याचें पाणी नीरस मग लेणें !
बहर भरारे देठोदेठीं रस भरला भरपूर
तारुण्याची सरल सम्पदा, अुतरुनि जाअिल नूर.” ( विवी ९ )

श्री. रा. बोबडे यांच्या या चार चरणांत तीन चरण भिन्न भिन्न मात्रावलींचे आहेत. ही रचना सयमक आहे; परन्तु अशा प्रकारची निर्यमक रचना केल्यास ज्यांच्या प्रतिभेची मुक्त पद्याच्या अभावीं कुचम्बणा होत आहे अशा कवींची सोय होअील आणि वाचकांचाहि अगदी विरस होणार नाही.

ज्यांच्या प्रतिभेला कोणतेंहि बन्धन सहन होत नाही त्यांनी गद्याचीच योजना करावी. पद्यापासून होणारा श्रुत्यानन्द मिळणार नाही, पद्यामुळेच लागणारी अेक प्रकारची तन्द्री लागणार नाही; आणि वाचिताचें पुन्हा मनांतल्या मनांत रोमन्थ करूं म्हटलें तर तें तितकें साधणार नाही या साऱ्या गोष्टी खऱ्या. परन्तु भावार्थाच्या हृदयङ्गमतेमुळे होणारा आनन्द गद्यामुळे रतीमात्रहि अुणावत नाही. अुलट गद्यापासून अेक लाभच आहे. पद्याचा वेष करून जें अकाव्य काव्याच्या नावावर विकतें त्याचें खरें स्वरूप लोकांना चटकन् अुमगेल. तेव्हा स्वाभाविक झळझळीत गद्य धकेल, पण दिखाअू म्हणजे लयमुक्त पद्य रुचणार नाही. लयमुक्त स्वैर पद्य हें निष्कारण कृत्रिम असल्याने केवळ स्वाभाविकपणाचा डाङ्गोरा पिटून तें कसें खपेल ?

# अध्याय २ रा

## यमक, यति, अक्षर आणि गण

### १ यमकविचार

पद्यरचना ही अेकप्रकारच्या आवृत्तीवर अधिष्ठित आहे. पद्यांत अेका चरणा सारखे अितर चरण असतात, अथवा चरणांतच काही ठराविक मात्रांच्या गणाची सारखी आवृत्ति असते. या आवृत्तीची सहज आणि स्पष्ट जाणीव व्हावी म्हणून विवक्षित ठिकाणीं, म्हणजे चरणान्त वा चरणारम्भ, गणान्त वा गणारम्भ या ठिकाणीं कवी काही आवृत्तिमूलक चमत्कार करून दाखवितात. यालाच **पदलालित्य** म्हणतात. पदलालित्य हें व्यञ्जनावृत्ति, अक्षरावृत्ति आणि यमक या तीन गोष्टींनी येतें.

आवृत्ति ही अेकाच व्यञ्जनाची आणि अेकदाच अशी असल्यास ती समासांत पदारम्भीं साधिल्याने तत्काळ प्रतीत होते; जसें कृष्णाकुमारी, तारातरङ्ग. अेकाच व्यञ्जनाची आवृत्ति अनेकदा साधायची झाल्यास ती क्रमाने शब्दांच्या आरम्भीं साधिल्याने लौकर डोळ्यांत भरते जसें,

> “पल्यङ्कावरि पडला पाण्डुपृथापुत्र पावला पीडा,
> वैरविजित विक्षतवपु विमुखत्वें वीरवर वरी व्रीडा.” (मोरोपन्त)

व्यञ्जनाची बहुवार आवृत्ति करणें यालाच **अनुप्रास** म्हणतात.

आवृत्ति ही अनेकव्यञ्जनांची वा अक्षरांची असल्यास ती अेकदाच झाली तरी रमणीयपणें जाणवते; मात्र ती यथाक्रम पाहिजे. जेथे अनेक गोष्टींचा अनेक गोष्टींशीं सम्बन्ध येतो तेथे क्रम अवश्य आहे. अक्रम हा दोष होतो.

> “न रन्जे कारन्जें निरखुनि, फणीने फणफणी,
> मुदेने मोदेना नलगुणगणीं जे गुणगुणी,
> न बैसे जे सेजेवरि, न परिसे जे शुकगिरा,
> न नाहे, माना हे न धरि ललना हेतु दुसरा.” (दस्व १४६)

या रघुनाथ पण्डिताच्या श्लोकांत मुदेने–मोदेना हें अुदाहरण अनेकव्यञ्जनावृत्तीचें आहे.

## अनेकाक्षरावृत्ति आणि यमक

वरील श्लोकांतील अितर अुदाहरणें 'न रन्जे कारन्जें'सारखीं अनेकाक्षरावृत्तीचीं आहेत. संस्कृतांत या अनेकाक्षरावृत्तीला यमक म्हणतात; आणि ही अनेकाक्षरावृत्ति अनेक ठिकाणीं योजितात. पुढील पद्यांत ती चरणविभागांच्या आरम्भीं योजिलेली आहे.

" छाया-नायकसा निदाघसमयीं छाया करी तो विधू,
वाया या हृदयश्रमासि करितो दायादसा हा मधू,
जाया ते रुचली मनीं तिजकडे जाया नये कीं पहा,
रायाला न गमे, न जाय रजनी, आयास होती महा."(दस्व २८)

येथे पहिल्या चरणांत 'छाया' या दोन अक्षरांची आवृत्ति आहे; परन्तु तिसऱ्या चरणांतील 'जाया' या दोन अक्षरांची आवृत्ति ही केवळ दिसायला आहे. पहिला जकार तालव्य आहे तर दुसरा जकार दन्ततालव्य आहे. तेव्हा सूक्ष्मपणाने पहातां जाया-जाया या जोडींतील आवृत्ति ही 'वाया-दाया,' 'राया-आया' या जोड्यांतील आवृत्तीप्रमाणेच अुपान्त्यस्वर आणि अन्त्याक्षर यांची म्हणजे 'आ-या'ची आहे.

मराठींत याला, म्हणजे अेक स्वर आणि पुढील व्यञ्जन, वा अक्षर वा अक्षरें यांची आवृत्ति साधणें याला **यमक** म्हणतात. आवृत्ति अनेकाक्षरांची असली म्हणजे त्या अक्षरांच्या पूर्वील स्वराचीहि आवृत्ति साधली आहे की नाही अिकडे लक्ष्य फारसें जात नाही; परन्तु आवृत्ति अेकाच अक्षराची असली तर मात्र त्याच्या पूर्वील स्वराची आवृत्ति पाहिजेच असें वाटतें. केवल अक्षरावृत्तीहून भिन्न असें हें यमक पूर्वी अगदी ठाअूक नव्हतें असें नाही. साहित्यदर्पणकार या यमकाला अन्त्यानुप्रास म्हणतो;

" व्यञ्जनं चेद्यथावस्थं सहाद्येन स्वरेण तु
आवर्तते ऽन्त्ययोज्यत्वादन्त्यानुप्रास अेव तत्" (साद १०।६)

या अन्त्यानुप्रासाचें अुदाहरण म्हणून तो पुढील चतुष्पदी देतो.

" केशः काशस्तबकविकासः
कायः प्रकटितकरभविलासः

चक्षुर्दग्धवराटककल्पं
त्यजति न चेतः काममतल्पम्" ( साद १०।६ )

गुजराथी रणपिङ्गलांत आणि हिन्दी छन्दःप्रभाकरांत या अन्त्यानुप्रासाला 'तुकान्त' हा शब्द योजलेला आढळतो; पण या तुकान्त शब्दाची पूर्वपीठिका गावत नाही.

अन्त्यानुप्रास हा शब्द रूढ व्हावा हें अिष्ट आहे; परन्तु यमक हा शब्द आधीच रूढ होअून बसला आहे; आणि अन्त्यानुप्रास हा शब्द तितका अुच्चारसुलभ नि सुटसुटीत नाही. तेव्हा यमक हा शब्द अन्त्यानुप्रासाच्या ठिकाणीं वापरून संस्कृतांत ज्याला यमक म्हणतात त्याला केवळ अक्षरावृत्ति म्हणावें; आणि वाङ्मयांत यमकाची तहान केव्हा केव्हा अक्षरावृत्तीवरच भागवून घेण्यांत येते असें समजावें.

## यमकाचा अितिहास

यमक हें संस्कृत वाङ्मयांत दुर्मिळ आहे. अलङ्कार म्हणून अनेकाक्षरावृत्तीचा अुपयोग चरणान्तींहि भारवि, माघ अित्यादिकांनी केलेला आढळतो.

" सकलविबुधलोकः स्वस्तनिःशेषशोकः
कृतरिपुविजयाशः प्राप्तयुद्धावकाशः
अजनि हरसुतेनानन्तवीर्येण तेना-
खिलविबुधचमूनाम् प्राप्य लक्ष्मीमनूनाम् " ( कुस १३।५१ )

या चतुष्पदींत यमकें आहेत; परन्तु हा सर्ग प्रक्षिप्त भागापैकी आहे असें म्हणतात. गीतगोविन्दकाव्यांत आणि मोहमुद्गर काव्यांत यमक आहे.

" ललितलवङ्गलतापरिशीलनकोमलमलयसमीरे
मधुकरनिकरकरम्बितकोकिलकूजितकुञ्जकुटीरे " ( गीगो १।३ )

" दिनमपि रजनी सायंप्रातः
शिशिरवसन्तौ पुनरायातः
कालः क्रीडति गच्छत्यायु-
स्तदपि न मुञ्चत्याशावायुः ( मोमु १ )

भरताच्या नाट्यशास्त्रांतील

"शङ्करः शूलभृत्
पातु मां लोककृत्" ( भ ३२।५१ )

या अुदाहरणांत यमक आहे; असें व्यञ्जनान्त यमक मराठींत फारच दुर्मिळ आहे. संस्कृतांत मात्र पहाः—

"गर्जसि मेघ न यच्छसि तोयं
चातकपक्षी व्याकुलितोऽहम्
दैवादिह यदि दक्षिणवातः
क्व त्वं क्वाहं क्व च जलपातः" ( पूर्वचातकाष्टक ४ )

भारवीच्या किरातार्जुनीयांतील पुढील श्लोकांत दिसून येणारें यमक कदाचित् यदृच्छया साधलें गेलें असेल.

"नासुरोऽयं न वा नागो
धरसंस्थो न राक्षसः
ना सुखोऽयं नवाभोगो
धरणिस्थो हि राजसः" ( किरात १५।१२ )

पहिल्या आणि तिसऱ्या चरणांच्या अन्तीं 'गो' या अेका अक्षराचीच आवृत्ति आहे; पण दुसऱ्या आणि चौथ्या चरणांच्या अन्तीं आवृत्ति 'असः'ची असल्यामुळे हें शुद्ध यमक आहे. अश्वघोषाच्याहि रचनेंत मध्येच यमक स्वाभाविकपणें पण अहेतुकपणें आलेलें आढळतेंः—

"हृदि या मम तुष्टिरद्य जाता
व्यवसायश्च यथा मतौ निविष्टः
विजनेऽपि च नाथवानिवास्मि
ध्रुवमर्थोऽभिमुखः समेत अिष्टः" ( अबुच ५।६९ )

यमक हें अपभ्रंशवाङ्मयांत सर्वत्र प्रचलित दिसतें; आणि त्या अपभ्रंशवाङ्मयाच्या द्वारा यमक मराठींत आलें असावें. जोअिन्दुकृत परमात्मप्रकाश हा अपभ्रंशवाङ्मयांतील ग्रन्थ खिस्तशकाच्या सहाव्या शतकापूर्वी रचलेला आहे. हा सयमक दोहा जातींत आहे. यांतून यमकाचें अेक अुदाहरण घेअूं.

“ अप्पा गुरु णवि सिस्सु णवि
णवि सामिअु णवि भिच्चु
सूरअु कायरु होअि णवि
णवि अुत्तमु णवि निच्चु ” ( पप्र ९० )

यमकाचें याहूनहि प्राचीन अुदाहरण आढळतें. कुन्दकुन्दाचार्यांच्या नावावर चालत आलेलीं प्राकृत गुरुभक्तीचीं पद्यें परमात्मप्रकाशाहून निःसंशय प्राचीन आहेत. हीं पद्यें सयमक आहेत. पहिली चतुष्पदी पहाः—

“ मणुयणाअिन्दसुर धरिय छत्तत्तया
पञ्चकल्लाणसोक्खावली पत्तया
दंसणं जाणज्झाणं अणन्तं बलं
ते जिणा दिन्तु अम्हं वरं मङ्गलं ” ( प्रागुभ १ )

## यमकाविषयी तीव्र मतभेद कां ?

यमकाचा काही अुपयोग आहे का? कवि रेन्दाळकर यांनी जेव्हा यमका-विरुद्ध बण्ड पुकारिलें तेव्हा निकराचीं वाग्युद्धें झालीं.

“ टला ट ग पला प
काव्य बने आपोआप ”

असें प्रतिपादन करणारे यमकाभिनिवेशी वीर प्रतिपक्षावर कर्तृत्वशून्यतेचा आरोप करीत आणि म्हणत की ‘ छन्दयाति आह्लादयाति अिति छन्दः ’ हें जर खरें असेल तर रसिकाच्या कानाला नि मनाला आल्हाद देणारें आणि कवीच्या कल्पनेला चालना देणारें यमक हें काढून टाकणें म्हणजे काव्याला शुष्क गद्याच्या पायरीला अुतरवून बसविण्यासारखें होय. अुलटपक्षीं यमकत्यागी लोक संस्कृत काव्यपरम्परेचें अुदाहरण पुढे करून प्रतिपक्षावर सनातन स्वधर्म सोडल्याचा आणि तोतयालाच राज्यासनावर बसविल्याचा आरोप करीत. त्यांचें म्हणणें असें की भावनेचें सङ्क्रामण हा काव्याचा आद्य हेतु होय. यमक हा निवळ अेक दागिना आहे. सालङ्कृत कलेवर नको; अनलङ्कृत परन्तु सुन्दर

जिवन्त कलाकृति पाहिजे. दागिन्यासाठी जातीचें सौन्दर्य विकृत करणें गर्ह्य आहे. यमकाच्या सोङ्गामुळे कित्येकदा नीरस पद्यच काव्याच्या नावावर खपतें. तेव्हा सयमक काव्य रचण्याचें सामर्थ्य अङ्गीं नाही म्हणून नव्हे तर खऱ्या काव्याची पारख व्हावी म्हणून निर्यमकच रचना करावी.

वस्तुतः यमकाचा प्रश्न गौण आहे. पक्षाभिनिवेशामुळेच या प्रश्नाला काही काळ अवास्तव महत्त्व आलें होतें. कविता ही आपण मुख्यत्वें करून सहानुभूतीच्या आनन्दासाठी वाचतों. चमत्कृतीची योग्य छटा कवितेंत असली तर ती आनन्दांत भरच टाकते; परन्तु कृति जितकी सहज, सुबोध आणि स्वाभाविक वाटेल तितकी तिच्यांतील चमत्कृतीची छटा हृदयङ्गम वाटते.

"अनलसमीहित साधी राया वारा महीवरा कामा
अनलस मीहि तसा धीरा यावा रामही वराका मा" (मोरोपन्त)

यासारखी हठाकृष्ट क्लिष्टरचना पाहिली की केवळ विस्मय वाटतो. अशा दुर्बोधरचनेंत रमणीयार्थ अत्यल्प येऊं शकतो; आणि वर, कविता अर्थाकडे लक्ष देऊन म्हणतांना चरणाचे जे विलक्षण तुकडे पडतात त्यांनी तर विरसच होतो. मणामणाच्या बेड्या पायांत घालून अेखादा बजरङ्ग विस्मयकारक अुड्या मारून दाखवील; परन्तु मेनकेचें पदलालित्य पहायचें असेल तर नूपुर चालतील; पण सुवर्णाचे असले तरी लङ्गर काय कामाचे? यमकाचें बन्धन हें तालाच्या बन्धनाप्रमाणे कृत्रिमता अुत्पन्न करितें; परन्तु ज्या मानाने चमत्काराचें स्तोम अुणावेल त्या मानाने बन्धनाची काचणी अुणावून कलाविलासास अधिक मोकळीक मिळेल.

## यमक अपरिहार्य नाही पण स्वाभाविक, आल्हाददायक आणि अपयुक्त आहे.

यमक हें सामान्यपणें आल्हाददायक आहे; आणि सयमकरचनेकडे मनुष्यप्राण्याची थोडीफार स्वाभाविक प्रवृत्तीच आहे. 'आपडी थापडी—गुळाची पापडी' यासारखे प्राचीन परम्परेने आलेले बाळबोल, आणि 'काखेंत कळसा—गावाला वळसा' यासारख्या म्हणी पाहिल्या की यमक जुळविण्याची प्रवृत्ति किती स्वाभाविक आहे हे दिसून येतें. पद्याप्रमाणेच यमक हें स्मरणशक्तीस साह्य

करितें आणि पद्याअितकेंच तें मनवळणींहि पडून जातें. काव्याची भाषा ही वास्तववादी, प्रत्यक्ष प्रखर सृष्टीची आठवण करून देअील अशी नसावी, ती गद्याच्या भाषेहून भिन्न, अद्भुतरम्यसूचक असावी असा जेव्हा आपला हेतु असतो तेव्हा यमक हें पद्याप्रमाणेच आपल्याला व्यवहाराच्या सहाऱ्यापासून दूर काव्याच्या काश्मीरांत नेअून सोडण्यास अुपयोगी पडतें. पद्याप्रमाणेच यमक हें कित्येकदा नवनवे वाक्प्रयोग आणि कल्पना सुचायला कारणीभूत होतें. पुन्हा काव्याची रचना जर पद्यांत करावयाची आहे तर कडव्याची विशिष्ट बान्धणी प्रतीत करून द्यायला यमक, चरणान्त्य यमक हें फार अुपयोगी पडतें. सुनीत म्हणजे केवळ साडेतीन श्लोक नव्हेत तर तें अष्टपदी नि षट्पदी, अथवा तीन चतुष्पद्या आणि त्यांची अेकत्र बान्धणी करणारी अन्त्य द्विपदी मिळून होतें याची जाणीव करून द्यायला यमकाच्या बान्धणीचा चाङ्गला अुपयोग होतो.

तथापि सयमक पद्य म्हणजे काव्य हें समीकरण कोणत्याहि रसिकास मान्य होणार नाही. 'औडक चौडक दामाडू, दामाडूचे पञ्चाडू' अशा सयमक आणि पद्यरूप तथापि निरर्थक बाळबोलांनी बाळांनाच आनन्द व्हायचा. समञ्जस मनुष्याला यांत काहीच हृद्रम्य वाटणार नाही. तरी यमकाच्या चमत्कृतीने दिपून नीरस पद्यालाच काव्य म्हणून कवळणारे आणि सरस काव्याला निर्यमक म्हणून झिडकारणारे काही विद्वान् आढळतात. त्यांच्या डोळ्यांना आणि कानांना यमकाची अितकी सवय झालेली असते की मराठी निर्यमक काव्य पहातांक्षणी ते बुजतात. यमक हें आज मराठी कवितेचें सौभाग्यचिन्ह होअून बसलें असलें तरी तें साक्षात् सौभाग्य नव्हे हें विसरतां कामा नये. तें अपरिहार्य नाही आणि त्याची शोभाहि सापेक्ष आहे.

सयमक रचना करावी की नाही हा प्रश्न जसा वैयक्तिक प्रकृतीचा तसाच सामाजिक रूढीचा आणि अभिरुचीचा आहे. संस्कृतांत बाणाच्या गद्यरूप कादम्बरीसहि काव्य मानतात, आणि पद्य हें प्रायः निर्यमक असतें; फार्सीभाषेंत गद्यसुद्धा सयमक रचण्याकडे शेकडों वर्षें प्रवृत्ति होती. रेन्दाळकरांनी निर्यमक पद्य रचण्यांत संस्कृत वाङ्मयांतील रूढीकडे परावर्तन केलें; राम गणेश गडकरी यांनी राजसंन्यासांतील सयमक गद्य लिहिण्यांत अुर्दू नाटकांतील पद्धतीचें अनुकरण केलें. यमकचतुर मोरोपन्ताने भगवद्गीतेचें भाषान्तर जसें पूर्वींच

निर्यमक केलें होतें, तसा चूर्णिका नामक गद्यप्रकारांत यमकाचा प्रवेश गडकऱ्यांच्या पूर्वीच झाला होता. विनायक कोण्डदेव ओक यांनी हिन्दुस्थानकथारसाच्या शेवटीं आपल्या अेका मित्राच्या गद्यग्रन्थांतून जो अुतारा दिला आहे तो केवळ यमकचमत्कार करून दाखविण्यासाटीच रचलेला दिसतो. वानगीसाठी पुढील अेक वाक्य पुरें होअील:—

"पहा पहा ! गङ्गानदीपलीकडे त्या लुङ्गाहीन कङ्गालांनी सङ्गात्यांसह दङ्गा शिङ्गावर घेण्यांत अङ्गाकडे न पाहतां पिङ्गा घालून, ढङ्गाच्या रङ्गाने हङ्गाम समजून, झिङ्गा बरळतो त्यापरी अिङ्गा फिरला नव्हता तोंपर्यंत चङ्गळ माण्डिली होती."

## यमकस्थान

पद्यांत यमक हें साधारणतः चरणान्तीं आणि लागोपाठ दोन वा आधिक चरणांच्या अन्तीं साधण्यांत येतें; कारण, चरणान्तीं विराम असतो आणि यमकाने चरण जणू काय अेकत्र बान्धले जातात. यमकाने प्रायः विषम-सम चरण बान्धले जातात; परन्तु केव्हा केव्हा यमक हें पहिल्या नि तिसऱ्या चरणांच्या अन्तीं आणि दुसऱ्या नि चौथ्या चरणांच्या अन्तीं साधण्यांत येतें.

(१) "अन्तर्बहिःस्थित रघूत्तमसूनुधाकें
प्राणासि धैर्य तिळमात्र न होय जाया;
मोहान्धकारपतिता विधिच्या विपाकें
नेत्रें हळूच अुघडी रघुवीरजाया" (मोकुल ४।३६)

(२) "घनरवान्तकरा, खणतो पहा
वनबिडाल महीस कसे वनीं,
बहु भयङ्कर कर्कश हे महा,
परम सस्पृह मूषकसेवनीं." (मोकुल ४।२१)

जेथे रचना अर्धसम असते तेथे यमकें याप्रमाणे जुळविणें बरें असतें. कित्येकदा यमक हें पहिल्या आणि तिसऱ्या चरणांच्या अन्तीं जुळवीत नाहीत, दुसऱ्या आणि चौथ्या चरणांच्या अन्तीं जुळवितात; जसें

"तव पादसरोरुहीं स्वचित्त-
भ्रमरातें रस चाखवूनि गोवूं,
तुज भक्त तुझे सदैव गाती,
मृग आम्ही गुणगीतसक्त होवूं." (मोस्फुका ४।१८३)

गीतींत बहुशः यमक असेंच दुसऱ्या आणि चौथ्या पादांच्या अन्तीं साधलेलें असतें; परन्तु दोनदोन चरण सलग अका ओळींत देण्याच्या पद्धतीमुळे ही गोष्ट ध्यानांत येत नाही. गीतींत लागोपाठ चरणांच्या अन्तीं यमक जुळविल्याचीं अुदाहरणें दुर्मिळ आहेत.

"सोडुनि माझा घोडा
दोघेहि हस्त या क्षणीं जोडा.
'शरणागत', म्हणवा रे,
यानि अुपायें समर्थभय वारे". (मोकुल १३।१६)

वीरेश्वराने आपल्या गजमुखचरित्रांत यमकें अशींच जुळविलीं आहेत:—

"देअुनि निरोप अमरां
अुठला तो अीश जावया समरा;
त्या जगदवलम्बातें
दे नन्दी निजकरावलम्बातें." (वीगच ८)

आर्यागीतींत यमकें अशीं म्हणजे पहिल्या आणि दुसऱ्या, तिसऱ्या आणि चौथ्या चरणांच्या अन्तीं साधिलेलीं रविकीर्तीच्या काळापासून आढळतात.

दोन वा क्वचित तीन चरणांहून अधिक चरण सोडून यमक साधूं नये. यमक केवळ डोळ्याला दिसून त्याचा तितका उपयोग नाही. तें कानाला कळलें पाहिजे. 'पूर्वानुभवसंस्कारबोधिनी यद्यदूरता,' हा दण्डीने अनुप्रासाच्या बाबतींत घातलेला दण्डक यमकाच्या बाबतींत अवश्य पाळायला हवा. दुसऱ्या जोडीदाराची गाठ पडेपर्यन्त पहिल्याचें स्मरण रहायला पाहिजे. चरण आखूड असल्यास पहिल्या आणि चौथ्या वा पांचव्या चरणांच्या अन्तीं यमक चालेल; परन्तु चरण दीर्घ असल्यास यमकांचाहि दूरान्वय होण्याची भीति असते. यशोधनांत (पृ. ७६) शार्दूलविक्रीडितरचनेंत पहिल्या चरणाचें यमक आठव्या चरणाशी जुळविलें आहे!

यमक हें जसें विरामापूर्वी म्हणजे चरणान्तीं साधण्यांत येतें तसेंच तें चरणारम्भींहि साधतात.

(१) "पम्पातीरीं मग वसे
शम्पाशतरुचिचाप
सम्पाया धृति विरह दे
कम्पा अुठवुनि ताप." (मोदोरा ३७)

(२) "शङ्का हरुनी बिभीषणा
रङ्का सङ्गरधीर
पङ्कापहगुणसिन्धु दे
लङ्का श्रीरघुवीर." (मोदोरा ६५)

(३) "वन्देऽहं विठ्ठलं दातुं
शं देहं धृतवान्प्रभुः
संदेहं हन्त मुदितो
मन्देहं योंऽशुमानिव." (मोस्फुका १।१३६)

(४) "पङ्कराशिमपि पावनकीर्ते
रङ्कराजमव मां करुणाब्धे
शङ्करानतमलं तव कर्तुं
कं कराब्जमनघं न सदीड्यम्" (मोस्फुका १।१८३)

पुढील दोन अुदाहरणांत अनुक्रम आद्यन्तिक आणि अन्तादिक यमक आहे असें म्हणतात; पण वस्तुतः हीं अनेकाक्षरावृत्तीचीं अुदाहरणें आहेत.

(१) "शोक लास्य करी हृदङ्गणिं, कण्ठ केवळ शोकला,
कोमलाननपूर्णचन्द्र तिचा तदा बहु कोमला;
कां पती रुसला? म्हणे, सकलेन्द्रियें बहु कांपती,
भार तीस निजाङ्ग होय, वदे अशी मग भारती." (मोकुल ४।७१)

(२) "तेची चिरञ्जीव जगीं जहाले
हाले जयांचे स्मरणें धरा ही,

राही जयांचें यश शुभ्र येथे,
येतें जयांचे स्मरणें दृगम्बू." ( तासक ४४ )

## यमकान्तीं खटका असतो.

चरणान्तर्गत विरामामुळे जेथे चरणाचे दोन विभाग पडतात तेथे त्यांच्या अन्तीं ( आणि क्वचित् केव्हा आरम्भीं ) यमक साधण्यांत येतें. याचीं अुदाहरणें मागे (पृ ४९–५० पहा) दिलींच आहेत. आणखीहि अेकदोन अुदाहरणें घेअूं.

( १ ) " असेल सामर्थ्य तरीच चापीं
मौर्वीसि जोडा, विशिखासि सोडा;
नसेल सामर्थ्य तथापि सारे
हस्तासि जोडा, मम बन्धु सोडा." ( मोकुल ८।२७ )

( २ ) " हे वो कोडें कोन निवाडें
अैस्या लक्षा काय विवक्षा
घेतो चापा स्पर्शुनि कोपा
चन्दीं दक्षा हेंचि परीक्षा." ( लस्व ५।३२ )

येथे चरणान्तीं यमक न साधितां चरणविभागान्तीं साधिलें आहे. परन्तु अेवढ्यावरून चरणविभागाला चरण मानून चतुष्पदीची अष्टपदी करण्याचें प्रयोजन नाही. जेथे चरणाचे अशा रीतीने पडणारे दोन विभाग लगक्रमदृष्ट्याहि अभिन्न असतात तेथे मात्र चरणाची अदूपट करून चतुष्पदीची अष्टपदी करण्याकडे प्रवृत्ति होते; अुदाहरणार्थ,

" त्या पुरींत सर्व लोक जाहले अुदण्डशोक
किन्तु तो न रामवीर जाउं दे स्वकीय धीर
सर्व पौर कान्तिहीन जाहले अतीव दीन
तो महान्त अन्तराय बोलवी जनांस 'हाय'!" (राप ५।८४)

हा श्लोक निर्यमक चञ्चला [ । – ‿ – ‿ । – ‿ – ‿ । – ‿ – ‿ । – ‿ – ‿ ] वृत्ताचा आहे. परन्तु मध्यान्तिक यमक साधल्यामुळे प्रत्येक चरणाचे दोन अगदी अेकसारखे तुकडे पडतात; आणि अेका श्लोकाचे पुढील प्रमाणे समानिकावृत्तांतील दोन सयमक श्लोक होतात.

“ त्या पुरींत सर्व लोक
जाहले अदण्डशोक
किन्तु तो न रामवीर
जाउं दे स्वकीय धीर.
सर्व पौर कान्तिहीन
जाहले अतीव दीन
तो महान्त अन्तराय
बोलवी जनांस ‘ हाय ’.”

वृत्तांत अथवा जातींत सारख्या लगक्रमाचे शब्द जर सारख्या अन्तरांनी येऊं शकत असतील तर तेथे चरणामध्येच यमकें साधून कवीस पदलालित्य दाखवावेसें वाटतें. आणि हीं यमकें तरङ्गावलीप्रमाणे आल्हाददायक होतात; जसें,

“ तो शर गरधरवरसा, पविसा रविसा स्मरारिसायकसा ” ( मोरोपन्त )

“ न धरी बा दर हा दर सादर दे वाजवूं पुन्हा नीट ” ( मोरोपन्त )

जातिरचनेंत विशेषतः अष्टमात्रक आवर्तनाच्या जातींत प्रत्येक आवर्तनांत तिसऱ्या मात्रेवर खण्डन करून तेथे यमकें साधतात; जसें,

“सुन्दरा मनामधि। भरलि जरा नहि। ठरलि हवेलिंत। शिरलि मोत्याचा। भाङ्ग”

यमकान्तीं याप्रमाणे खटके हे असतात; तेथे थोडें थाम्बणें अवश्य असतें. तसें न केल्यास यमकांची प्रतीति कानास होत नाही. तेव्हा तसें करितांना शब्द भलत्या ठिकाणीं तुटून रसभङ्ग होऊं नये.

“ वाजत गाजत साजत आज तया जतन करुनि आणा हो ” ( मोविप ४ )

ही ओळ अर्थाकडे लक्ष देऊन सरळ म्हटली असतां वाजत, गाजत, साजत या तीनच शब्दांतील यमक प्रतीत होतें; आजत याजत या दोन अक्षरावलींतील यमक प्रतीत होत नाही; कारण, म्हणतांना आजत–याजत असे तुकडे न पडतां ते ‘ आज तया ’ आणि ‘ जतन ’ असे पडतात.

“ रामा, मनोज्ञगुणधामा, पलाशजनतामारणैकनिरता,
कामारिचित्तसदना, मारुतिप्रियसुनामा, नराश्रुविजिता,

धामाधिपान्वयवरा, मानशौर्यसुभगा, मानिषेव्यचरणा,
वामाकृते, अितरवामापराङ्मुखमना, मानवैकशरणा." (मोकुल १३।३०)

या श्लोकांत 'आमा'ची आवृत्ति साधिली परन्तु ती स्पष्टपणें प्रतीत होत नाही. यासाठी यमकान्तीं पदसमाप्ति होणें अवश्य आहे.

चरणान्तर्गत यमकावलीमुळे कित्येकदा वृत्ताची वा जातीची मोडणी कळायला साह्य होतें. अुदाहरणार्थ, सोळा गुरु अक्षरांच्या ब्रह्मरूपक नावाच्या वृत्ताचें वाणीभूषणांतील

"राजद्भालः स्फूर्जन्नेत्रप्रोद्यद्वाह्निज्वालाजालैः
स्व...त्यम्भोवीचीनीरासारस्विद्यच्चूडाचन्द्रः।
माद्यद्गौरीवक्त्राम्भोजस्वैरस्मैरक्रीडाशीतः
श्रेयो देयान्नागश्रेणीभूषामीषश्चन्द्रापीडः" (वाभू २।१८२)

हें अुदाहरण पाहतां वृत्ताची मोडणी [।----।----।----।----] अशी वाटते; परन्तु ज्या प्राकृतपैङ्गलावर वाणीभूषण आधारलेलें आहे त्यांतील,

"अुम्मत्ता जोहा अुट्ठे कोहा ओत्थाओत्थी जुज्झन्ता
मेणक्का रम्भा णाहं दम्भा अप्पाअप्पी बुज्झन्ता
धावन्ता सण्ठा छिण्णो कण्ठा मत्था पिट्ठी पेरन्ता
णं सग्गा मग्गा जाओ लग्गा लुद्धा अुद्धा हेरन्ता" (प्रापै २।१७५)

हें अुदाहरण पहातां वृत्ताची मोडणी [-।-----।-----।-----।---] अशी पाहिजे हें निश्चित होतें.

चरणान्तीं यमक साधितात म्हणून तेवढ्याने यमक हें चरणसमाप्तीचें गमक होत नाही. कित्येकदा लागोपाठ दोन आवर्तनान्तीं यमक साधतात; कित्येकदा तें अेका चरणांत साधतात आणि दुसऱ्या चरणांत साधीत नाहीत. तेथे यमक हें केवळ पदलालित्याचें अेक अङ्ग असतें.

"मुखरमधीरं त्यज मञ्जीरं रिपुमिव केलिसुलोलम्
चल सखि कुञ्जं सतिमिरपुञ्जं शीलय नीलनिचोलम्" (गीगो ११।४)

हे साकीचे दोन चरण आहेत. या द्विपदीची यमकानुरोधाने,

> “ मुखरमधीरम्
> त्यज मञ्जीरम्
> रिपुमिव केलि सुलोलम्
> चल सखि कुञ्जम्
> सतिमिरपुञ्जम्
> शीलय नीलनिचोलम् ”

अशी षट्पदी करणें युक्त होणार नाही. यमकानुरोधाने चरणनिर्णय केल्यास “ वाचाळ मी नीट पाचारितों धीट त्याचा न यो वीट साचा हरी ” या अेक चरणाचे

> “ वाचा-
> ळ मी नीट
> पाचा-
> रितों धीट
> त्याचा
> न यो वीट
> साचा
> हरी ”

असे आठ तुकडे पडून हें विलक्षण पद्य होअील !

## यमक कसें असावें ?

काव्याच्या सरस स्वाभाविकतेला जपायचें असेल तर यमक हें अेकदोनाहून अधिक अक्षरांचें असण्याचें प्रयोजन नाही. यमक प्रत्ययात्मक नसावें. “ रामाचें –देवाचें ” हें यमक योग्य नाही; “ घे वाचे–देवाचे ” हें यमक चालेल. यमकाच्या पुनरावृत्त भागांतील व्यञ्जनोच्चार अभिन्न नसले तर ते सवर्गीय, निदान अेकमेकाशी जुळते असे असावेत. टाक–लाख, दासी–खाशी, पुढे–मुदें, केश–वेष, भाल–आळ अशीं यमकें शुद्ध आणि अुत्तम अर्थातच नाहीत; पण तीं धकतील. त्यांच्यावर बहिष्कार घालण्याचें कारण नाही.

## मराठींतील यमकोपयोगाचा अितिहास

मराठींत चरणान्त्य यमक हें अपभ्रंशवाङ्मयाच्या द्वारा आलें असलें पाहिजे. तथापि मराठींतील आद्य वृत्तात्मक रचना, भास्करकविकृत 'अीशस्तुति' ही निर्यमक आहे. तेराव्या शतकाच्या शेवटीं शेवटीं सयमक रचनेचा पाठच पडला. परन्तु अनेकदा शुद्ध यमकाचें काम केवळ अक्षरावृत्तीवर भागवून घेण्यांत येअी. ओवीरचनेंत असें सदोष यमक आहे. अेकनाथाचीं पदें सयमक आहेत. मुक्तेश्वराच्या रामायणाची वृत्तरचना ही सयमकच आहे. वामनापासून यमकाला विशेष महत्त्व येअूं लागलें; तो निर्वाळा असा देतो कीं,

> "श्लोकवृत्त कथिलें यमकांनी
> गाति त्यांस न पडे यम कानीं" (वाभारा १।३०)

त्याच्या चमत्कृतिजनक थोर कामगिरीमुळेच त्याचें नाव 'यमक्या' पडलें. मोरोपन्ताच्या कृतींत या चमत्कृतीचा कळस झाला. चरणान्तीं शक्य तितक्या अक्षरांचीं यमकें तर त्याने साधिलींच, पण साहित्यकारांनी शब्दालङ्कारप्रकरणीं जितक्या प्रकारचीं यमकें साङ्गितलीं आहेत तितक्या प्रकारचीं जुळवून मोरोपन्ताने वाचकांचे डोळे दिपवून टाकिले, त्यांची मति भ्रान्त करून टाकिली. तथापि त्याचें भगवद्गीतेचें भाषान्तर निर्यमक गीतींत आहे हें विसरतां कामा नये. जातिरचनेला यमक हें प्राचीनकाळापासून आवश्यक वाटत आलें आहे. आधुनिक मराठी कवींत घण्टय्या नायडू यांनी आपलें अेक दीर्घ काव्य निर्यमक लिहिलें असलें तरी निर्यमक कवितेची चळवळ अेकनाथ पाण्डुरङ्ग रेन्दाळकर यांनीच केली. रा. अेकनाथ यादव निफाडकर यांचें 'सतीचा शाप' हें दीर्घ जातिस्वरूप काव्य निर्यमकच आहे. तरी आधुनिक मराठी कविता ही प्रायः सयमकच आहे. शक्य तितक्या अक्षरांचीं यमकें हट्टाने जुळवीत बसण्यांत बुद्धीचा व्यय मात्र क्वचितच कोणी कवि करीत असेल. यमक अेकाक्षरी असलें तरी धकतें. अेकाक्षरी यमक जुळविणें हें पद्यरचनेहून अधिक दुष्कर वा कृत्रिम सुतराम् नाही. तथापि रेन्दाळकरांच्या मागून निर्यमक कवितेचा पुरस्कार करण्याची आवश्यकता अलीकडे पूर्व महाराष्ट्रांतील कवींना वाटूं लागली आहे. त्यांच्यापैकी काही जणांना तर लयबद्धताहि जाचक होते. त्यांनी यमकाची प्रतिष्ठा कां ठेवावी ?

## २ यतिविचार

पद्य सलगपणें आणि लयानुरोधाने वाचीत असतांना जो न्यूनाधिक विराम काही ठिकाणीं घ्यावाच लागतो त्याला **यति** म्हणतात. हा यति ज्या ठिकाणी घ्यावयाचा त्या 'जिह्वेष्टविश्रामस्थाना'लाहि **यति** म्हणतात. यतिस्थानीं पद्याचा विच्छेद होतो, तुकडा पडतो; म्हणून यतिस्थानीं शब्दसमाप्ति, निदान पदसमाप्ति तरी व्हावी. तसें न झाल्यास जो कर्णकटु दोष होतो त्याला यतिभङ्ग म्हणतात.

यति मानावा की नाही याविषयी मतभेद आहे असें दिसतें.

" जयदेअपिङ्गला सक्कअम्मि दोच्चिअ जअिं समिच्छन्ति।
मण्डव्व, भरह, कासव, सेवल ( ? यव ) पमुहा ण अिच्छन्ति " ॥
( स्वछ १।१४४ )

पिङ्गल आणि जयदेव हे यति मानतात तर माण्डव्य, भरत, काश्यप, आणि सैतव हे मानीत नाहीत. याचा अर्थ, पद्यरचनेंत यति येअूंच शकत नाही असा नव्हे, तर यति हा पद्य म्हणणाऱ्याच्या पद्धतीवर अवलम्बून असल्यामुळे त्याचें स्थान हे निश्चित मानीत नसत अेवढाच केला पाहिजे. ही अनिश्चिति चरणान्तर्गत यतीविषयीं असली पाहिजे; कारण " यतिः सर्वत्र पादान्ते श्लोकार्धेतु विशेषतः " असें परम्पराप्राप्त वचन आहे. चरणान्तीं यति हा निरपवादपणें असलाच पाहिजे; कारण, पद्याचे चरणरूपी विभाग हे या अपरिहार्य यतीच्याच अनुरोधाने पडतात.

" लाविला गुलाबी रङ्ग
किति सुन्दर अमुच्या बङ्ग- ल्याप्रती !
मोगरी, चमेली, कुन्द
लाविलीं चहुकडे सुन्द- राकृती.
गुञ्जतात गुङ्गुङ् भृङ्ग;
तो नाद तयांचा गुङ्ग- वी मती." (पोप ५७)

यासारखीं हास्योत्पादक* पद्यें सोडलीं तर चरणान्तीं शब्दसमाप्ति न होण्याचा

---

* परन्तु " प्रभूतें म्हणे, हें पहा आङ्ग, लीला-
वती मी, वरावें मला चाङ्गलीला " (मोसीरा ४०)

हें हास्योत्पादक नाही, हास्यास्पद आहे.

प्रश्नच सम्भवत नाही. अुलटपक्षीं चरणान्तीं विराम घ्यायला पाहिजे तो न घेतां पुढील चरणांत जेथे यति नाही तेथे तो अर्थाच्या सोयीसाठी घेतल्यास तें कर्णकटु नि वैरस्यकारक होतें. पहाः—

" लीलेने स्वकरांत तो धरितसे काण्डी बरूची जधी
सार्‍या सुन्दर वस्तु त्या झडकरी येती समाधीमधी
त्याच्या; येअुनि त्या तयास म्हणती, 'आम्हास दे भूषण
दिव्यें, आणि शिकीव लौकर अम्हां तीं अप्सरोगायनें' " ( केक. ८० )

चरणान्तर्गत यति मानावयाचा की नाही, मानावयाचा झाल्यास त्याचें स्थान कोणतें अित्यादि गोष्टीविषयी मतभेद सम्भवतो. अनुष्टुभ् , बृहती आणि पङ्क्ति या वर्गांतील वृत्तांत पिङ्गलाने यति साङ्गितला नसला तरी हलायुध असा आम्नाय आहे म्हणून याति साङ्गतो. अिन्द्रवज्रा, अुपेन्द्रवज्रा या अकरा-अक्षरी वृत्तांत पिङ्गल यति साङ्गत नाही, पण शालिनी या अकराच अक्षराच्या वृत्तांत तो याति साङ्गतो. मन्दारमरन्दचम्पूचा कर्ता श्रीकृष्ण कवि हा अिन्द्रवज्रा –अुपेन्द्रवज्रा वृत्तांत पांचव्या अक्षरानन्तर यति साङ्गतो.

कानडी छन्दोऽम्बुधीचा कर्ता नागवर्मा हा स्वतन्त्रपणें याति साङ्गतो. शालिनीवृत्तांत तो यति [ – – – – – ‿ – ! – ‿ – – ] सातव्या अक्षरानन्तर साङ्गतो; रथोद्धतेंत [ – ‿ – ‿ ‿ ‿ ! – ‿ – ‿ – ] सहाव्या अक्षरानन्तर, अिन्द्रवज्रावृत्तांत [ – – ‿ – – ‿ ‿ – ! ‿ – – ] आठव्या अक्षरानन्तर यति साङ्गतो. नागवर्म्याने साङ्गितलेले काही यति स्वाभाविक वाटतात तर काही कृत्रिम वाटतात. शशिकला, स्रक् इत्यादि अप्रचलित वृत्तांची मोडणी कळून त्यांना चाल लावायला साङ्गितलेल्या यतिस्थानांचें साह्य होतें. परन्तु कोकिलक, नर्कुटक अित्यादि काही वृत्तांना चाल लावतांना यतीची अुलट अडचण होते.

शालिनी, पृथ्वी, शार्दूलविक्रीडित अित्यादि वृत्तांच्या चाली परम्परेने चालत आल्या असून जिवन्त राहिल्या आहेत, त्यांच्या यतिस्थानाविषयी बहुशः मतभेद होत नाही.

यतिभेदाने वृत्तभेद होतो. अवितथ, कोकिलक, आणि नर्कुटक वा शशिकला, स्रक् आणि मणिगुणनिकर हे भेद यतिभेदाने होतात.

यतिस्थानीं विराम घ्यावयाचा तो न्यूनाधिक असूं शकतो. त्या ठिकाणीं जर नुसता खटकाच असेल तर तो स्वल्पविराम समजावा. रुचिरा आणि प्रहर्षिणी या वृत्तांत अनुक्रमें चार आणि तीन अक्षरांनन्तर म्हणजे सहा मात्रांनन्तर द्विमत्त्रक विराम असावा असें मला वाटतें.

## पिङ्गलाची धरसोड

आवर्तनी वृत्तांत यतिस्थान कोणत मानावें याविषयी पिङ्गलाचें काही निश्चित धोरण दिसत नाही. कुड्मलदन्ती, जलोद्धतगति, प्रहरणकलिता, मणिगुणनिकर, ललना अित्यादि सोळा मात्रांच्या पञ्चावर्तनी वृत्तांत तो प्रथमावर्तनान्तीं यति साङ्गतो; परन्तु दोधक आणि मत्ता या सोळाच मात्रांच्या पञ्चावर्तनी वृत्तांत तो तसा प्रथम आवर्तनाच्या अन्तीं यति साङ्गत नाही. रुक्मवती वृत्तांत तर चरणमध्यावर चरणाचे लगक्रमदृष्ट्या अेकसारखे असे दोन तुकडे पडत असूनहि तो यति साङ्गत नाही; आणि वरतनु ( म्हणजेच मालती ) वृत्तांत तर तो भलत्याच ठिकाणीं यति साङ्गतो. क्रौञ्चपदावृत्तांत तो प्रत्येक आवर्तनान्तीं यति साङ्गतो, पण त्या सारख्याच तन्वीवृत्तांत तो पहिल्या आणि दुसऱ्या आवर्तनान्तीं यति साङ्गतो, पण तिसऱ्या आवर्तनान्तीं साङ्गत नाही.

पिङ्गलाची ही धरसोड दाखवून देण्याचा हेतु अितकाच की त्याचें मत हें अवश्य विचारणीय असलें तरी तो अन्तिम निर्णय समजण्यांत येअूं नये. अमुक अेक ठिकाणीं यति मानावा की नाही याचा निर्णय, प्राचीन विपुल अुदाहरण अुपलब्ध असतीं तर तत्काळ देतां आला असता. परन्तु हें आता शक्य नाही. पिङ्गलाचें मत प्रमाण मानून ज्या कवींनी त्याप्रमाणे रचना केली त्यांच्या रचनेचा अुपयोग पिङ्गलाच्या मताची ग्राह्याग्राह्यता ठरवायला मुळीच होणार नाही. कवींनी यति पाळलेला दिसला नाही तरी मोडणी पहातां जेथे अेक वा अनेक मात्रांचा विराम असेल तेथे यति मानल्यावाचून शास्त्राला गत्यन्तर नाही. कित्येक अशीं वृत्तें आहेत की त्यांच्यांत प्रथमावर्तनांत शेवटीं द्विमात्रक विराम पाहिजे असें मला वाटतें.

नवमालिनी, प्रमदा, कुटिल, गजविलसित, प्रभद्रक, कुमारी, मणिकल्पलता,

शैलशिखा, अवितथ, वरयुवती, वंशदल, भ्रमदपद, द्युवाणिनी, वाणिनी, नीरललिता, समदविलासिनी, गरुडरुत, नन्दन, नरेन्द्र, कामलता, शशिवदना, भद्रक, अश्वललित, ललितविक्रम आणि सुधाकलश[1] या पञ्चवीस वृत्तांची परस्पराशी तुलना करून पहातां हीं अष्टमात्रक आवर्तनाचीं आहेत, पहिला गण ( – ⏑ ⏑ – ) वा ( ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ) असा षण्मात्रक आहे, आणि पुढील गणांत ( ⏑ – ⏑ ⏑ ⏑ – ) या गणाचें प्राचुर्य आहे हें ध्यानांत यायला वेळ लागत नाही. आता पिङ्गलाने साङ्गितलेल्या वृत्तांपुरताच विचार केला तर असें दिसून येतें की वंशपत्रपतित (वंशदल), शशिवदना, भद्रक आणि अश्वललित या चार वृत्तांत तो द्वितीय आवर्तनाच्या अन्तीं यति साङ्गतो; पण नवमालिनी, ऋषभगजविलसित, शैलशिखा, अवितथ आणि वरयुवती या वृत्तांत तो द्वितीय आवर्तनाच्या अन्तीं यति साङ्गत नाही. वरयुवती आणि वंशपत्रपतित या दोन वृत्तांत विलक्षण साम्य आहे; पण अेका वृत्तांत तो यति योग्य ठिकाणीं साङ्गतो तर दुसऱ्या वृत्तांत तो यतिच साङ्गत नाही! अेकन्दरीने विचार करितां नवमालिनी, ऋषभगजविलसित, शैलशिखा, कोकिलक या वृत्तांत पिङ्गलाने साङ्गितलेलीं यतिस्थानें चुकीचीं वाटतात. अष्टमात्रक आवर्तनाच्या वृत्तांत जेथे चरणांत चार आवर्तनें असतात तेथे दुसऱ्या आवर्तनाच्या अन्तीं खटका अगदी स्वाभाविकपणें येतो. तेथे अेका मात्रेचाहि विराम नसतो, तथापि तें यतिस्थान होतें; आणि तेथे पदसमाप्ति अवश्य वाटते. जेथे केवळ खटका आहे तें जर यतिस्थान मानावें लागतें तर जेथे दोन मात्रांचा विराम आहे तें यतिस्थान मानलेंच पाहिजे हें अुघड आहे. पहिल्या आवर्तनांत सशब्द सहा मात्रा झाल्यावर दोन निःशब्द मात्रांचा विराम घेतल्याविना नवीन आवर्तनाला आरम्भ होअू शकत नाही. म्हणून या सर्व वृत्तांत ( ⏑ ⏑ – – ) वा ( – ⏑ ⏑ – ) वा ( ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ) या पहिल्या गणाच्या अन्तीं द्विमात्रक विराम असल्याने तेथे यति मानणें अपरिहार्य आहे.

---

१ यांच्या व्यतिरिक्त याच प्रकारचीं आणखी काही वृत्तें आहेत. त्यांची ठाअुकी छन्दःशास्त्रज्ञांस नाही; पण त्यांचीं अुदाहरणें वाङ्मयांत सापडतात. त्यांचीं अुडुपथ, सुरासुरवन्द्य, त्रिदशाङ्गना अशीं नावें अुदाहरणांतील शब्दांवरून मी ठेविलीं आहेत. विस्तारभयास्तव तीं येथे दिलीं नाहीत.

अगदी सूक्ष्मपणाने विचार केला तर असें वाटतें की रुचिरा आणि प्रहर्षिणी या वृत्तांत, पाहिल्या आवर्तनांत ज्याप्रमाणे द्विमात्रक विराम असल्याने अनुक्रमें चौथ्या आणि तिसऱ्या अक्षरानन्तर यति साङ्गण्यांत आला आहे त्याप्रमाणे दुसऱ्या आवर्तनांतहि पाचव्या अक्षरानन्तर यति साङ्गायला हवा. म्हणजे रुचिरा आणि प्रहर्षिणी यांची अक्षरमाण्डणी आवर्तनानुसार अनुक्रमें [। – –ऽऽ! ᵕ ᵕ ᵕ ᵕ –ऽऽ! ᵕ – ᵕ –] आणि [– – –ऽऽ! ᵕ ᵕ ᵕ ᵕ –ऽऽ! ᵕ – ᵕ – –] अशी होओील. यतिस्थान ( ! ) या चिन्हाने दाखविलें आहे.

## ३ अक्षरविचार

अक्षर म्हणजे वर्ण नव्हे, आणि अक्षरविचार म्हणजे शुभ वर्ण कोणते आणि अशुभ वर्ण कोणते याचाहि विचार नव्ह. वर्णांचें शुभ आणि अशुभ वा दग्ध असें वर्गीकरण केलेलें आढळतें तें कोणत्या तत्त्वास अनुसरून आहे आणि त्या वर्गीकरणाचा छन्दःशास्त्राशी काय सम्बन्ध आहे हें काही समजत नाही. काव्यारम्भीं अशुभ अक्षर नसाव; पण देवाच्या नावासारख्या मङ्गल शब्दारम्भीं तें असलें अथवा तें गुरु असलें तर म्हणे दोषाचा परिहार होतो !

**अक्षर** म्हणजे ओकावेळीं तोण्डांतून बाहेर पडणारा ध्वनि होय, मग तो ध्वनि लिहून दाखवायला लिपींतील चिन्ह ओक लागो वा अनेक लागोत. अक्षराचें अधिष्ठान स्वरावर असतें,[1] मग त्यांत आरम्भीं वा अन्तीं व्यञ्जनोच्चार मिळो वा न मिळो. राजन् या शब्दाच्या लेखाकडे पाहून आपण यांत रा-ज-न् अशीं तीन अक्षरें आहेत म्हणून म्हणतों; पण हें चूक आहे. वस्तुतः रा-जन अशीं दोनच अक्षरें आहेत. शब्दांत जितके स्वर तितकींच अक्षरें होणार. रा हें अक्षर आकारान्त म्हणजे स्वरान्त आहे; तर जन् हें अक्षर व्यञ्जनान्त आहे. स्वरान्त अक्षराला **विवृत** म्हणतात आणि व्यञ्जनान्त अक्षराला **संवृत** म्हणतात.

स्वराच्या ऱ्हस्वदीर्घतेप्रमाणे स्वाभाविकपणेंच विवृत अक्षर अुच्चारायला न्यूनाधिक काळ लागतो. दीर्घ स्वर अुच्चारायला लागणारा काळ ऱ्हस्व स्वर अुच्चारायला लागणाऱ्या काळाच्या दुप्पट गणावा असा स्थूल सङ्केत आहे.

१ "अेक मात्रं भवेद् ह्रस्वं द्विमात्रं दीर्घमिष्यते
प्लुतं चैव त्रिमात्रं स्याद् अक्षरं स्वरयोजनात्" ( भ १७।११६ )

ऱ्हस्व स्वर अुच्चारायला अेक मात्रेचा काळ लागतो असें म्हटलें तर दीर्घ स्वराच्या दोन मात्रा होतात. ऱ्हस्वस्वरान्त अक्षराला लघु आणि दीर्घ स्वरान्त अक्षराला गुरु म्हणतात. आधुनिक मराठींत अ, अि, अु हे तीन स्वर ऱ्हस्व, आणि आ, अी, अू, अे, अै, ओ, औ हे सात स्वर दीर्घ मानावेत ही मर्यादा पाळली जात आहे.

व्यञ्जनान्त म्हणजे संवृत अक्षर अुच्चारायला लागणाऱ्या काळांताहि स्वराच्या ऱ्हस्वदीर्घतेप्रमाणे काही सूक्ष्म अन्तर पडतेंच पण तिकडे दुर्लक्ष करून, स्वर ऱ्हस्व असो वा दीर्घ असो, संवृत अक्षर हें सदैव गुरुच, द्विमात्रक मानावें असा-नियम चालत आलेला आहे.

लघु-गुरूसाठी अनुक्रमें ( । ) नि ( ऽ ) हीं प्राचीन, आणि ( ᵕ ) नि ( – ) हीं अर्वाचीन चिन्हें आहेत. परशुराम तात्या गोडबोले यांनी अिङ्ग्रजींतून लघुगुरूसाठी अनुक्रम ( ᵕ ) आणि ( – ) हीं चिन्हें घेतलीं. अिङ्ग्रजी छन्दोरचनेंत लघुगुरु हा भेद नसून साघात आणि निराघात असा भेद असल्याने अिङ्ग्रजींत या दोन चिन्हांचा लोप झाला. हिन्दुस्थानांत मात्र हीं आता सर्वत्र रूढ झालीं आहेत. हींच चिन्हें अुलट क्रमाने म्हणजे लघुसाठी ( – ) आणि गुरुसाठी ( ᵕ ) अशीं घेतलीं तर आपली परम्परा पाळल्यासारखें होअील. हीं चिन्हें अुलटून ( – ) आणि ( ^ ) अशीं अनुक्रमें लघुगुरूसाठी निर्णयसागरी वृत्तरत्नाकरपञ्चिकेमध्ये वापरिलीं आहेत. पण अेकट्यानेच ती प्रथा पाडण्याचा प्रयत्न केला तर तो फोल होतो. या ग्रन्थांत ( । ) या चिन्हाचा अुपयोग चरणविभाग दाखवायला केला असून निःशब्द मात्रा व्यक्त करण्यासाठी ( ऽ ) या चिन्हाचा अुपयोग केला आहे.

---

१. “ गुरुस्तु द्विकलो ज्ञेयो गजदन्तसमाऽकृतिः
लघुस्तदन्यः शुद्धोऽसावेकमात्रः प्रकीर्तितः ” ( के ९ टीप )
“ गुरु संज्ञा वक्र रेखा, ऋजु रेखा लघुस्थळीं
प्रस्तारलेखनीं आहे रीति हे ऋषिनिर्मित ” ( निस ९ )

आ, अे, ओ हे तीन स्वर ऱ्हस्व अुच्चारितां येतच नाहीत असें नाही. प्राकृतांत आणि प्राचीन मराठी कवितेंत त्यांचा ऱ्हस्व म्हणून अुपयोग केलेला आढळतो.

“ समाअे पेहाअे परिव्वयन्तो
सिया मणो निस्सरअी बहिद्धा ” ( दवैसू २।४ )
“ देह त्यागितां कीर्ति मागें अुरावी ” ( रामदास )

परन्तु आधुनिक मराठी पद्यांत त्यांचा ऱ्हस्व म्हणून अुपयोग होत नाही.

प्लुत

पद्यरचनेंत काही ठिकाणीं प्लुत[1] म्हणजे दोहोहून अधिक, विशेषतः तीन मात्रांचें अक्षर येतें. दिसायला प्लुत अक्षर काही गुरु अक्षराहून वेगळें नसतें. अेरव्ही गुरु अक्षर अुच्चारतांना दोन मात्रांचा काळ लागतो; प्लुत अुच्चारतांना स्वर थोडा लाम्बवून तीन मात्रांच काळ व्यियित करायचा असतो. अष्टमात्रक आवर्तनारम्भीं प्लुत अक्षर येतें आणि तेव्हा त्याच्यापुढे बहुशः लघु अक्षर असतें. प्लुत आणि त्यापुढील लघु मिळून चार मात्रांचा काळ पुरा करायचा असतो. अुदाहरणार्थ

“ गौऽळणी होअूंऽसयांनो, गौऽळणी होअूं !
घागरि घेअुनि पाण्यालागी यमुनेला जाअूं !” ( माशि २१ )

अष्टमात्रक आवर्तनाच्या ज्या वृत्तांत वा जातींत अन्त्य गण ( ᴗ – ᴗ – ) असा यावा तेथे कित्येकदा अन्त्य गण ( – ᴗ – ) असा असतो, अशा ठिकाणीं प्रथमाक्षर प्लुत अुच्चारिल्याविना लयबद्धता रहात नाही.

---

१ ‘ घागरि घेअुनि ’ याच्या जशा आठ मात्रा होतात तशा ‘ गौळणी हो- ’ याच्या आठ मात्रा व्हायला पाहिजेत. ‘ णी हो- ’च्या चार मात्रा होतात, तेव्हा ‘ गौळ ’ च्या चार मात्रा व्हायला ‘ ळ ’ दीर्घ अुच्चारून ‘ गौळऽणी हो ’ असें तरी म्हटलें पाहिजे अथवा ‘ गअूळणी हो ’ असा काहीतरी अुच्चार करून ‘ गौ ’वर तीन मात्रांचा काळ घेतला पाहिजे. अशा ठिकाणीं ‘ गौ ’ प्लुत आहे असें म्हणतात.

"। गज्जिअ चंचल । बिज्जुलिआ साह । जाऽणअे
। मम्मह खग्ग कि- । णीसअि जलहर । साऽणअे
। फुल्ल कअंबअ । अंबर डंबर । दीऽसअे
। पाअुस पाअु घ- । णाघण सुमुहि व- । रीऽसअे" (प्रापै १ । १८८)

शंकर आणि अितःपर यांचे अुच्चार शङ्-क-र आणि अि-तह्-प-र असे होत असल्याने अनुस्वार आणि विसर्ग यांच्यामुळे अक्षर व्यञ्जनान्त म्हणजे संवृत म्हणजे गुरु होतें हें अुघड आहे. 'संवय' सारख्या शब्दांत शीर्षबिन्दु हा अनुस्वार व्यक्त करीत नाही, केवळ नाकांतून अुच्चार करायचा हें व्यक्त करितो. तेथे शीर्षबिन्दूने गुरुत्व येत नाही. महत्त्व अुच्चाराला आहे, लेखाला नाही हें ध्यानांत वागविलें पाहिजे.

ऋऌ यांचा विचार संयुक्त अक्षरांचा विचार केल्यानन्तर करूं.

## संयुक्तवर्णपूर्व अक्षर

'संयोग ऱ्हस्वास गुरुत्व देतो' हा नियम केवळ लेखाकडे लक्ष्य देअून केलेला आहे. काही जोडाक्षरापूर्वील लघूस गुरुत्व येत नाही हें जेव्हा आढळून आलें तेव्हा आघात असल्यासच गुरुत्व येतें अशी या नियमाला पुस्ती जोडण्यांत आली. अुच्चारदृष्ट्या अक्षरघटना कशी होते हें पाहिलें असतें तर साराच घोटाळा दूर झाला असता.

शब्दाचीं सारीं अक्षरें आपण सलग आणि लागोपाठ अुच्चारितों त्यामुळे शब्दांत कोठे दोन वा अधिक व्यञ्जनें संयुक्त असलीं तर त्यांतील पहिलें व्यञ्जन तत्पूर्वील अक्षरांत समाविष्ट होतें. विप्र या शब्दाचीं लेखन-दृष्ट्या वि आणि प्र अशीं दोन अक्षरें दिसतात; परन्तु अुच्चारदृष्ट्या विप्—र अशीं दोन अक्षरें पडतात. सूक्ष्मपणाने पाहिलें तर असें दिसतें की प्‌चा अुच्चार प्रथमाक्षरान्तीं सम्पून मग तो द्वितीय अक्षराच्या आरम्भीं येतच नाही असें नाही. अुच्चार काटेकोरपणाने लिहून दाखवायचा तर तो विप्—प्र असाच लिहिला पाहिजे. पण तें असो. मुख्य गोष्ट ही की महत्त्व लेखापेक्षां अुच्चाराला आहे. 'छन्दसा लक्षणं येन श्रुतमात्रेण बुध्यते' असें श्रुतबोधाच्या आरम्भींच साङ्गितलें आहे. शब्दांत कोठे संयुक्त व्यञ्जनोच्चार असला तर त्यांतील पहिला

व्यञ्जनोच्चार तत्पूर्वील अक्षरांत मिळून जातो आणि तें अक्षर लघु असल्यास त्यास व्यञ्जनान्त म्हणजे गुरु करितो.

## संयुक्तवर्ण दृश्य नको श्राव्य हवा.

मराठींत हकार जेव्हा काही व्यञ्जनांत मिळून जातो तेव्हा दिसायला संयुक्त अशीं सहा अक्षरें ण्ह, न्ह, म्ह, ऱ्ह, ल्ह, आणि व्ह हीं होतात. अुच्चारदृष्ट्या हीं अितर संयुक्त व्यञ्जनांसारखीं नाहीत. कोणताहि स्वर नाकांत अुच्चारितां येतो. हा अनुनासिक अुच्चार केल्याने लघूस गुरुत्व येतें असें मुळीच नाही. हँ हें अक्षर लघु आहे पण 'हम्' हें अक्षर व्यञ्जनान्त अतअेव गुरु आहे. हा अनुनासिक अुच्चार जसा स्वराशी अगदी अेकजीव होअून जातो तसाच हा हकार म्हणजे महाप्राण हा अेकजीव होअून जाअूं शकतो. हा महाप्राण अक्षरांत अेकजीव होअून जातो म्हणूनच प्राचीन लिपींत या महाप्राणयुक्त अक्षरांसाठी पृथक् चिन्हें निर्माण केलीं गेलीं. महाप्राणयुक्त क म्हणजेच ख होय. पुढे मराठींत जेव्हा महाप्राणयुक्त ण्, न्, म्, ऱ्, ल् आणि व् हे अुच्चार नवीन आले तेव्हा शास्त्रशुद्ध रीत्या या अुच्चारांसाठी पृथक् चिन्हें निर्माण व्हायला हवीं होतीं. तशीं स्वतन्त्र चिन्हें असतीं तर ख् हा वर्ण ज्याप्रमाणे संयुक्त वाटत नाही, त्याप्रमाणे हे नवे वर्ण संयुक्त वाटले नसते. परन्तु लिपींत हे नवे महाप्राणयुक्त अुच्चार ण्ह, न्ह, म्ह, ऱ्ह, ल्ह, व्ह असे दिसूं लागले म्हणूनच ते संयुक्त वर्ण वाटूं लागले. वस्तुतः ते संयुक्त वर्ण नव्हेत. म्हणूनच कण्हेर, पन्हें, तुम्ही, वऱ्हाडी, वल्हें, नव्हे अित्यादि शब्दांत प्रथमाक्षर गुरु होत नाही. अक्षरांचे स्पष्ट अुच्चार करूनहि तीं क-ण्हे-र अशींच पडतात.

ण्ह, न्ह, म्ह, ऱ्ह, ल्ह, व्ह हे उच्चारच संस्कृतांत नाहीत म्हणूनच हीं लिपिचिन्हेंहि नाहीत. ज्या संयुक्त व्यञ्जनांत प्रथम व्यञ्जन ह् आहे अशीं ह्ण, ह्म, ह्र, ह्ल सारखीं काही संयुक्त व्यञ्जनें आहेत. यांचे मराठींत जे अुच्चार होतात त्यांत वर्णांचा विपर्यय होअून ह्ण, ह्म, ह्र, ह्ल यांचे अुच्चार अनुक्रमें ण्ह, म्ह, ऱ्ह, ल्ह असे होतात; आणि चिन्ह, ब्रम्ह, अऱ्हस्व, प्रल्हाद अित्यादि शब्दांत या संयुक्तवर्णांचा अुच्चार करितांना प्रथम वर्णाचें द्वित्व होतें जसें चिन्न्ह, ब्रम्म्ह, अऱ्ऱ्हस्व, प्रल्ल्हाद. या ठिकाणीं चिन्-न्ह, ब्रम्-म्ह, अर्-

ऱ्हस्व, प्रल्-ल्हाद अशी अक्षरविभागणी होत असल्याने पहिलीं अक्षरें व्यञ्जनान्त अतअेव गुरु होतात. चिन्ह, ब्रम्ह, प्रल्हाद अित्यादि शब्दांत अनुक्रमें न्, म्, ल् या व्यञ्जनाचें द्वित्त्व होतें हें त्यांची अनुक्रमें भिन्न, ढम्म, जल्लाद या शब्दांशी तुलना केली असतां तत्काळ स्पष्ट होअील. या शब्दांतील अुच्चाराच्या अनुकरणाने तुम्ही, अुन्हें, वल्हें यांचे अुच्चारसुद्धा जेव्हा तुम्म्ही, अुन्न्हें (कोल्हापुराकडील बोलींत अुन्नें,) वल्ल्हें (वल्लें) असे होतात तेव्हा प्रथमाक्षर व्यञ्जनान्त आणि गुरु होतें.

मराठी शब्दांत व्यञ्जनांचा जेव्हा 'या'शी (आणि केव्हा केव्हा 'ये'शी) संयोग होतो तेव्हा हा यकार असाच त्या अक्षरांत अेकजीव होअून जात असल्याने नद्या, करित्यें या शब्दांत दिसायला जरी द्य आणि त्य हीं संयुक्तव्यञ्जनें असलीं तरी वस्तुतः तीं तशीं नसतात. शब्दांची न-द्या, क-रि-त्ये अशीच अक्षरविभागणी होते; आणि या संयुक्त भासणाऱ्या वर्णापूर्वीचें लघु अक्षर गुरु होत नाही. परन्तु संस्कृत शब्दांत तीं संयुक्त व्यञ्जनें असल्याने मराठींत त्यांचा अुच्चार करितांना पहिल्या व्यञ्जनाचें द्वित्व होतें, आणि त्यांतील पहिलें व्यञ्जन पूर्वीच्या अक्षरांत मिळून त्यास व्यञ्जनान्त अतअेव गुरु करतें जसें, नद्याम् (नद्-द्याम्). सत्याने (< सत्य) आणि बत्त्याने (< बत्ता) या दोन शब्दांच्या अुच्चारांची तुलना केल्यास संस्कृत शब्दांचा मराठींत अुच्चार करितांना य्च्या पूर्वीच्या संयोगी वर्णाचें द्वित्व कसें होतें हें स्पष्ट होअील. पुढील अुदाहरणांत मात्र 'र्यु' याचा अुच्चार 'र्यु' असा न होतां मराठी 'ऱ्यु' प्रमाणे होअून तत्पूर्वील लघूस गुरुत्व येत नाही.

"अटति यद्भवानह्नि काननं
त्रुटिर्युगायते त्वामपश्यताम्
कुटिलकुन्तलं श्रीमुखंच ते
जड अुदीक्षतां पक्ष्मकृद्दशाम्" (भाग १०।३१।१५)

तेव्हा अक्षरांचा सलग आणि स्पष्ट अुच्चार केला असतां अेखाद्या अक्षरांत जर पुढील जोड वर्णातील प्रथमवर्णाचा अुच्चार येअून मिळत असेल तरच तें अक्षर लघु असल्यास गुरु होतें असा निरपवाद नियम समजावा.

परन्तु या नियमालाहि काही अपवाद असावेत अशी म्हणण्याची प्रवृत्ति केव्हा होते ? विप्र याचा अुच्चार निरपवादपणें विप्-प्र ( – ᵕ ) असा होतो; पण हाच प्र जर अेखाद्या पदारम्भीं आला तर तत्पूर्वील लघूस गुरुत्व यावें की नाही ? ज्ञान-प्रकाश हा शब्द [ – ᵕ, ᵕ – ᵕ ] असा अुच्चारावा की ज्ञानप्-प्रकाश [ – – ᵕ – ᵕ ] असा अुच्चारावा. दैनिक बोलींत तर याचा अुच्चार [ –, ᵕ – ᵕ ] ज्ञान्-प्रकाश असा होतो. तेव्हा पद्यांत ग्राह्य कोणता मानायचा हा प्रश्न आहे. डोळ्यापुढे पद्यांतील अुदाहरण पाहिजे म्हणून पुढील अुदाहरण रचून पाहूं या.

रवि-प्रकाश हा पडला भूवर,
रविप्रकाशीं सुवर्णसुन्दर
मुलांस या हिरवळीं क्रीडुं द्या—
असो काळजी अुद्याची अुद्या.

छन्दोभङ्ग टाळायचा असला तर पहिल्या चरणांतील 'वि' हें दुसरें अक्षर लघुच ठेविलें पाहिजे; आणि तीव्र-प्रयत्नाने, हट्टाने तें लघुच ठेवायचें म्हणजे 'वि'च्या मागून किञ्चित् अडखडळल्यासारखें थाम्बून मग पुढील 'प्र'चा अुच्चार अस्पष्ट निसरडा करावा लागतो.[1] असें न केलें तर दुसऱ्या चरणांतील वि-प् यांच्या सहजसंयोगाप्रमाणे पहिल्या चरणांतहि संयोग होअून, विप् असें होअून दुसऱ्या अक्षराला गुरुत्व येतें. सलग, स्पष्ट आणि स्वाभाविक अुच्चाराला महत्त्व देणारा कवि पहिला चरण 'पडे हा रविप्रकाश सुन्दर' असा सुधारून घेअील. अेका चरणांत अेक नियम आणि दुसऱ्या चरणांत दुसराच नियम असें निरङ्कुशत्व त्याला रुचणार नाही. पद्यांत चरणांतील सारीं अक्षरें सलग आणि स्पष्ट अुच्चारावयाचीं असतात. तेव्हा चरणांत कोठेहि संयुक्त वर्ण आला असला, आणि तो कानालाहि संयुक्त प्रतीत होत असला तर तत्पूर्वील लघु हा निरपवादपणें गुरु झाला पाहिजे. क्र, प्र अित्यादि संयुक्त वर्णांच्या प्रकरणीं सुद्धा अपवाद करण्यांत येअूं नये.

१. यालाच तीव्रप्रयत्नोच्चारण म्हणतात. "यदा तीव्रप्रयत्नेन संयोगादेरगौरवम् । नच्छन्दोभङ्ग अित्याहुस्तदा दोषाय सूरयः" (सरस्वतीकण्ठाभरणं १।१२३) या वचनाला फार महत्व देतां कामा नये.

( १ ) "सा मङ्गलस्नानविशुद्धगात्री
गृहीतप्रत्युद्गमनीयवस्त्रा" ( कुमार ७।११ )

( २ ) "प्राप्यनाभिह्नदमज्जनमाशु
प्रस्थितं निवसनग्रहणाय" ( शिशु १०।६० )

या अवतरणांतील छन्दोभङ्गाच्या दोषाच्या परिहारासाठी 'प्रेह्नेवा' म्हणून जें सूत्र पिङ्गलाच्या नावावर विकण्यांत येतें त्याचा पिङ्गलाच्या छन्दःशास्त्रांत तरी पत्ता लागत नाही.

चरणान्तीं खटका तरी असतोच, तेव्हा अैखाद्या चरणारम्भीं संयुक्त वर्ण आल्यास त्यांतील पहिला व्यञ्जनोच्चार काही त्याच्या पूर्वीच्या चरणाच्या अन्तीं असलेल्या अक्षरांत मिळायला जात नाही; आणि तें चरणान्त्य अक्षर लघु ठेवायचें असल्यास तसें राहूं शकतें.

जलबिन्दु जसा पद्मदलस्थित
क्षणभङ्गुर हें तैसें जीवित.

येथे प्रथमचरणान्तीं खटका असल्याने तक्–क्षण असा संयोग होअूं शकत नाही. म्हणूनच केदारभट्टाने

"पादादाविह वर्णस्य संयोगः क्रमसंज्ञकः
पुरःस्थितेन तेन स्याल्लघुताऽपि क्वचिद् गुरोः" ( के १।१० )

असा नियम साङ्गून

"अल्पव्ययेन सुन्दरि
ग्राम्यजनो मिष्टमश्नाति"

हें अुदाहरण दिलें आहे.

## ऋऌ हे शुद्ध स्वर नव्हेत.

ऋ, ऌ यांचा विचार आता करणें योग्य होअील. संस्कृतांत यांना स्वर मानतात; आणि मराठी भाषेंत हे संस्कृतशब्दाव्यतिरिक्त अितर कोठेहि आढळत नाहीत. ऌ हा क्लृप्ति या अेकच शब्दांत आढळतो. ऋ आणि ऌ यांचा अुच्चार प्राचीनकाळीं संस्कृतांत कसा होत असेल तो असो. आ, अी, अू, अे, हे

आपले स्वरच काय, परन्तु अिङ्ग्रजींतून मराठींत आलेले बॅट् हॅट् अित्यादि शब्दांतील ॲ, नि बॉल् मधील ऑ हे अिङ्ग्रजींतील स्वरहि सारेच 'अ'चीं निर-निराळीं निर्भेळ रूपें वाटतात. ऋ-ऌ चे आजचे प्रचलित अुच्चार पहातां ते तसे अच्या रूपावलींत बसत नाहीत. ज्ञ म्हणजे ज्ञ याचा अुच्चार जसा मराठींत ज् आणि ञ् यांच्या संयोगाहून अगदीच भिन्न, 'द्न्य' असा होतो त्याप्रमाणे ऋ-ऌ यांचे आज होत असलेले अुच्चार प्राचीन, अकाराच्या रूपावलींत बसतील अशा अुच्चाराहून अगदीच भिन्न वाटतात. वस्तुतः केवळ व्यञ्जनांचा अुच्चार करून दाखविणें अशक्य आहे; परन्तु क्, ख्, ग्, र्, ल् अशीं पाय मोडलेलीं व्यञ्जनें अुच्चारून दाखवितांना ज्या स्वराचा आश्रय घेण्यांत येतो, जो धड अि नाही धड अु नाही पण यांमधीलच असा, जर्मन ö सारखा स्वर, तो र् आणि ल् या व्यञ्जनांना मिळाला असतां जे अुच्चार होतील ते अनुक्रमें ऋ-ऌचे अुच्चार होत. अर्थात् आधुनिक मराठींत ऋ-ऌ हे स्वर नसून हीं रि–लि वा रु–लु यांसारखीं अक्षरें आहेत. अेखादें स्वरान्त अक्षर दीर्घ अुच्चारीत राहिलें असतां लाम्बविलेला अुच्चार हा त्या स्वराचा अुच्चार असतो. का हें अक्षर लाम्बवून अुच्चारिलें की आऽऽऽऽ हा स्वर प्रतीत होतो. कृ हें अक्षर लाम्बवून अुच्चारिलें की जो स्वर प्रतीत होतो तो कृमधील शुद्ध स्वर होय. ककार आणि रकार हे लाम्बविले जात नाहीत. ऋ आणि ऌ या अक्षरांत जो स्वर प्रतीत होतो त्याच्यासाठी जर ृ हें चिन्ह अुपयोगिलें तर ऋ आणि ऌ हीं अक्षरें ‑ृ आणि ऌ अशीं लिहिलीं जातील; आणि मृ हें साधें अक्षर न राहतां म्‍ृ असें संयुक्त अक्षर होअील. अर्थात् अमृत शब्दाचीं अक्षर अम्–मृ–त ( – ᵕ ᵕ ) अशीं पडून ऋकारयुक्त अक्षरापूर्वीच्या अक्षराला गुरुत्व येअील.

मग कवींच्या रचनेंत ऋकाराने तत्पूर्वील लघूला गुरुत्व आल्याचीं अुदाहरणें दुर्मिळ कां? अितर संयुक्तवर्णापूर्वीच्या लघूस गुरुत्व न आल्याचीं अुदाहरणें जेथे अगणित आहेत, अेखाद्या पदारम्भीं संयुक्त वर्ण आला असतां तत्पूर्वील लघु तीव्रप्रयत्नाने लघु ठेवण्याची जेथे वहिवाट दिसते तेथें ऋ—ऌ यांच्या पूर्वील लघूस गुरुत्व आल्याचें अुदाहरण नाही या गोष्टीला महत्त्व नाही. "वीर पडुनि रणिं स्वर्ग जिङ्किती" ( केपगु ४९ ) असा चरण पादाकुलकजातींत लिहिणारे कवि "अुज्ज्वल मुगुटशिरीं धरि नृपती" ( केपगु ४९ ) असा चरण लिहितील

यांत नवल नाही. परन्तु ऋ आणि लृ हे स्वर आहेत असें मानणारे हेच कवि—श्री० नरसिंह चिन्तामण केळकर जेव्हा सहजगत्या शार्दूलविक्रीडितांत

"देअीं धीर मनासि आजवरि मी, झाले प्रयत्न वृथा" ( केपगु ६९ ) असा चरण लिहितात तेव्हा ऋकारयुक्त अक्षरापूर्वील लघु गुरु व्हायला पाहिजे हें आपोआप सिद्ध होतें. अक्षरांचे अुच्चार सलग आणि स्पष्ट केले असतां ऋकारयुक्त व्यञ्जनापूर्वील लघूस गुरुत्व आलेंच पाहिजे. "प्रवृत्ति परिसूनिया स्तिमित सर्वही मानसीं" ( लेति २ ) या पृथ्वीवृत्तांतील चरणांतील प्रवृत्ति या शब्दाचा अुच्चार आणि "निवृत्ती ही प्रवृत्तीशी झुन्जे नित्य विलोकी" ( टिक १।१२४ ) या साकीजातींतील चरणांतील प्रवृत्ति या शब्दाचा अुच्चार यांची तुलना केली असतां आधुनिक मराठींतील रूढ आणि प्रचलित अुच्चाराच्या दृष्टीने टिळकांचाच चरण शुद्ध वाटतो.

## हृचा अपवाद होतो का ?

मग सहृदय या शब्दामध्ये प्रथमाक्षर गुरु कां होअू नये ? हृ मध्ये संयुक्त व्यञ्जन नाही हेंच कारण होय. संस्कृतलेखनपद्धतीप्रमाणे हृ हें अक्षर लिहिलें जात असलें तरी अुच्चारतः तें ह्+र्+अ (hrö) असें नसून ऱ्ह्+अ rhö असें आहे. म्हणजे ऱ्ह् मध्ये अेक विशिष्ट स्वर मिळून हें अक्षर होतें. अर्थात् 'तऱ्हा' मध्ये ज्याप्रमाणे प्रथमाक्षराला गुरुत्व येत नाही, त्याचप्रमाणे 'सहृदय' मध्ये प्रथमाक्षराला गुरुत्व येत नाही.

## स्वरभक्ति

ज्या संयुक्त वर्णांत पहिला वर्ण र् आहे अशा संयुक्त वर्णाची फाळणी वृत्ताच्या सोयीसाठी मध्ये अेखादा अिकार घालून प्राचीन संस्कृत काव्यांत करण्यांत येते असें दिसतें.

"यं वै श्वसन्तमनु विश्वसृजः श्वसन्ति
यं चेकितानमनु चित्तय अुच्चकन्ति
भूमण्डलं सर्षपायति यस्य मूर्ध्नि
तस्मै नमो भगवतेऽस्तु सहस्रमूर्ध्ने" ( भाग ६।१६।४८ )

येथे सर्ष याचा अुच्चार सरिष असा करावयाचा आहे. मराठींतहि वर्ष याचें वरिस असें रूप होतें. पण मराठींत वर्ष लिहून वरिस अुच्चारीत नाहीत तर 'वरिस' असें लिहितात.

## चरणान्त्य अकार

चरणान्तीं विरामपूर्व स्वर दीर्घ होतो या न्यायाने चरणान्त्य अकार अवश्य असल्यास दीर्घ करितां येतो. या दीर्घ अ–साठी लिपींत निराळें चिन्ह नाही त्यामुळे तो दिसायला अेकमात्रक अच दिसला तरी छन्दाच्या आवश्यकते-प्रमाणे तो दीर्घ अुच्चारावयाचा असतो. चरणान्त्य अकार हा ऱ्हस्व असूंच शकत नसता तर त्याच्यासाठी निराळें चिन्ह असण्याची आवश्यकता नव्हती. पण चरणान्त्य अकार कित्येकदा ऱ्हस्व असूं शकतो. तेव्हा शुद्धलेखन करायचें म्हणजे कवितेंत तो जेव्हा दीर्घ असेल तेव्हा स्वर अेका मात्रेने पुढे लाम्बवायचा आहे हें दाखवायला त्याच्यापुढे ऽ हें चिन्ह घालावें.

> " तेव्हा आम्ही म्हटलें, " ही ऱ्हासाची
> रजनी केव्हा जाअिल विरूनि साची ?—
> स्वतन्त्रतेची पहाट ती येअील ऽ?"
> अुत्कर्षाचा दिन केव्हा सुचवील ऽ." ( केक २० )

चरणान्तीं अेक मात्रेच्या विरामाचीहि कूस नसते, केवळ खटका असतो तेव्हा अन्त्य अकार ऱ्हस्वच अुच्चारावा लागतो.

( १ ) " भुललों देखुनि सकळहि सुन्दर
सुराङ्गना तों नाचति भूवर. " ( केक १४३ )

( २ ) " मन किती अुताविळ घेत धाव
कधि वरिन नोवरी हीच हाव. " ( देशा ३७ )

( ३ ) " आम्ही श्रीरामाचे चाकर ध्रु०

" हरिकीर्तन आमुचा मुशारा, रामनाम तुपसाखर १
अमृतरूप घरिं बसल्या देतो स्वात्मसुखाची भाकर." २ (अक १३७)

चरणान्त्य अकार हा छन्दाच्या सोयीसाठी जसा दीर्घ होअू शकतो तसा तं
छन्दाच्या सोयीसाठी गाळतांहि येतो. हा गाळावयाचा अकार वर्णाखाल
हलचिन्ह काढून दाखविणें हें शुद्धलेखन होअील.

> " पाखरा, येशिल का परतून् ?
> मत्प्रेमाने दिल्या खुणांतुनि अेक तरी अठवून् ?" (टिक १।१४१

अशा ठिकाणीं अन्त्य अक्षर अकारविरहित असूनहि तो वर्ण पाय मोडून लिहिं
कित्येकांना चुकीचें वाटतें. जो अकार अुच्चारावयाचा नाही तो खुणेने तस
दाखविण्यांत चूक कोणती ? तो अकार अुच्चारावयाचा असतो असा ज्यांना भ्र
होतो त्यांच्या भ्रमाचा निरास करण्यासाठी वरील पद्याच्याच जातींतील संस्कृ
पद्य देतों. तुलना अवश्य करून पहावी.

> " विजयते रामदूत हनुमान्
> यो रघुपतिनासह सुग्रीवं मैत्र्या योजितवान् " ( विदप ८ )

हा अन्त्य अकार अुच्चारित आहे असें समजून त्याचा अेक लघु गणून अर
विन्दादि भिन्न वृत्तें हिन्दी छन्दःप्रभाकरांत साङ्गितलेलीं आहेत; परन्तु ह
अकार अनुच्चारित आहे तसा गणल्यास वृत्तभेद होत नाही. अुदाहरणार्थ, छन्दः
प्रभाकरांतील अरविन्द ( पृ. २०७ ) हें वृत्त वस्तुतः दुर्मिलच होय.

अकार गाळण्याची ही मोकळीक चरणान्तींच ठेविलेली आहे, अितर
नाही. दैनिक बोलींत शब्दान्त्य अचा अुच्चार क्वचितच होतो; आणि जर, मग
कळ अित्यादि द्व्यक्षरी शब्दांतील अन्त्य अकार गळून अुपान्त्य अ हटकून दी
होतो. तरी पद्यांत हा शब्दान्त्य अकार अुच्चारावा आणि अुपान्त्य अकार ऱ्हस्वच
गणावा अशी वहिवाट आहे. जर मग, कळ अित्यादि शब्दांचें लगत्वलेख
( ⏑ ⏑ ) असेंच होतें. बोलतो, चालतो अित्यादि शब्दांतहि मधला अकार गळू
सामान्य अुच्चार बोल्तो, चाल्तो असा होतो; तथापि या अुच्चाराला अद्यापि मान्यत
मिळालेली नाही. अेरव्हीचा अुच्चार आणि काव्यपठनांतील अुच्चार यांतील ह
भेद स्वाभाविकपणाला थोडा मारक होतो हें निःसंशय खरें आहे. हा भेर
काढून टाकिल्यास भाषेचें स्वरूप किती निराळें दिसेल या कल्पनेनेच डोळं

मिटून घ्यावेसे वाटतात. तथापि ही क्रान्ति बहुजनांच्या योजनेने आणि दण्ड-काने घडवून आणल्यास तें अनिष्ट होओील असें मात्र नाही.

'राजा शिवाजी' या काव्याचे कर्ते महादेव मोरेश्वर कुण्टे[1] हे खिस्तशके १८६९ मधील आपल्या प्रस्तावनेंत म्हणतात, "हा शुद्ध मराठी शब्दांचा दोष नाही; पण अक्षरविभागणीची आणि अक्षरमोजणीची पद्धत ही अनियमित आणि अस्वाभाविक आहे. मराठी शब्द जसे अुच्चारिले जातात तसे ते लिहिण्यांत येत नाहीत. अुदाहरणार्थ अुचलून या शब्दाचा अुच्चार करितांना पूर्ण चार अक्षरें कोणीहि अुच्चारीत नाही. च हें केवळ व्यञ्जन असून तें तत्पूर्वील 'अु' मध्ये समाविष्ट होतें आणि त्यामुळे तें अक्षर गुरु होतें. लेखी मराठी आणि बोललेली मराठी यांच्यातील हा भेद जोंपर्यन्त दूर करण्यांत येत नाही, निदान ओळखला जात नाही, या भेदाच्या जाणीवेवर जोंपर्यन्त अेखादी नवी पद्धति स्थापण्यांत येत नाही तोंपर्यंत मराठी पद्यरचनेच्या कार्याची ही हानिच होत रहाणार. हें जाणून शब्द जसे अुच्चारण्यांत येतात तसेच ते माझ्या काव्यांत लिहिण्याची पद्धति मी निर्भीडपणें स्वीकारिली. म्हणून वाचकाला 'खालचा'च्या ठिकाणीं 'खाल्चा' असें आढळेल. 'खालचा' हें रूप खरोखर कर्णकटु आहे."

१ मूळांत शब्द पुढीलप्रमाणे आहेत. "It is not pure Marathi words that are at fault, but the system of quantification now in force is irregular and unnatural. Marathi words are not written as they are pronounced. For instance nobody pronounces अुचलून as consisting of four full syllables, but च् is only a consonant and is amalgamated with अु which therefore becomes long by position. So long as this difference between Marathi written and Marathi spoken is not removed or atleast recognized; so long as some innovation founded on the knowledge of this difference is not introduced the cause of Marathi metrical composition should suffer. Aware of this, I fearlessly adopted the method of writing words as they are spoken in my poem. So the reader will find खाल्चा instead of खालचा which is really unmusical." (Preface p. 23)

ऋकाराला स्वर न समजतां र्+अृ असें अक्षर समजून त्या धोरणानें निरपवाद रचना करण्याचा जो अुपक्रम मी चालू केला आहे तो कुण्टे यांनी दाखविलेल्या दिशेनेच आहे. परंतु या अेवढ्याशा सुधारणेलाच अज्ञान आग्रहाने किती विरोध होत आहे! मग कुण्टे यांची सम्भावना ६५ वर्षांमागे कशी झाली असेल याची कल्पनाच करावी.

## शिष्टसम्मत आणि सर्वत्रप्रचलित असा स्पष्टोच्चार हवा.

जा स्पष्टोच्चार शिष्टसम्मत आणि सर्वत्र प्रचलित आहे त्याप्रमाणे जें लेखन तें शुद्ध होय आणि त्याप्रमाणेच पद्यांतहि रचना असावी. वैयक्तिक अुच्चारवैचित्र्याला मात्र अगदी महत्त्व देअू नये.

"दीर्घाक्षरमपि जिह्वा ह्रस्वं चेत्पठति तदपि भवति लघु
द्वौ वा त्रीनथ वर्णानेकं जातीहि शीघ्रपठनाच्च" (के २२ टीका)

हा नियम नागर सुसंस्कृत मराठीचा नव्हे. त्याचप्रमाणे दैनिक बोलींत काही अुच्चार आपण घाअीघाअीने अस्पष्ट आणि लघु करितों; त्याप्रमाणे रचना करितां कामा नये. अुदाहरणार्थ 'महा' या शब्दांतील 'हा'चा अुच्चार घाअीघाअीने कित्येकदा अस्पष्ट आणि ऱ्हस्व केला जातो म्हणून काही

"पार्थसखा म्हण बोधितसे भगवन्त पहा महाभारतयुद्धीं" (अुभ)
"महाराष्ट्राच्या पुण्याअीच्या फुलल्या फुलवेली" (कुगी)

अशी रचना रसिकमान्य होणार नाही. प्राचीन मराठी कवींच्या काव्यांत शैथिल्य आढळतें म्हणून तशी रचना आता भाषा नागर, सुसंस्कृत, सुसङ्घटित आणि रेखीव झाल्यावरहि करणें असमंजसपणाचें होअील. सोहिरोबा आम्बिये यांच्या

"सर्वची पाहातां अुदासिन मना काहीचि ना वाटते
हे पञ्चात्मक सव विश्वरचना सम्भूत हें आटतें,
ना पाचारित अङ्गि येअुनि बहू वैराग्य हें दाटतें,
सोहीरा म्हणे भ्रान्तिचें वसन की निभ्रान्त हें फाटतें" (सोआप १७१)

या शार्दूलविक्रीडितांतील श्लोकासारखी रचना आता असह्यच झाली पाहिजे.

लेखनाप्रमाणे सरळ वाचन करीत गेलें की तें प्रायः शुद्ध व्हायचेंच हा जसा बालबोध ( नागरी ) लिपीचा विशेष आहे, त्याप्रमाणे आधुनिक मराठी कविता लेखनाप्रमाणे सलग स्पष्ट वाचीत गेल्याने तिच्यांतील छन्दाचा बोध आपोआप होतो, हा जो बहुमोल विशेष मोरोपन्त-देवलादि पद्यप्रभूंना मराठींत कमावून आणिला आहे तो गमावणें अनर्थावह होईल. हा विशेष प्राचीन मराठी कवितेंत नसल्यामुळे शेकडों अर्थदृष्ट्या सरस अशीं पदें दुर्दैवाने गद्यासारखीं वाचावीं लागतात; कारण लेखनानुसारी वाचनाने त्यांच्यांतील छन्दाचा बोध होत नाहीं. पद्यरचनेंत अडचणी येत नाहीत असें नाही; परन्तु अडचणीच्या निमित्ताने अस्पष्टोच्चाराचा चञ्चुप्रवेश होऊं दिला तर तो परिणामीं घातक झाल्याविना रहाणार नाही. प्रणय, प्रीति आणि प्रेम ही शब्दत्रयी मात्र जितकी अपरिहार्य तितकीच जाचक आहे तेव्हा या तीन शब्दांच्या पुरताच 'तीव्रप्रयत्नोच्चार' क्षम्य ठरेल. संयुक्त वर्णाचा अुच्चार अस्पष्ट करणें हा अक्षम्य दोष आहे हें मनाला पटल्याविना तो टाळण्याचे कष्ट कोणी करणार नाही. असे दोष जितके दुर्मिळ तितकें कवीचें पद्यपटुत्व प्रशंसनीय ठरतें. असे दोष टाळतां यावेत म्हणूनच तर कवीला शब्दक्रम फिरविण्याची, अपरिचित पर्याय वापरण्याची आणि शब्दांचीं रूपें विकृत करण्याची थोडी मोकळीक असते.

## ४ निरङ्कुशत्वाच्या मर्यादा

या मोकळिकीचा विचार थोड्या विस्ताराने येथेच करून टाकणें बरें. पद्यरचना म्हणजे विशिष्ट साच्यांत निरनिराळ्या मात्राकाराचे शब्द-खडे बसवून करावयाची सार्थ आणि लयबद्ध अक्षररचना होय. ही जितकी हृदयङ्गम तितकीच दुष्कर असल्याने गद्यलेखकापेक्षा कवीला थोडें अधिक स्वातन्त्र्य देण्यांत येतें. हेंच निराळ्या शब्दांनी साङ्गायचें म्हणजे काव्याची गद्यभाषासरणीपासून च्युति ही काही प्रमाणांतच क्षम्य असते. तेव्हा कवीने किती स्वातन्त्र्य चालवावें याचा विचार नेमस्तपणाने आणि तडजोडीने व्हायला पाहिजे. कवि आणि वाचक यांनी अेकमेकांची सोय पहायला हवी; आणि भाषा ही सर्वांचीच असल्यामुळे तिच्या स्थैर्याकडे, स्वत्वरक्षणाकडे आणि संवर्धनाकडे सर्वांनीच लक्ष्य पुरवायला हवें. शब्दक्रम फिरविण्याची आणि अपरिचित पर्याय नि शब्दांचीं

प्राचीन वा ग्रामीण रूपें वापरण्याची मोकळीक कवीला असली, तरी आपल्या भाषेंत दूरान्वय आणि दुर्बोधता हीं येत नाहीत याविषयी कवीला दक्षता बाळगावीच लागते. ज्या कालांत कवि रचना करितो त्या काळच्या लोकांना तो आपलीच प्रचलित भाषा लिहीत आहे हें पटलें पाहिजे. नाहीतर त्यांना त्या काव्याविषयी आपुलीक वाटणार नाही. कवीला अेकन्दर ज्या शब्दसङ्ग्रहाची आवश्यकता भासते त्यांत अव्ययसर्वनामादि पदोपदीं येणारे काही शब्द असतात, आणि मराठी पद्यांत त्यांचीं अनेक रूपें प्रचलित आहेत. तेव्हा या बहुरूपी चिल्हर शब्दांचा अुपयोग केल्यास आणि समानार्थी शब्दांचा साठा ठेविल्यास, "अपि माषं मषं कुर्यात् छन्दोभङ्गं न कारयेत्" असें जरी वचन आहे तरी सामान्यतः शब्दांची विकृति करण्याचा प्रसङ्ग कवीवर ओढवणार नाही.

(१) संस्कृत धातूपासून, भूतकालवाचक धातुसाधित अव्ययापासून, आणि नामापासून, तसेंच मराठी नामापासून नि विशेषणापासून क्रियापदें सिद्ध करण्याने अर्थ थोडक्या शब्दांत साङ्गतां येतो. अशा रीतीनें सिद्ध केलेलीं क्रियापदें अुच्चारसुलभ आणि सुटसुटीत मात्र असावींत. प्राचीन मराठी कवींनी घालून दिलेलें हें वळण पद्यांतच नव्हे तर निर्भीडपणें गद्यांतहि गिरविलें पाहिजे. यांत भाषेचें हितच आहे.

(२) करीं, करिशी, करी, करिती यासारख्या रूपांचा अुपयोग अनेक काळ दाखवायला होतो. यांचा त्याग करूं नये. अीकारान्त रूप सकर्मक क्रियापदासाठी योजण्याकडे लक्ष्य द्यावें.

(३) न हें अव्यय वाक्यांत कोठेहि घालून क्रियापदाचें नकारार्थी रूप साधितां येतें.

(४) काही क्रियाप्रदांच्या भूतकालाच्या रूपांत अुडला, अुडाला असे दोन्ही प्रकार आहेत. दोन्हीहि पद्यांत रूढ असले तरी होतां होअील तों जें रूप गद्यांत रूढ आहे तें वापरण्याकडे प्रवृत्ति असावी. अुबाला, जुळाला, झिजाला, तसेंच निघला, निमला, मिळला हीं रूपें बहुशः कोणी गद्यांत वापरीत नाही आणि पद्यांतहि वापरूं नये.

(५) करिती, करिशी यांच्या ठिकाणीं करिति, करिशि हीं रूपें केव्हा केव्हा

वापरावींत; परन्तु जाआीं, करी अशा द्यक्षरी रूपांतील अन्त्यस्वर ऱ्हस्व करूं नये.

( ६ ) करीत, जाशील अशा अकारान्त रूपांतील अुपान्त्य स्वर ऱ्हस्व केला तरी चालेल; परन्तु अन्त्याक्षर दीर्घ असतांना अुपान्त्य स्वर ऱ्हस्व असतो तो दीर्घ करून फुङ्कीतों, करीती अशीं रूपें योजणें टाळावें.

( ७ ) गेली, अुठली अशा भूतकाळाच्या रूपांतील अन्त्य ओी ऱ्हस्व करूं नये. बसेल, जातेस अशा रूपांतील अुपान्त्य अेकार ऱ्हस्व करण्यासाठी बसल, जातिस अशीं रूपें वापरूं नयेत. पाहूं याचीं पाहों, पाहुं अशीं दोन्ही रूपें चालतील; परंतु करो, करोत यांचीं करु, करुत अशीं रूपें युक्त वाटत नाहीत.

( ८ ) लागली याच्या ठिकाणीं ‘ लागयिली’ ( केक २० ) हें रूप कसेसेंच वाटतें. अशीं रूपें वैरल्यानेच वापरावींत. धाविन्नला, करिजेतो अशीं रूपें मात्र आधुनिक मराठी पद्यांत मुळीच वापरूं नयेत.

( ९ ) घेअी, देअी अशा द्यक्षरी रूपांच्या ठिकाणीं घे, दे, ने, पी, भी, ये, वी, हो अशीं अेकाक्षरी रूपें वापरणें सोयीचेंच आहे.

( १० ) अून प्रत्ययान्त शब्दांत अूचा अु, ओ करितां येतो आणि न चीं नि, नी, निया, नीया अशीं चार रूपें करितां येतात. करौनि, म्हणौनि हीं रूपें मात्र आता चालणार नाहीत.

( ११ ) ‘ कां करितां विघ्नाला ?’ ( टिक १०६ ) याप्रमाणे द्वितीयेचा प्रत्यय निष्कारण लावणें अिष्ट नाही.

( १२ ) विभक्तिप्रत्ययाचा लोप करून तें कार्य सामान्यरूपाकडूनच करून घ्यावयाचें तें सुद्धा अकारान्त आणि आकारान्त नामांच्याच आणि द्वितीया-चतुर्थीपुरतेंच करून घ्यावें. ‘ तातडीने’चें कार्य ‘ तातडी ’ या रूपाने करून घेणें योग्य नाही.

( १३ ) तें हा द्वितीयेचा प्रत्यय, अें, अीं, हीं हे तृतीयेचे प्रत्यय आणि आं, अीं: हे सप्तमीचे प्रत्यय हे पद्यांतच आढळतात. तारतम्याने त्यांचा अुपयोग चालूं ठेवायला काही अडचण नाही. अें, अीं हे तृतीयेचे प्रत्यय अकारान्त नामासच लावावेत आणि सप्तमीचा प्रत्यय अीं याचें ऱ्हस्वीकरण करूं नये.

( १४ ) सामान्यरूपांतील अुपान्त्यस्वराचें ऱ्हस्वीकरण करूं नये. सतिला, काकुने हीं रूपें वापरणें अुचित नाही.

( १५ ) विशेष्यांच्या सङ्गती विशेषणांसहि विभक्तिप्रत्यय लावण्याची संस्कृतांतील पद्धत मराठींत योग्य नाही. 'पवित्रें चरित्रें' 'पावनें अुपवनें' 'मङ्गलें जङ्गलें' हे प्रयोग अमराठी वाटतात.

( १६ ) शुद्ध संस्कृत शब्द स्थिरोच्चार असल्यास त्यांची विकृति करूं नये. सामान्यरूप करितांना अुपान्त्य स्वर दीर्घ असल्यास तो ऱ्हस्व होतो हा मराठी शब्दांच्या विषयींचा नियम संस्कृत शब्दांना लावूं नये. प्रितीला, रुपानें हीं रूपें चाङ्गलीं दिसत नाहींत. 'शरिराला' हें रूप अेकवेळ चालेल; पण 'शरिरभोग' तर अगदी असह्य होतो.

( १७ ) नदी, वधू यांसारखे जे दीर्घ स्वरान्त शब्द आहेत त्यांतील अन्त्य स्वर कधीच ऱ्हस्व करूं नये.

( १८ ) प्रीति, हेतु यासारख्या अिकारान्त आणि अुकारान्त नामांतील अन्त्यस्वर छन्दोवशात् दीर्घ लिहावेत; प्रीत, हेत अित्यादि काही थोडक्या शब्दांत यमकासाठी अन्त्य अकार होअूं द्यावा. समासांत मात्र हे शब्द शुद्ध रूपांतच योजावेत. दृष्टीशर, प्रीतीयुक्त, रघूनायक अशीं समस्तरूपें त्याज्य होत.

( १९ ) हृत् या नामाचें हृदीं हें सप्तमीचें रूप चालूं ठेवावें पण समासांत हृदकमल न म्हणतां हृत्कमलच म्हणावें.

( २० ) शशिन्, हस्तिन् सारखीं जीं नामें आहेत त्यांचीं प्रथमेचीं रूपें शशी, हस्ती अशीं असतात. या रूपांतील अन्त्य अीकार ऱ्हस्व केला तरी चालेल; पण अुलटपक्षीं समासांत शशी-वदना, हस्तीदन्त अशीं रूपें त्याज्य गणावींत.

( २१ ) छन्दस्, तपस्, तेजस्, नभस्, यांसारखीं जीं नामें आहेत त्यांतील अन्त्य स्‌चा साहजिकच विसर पडतो. शिक्षणाच्या प्रसारामुळे छन्दोमञ्जरी, तपोबल, तेजोभङ्ग, मनोरञ्जन अित्यादि समास जरी सर्वसामान्य परिचयाचे झाले आहेत तरी नवीन समास करितांना मन-रञ्जनासारखे करण्यांत आले तर ते क्षम्य मानावेत.

( २२ ) मराठी समासांत सन्धि वैकल्पिक असला तरी शुद्ध संस्कृत समासांत तरी या विकल्पाला वाव नसावा. 'प्रभातअुदय,' 'जन-अिच्छा,' 'अुत्कण्ठा–अनळ' अशीं समस्तरूपें वापरूं नयेत.

( २३ ) प्राचीन मराठी कवितेंत अकारान्त स्त्रीलिङ्गी नामांना निष्कारण अी जोडीत असत जसें आगी, सरी, चाडी, तळमळी. हीं रूपें आता नकोत.

( २४ ) आता, आपणां, आपुला अित्यादि पाच सहा शब्द सोडले तर शब्दारम्भींच्या आचा अ करणें युक्त नाही. आङ्ग, आजून, आळस हीं रूपेंहि त्याज्य मानावींत.

( २५ ) धक्का, बुक्की, हद्द अित्यादि शब्दांत दुहेरी व्यञ्जनाच्या ठिकाणीं अेकेरी व्यञ्जन सहसा वापरू नये.

( २६ ) छी, थू, तू, मी अित्यादि अेकाक्षरी शब्द ऱ्हस्व वापरू नयेत; पण हा नियम की, नी, ही, या अव्ययांना लागू नसावा.

( २७ ) सर्वनामांच्या रूपांत विविधता फार आहे. मला याच्या ठिकाणीं मज, मजला, मजलागी, मजलागून, मशी, मजशी, मातें, मजप्रति अशीं आठ रूपें वापरितां येतात. माझ्या, तुझ्या, त्याच्या, याचीं माझिया, तुझिया, त्याचिया अशींहि रूपें होतात. अियेस, तियेचें, तयाला, मियां, म्यां, तुवां, त्वां अित्यादि विविध रूपें तारतम्याने वापरून जिवन्त ठेवावींत. आम्ही तुम्ही, माझी, तुझी, त्याची अित्यादि शब्दांतील अन्त्य स्वर ऱ्हस्व करूं नये. ही, जी, ती या स्त्रीलिङ्गी रूपांच्या ठिकाणी हे, जे, ते हीं रूपें यमकादि शब्द-चमत्कृतीपुरतीच वापरण्यासारखीं आहेत.

( २८ ) सर्वनामांप्रमाणेच अव्ययांचींहि विविध रूपें आढळतात. याच शब्दांना चिल्हर म्हटलें आहे. अितर शब्द अविकृत रहावेत म्हणून या किर-कोळ शब्दांचीं विविध रूपें चालूं रहावींत हेंच योग्य होय. रूपांची विवि-धता पहाः—

( १ ) अलीकडे, अल्याड, अैलीकडे, अैलाड.
( २ ) असें, अैसें, अेवि, अेवी, कसें, कैसें, केवि, केवी, तसें, तैसें, तेवि, तेवी
( ३ ) आज, आजि, आजी.
( ४ ) आणि, अन्, नि.
( ५ ) अिथ, अिथे, येथे, कुठ, कुठे, कोठे, तिथ, तिथे, तेथे.
( ६ ) कअीं, कैं, कदा, कधी, कव्हा, केव्हा, जअीं, जैं, जंव, जधीं, जव्हा, जेव्हा त्याचप्रमाणें तअीं, तैं अित्यादि

( ७ ) कडून, कून, पासून, पून.
( ८ ) खाली, खालें, खालति, खालती, खालील, खालला.
( ९ ) जर, जरि, जरी, तर, तरि, तरी, परि, परी, परीस.
( १० ) झणी, लवलाही, लौकरी, झडकरी, सत्वरी.
( ११ ) नाही, नहि.
( ११ ) नित्य, नित.
( १२ ) पलीकडे, पल्याड, पैलीकडे, पैलाड.
( १३ ) पुढे, पुढं, पुढारीं, पुढारां, पुढतें, पुढील, पुढला.
( १४ ) भंवती, भवतें, भवताली, भोवतां, भोंवतीं, भोंवतें, भोवताली, सभोवती, सभोंवताली.
( १५ ) मग, मा.
( १६ ) मध्ये, मधे, मधि, मधी, माजि, माजी, माझारीं, भीतरीं.
( १७ ) मागे, मागां, मागुती, मागून, माघारा, मागील, मागला.
( १८ ) वर, वरि, वरी, वरति, वरती, वरतें, वरील, वरली.
( १९ ) विना, विणें, वीण.

निरङ्कुशत्वाच्या या ज्या मर्यादा घालून दिल्या आहेत त्या पाहतां त्यांत अेकसूत्रीपणा नाही हें अुघड आहे. पण हा दोष व्यक्तिशः कवीचा वा भाषेचा नसून मूलभूत मनुष्यस्वभावाचा आहे. व्यक्तींतसुद्धा जर आत्यन्तिक अेकसूत्रीपणा आढळत नाही तर अशा कोट्यवधि व्यक्तींची मिळून जी भाषा तिच्यांत त्याची अपेक्षा करणें चुकीचें आहे. मनुष्य अेकीकडे अेकसूत्रीपणा आणण्याचा प्रयत्न करितो तर दुसरीकडे जें चिरपरिचयाचें रूढ आहे तें त्याला सोडवत नाही. तेव्हा विसङ्गति आणि तडजोड हीं या मूलभूत द्वैताचींच फळें आहेत. शुद्ध संस्कृत शब्दांचे प्रयोग संस्कृत व्याकरणास अनुसरून करावेत असें ठरवून दारा, समाधि अित्यादि शब्द पुल्लिङ्गी वापरले तर तें हास्यास्पद पाण्डित्य होतें; बरें, मराठी व्याकरणाचे नियम यच्चयावत् सर्व शब्दांना लावावेत असें ठरवून, 'आधुनीक', 'विवीध' 'प्रितीला' अशीं रूपें लिहूं लागलों तर तो निरर्गल सुधारकपणा होतो; आणि डोळ्यापुढे नकोसा वाटतो तरी सुधारणेची दिशा ठरली की त्या दिशेने थोडीफार प्रगति करीत रहावें हें युक्त होय.

## ५ गणविचार

**गण** म्हणजे चरणाचा स्वाभाविकपणें पडणारा भाग होय. पद्य जर आवर्तनी असेल तर चरणांत ठराविक कालांत अुच्चारल्या जाणाऱ्या अक्षरांचे जे गट पडतात ते स्वाभाविक गण होत. हे सदैव अेकाच अक्षरसङ्ख्येचे आणि लगक्रमाचे कसे असतील ? "अच्युतं केशवं रामनारायणम्" या चरणांत (– ᴗ –) असे त्र्यक्षरी गण चार पडतात, तर "धुनोतु नो मनोमलं कलिन्दनन्दिनी सदा" या चरणांत (ᴗ – ᴗ –) असे चतुरक्षरी गण चार पडतात. रुक्मवती वृत्तांत (– ᴗ ᴗ – –) असे पञ्चाक्षरी गण दोन पडतात तर दोधक वृत्तांतील दोन गण (– ᴗ ᴗ – ᴗ ᴗ) आणि (– ᴗ ᴗ – –) असे भिन्न भिन्न पडतात. शालिनी वृत्तांत गण या दृष्टीने पहातां (– – – –) आणि (– ᴗ – – ᴗ – –) असे पडतील.

### पिङ्गलोक्त त्रिक

वृत्ताचें लक्षण म्हणजे चरणांतील अक्षरांची सङ्ख्या आणि लगक्रम हीं साङ्गण्याच्या ज्या अनेक शास्त्रोक्त पद्धती आहेत त्यांपैकीं पिङ्गलाच्या पद्धतींत त्र्यक्षरी गणांची, त्रिकांची योजना आहे. ही पद्धति अधिक रूढ झाल्यामुळे गण हे त्र्यक्षरीच असले पाहिजेत हा समज रूढ झाला आहे. या गणांतहि काही शुभ आणि काही अशुभ मानण्यांत येअून त्यांच्या देवता आणि त्यांचीं फलें हीं कल्पिण्यांत आलीं आहेत! पण या देवखुळेपणाच्या प्रपञ्चाला पिङ्गलाच्या सूत्रांत आधार नाही.

या त्र्यक्षरी गणांच्या नावांच्या साहाय्याने कोणत्याहि वृत्ताचें लक्षण थोडक्यांत आणि अचूक माण्डून ठेवितां येतें ही गोष्ट खरी; आणि म्हणूनच विष्णूने जसें त्रैलोक्य व्यापिलें तसें य, म, त, र, ज, भ, न, स, ल आणि ग या दहा अक्षरांनी, समस्त वाङ्मय व्यापून टाकिलें आहे असें केदारभट्ट[1] म्हणतो.

---

१ "मयरसतजभनलगसंमितं भ्रमति वाङ्मयं जगति यस्य
स जयति पिङ्गलनागः शिवप्रसादाद्विशुद्धमतिः" (हलायुध)
"म्यरस्तजभ्नगैर्लान्तैरेभिर्दशभिरक्षरैः
समस्तं वाङ्मयं व्याप्तं त्रैलोक्यमिव विष्णुना" (के १।६)

**'यमाताराजभानसलगम्'** या सूत्राने पिङ्गलाने साङ्गितलेल्या गणांचीं नावें आणि स्वरूपें बान्धून टाकिलीं आहेत. कोणतींहि तीन अक्षरें क्रमाने घेतलीं असतां त्या त्या त्र्यक्षरी शब्दाचें जें लगत्वरूप होतें तें त्यांतील आद्याक्षराने निर्दिष्ट होणाऱ्या गणाचें स्वरूप होय.

यमाता ( ᴗ – – ), मातारा ( – – – ), ताराज ( – – ᴗ ), राजभा ( –ᴗ– ) जभान ( ᴗ – ᴗ ), भानस ( – ᴗ ᴗ ), नसल ( ᴗ ᴗ ᴗ ), आणि सलगं ( ᴗ ᴗ– ), हीं य, म, त, र, ज, भ, न आणि स या गणांचीं रूपें होत. ल ( ᴗ ) हें अक्षर लघुदर्शक असून ग ( – ) हें गुरुदर्शक आहे. यांच्या साह्याय्याने वृत्तलक्षण थोडक्यांत साङ्गता येतें जसें, "शार्दूलविक्रीडितं म्सौ ज्सौ तौ ग् आदित्यऋषयः". परन्तु अर्थशून्य आणि अुच्चारकठिण सूत्र ऱ्हस्वतम असलें तरी बिनचूक लक्षांत ठेवायला थोडे श्रम पडत नाहीत. अेखाद्या श्लोकाचें वृत्त कोणतें म्हणून कोणी विचारिलें तर आपण काही गण माण्डून सूत्रस्मरणानें तें ओळखीत नाही. वाचतां-वाचतांच तो श्लोक कोणत्या ओळखीच्या श्लोकासारखा आहे हें आपला कान साङ्गतो, आणि मग आपण त्या ओळखीच्या श्लोकाच्या वृत्ताचें नाव साङ्गतों. म्हणून, वृत्त ओळखतां यायला प्रत्येक सुप्रसिद्ध वृत्ताचें अेक अेक अुदाहरण चाङ्गलें ध्यानांत ठसलें की पुरें. विचारलेल्या श्लोकाची शुद्धता तुलनेने सहज पारखतां येअील. यतिस्थानेंहि श्लोक म्हणतांना आपण विशेष कोठे थाम्बतों हें पाहूनच ध्यानांत रहातात. तेव्हा तोण्डपाठ करावयाच्या शुद्ध श्लोकांत त्याच्या वृत्ताचें नाव ग्रथित केलेलें असल्यास तेंहि अनायासें साङ्गतां येअील. त्र्यक्षरी गणाहि साङ्गा म्हणून कोणी आग्रहच केल्यास आरम्भींपासून त्र्यक्षरी तुकडे पाडून लगक्रम माण्डून यमाताराजभानसलगम् या सूत्राच्या साहाय्याने त्या गणांचीं नावेंहि साङ्गतां येतील.

---

२ दुसरें अेक सूत्र "**मायावी यतात्मा रावणः सहसा तन्त्राणि जजाप भावय न** अिति" हें अेका विद्वान् जर्मन स्नेह्याकडून मिळालें असें चार्लस फिलिप ब्राअुन आपल्या Sanskrit Prosody च्या ३ ऱ्या पृष्ठावर म्हणतो. "यमाताराज-भानसलगम्" हें सूत्र पाणिनीने केलें असें याच ब्राअुनने २८ व्या पृष्ठावर लिहून ठेविलें आहे. या सूत्राचा अुगम मला सापडला नाही.

"शार्दूलासच कौतुकास्पद गमे शार्दूलविक्रीडित"

− − − | ᴗ ᴗ − | ᴗ − ᴗ | ᴗ ᴗ − | − − ᴗ | − − ᴗ | −

मातारा सलगं जभान सलगं ताराज ताराज गं

तेव्हा, शार्दूलविक्रीडिताच्या अेका चरणांत १९ अक्षरें असून मसजसतत असे क्रमाने गण पडून शेवटीं अेक गुरु असतो; आणि यति बाराव्या अक्षरानन्तर असतो असें सहज साङ्गतां येतें.

परन्तु वृत्तज्ञानाला या त्रिकांचा काही अुपयोग नाही.

---

# अध्याय ३ रा

## वृत्तविचार आणि वृत्तविस्तार

शिखा,[१] खञ्जा नि चूलिका हे प्रकार वगळल्यास संस्कृतांत पद्याचें परिमाण चतुष्पदी हें आहे. शिखा, खञ्जा नि चूलिका या प्रकारांत चरण दोन दोनच असले तरी ते दीर्घ असल्याने म्हणतांना त्यांचे स्वाभाविकपणेंच चारचार चरण होतात. संस्कृतांत बहुशः अनुष्टुप् छन्दांतील चतुष्पदीसच श्लोक म्हणतात; तथापि शङ्कराचार्यकृत ' प्रातःस्मरामि हृदि संस्फुरदात्मतत्त्वम् ' या 'प्रातः-स्मरण' स्तोत्रांत वसन्ततिलकावृत्ताच्या तीन चतुष्पद्या असून त्यांना अुद्देशून नन्तर

" श्लोकत्रयमिदं पुण्यं लोकत्रयविभूषणम् ।
प्रातःकाले पठेद्यस्तु स गच्छेत्परमं पदम् ॥ "

असा श्लोक आहे. मराठींत कोणत्याहि वृत्तांतील चतुष्पदीस **श्लोक** म्हणतात.

ज्या पद्यांतील चरण विशिष्ट अक्षरसङ्ख्या, लगक्रम आणि मोडणी वा गणविभागणी यांनी नियमित असतात तें वृत्त होय. मोडणी म्हणजे पिङ्गलोक्त गणांचा क्रम नव्हे तर अन्तर्गत आन्दोलनानुसार होणारी गणविभागणी होय. अक्षरसङ्ख्या आणि लगक्रम हीं अभिन्न असलीं म्हणजे आरम्भापासून गणना करून चरणाचे जे त्र्यक्षरी तुकडे वा गण पडतात ते पिङ्गलोक्त गण अेका ठराविक क्रमानेच येतात. पण पिङ्गलोक्त गणांचा क्रम अभिन्न असूनहि अन्तर्गत आन्दोलनानुसार होणारी गण–विभागणी भिन्न भिन्न होअूं शकते. या गणविभागणीस मोडणी म्हटलें आहे.

मणिगुणनिकर [ । ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ! ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ] ( पि ७/१३ )
शशिकला [ । ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ! ᴗ ᴗᴗ ᴗᴗᴗᴗ । – ] ( हे २/२४४ )
स्रक् [ । ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ! ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ! ᴗ ᴗ – ] ( हे २/२४५ )

---

१ शिखा नि खञ्जा हे प्रकार वृत्तरत्नाकर आणि प्राकृत पैङ्गल या दोनच ग्रन्थांत पाद्द्वयघटित आहेत.

हीं तीन वृत्तें अक्षरसङ्ख्येने आणि लगक्रमाने अेकसारखीं असल्याने न, न, न, न, स, याच क्रमाने तिन्ही वृत्तांचे पिङ्गलोक्त गण पडतात; पण या तीन वृत्तांत अनुक्रमें अष्टमात्रक, सप्तमात्रक आणि षण्मात्रक आवर्तनें असल्या-कारणाने त्यांची गणविभागणी निरनिराळी होते. आवर्तन किती मात्रांचें आहे, आवर्तनारम्भ कितव्या अक्षरावर होतो, आणि गण–विभागणी कशी होते यांचा निर्णय करायला प्राचीन छन्दःशास्त्रकारांनी साङ्गितलेल्या यतिस्था-नांचा फार अुपयोग होतो. म्हणून लक्षण साङ्गतांना यति कोठे आहे हें साङ्-गण्यांत येतें; आणि यतिभेदाने म्हणजेच मोडणी–भेदाने वृत्तभेद मानण्यांत येतो. वर दिलेल्या वृत्तांत यतिस्थानें खाली टिम्ब असलेल्या अुभ्यारेघांनी दाख-विण्यांत आलीं आहेत. यति अनुक्रमें ८ व्या, ७ व्या आणि ६ व्या अक्षरा-नन्तर साङ्गितले आहेत त्यावरून आवर्तनें हीं अनुक्रमें अष्टमात्रक, सप्तमात्रक आणि षण्मात्रक आहेत ही गोष्ट कळते. परन्तु पुष्कळदा यति साङ्गितलेलेच नसतात वा भलत्याच म्हणजे अस्वाभाविक ठिकाणीं साङ्गितलेले असतात. अुदाहरणावरून वृत्ताची मोडणी निर्णीत करूं म्हटलें तर अेखादेंच अुदाहरण असायचें आणि तेंहि छन्दःशास्त्रकारानें रचून घातलेलें असायचें. वृत्तव्याख्या सुधारायला त्या अुदाहरणाचा फारसा अुपयोग होत नाही. म्हणून अेखाद्या वृत्ताच्या जर अनेक मोडण्या सम्भवत असतील तर त्या साऱ्या देण्याचा प्रयत्न मी या ग्रन्थांत केला आहे. तथापि जेथे चरणांत अेखाद्या विशिष्ट गणाची आवृत्ति आहे तेथे, जेणें करून ती आवृत्ति भङ्गेल अशी मोडणी घेणें अुचित नाही.

चारी चरण भिन्न भिन्न लक्षणांनी युक्त असल्यास त्या वृत्तास **विषम वृत्त** म्हणतात. संस्कृतांत अनेक विषम वृत्तें साङ्गितलीं आहेत. त्यांपैकी अेकाच वि-षम वृत्ताचा अुपयोग सलग दीर्घ रचनेंत केलेला आढळतो. सौन्दरनन्द ३ रा, किरात १२ वा आणि शिशु १५ वा हे सर्ग अुद्गता नामक विषमवृत्तांत आहेत. या वृत्ताचें लक्षण अुत्पल ( वबृ १०३/४८ ) या श्लोकावरील टीकेंत

“प्रथमे सजौ यदि सलौच
नसजगुरुकाण्यनन्तरम्
यद्यथ भनजलगाः स्युरथो
सजसा जगौच भवतीयमुद्गता”

असें देतो. अुद्गताचें पुढील अुदाहरण मराठींत अपवादरूपच असेल.

"बहु भागला दितिसुतांसि
अतुल समरा करूनिया
राम तृषित बहु होअुनिया
रमला प्रियाननसुधानिषेवणीं". ( साव ९/५६ )

सौन्दरनन्द काव्यांत ( २/६४–६५ ) हे दोन श्लोक अुपस्थितप्रचुपित नामक विषमवृत्ताचे आढळतात.

"हुडकिती सगर ते चहूकडे
हय त्यांसी परि कुठे न सापडे;
हुडकुनी हरितां मग चारही
करिती साठ हजार विचारही". ( नग ७३ )

या चतुष्पदींत चारी चरण लगक्रमदृष्ट्या भिन्न भिन्न आहेत; पण अेवढ्याने हें विषमवृत्त होत नाही. लगक्रमदृष्ट्या भिन्न असणारे चारी चरण जेव्हा अनेक श्लोकांत अनुक्रमें सारखे येतात; तेव्हा ते श्लोक अेका विशिष्ट विषमवृत्ताच्या साच्याचे ठरतात.

**चूलिका** ( पि ४/५२ ) [ २७ ल । १ ग ॥ २९ ल । १ ग ] ही द्विपदी आहे. पहिल्या चरणांत सत्तावीस २७ लघू आणि मग अेक १ गुरु अशीं अक्षरें असतात; दुसऱ्या चरणांत अेकोणतीस २९ लघू आणि मग १ गुरु अशीं अक्षरें असतात. चूलिकेची मोडणी जर पद्मावर्तनी असली तर सोळा लघु अक्षरांनन्तर यति येतोच. पण हा यति साङ्गितलेला मात्र नाही. तेथेच चरण तोडून द्विपदीची चतुष्पदी केल्यास या प्रकारास विषम वृत्तांत ढकलितां येअील. पहिला नि तिसरा चरण हे मात्र सोळा सोळा लघु अक्षरांचे असल्याने अेकसारखे होतात. हीच स्थिति शिखा ( के २/३९ ), आणि खञ्जा ( के २/४० ) या दोन प्रकारांची आहे. **शिखा** [ २८ ल । १ ग ॥ ३० ल । १ ग ] या प्रकाराचा व्यत्यय म्हणजे **खञ्जा** [ ३० ल । १ ग ॥ २८ ल । १ ग ] हा प्रकार होय. परन्तु पिङ्गल, स्वयम्भू आणि हेमचन्द्र यांच्या मतें शिखा आणि खञ्जा हे प्रकार पादचतुष्टयघटित आहेत. प्राकृत पैङ्गलाच्या मतें शिखाच्या १ ल्या चरणांत पञ्चवीस २५ लघू असून मग ( – ᵕ ) हा गण असतो; आणि दुसऱ्या

चरणांत अेकोणतीस २९ लघू असून मग ( – ᴗ ) हा गण असतो. खञ्जामध्ये दोन्ही चरणांत छत्तीस ३६ लघू असून मग रगण असतो. ( प्रापै १/१६१,१५८ ).

चूलिकेचा जो दुसरा प्रकार हलायुध साङ्गतो त्यालाच केदारभट्ट **अति-रुचिरा** ( के २/४२ ) म्हणतो. या प्रकारांत [ २७ ल । १ ग ] दोन्ही चरण सारखे असून ते सत्तावीस लघु आणि अेक गुरु मिळून झालेले असतात. सोळा लघूनन्तर चरण तोडून या द्विपदीची जर चतुष्पदी केली तर तें अर्धसम वृत्त होअील.

ज्या पद्यांत विषम वा ओज वा अयुक् म्हणजे पहिला नि तिसरा हे चरण सारखे असतात; आणि सम वा अनोज वा युक् म्हणजे दुसरा नि चौथा हे चरण सारखे असतात तें **अर्धसम वृत्त** होय. समवृत्तांच्या सङ्ख्येच्या मानाने अर्धसम वृत्तें अगदीच अल्पसङ्ख्य आहेत.

अर्धसम वृत्ताचा आणखी अेक प्रकार आढळतो; पण त्या प्रकाराचें पृथक् विवेचन कोणी केलेलें नाही. या प्रकारांत चतुष्पदीचे पहिले दोन चरण सारखे अेका लगावलीचे असतात; आणि शेवटील दोन चरण सारखे, पण भिन्न लगावलीचे असतात. या प्रकारच्या मिश्रणाचे स्फुट श्लोक आढळतात, ते पुढे वृत्तविहारांत दिले आहेत. परन्तु अेकासारखे अनेक श्लोक आढळल्याविना त्या प्रकाराला पृथक् स्थान प्राप्त होअूं शकत नाही. अचलधृति आणि विद्युन्माला यांच्या अशा मिश्रणाने होणाऱ्या प्रकारांचा ( पि ४/५०–५१, मागे पृष्ठ २३ पहा ) पिङ्गल अुल्लेख करितो; परन्तु हलायुधाने दिलेल्या अुदाहरणाव्यतिरिक्त अितरत्र तशी रचना संस्कृतांत मला आढळली नाही. मराठींत मात्र मोरोपन्ताने आपलें सौम्य रामायण ( मोसग्र ८/१३८ ) हें सौम्या नामक अर्धसम वृत्तांत रचिलें आहे. चतुष्पदीचा पूर्वार्ध विद्युन्माला आणि अुत्तरार्ध अचलधृति असल्यास त्या अर्धसम वृत्ताला **सौम्या** ( पि ४/५१ ) वा **अनङ्गक्रीडा** ( के २/४१ ) म्हणतात.

चारी चरण अेकसारखे असलें म्हणजे त्या वृत्ताला **समवृत्त** म्हणतात.

समवृत्तांचें वर्गीकरण चरणाक्षरसङ्ख्येप्रमाणे करण्याचा आम्नाय आहे. अेका चरणांत जितकीं अक्षरें असतात तितक्या अक्षरांचें तें वृत्त मानण्यांत येतें.

अेकाक्षरी वृत्तापासून सव्वीस–अक्षरी वृत्तापर्यन्त अनुक्रमें ( १ ) **अुक्ता**, ( २ ) **अत्युक्ता**, ( ३ ) **मध्या**, ( ४ ) **प्रतिष्ठा**, ( ५ ) **सुप्रतिष्ठा**, ( ६ ) **गायत्री**, ( ७ ) **अुष्णिह्**, ( ८ ) **अनुष्टुभ्**, ( ९ ) **बृहती**, ( १० ) **पङ्क्ति**, ( ११ ) **त्रिष्टुभ्**, ( १२ ) **जगती**, ( १३ ) **अतिजगती**, ( १४ ) **शक्करी**, ( १५ ) **अतिशक्करी**, ( १६ ) **अष्टि**, ( १७ ) **अत्यष्टि**, ( १८ ) **धृति**, ( १९ ) **अतिधृति**, ( २० ) **कृति**, ( २१ ) **प्रकृति**, ( २२ ) **आकृति**, ( २३ ) **विकृति**, ( २४ ) **सङ्कृति**, ( २५ ) **अभिकृति**,[1] आणि ( २६ ) **अुत्कृति** या नावाचे वर्ग कल्पिण्यांत आले आहेत. ज्या वृत्तांच्या चरणांत सव्वीसाहून अधिक अक्षरें आहेत त्यांना **दण्डक** वा **मालावृत्त**[2] म्हणतात. दण्डकांत अेका विशिष्ट गणाची सारखी आवृत्ति असते तशी माला वृत्तांत नसते.

वृत्त फारच आखूड असल्यास अर्थप्रतिपादनाची अडचण होते; आणि म्हणूनच प्रीति, विदग्धक, हारीत, तनुमध्या, कुमारललिता, आनन्द, हंसमाला अित्यादि वृत्तांच्या द्विरावृत्तीने अनुक्रमें पद्मिनी, मरालिका, स्वानन्दसम्राट्, मणिमाला, राजरमणीय, आनन्दकन्द, दया अित्यादि नवीन वृत्तें साधण्यांत आलीं असतील. सहासात–अक्षरी वृत्तांविषयी क्षेमेन्द्र मार्मिकपणाने म्हणतो,

"न षट्सप्ताक्षरे वृत्ते विश्राम्यति सरस्वती
भृङ्गीव मल्लिकाबालकलिकाकोटिसङ्कटे" ( क्षेसु २।२ )

वृत्त अतिशय दीर्घ असल्यास कवि आणि वाचक दोघांचाहि अूर भरून यावयाचा! पद्यपाटव दाखवून वाचकांना चकित करून टाकण्यासाठी अतिऱ्हस्व वा अतिदीर्घ वृत्तांत जरी रचना करून दाखविण्यांत आली असली तरी अशीं क्लिष्टवृत्तें हीं रमणीयार्थाच्या स्वाभाविक प्रतिपादनाला निरुपयोगीच होत. भास, वराहमिहिर, वाग्भट, भवभूति अित्यादिकांच्या कृतींत दण्डकरचना आढळते यावरून दण्डकाचें प्राचीन महत्त्व दिसून येतें. वराहमिहिराच्या अेका दण्डकाच्या ( वबृ १०३।६१ ) प्रत्येक चरणांत १०२ अक्षरें आहेत. सिद्धर्षिकृत अुपमितिभवप्रपञ्चाकथामध्ये दण्डकाच्या चतुष्पद्या नाहीत; तर अेकअेक दोनदोन स्फुट चरण आहेत. या ग्रन्थाच्या ५ व्या प्रस्तावांतील ( पृ. ८४१

---

१ भरत आणि केदारभट्ट हे अभिकृतीच्या ठिकाणीं अतिकृति म्हणतात. २ मालावृत्त ( भ १५।४७ ).

रील) 'विलसतभटकोटि'° या दण्डकचरणांत अेकशें अठ्ठयाण्णव अक्षरें आहेत! तथापि येथूनहि सीमा फारच दूर आहे. वृत्तरत्नाचा टीकाकार नारायण भट्ट पुढील पद्य अुद्धृत करितो,—

" अेकोनसहस्राक्षरपर्यन्ता दण्डकाङ्घ्रयः प्रोक्ताः
वर्णत्रिकगणवृद्ध्या नद्वितयाद्या महामतिभिः " (के. पृ. १०६)

या ग्रन्थांत वृत्तविस्तार देतांना वृत्तें चरणाक्षरसङ्ख्येप्रमाणे साङ्गण्याची प्राचीन पद्धति स्वीकारलेली नाही. अर्थातच दण्डकाच्या विवेचनासाठी पृथक् प्रकरण दिलेलें नाही. अेका वृत्ताचा दुसऱ्या वृत्ताशी सम्बन्ध काय तो ध्यानांत यावा म्हणून वृत्तानुक्रम हा लगक्रमसाम्य आणि मोडणीचें साम्य यांच्या अनुरोधाने ठरविला आहे. छन्दःसाम्य हें चरणान्तापासून[1] चरणारम्भाकडे पहात अनुक्रम ठरविला आहे.

सङ्ख्याक्रमभेदाने वृत्तप्रकार किती होअू शकतील हा वस्तुतः गणिताचा प्रश्न आहे; परन्तुः या प्रस्तारप्रकरणाने छन्दःशास्त्राच्या क्षेत्रांत निष्कारण पाय पसरले आहेत. अेकाक्षरी रचनेपासून सव्वीसअक्षरी रचनेपर्यंतच शक्य वृत्तप्रकारांची अेकन्दर सङ्ख्या गणिताने $२^{२५}-२$ म्हणजे ३३,५४,४३० अितकी होते! परन्तु अेकन्दर अुपलब्ध वृत्तांची सङ्ख्या सहस्रावर जात नाही. वृत्तांत तें वृत्त व्हायला काहीतरी आन्दोलनमाधुरी पाहिजे. छन्द म्हणजे काही लघुगुरूंचा प्रस्तारखेळ नव्हे.

ज्या वृत्तांतील आन्दोलन अक्षररचनेकरून सहज प्रतीत होत नाही, ज्यांना तालांत बसवायला थोडे फार परिश्रम पडतात, परन्तु ज्यांपैकी अनेक वृत्तांच्या चाली परम्परया चालत आल्याकारणाने सुकर वाटतात अशा वृत्तांना **अनावर्तनी** म्हटलें आहे. त्यांचें विवेचन आवर्तनी वृत्तांच्या आधी केलें आहे. कित्येक वृत्तें अशीं आहेत कीं तीं सहज (क्वचित् अेखादें दुसरें अक्षर प्लुत अुच्चारून) आवर्तनी होअू शकतात; परन्तु त्यांच्या परम्पराप्राप्त चाली पहातां तीं अनावर्तनी वाटतात त्यांचें विवेचन आधी अनावर्तनी वृत्तांच्या वर्गांत केलें असून पुढे आवर्तनी वृत्तांच्या वर्गांत त्यांचा पुन्हा अुल्लेख केला आहे. अुदाहरणार्थ, रथोद्धता

---

**१ रणपिङ्गलांत प्राचीन वर्गपद्धति आहे; पण अेका वर्गांतील वृत्तांचा अनुक्रम ठरवितांना त्रिकगणसाम्य हें चरणान्ताकडून चरणारम्भाकडे पहाण्यांत आलें आहे**

नि स्वागता यांची रूढ मोडणी अनुक्रमें [ – ᵕ – ᵕ ᵕ ᵕ – । ᵕ – ᵕ – ] आणि [ – ᵕ – ᵕ ᵕ ᵕ – । ᵕ ᵕ – – ] अशी आहे, म्हणून त्यांचें विवेचन अनावर्तनी वृत्तांत केलें आहे. परन्तु त्यांची मोडणी अनुक्रमें [–ᵕ–ᵕ ᵕ ᵕ । – ᵕ – ᵕ –] आणि [– ᵕ – ᵕ ᵕ ᵕ । – ᵕ ᵕ – –] अशी घेतल्यास तीं पद्मावर्तनी होतात म्हणून त्यांचा अुल्लेख विद्युन्माला वर्गांतहि पुन्हा केला आहे. मोडणी भिन्न झाली की तें वृत्त वस्तुतः भिन्न झालें, त्याला भिन्नच नाव पाहिजे. अुदाहरणार्थ, पृथ्वीवृत्तांतील लगावलीची मोडणी जर [ । ᵕ – ᵕ ᵕ ᵕ – ! ᵕ – ᵕ ᵕ ᵕ – । ᵕ – – – ᵕ – ] अशी धरिली तर तें वृत्त निराळेंच होअील. सुदैवाने पृथ्वीवृत्ताला विलम्बितगति असें दुसरें नाव असल्याने तें या दुसऱ्या मोडणीच्या वृत्ताला निश्चित करितां येतें. पण जेथे वृत्ताचें नाव अेकच आहे पण त्या लगावलीची मोडणी विविध होअू शकते तेथे निरनिराळीं नावें असणें अिष्ट असलें तरी त्या भिन्न भिन्न मोडणीच्या वृत्तांत यापुढे सहेतुकपणें रचना होण्याचा सम्भव अत्यल्प असल्याने सध्या तरी नवीन नावें निर्माण करून वृत्तनाममाला लाम्बविण्याचें काही प्रयोजन नाही.

पद्मावर्तनी, अग्न्यावर्तनी, भृङ्गावर्तनी आणि हरावर्तनी वृत्तांचा विचार अनुक्रमें अनावर्तनी वृत्तांच्या नन्तर केला आहे. चतुर्मात्रक आवर्तनांचीं वृत्तें असूंच शकत नाहीत असें नाही; परन्तु चतुर्मात्रक आवर्तनांचीं वृत्तें सारींच अष्टमात्रक आवर्तनांत बसतात. अुलटपक्षीं आवर्तनान्तीं पदसमाप्ति झाली नाही तरी अक्षरसमाप्ति तरी झालीच पाहिजे असें असल्याने अष्टमात्रक आवर्तनाचें वृत्त चतुर्मात्रक आवर्तनांत बसेलच असें नाही. अुदाहरणार्थ, ( ᵕ – – ᵕ – ) ( – ᵕ – ᵕ – ) या अष्टमात्रक गणांचे चारचार मात्रांचे दोन दोन तुकडे पडूं शकत नाहीत. यासाठी चतुर्मात्रक आवर्तनांच्या वृत्तांचा समावेश पद्मावर्तनी वृत्तांत करणेंच सोयीचें आहे.

आवर्तनी वृत्तांत पद्मावर्तनी वृत्तांची सङ्ख्या सर्वांत मोठी आणि अग्न्यावर्तनी वृत्तांची सङ्ख्या सर्वांत लहान आहे. अनावर्तनी वृत्तांच्या मानाने आवर्तनी वृत्तांची सङ्ख्या जवळ जवळ औटपट आहे. परन्तु आवर्तनी वृत्तांची सङ्ख्या कितीहि मोठी असली तरी तीं बहुतेक जातिरचनेंत लय पावलीं आहेत. अेकट्या पादाकुलकजातींत पाअूणशेंहून अधिक वृत्तें लय पावतात. जातिरचना ही सुकर असून तिच्यांत स्वाभाविकपणेंच विविधतेला पुष्कळ वाव मिळतो.

वृत्तें अनावर्तनी असोत वा आवर्तनी असोत, कवींना जीं वृत्तें सलग नि दीर्घ रचनेला अनुकूल अशीं वाटलीं आणि जीं त्यामुळे रूढ झालीं अशा वृत्तांची सङ्ख्या चाळीसाच्या वर जात नाही.

अनावर्तनी वृत्तांपैकी अिन्द्रवज्रा, अुपेन्द्रवज्रा, अिन्द्रवंशा, वंशस्थ, रुचिरा, प्रहर्षिणी, रथोद्धता, स्वागता, प्रमिताक्षरा, द्रुतविलम्बित, वसन्ततिलका, शालिनी, मालिनी, मन्दाक्रान्ता, स्रग्धरा, शार्दूलविक्रीडित, हरिणी, शिखरिणी, सुवदना आणि पृथ्वी हीं वृत्तें विशेष रूढ दिसतात. या वीस वृत्तांपैकी अिन्द्रवंशा हें वृत्त संस्कृतांत वैरल्यानें आढळतें. रुचिरा, प्रहर्षिणी, प्रमिताक्षरा नि सुवदना हीं वृत्तें अुत्तरोत्तर दुर्मिळ होत आलीं आहेत.

पञ्चावर्तनी वृत्तांपैकी तोटक, विद्युन्माला, दोधक, जलोद्धतगति, जलधरमाला, मत्तमयूर, मदिरा, हंसगति आणि हेमकला हीं नअू वृत्तें रूढ दिसतात. अग्न्यावर्तनी वृत्तांपैकी विबुधप्रिया आणि सुरनिम्नगा हीं रूढ दिसतात. भृङ्गावर्तनी वृत्तांत प्रमाणिका हें फार प्राचीन काळापासून रूढ दिसतें. कलिन्दनन्दिनी आणि देवराज हीं अुशीराने रूढ झालीं आहेत; पण यांच्या मिश्रणामुळे होणारी शिथिल रचना ललितविस्तरांत आढळते. हरावर्तनी वृत्तांपैकी भुजङ्गप्रयात आणि स्रग्विणी हीं प्राचीन दिसतात; मन्दारमाला आणि अमृतध्वनि हीं अुशीराने रूढ झालीं आहेत.

अर्धसमवृत्तांपैकी संस्कृतांत अपरवक्त्र, पुष्पिताग्रा, वियोगिनी आणि मालभारिणी हीं चारच रूढ दिसतात. मराठींत वियोगिनी आणि मालभारिणी हीं दोनच विशेष परिचित आहेत.

अश्वघोष आणि भास यांच्या काळींच ज्यांचें स्वरूप निश्चित झालें होतें अशीं हीं अनावर्तनी वृत्तें मूळ कशीं अुत्पन्न झालीं असतील? छन्दःशास्त्र अुत्पन्न होण्यापूर्वी कवींनी जी रचना मनोगत आन्दोलनानुसार केली असेल ती अपरिहार्यपणें शिथिल झाली असलीच पाहिजे. अशी शिथिल रचना ललितविस्तरांत विपुल पहायला मिळते. अशा शिथिल रचनेंतूनच पृथक्करण, तुलना नि वर्गीकरण यांच्या साह्याने निश्चित स्वरूपाची पद्यरचना निघते. पिङ्गलभरतादि प्राचीन छन्दःशास्त्रकारांनी ज्या सामग्रीवरून हें शास्त्र रचिलें ती सामग्री त्यांनी आपल्या ग्रन्थांत जतन करून न ठेविल्यामुळे वृत्तोत्पत्तीचा अत्यन्त कुतूहल-

जनक प्रश्न हा तितकाच कूट होऊन बसला आहे. अिन्द्रवज्रा, अुपेन्द्रवज्रा, शालिनी, वातोर्मि, वंशस्थ, रुचिरा अित्यादि वृत्तें प्राचीन त्रिष्टुभ्‌जगतींपासून निघालीं हें अुघड आहे. परन्तु वसन्ततिलका, मन्दाक्रान्ता, शार्दूलविक्रीडित, हरिणी, शिखरिणी, पृथ्वी हीं कशीं कशीं परिणत होत आलीं याविषयी अटकळ करायलाहि आता काही मार्ग नाही.

आवर्तनी वृत्तें हीं प्राकृत गेय जातिरचनेपासून नियमित करण्यांत आलीं असावींत. गेय जातिरचना ही आन्दोलन मनांत मुरल्यावर जितकी सुकर असते तितकीच, तिचें नियमन ओळखून तें दृग्गोचरकरून द्यायला कठिण असते. जातिरचना करायला कवि थोडा श्रुतिसिद्ध असावा लागतो. अुलटपक्षीं वृत्त हें रचायला कठिण असलें तरी अक्षरांची सङ्ख्या आणि लगक्रम यांनी बद्ध असलेलें त्याचें स्वरूप सहज आणि स्पष्टपणें ध्यानांत राहतें. अक्षरसङ्ख्या नि लगक्रम यांच्या दृष्टीने जातिरचनेकडे पाहिलें तर कोणतेच दोन चरण अेकसारखे दिसत नाहीत; त्यांतील साम्य सूक्ष्म असतें; चरणांचे काही विभाग मात्र अनिच्छया अेकसारखे येअू शकतात. हें पाहून, जातीचें मूळ स्वरूप ध्यानांत न आल्यामुळेच की काय, ज्यांत चरणाचा काही भाग अचल आणि काही भाग चल असतो असा पद्यप्रकार छन्दःशास्त्रकारांनी कल्पिला असावा. वैतालीय, औपच्छन्दसिक, गीति, आणि आर्यगीति ही रचना या प्रकारांतील आहे.

अशा गेय जातिरचनेंत जेथे अहेतुकपणें चारी चरण लगक्रमदृष्ट्या सारखे आले असतील तेथे छन्दःशास्त्रकारांनी स्वाभाविकपणेंच स्वतन्त्र वृत्त कल्पिलें असेल. परन्तु अेका चरणासारखे चार चरण लगक्रमदृष्ट्या असावेत या हेतूने केव्हा केव्हा कवींनी तर केव्हा केव्हा छन्दःशास्त्रकारांनी भिन्न भिन्न वृत्तें सिद्ध करण्याचा प्रयत्न बुद्ध्याहि केला असेल. छन्दःशास्त्रकारांनी दिलेल्या अुदाहरणांव्यतिरिक्त स्वतन्त्र काव्यरचनेंत फारच थोड्या आवर्तनी वृत्तांचीं अुदाहरणें आढळतात. अुलटपक्षीं वाङ्मयांत वृत्तस्वरूप चतुष्पद्या आढळतात त्यांची वार्ताहि छन्दःशास्त्रकारांना लागलेली दिसत नाही.

रूढ झालेल्या वृत्तांपासून नवीं वृत्तें पुढील प्रकारांनी निर्माण करण्यांत आलेलीं दिसतात.

( १ ) चरणारम्भींच्या गुरूच्या ठिकाणीं दोन लघू घालून अिन्द्रवंशा, रथोद्धता, स्वागता, वसन्ततिलका, शार्दूलविक्रीडित आणि स्रग्धरा या वृत्तांपासून

अनुक्रमें केकिरव, सुदन्त, प्रियंवदा, द्रुतपदा, ऋषभ, मत्तेभविक्रीडित आणि महास्रग्धरा हीं वृत्तें सिद्ध झालीं आहेत.

प्रथमाक्षराप्रमाणेच अितरत्रहि अेका गुरूच्या ठिकाणीं दोन लघू घालून अुपेन्द्रवज्रा, अिन्द्रवंशा, वंशस्थ, शार्दूलविक्रीडित आणि स्वागता या वृत्तांपासून अनुक्रमें कोल, लक्ष्मी, सद्रत्नमाला आणि चन्द्रवर्त्म हीं वृत्तें सिद्ध झालीं आहेत.

( २ ) अुलटपक्षीं, प्रमिताक्षरा नि द्रुतविलम्बित यांच्या आरम्भींचे दोन लघू, आणि शिखरिणींतील अुपान्त्य दोन लघू, यांच्या ठिकाणीं अेकअेक गुरु घालून अनुक्रमें अुत्थापनी, अच्युत आणि प्रवरललिता हीं वृत्तें सिद्ध झालीं आहेत.

( ३ ) अिन्द्रवज्रा, अुपेन्द्रवज्रा, स्वागता, कनकप्रभा, आणि वसन्ततिलका यांच्या अन्त्याक्षरापूर्वी अेक लघु वाढविल्याने अनुक्रमें अिन्द्रवंशा, वंशस्थ, यूथिका, कमलिनी आणि मृदङ्ग हीं वृत्तें सिद्ध होतात.

( ४ ) रथोद्धता, स्वागता नि प्रमिताक्षरा यांच्या आरम्भीं दोन लघु वाढविल्याने अनुक्रमें कनकप्रभा, कुटजा नि प्रमदा हीं वृत्तें सिद्ध होतात.

( ५ ) रथोद्धता, शालिनी नि यूथिका यांच्या आरम्भीं अेक गुरु वाढविल्याने अनुक्रमें ललिता, वैश्वदेवी नि अभ्रक हीं वृत्तें सिद्ध होतात.

( ६ ) रुचिरा, पृथ्वी नि कुटिलगति यांच्या अन्तीं अेक गुरु वाढविल्याने अनुक्रमें रुक्मिणी, रतिलीला नि नन्दीमुखी हीं वृत्तें होतात.

( ७ ) प्रियंवदा, द्रुतपदा, स्वागता, मङ्गला या वृत्तांत पाचवें अक्षर लघु आह तें गाळल्याने अनुक्रमें 'अभीष्ट,' 'लङ्का,' मणिराग, "प्रगुणीकृता" हीं वृत्तें सिद्ध होतात.

( ८ ) कित्येक वृत्तें अितर वृत्तांचे विभाग जोडून सिद्ध होतात. ( – – – – ) वा ( – – – – – ) आणि ( ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ) वा ( ᴗ ᴗ - ᴗ ᴗ – ᴗ ) यांच्या जोडणीने आणि केव्हा केव्हा या जोडणीला ( - ᴗ – – ᴗ – – ), ( ᴗ – ᴗ ᴗ – ᴗ – ) आणि ( – – ᴗ – – ᴗ – ) यांच्यापैकी अेखादा गण शेवटीं जोडून कितीतरी वृत्तें झालीं आहेत !

( ९ ) काही वृत्तें म्हणजे सुप्रसिद्ध वृत्तांचे विभागच होत. हंसी [ – – – – । ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ] हें वृत्त मन्दाक्रान्ताचे पहिले दोन विभाग मिळून होतें. अिन्द्रवज्रा, अिन्द्रवंशा, पृथ्वी आणि सुवदना यांचे अन्त्य विभाग म्हणजे अनुक्रमें विमला ( ⏑ ⏑ – ⏑ – – ), "निर्मला" ( ⏑ ⏑ – ⏑ – ⏑ – ), कुसुमिता ( ⏑ ⏑ ⏑ – ⏑ – – ⏑ – ) आणि वसुमती ( – – ⏑ ⏑ ⏑ – ) हीं वृत्तें होत. द्रुतविलम्बित, मालिनी आणि शिखरिणी यांचे आद्य विभाग म्हणजेच अनुक्रमें मधुमती ( ⏑ ⏑ ⏑ – ⏑ ⏑ – ), रतिमाला ( ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – – ) आणि शिखण्डिनी ( ⏑ – – – – – ) हीं वृत्तें होत.

( १० ) कित्येकदा अेखाद्या सुप्रसिद्ध वृत्ताला अेखाद्या गणाची जोड देअून नवीन वृत्त सिद्ध करण्यांत येतें. कनकप्रभा आणि विदग्धक यांच्या जोडणीने बुद्बुदवृत्त होतें. मत्ताक्रीडा वृत्ताला ( ⏑ – ⏑ ⏑ – ⏑ – ) हा गण जोडून पिपीलिका वृत्त सिद्ध होतें. शार्दूलविक्रीडिताला ( ⏑ ⏑ – ⏑ – ) हा गण जोडल्यानें विभ्रमगति हें वृत्त होतें. पृथ्वी वृत्ताला ( – ⏑ – – ⏑ – ) हा गण जोडल्याने वृन्दारक वृत्त होतें; आणि ( – – – – ⏑ – – ) या गणाला मालती वृत्त जोडल्याने माधवीलता वृत्त होतें.

( ११ ) मणिमाला, राजरमणीय, मरालिका अित्यादि वृत्तें अनुक्रमें तनुमध्या, कुमारललिता, विदग्धक अित्यादि ऱ्हस्व वृत्तांच्या द्विरावृत्तीने सिद्ध झालीं आहेत.

( १२ ) काही ठिकाणीं प्राचीन वृत्तरचनेंत झालेल्या चुका न अुमगल्यामुळेच नवीन वृत्तें कल्पिण्यांत येअून मग त्यांच्यासाठी सूत्रें रचण्यांत आलीं असावींत असें वाटतें. द्रुतपदा [ ⏑ ⏑ ⏑ – ⏑ ⏑ ⏑ – । ⏑ ⏑ – – ] या वृत्ताचें लक्षण "द्रुतपदं भवति नभनयाश्चेत्" [ ⏑ ⏑ ⏑ – ⏑ ⏑ ⏑ ⏑ । ⏑ ⏑ – – ] असेंहि आढळतें, वा महास्रग्धरा [ ⏑ ⏑ – – – ⏑ – – । ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – । – – – ⏑ – – ] या वृत्ताचें लक्षण " सजता नसौ रौ गः फणितुरगहयैः स्यान्महास्रग्धराख्या" ( गछ २।२१६ ) असेंहि आढळतें, वा वातोर्मीचें लक्षण [ – – – – ⏑ ⏑ – ⏑ – – ] असेंहि हेमचन्द्र ( २।१३७ ) साङ्गतो, वा पणवाचें लक्षण म्नौ य्गौ असें न साङ्गतां केदारभट्ट "म्नौ ज्गौचेति पणवनामकम्" ( – – – ⏑ ⏑ । ⏑ ⏑ – ⏑ – ) असें साङ्गतो या मतभेदाच्या बुडाशी मूळची

चुकी अुमगली नाही हेंच कारण असावें. असले मतभेद पुढे वृत्तांवरील टीपांत अुल्लेखिले आहेत.

वृत्तनामाचा प्रश्न फारच घोटाळ्याचा आणि बिकट झाला आहे. छन्दस् आणि वृत्त हे शब्द नपुंसकलिङ्गी असले तरी त्यांची नावें बहुतेक स्त्रीलिङ्गी आहेत. प्रायः हीं नावें त्या वृत्ताच्या रचनेंत गोवितां येतील अशींच असतात. 'चन्द्रावर्ता' सारखें त्या वृत्ताच्या रचनेंत न बसण्याजोगें नाव क्वचितच आढळतें. णराच, मालत्ती अित्यादि प्राकृत नावें वृत्तांत बसलीं तरी त्यांची संस्कृत रूपें त्या वृत्तांत बसत नाहीत; आणि स्वयम्भूच्छन्द, कविदर्पण आणि प्राकृत पैङ्गल हे तीन ग्रन्थ वगळल्यास वृत्तांचीं नावें संस्कृत रूपांतच देण्याचा आम्नाय आहे. तेव्हा संस्कृत नाव जर वृत्तांत बसत नसलें तर त्यांत थोडा फार फेरफार करणें अवश्य होतें. प्रमाणी, समानी, श्येनी आणि हंसी यांची अनुक्रमें प्रमाणिका, समानिका, श्येनिका आणि हंसिका अशी रूपें करण्यांत येतात. याच कारणासाठी अुदाहरणांत 'यवमती'च्या ठिकाणीं 'यवान्विता' म्हणून 'छन्दोवशाच्च यवान्वितामित्युक्तम्' असें समर्थन हेमचन्द्र ( हे ३।८ ) करितो. याच कारणासाठी चन्द्रावर्ता आणि माला या वृत्तांत न बसणाऱ्या नावांच्या ठिकाणीं शशिकला आणि स्रक् हीं नावें देण्यांत आलीं असावींत.

पुष्कळ नावें म्हणजे कान्तेचें वर्णन करणारीं विशेषणें आहेत. काही पशुपक्ष्यांच्या स्वरावरून, गतीवरून वा क्रीडितावरून पडलीं आहेत. काही सामासिक नामांच्या शेवटीं–आवली,–माला अशीं पदें आहेत.

हीं नावें अस्तित्वांत कशीं आलीं ?

जो अेखादा श्लोक सुपरिचित असेल त्यांतीलच अेखाद्या संस्मरणीय ललित शब्दाने ( बहुशः आद्य वा अन्त्य शब्दाने ) तो वृत्तप्रकार निर्देशिला जावा आणि सूचित व्हावा हें स्वाभाविक आहे. अेकाच वृत्ताला कित्येकदा अनेक नावें आढळतात याचें अेक कारण, त्या वृत्ताचे भिन्न भिन्न सुपरिचित श्लोक छन्दःशास्त्रकारांच्या डोळ्यापुढे असतील हें असूं शकेल.

" कुटजानि वीक्ष्य शिखिभिः शिखरीन्द्रं
समयावनौ घनमदभ्रमराणि
गगनंच गीतनिनदस्य गिरोच्चैः
समया वनौघनमदभ्रमराणि " ( शिशु ६/७३ )

या वृत्ताला हेमचन्द्र कुटज म्हणतो आणि पुढे ' भ्रमर अित्यन्यः ' असें साङ्गतो; दोन्ही नावें या श्लोकाच्या आद्यन्तीं आहेत. याचप्रमाणे अतिशायिनीचें म्हणून दिलेल्या अुदाहरणांत ( शिशु ८/७१ ) अतिशायिनी आणि यादवी या दोन्ही नावांचा अुगम आहे. हंसश्येनी हें नाव ( किरात ५/३१ ) या श्लोकावरून घेतलें आहे हें अुघड आहे. विस्मिता आणि धृतश्री हीं नावें अनुक्रमे ( शिशु २०/७१ ) आणि ( शिशु ३/८२ ) या श्लोकावरून घेतलीं आहेत. ज्या वृत्ताला पिङ्गल वातोर्मि म्हणतो आणि वराहमिहिर अूर्मिमाला म्हणतो त्या वृत्ताचें अुदाहरण म्हणून जो श्लोक हलायुध अुद्धृत करितो त्याच्या शेवटल्या म्हणजे ' त्याज्या सा स्त्री द्रुतवातोर्मिमाला ' या चरणाच्या अन्तीं दोन्हीं नावें आढळतात. हलायुधाने भद्रकाचें म्हणून जें अुदाहरण दिलें आहे त्याच्या आरम्भीं ' मद्रकगीतिभिः' असें आहे; तेव्हा भरत आणि हेमचन्द्र या वृत्ताला मद्रक कां म्हणतात हें चटकन ध्यानांत येतें. तथापि वृत्तांचीं निर्विवादपणें प्राचीनतम अशीं अुदाहरणें अुपलब्ध झाल्याविना या प्रकरणीं निश्चित असें काही साङ्गतां येणार नाही. भरताने साङ्गितलेल्या शरभललिता वृत्ताचें अुदाहरण सौन्दरनन्दाबाहेर आढळत नाही; आणि सौन्दरनन्दांतील अुदाहरणांत शरभललित हा शब्द नाही त्याअर्थी सुप्रसिद्ध वृत्तांचीं नावें ज्या श्लोकांवरून आलीं असतील ते श्लोक अश्वघोषाच्याहि पूर्वी स्फुट स्वरूपांत सुपरिचित असले पाहिजेत. सुप्रसिद्ध वृत्तांत थोडी फिरवाफिरव करून जीं नवीन वृत्तें प्रयोग म्हणून कवींनी वा छन्दःशास्त्रकारांनी साधिलीं असतील त्यांना मात्र त्यांनी स्वतःचीं नावें दिलीं असण्याचा सम्भव आहे.

वृत्तांच्या नावांत अनन्वित गोन्धळ माजलेला आहे. काही वृत्तांना अेकाहून अधिक नावें आहेत; तर काही नावें अेकाहून अधिक वृत्तांना दिलेलीं आढळतात. शशिवदना या वृत्ताला सिद्धक, सिद्धि, सरसी, चित्रलता, रुचिरा, धृतश्री, पञ्चकावली अशीं आणखी सात नावें आहेत! कनकप्रभा वृत्ताला जया, नन्दिनी, प्रबोधिता, मञ्जुभाषिणी, मनोवती आणि सुमङ्गली अशीं आणखी सहा नावें आहेत. कुड्मलदन्ती या वृत्ताला श्री, रुचिरा, मौक्तिकमाला, अनुकूला आणि सान्द्रपद अशीं आणखी पाच नावें आहेत. अुलटपक्षीं चन्द्रलेखा हें नाव सहा वृत्तांना दिलेलें आढळतें. रुचिरा, पञ्चचामर हीं नावेंहि अशीं सहा भिन्न भिन्न वृत्तांना दिलेलीं दिसतील. चित्रलेखा हें नाव पांच वृत्तांना आहे. ललिता हें

हें नाव चार वृत्तांना आहे; आणि अेकच नाव दोन तीन निरनिराळ्या वृत्तांना आहे अशी अुदाहरणें कितीतरी सापडतील ! काही नावांत अन्तर अत्यल्प आहे. मत्ताक्रीडा–मत्तक्रीडा, सुभद्र–सुभद्रा, अुपस्थित–अुपस्थिता, कमल–कमला, ललित–ललिता, वृत्त–वृत्ता यांचा घोटाळा सहज होअू शकेल.

ज्या नांवाचे दोन दोन पारिभाषिक अर्थ होअू शकतात तीं नावें योग्य नव्हेत. पण वृत्त हेंच नाव दोन वृत्तांना दिलेलें आढळतें; यमक हेंहि अेका वृत्ताचें नाव आहे ! पङ्क्ति, बृहती, धृति हीं वर्गवाचक नावें वृत्तांनाहि दिलेलीं आहेत; आणि गीतिका हेंहि अेका वृत्ताचें नाव बनलें आहे !

पूर्वी होअून गेलेल्या छन्दःशास्त्रकाराने जर अेखाद्या वृत्ताला अेक नाव दिलें तर त्या वृत्ताला दुसऱ्या छन्दःशास्त्रकाराने आपलें स्वतःचें म्हणून दुसरें नाव देअू नये, सयुक्तिक कारणावाचून तरी देअू नये. परन्तु छन्दःशास्त्रांत अगदी विरुद्ध वहिवाट दिसते. ज्या वृत्ताला काश्यपाने सिंहोन्नता हें नाव दिलें, त्याला जर सैतवाने अुद्धर्षिणी म्हटलें तरी चालतें तर पिङ्गलाने आपलें वसन्ततिलका हें नाव द्यायला कां भ्यावें ? आणि ही परम्परा येथे तरी काय म्हणून थाम्बावी ? ती थाम्बली नाहीच. ‘ गार्गेण सैव गदिता मधुमाधवीति ’ असा चौथा चरण प्राकृत पैङ्गलाचा टीकाकार ( पृ. ४७४ ) छन्दःसिद्धान्त-भास्करांतून अुद्धृत करितोच !

प्रमाणिका, विद्युन्माला, द्रुतविलम्बित, भुजङ्गप्रयात, स्रग्विणी, मालिनी, हरिणी, मन्दाक्रान्ता, पृथ्वी आणि कुसुमितलतावेल्लिता या नावांनी जीं वृत्तें पिङ्गलाच्या छन्दःशास्त्रांत सुप्रसिद्ध आहेत त्यांना भरताच्या नाट्यशास्त्रांत अनुक्रमें मत्तचेष्टित, विद्युल्लेखा, हरिणीप्लुता, अप्रमेया, पद्मिनी, नान्दीमुखी, वृषभललिता, श्रीधरा, विलम्बितगति आणि चित्रलेखा अशीं नावें आहेत ! नाट्यशास्त्र हें पिङ्गलाच्या, लौकिक वृत्तांचें विवेचन करणाऱ्या छन्दःशास्त्राहून प्राचीन असावें असें वाटतें; तथापि नाट्यशास्त्राची मूळ विश्वसनीय अशी शुद्ध प्राचीन प्रत अद्यापि अुपलब्ध नाही. पुन्हा, रूढ नावाचें सर्वथैव अुच्चाटन करणें शक्य नाही आणि अिष्टहि नाही. म्हणून नावें निश्चित करितांना होतां होअील तों प्राचीन ग्रन्थकारास मान दिला असला तरी भरताने दिलेलीं नावें स्वीकारण्यापेक्षा पिङ्गलाने दिलेलीं आणि रूढ झालेलीं नावेंच बहुतांशी स्वीकारिलीं आहेत.

परन्तु या प्रकरणीं अमुक अेक पद्धत निरपवादपणें स्वीकारिली आहे असें म्हणतां येणार नाही; अेका वृत्ताला अनेक नावें वा अनेक वृत्तांना अेकच नाव ही दुरवस्था राहूं नये अेवढी काळजी घेतली आहे. वरतनु नावाचें जें वृत्त हेमचन्द्र साङ्गतो त्याला दुसरें नावच नाही; अुलट ज्या वृत्ताला पिङ्गल वरतनु म्हणतो त्याला वराहमिहिर मालती म्हणतो, तेव्हा त्या वृत्ताला मालती हें नाव निश्चित केल्याने हेमचन्द्राने साङ्गितलेल्या वृत्ताला वरतनु हें नाव निश्चित करितां आलें. तसेंच केदारभट्टाने ज्याला मञ्जुभाषिणी हें नाव देअून तें रूढ केलें त्याला पिङ्गलाचें कनकप्रभा हें नाव आहे; आणि हेमचन्द्र ज्या वृत्ताला मञ्जुभाषिणी म्हणतो त्याला दुसरें नाव नाही. तेव्हा त्या वृत्ताला मञ्जुभाषिणींच म्हणणे प्राप्त होतें; मग केदारभट्टाच्या मञ्जुभाषिणीला कनकप्रभा हें पिङ्गलोक्त नाव द्यावें लागतें.

निरञ्जनमाधव, विद्याधर वा. भिडे, हिन्दी छन्दःप्रभाकराचा कर्ता रायबहादुर जगन्नाथप्रसाद, रणपिङ्गलकार रणछोडराय अुदयराम अित्यादि अनेक लेखक नवीं नवीं नावें देतात; पण आधार देत नाहीत. यांच्या काही नावांचा अुपयोग वैरल्याने आणि भीतभीतच केला आहे.

जेथे निराळें नाव अुपलब्ध नाही तेथे मूळ नावाच्या आरम्भीं अेखादें पद जोडून नावास वेगळीक आणिली आहे. मूळ नावाच्या पूर्वी कोणता शब्द जोडायचा तो हेमचन्द्रादिकांनी दिलेल्या अुदाहरणांतूनच पुष्कळदा घेतला आहे. लक्ष्मी नावाचीं तीन वृत्तें आहेत, त्यांचीं नावें लक्ष्मी, राजलक्ष्मी, गृहलक्ष्मी अशीं ठेवून भेद व्यक्त केला आहे. केव्हा केव्हा हा भेद 'सु' वा 'अति' हा अुपसर्ग जोडून व्यक्त केला आहे. नावांचा घोटाळा टाळण्यासाठी जें नाव वा नावाचा जो भाग मी दिला आहे तो दुहेरी अवतरण चिन्हांत दिलेला आहे. अरबी, फार्सी छन्दःशास्त्रांतून जीं वृत्तें अिकडे येत आहेत त्यांना नावें मी दिलीं असून तीं दुहेरी अवतरण चिन्हांत छापलीं असून त्यांच्यापुढे * फुली दिलेली आहे.

ज्या वृत्तांचा पत्ता छन्दःशास्त्रकारांना लागलेला नाही पण ज्यांमध्ये केलेली रचना अुपलब्ध आहे अशा वृत्तांना नावें त्या अुदाहरणांतील शब्दांवरूनच दिलीं आहेत. हीं नावें अेकेरी अवतरण चिन्हांत आहेत; आणि मूळ आधारभूत अुदाहरणें पुढे वृत्तविहारांत दिलेलीं आहेत.

नावें अुच्चारसुलभ असावींत. कुसुमितलता-वेल्लिता, भुजङ्गविजृम्भित अित्यादि नावें फार दीर्घ आहेत. सुदैवाने अशीं नावें फार नाहीत. वंश-पत्र पतित हें नाव प्राचीन कालापासून रूढ असलें तरी बोजड आहे म्हणून त्याच्या ठिकाणीं स्वयम्भूचें वंशदल हें आखूड आणि सुटसुटीत नाव निश्चित केलें आहे.

## अनुष्टुभ्

वृत्तविस्तार देण्यापूर्वी अेका सुपरिचित परन्तु वृत्तजातिच्छन्दांपैकी कोणत्याच वर्गांत बसूं न शकणाऱ्या अशा अेका पद्यप्रकाराचा विचार केला पाहिजे. तो पद्यप्रकार म्हटला म्हणजे श्लोक वा अनुष्टुभ् होय. याला छन्द म्हणतात; पण यांत लगत्वभेद आहे. याला वृत्त म्हणावें तर लगक्रम निश्चित् नाही; आणि जाति म्हणावें तर काही भाग वृत्ताप्रमाणे अचल आहे, आणि अुर्वरित भाग निश्चित नाही; नि मात्रांची सङ्ख्याहि नियमित नाही. वराहमिहिर श्लोकलक्षण पुढीलप्रमाणे साङ्गतो.

"पञ्चमं लघु सर्वेषु
सप्तमं द्विचतुर्थयोः
यद्वच्छ्लोकाक्षरं तद्व-
ल्लघुतां याति दुःस्थितैः" (वबृ १०३।५७)

श्रुतबोधकार लक्षण साङ्गतांना सहावें अक्षर गुरु पाहिजे ही गोष्ट अधिक साङ्गतो,

"श्लोके षष्ठं गुरु ज्ञेयं
सर्वत्र लघु पञ्चमम्
द्विचतुष्पादयोर्ह्रस्वं
सप्तमं दीर्घमन्ययोः" (श्रुबो १०)

चरणान्तीं यति असल्यामुळे आठवें अक्षर लघु असलें तरी तें म्हणतांना गुरुच होतें म्हणून आठवें अक्षर गुरु पाहिजे ही अट साङ्गितलेली नाही. परन्तु या दोन श्लोकांचा अर्थ अेवढाच होतो की विषमचरणान्तीं [ ᴗ – – – ] हा अक्षरक्रम असावा आणि समचरणान्तीं [ ᴗ – ᴗ – ] हा अक्षरक्रम असावा.

परन्तु चरणारम्भींचीं चार अक्षरें कशीं असावींत याविषयी काहींच बोध होत नाही.

भगवद्गीतेंतील अध्याय १,५,७,१०,१२,१४ नि १६ या सात अध्यायांतील मिळून २१९ श्लोकांचें पृथक्करण करून पहातां,

( १ ) समचरणान्तीं ( ᴗ – ᴗ – ) हा गण निरपवादपणें आढळला.

( २ ) विषमचरणान्तीं ( ᴗ – – – ) हा गण शेकडा नव्वदाहून अधिक वेळां आढळला. ४३८ विषमचरणांपैकीं अन्तीं ( ᴗ ᴗ – – ) हा गण अेकाच चरणांत, ( ᴗ ᴗ ᴗ – ) हा १५ चरणांत, ( – – – – ) हा १० चरणांत, ( – ᴗ – – ) हा ७ चरणांत आणि ( – ᴗ ᴗ – ) हा ९ चरणांत आढळला. म्हणजे काय, 'पञ्चमं लघु सर्वेषु' हा नियम सुद्धा विषम चरणांत निरपवाद नाही.

आरम्भींचे चतुरक्षरी गण पुढीलप्रमाणे आढळले.

| | | विषमचरणारम्भीं | समचरणारम्भीं |
|---|---|---|---|
| १ | [ – – – – ] | ७७ वेळां | ७४ वेळां |
| २ | [ ᴗ – – – ] | ५० ,, | ५२ ,, |
| ३ | [ – ᴗ – – ] | ६० ,, | ६६ ,, |
| ४ | [ – – ᴗ – ] | ३९ ,, | शून्य ,, |
| ५ | [ – – – ᴗ ] | ३७ ,, | ५० ,, |
| ६ | [ ᴗ ᴗ – – ] | ३० ,, | ३९ ,, |
| ७ | [ – ᴗ ᴗ – ] | शून्य ,, | शून्य ,, |
| ८ | [ – – ᴗ ᴗ ] | ३१ ,, | ३७ ,, |
| ९ | [ ᴗ – – ᴗ ] | १९ ,, | ३६ ,, |
| १० | [ ᴗ – ᴗ – ] | २६ ,, | शून्य ,, |
| ११ | [ – ᴗ – ᴗ ] | २७ ,, | ४३ ,, |
| १२ | [ ᴗ – ᴗ ᴗ ] | १७ ,, | २४ ,, |
| १३ | [ ᴗ ᴗ – ᴗ ] | २५ ,, | १७ ,, |

यावरून असें म्हणतां येअील की विषमचरणारम्भीं कोणताहि चार-अक्षरी गण चालेल; परन्तु त्याचें दुसरें नि तिसरें अक्षर हीं दोन्ही अेकसमयावच्छेदें

लघु नसावींत. म्हणजे विषमचरणारम्भीं (–⏑⏑–), (–⏑⏑⏑), (⏑⏑⏑–) आणि (⏑⏑⏑⏑) हे चार गण वर्ज्य होत.

हे चार गण समचरणारम्भींहि वर्ज्यच आहेत. यांच्या भरीला (––⏑–) आणि (⏑–⏑–) हे दोन गण विषमचरणारम्भीं वर्ज्य नसून समचरणारम्भीं वर्ज्य दिसतात.

अनुष्टुभांतील समचरणाची त्रिपदी पुढील पद्यांत आहे.

"द्यावया नव चालना
पाऊल पहिलें पडो
हो तूं मला अनुव्रता" (पु. मं. लाड)

परन्तु तिसऱ्या चरणाची आवृत्ति प्रत्येक त्रिपदींत असल्याने त्याला ध्रुवपदाचें स्वरूप प्राप्त होतें आणि प्रत्येक कडव्यांत द्विपदीच अुरते.

"बल–तेजास वाढवीं
दुसऱ्या शुभ पावलीं" हो तू०

अनुष्टुभ् छन्दाप्रमाणेच दुसरे काही पद्यप्रकार असे आहेत की त्यांना वृत्त वा जाति यांपैकी कोणत्याच वर्गात समाविष्ट करितां येत नाही. चरणाचा काही भाग वृत्ताप्रमाणे अचल असतो; पण अुरलेला भाग पूर्णपणें जातिस्वरूप नसतो. अपरान्तिका, आपातलिका, अुदीच्यवृत्ति, अुपचित्रा, चारुहासिनी, चित्रा, प्रवृत्तक, प्राच्यवृत्ति, वानवासिका, विश्लोक अित्यादि पद्यप्रकारांपैकी काहींचीं अुदाहरणें वृत्तस्वरूप दिसल्यामुळें त्यांचा विचार वृत्तप्रकरणीं केला आहे. या ठिकाणीं वैतालीय, औपच्छन्दसिक, गीति आणि आर्यागीति यांचाच विचार कर्तव्य आहे.

**वैतालीय** { [–––+।⏑+⏑+]
[––+–।+⏑+⏑+] }

ज्या ठिकाणीं शुद्ध गुरूच हवा असतो आणि दोन लघू चालत नाहीत तेथे (+) ही खूण योजिली आहे.

सूत्रकृताङ्गांत वैतालीयाचे बरेच श्लोक आहेत. त्यांतील चरणांचें पृथक्करण करितां असें दिसतें की विषम चरणांचे आठ मात्रांचा आणि सहा मात्रांचा

असे दोन भाग पाडतात. विषम चरणान्तीं ( ᴗ + ᴗ + ) हा गण आणि समचरणान्तीं ( + ᴗ + ᴗ + ) हा गण हे निरपवादपणें येतात. विषमचरणांतील आद्य अष्टमात्रक गणांत ( – – – – ) हा पहिलाच प्रकार आढळतो; ( ᴗ – ᴗ – – ), ( ᴗ – – ᴗ – ), ( – ᴗ – ᴗ – ) आणि ( – – ᴗ – ᴗ ) हे प्रकार आढळत नाहीत. ते तसे आढळत नाहीत म्हणूनच पहिला गण पूर्ण जातिस्वरूप होअू शकत नाही. विषमचरणांतील आद्यगणांत अन्त्याक्षर गुरूच पाहिजे असें दिसतें. अितरत्र अेका गुरूच्या ठिकाणीं दोन लघू घालतां येतात.

समचरणांतील आद्यगणांत ( – – – – ) या प्रकाराव्यतिरिक्त वैरल्याने का होअीना पण ( – ᴗ – ᴗ – ) हा प्रकार आढळतो. मात्र या गणांत चौथी नि पाचवी मात्रा अथवा पाचवी नि सहावी मात्रा मिळून गुरुच अक्षर पाहिजे असा कटाक्ष दिसतो.

"पन्नसमत्ते सया जअे
समताधम्ममुदाहरे मुणी
सुहुमे अु सया अलूस अे
नो कुज्झेनो माणि माहणे" ( सूक्त १।२।२।६ )

वैतालीयांतील प्राचीन रचना केव्हा केव्हा स्वाभाविकपणेंच शिथिल आढळते.

" अुत्तर मणुयाण आहिया
गामधम्म अिअिमे अणुस्सुयं
जंसी विरया समुठ्ठिया
चासवस्स अणुधम्मचारिणो" ( सूक्त १।२।२।२५ )

**औपच्छन्दसिक** हें वैतालीयाच्या चरणान्तीं अेक अेक गुरु वाढविल्याने सिद्ध होतें.

**गीति** { [ – – – – । – – ]
[ – – – – । ᴗ – ᴗ – – । + ] }

गीति ही सुद्धा चतुष्पदीच आहे. ही पूर्णपणें जातिस्वरूप नाही. विषमचरणांतील आद्यगणांत ( ᴗ – – ᴗ – ) अथवा ( – ᴗ – ᴗ – ) या गणाचा अुपयोग अद्यापि होअू लागला नाही. समचरणांतील आद्यगणांत हीच स्थिति

आहे. परन्तु ही अुणीव नाहीशी करितांच येणार नाही असें मात्र नाही. समचरणांतील दुसऱ्या गणांत मात्र ( ⏑ – ⏑ – – ) हाच गण लागतो.

मराठींत गीतीला आर्या म्हणण्याचा प्रघात आहे. वस्तुतः आर्या ही गीतीच्या समचरणांत अन्त्य दोन गणांच्या ठिकाणीं (⏑ – – +) हा गण घातल्यानें होते.

> " प्राकृत भाषेमध्ये
> आर्या म्हणती जिला जुनाट कवी
> गीति असूनि खरी ती
> संस्कृत छन्दोविदां जनां ठकवी." ( पार २९ )

> " आर्या आर्यांसि रुचे
> अीच्या ठायीं जसी असे गोडी
> आहे अितरां छन्दीं
> गोडी, परि यापरीस ती थोडी. " ( मोभीभ १० )

**आर्यागीति** ही गीतीच्या समचरणान्तीं अेक अेक गुरु वाढविल्याने सिद्ध होते.

> " वृत्तीं आधी आर्या
> श्राव्या सेव्याचि फार साधी आर्या,
> युक्ता सद्यमकांनी
> घ्यावी रसिकीं करूनि अुद्यम कानीं." ( मोकृवि १।५ )

मोरोपन्तकृत कृष्णविजय पूर्वार्ध आणि अुत्तरार्धांतील पहिले पाच अध्याय, आणि प्रल्हादविजय हीं काव्यें आर्यागीतीमध्ये आहेत.

आर्यागीति समयक रचण्याची वहिवाट संस्कृतांत रविकीर्तीच्या काळापासून दिसते. पहा

> " येनायोजि न वेश्म
> स्थिरमर्थविधौ विवेकिना जिनवेश्म
> स विजयतां रविकीर्तिः
> कविताश्रितकालिदासभारविकीर्तिः " ( अैहोळे शिलालेख )

---

# वृत्तविस्तार

## परिच्छेद १ ला

## अनावर्तनी वृत्तें

### १ श्री-वर्ग

पुढील ऱ्हस्वतम वृत्तांचा नामनिर्देश करून ठेवण्यापलीकडे त्यांचें काही प्रयोजन नाही.

| | | | |
|---|---|---|---|
| १ श्री | [ – ] | ६ स्त्री | [ – – ] |
| २ मद | [ ᴗ ᴗ ] | ७ रजनी | [ ᴗ ᴗ – ] |
| ३ सुख | [ ᴗ – ] | ८ मन्दर | [ – ᴗ ᴗ ] |
| ४ दुक्ख | [ – ᴗ ] | ९ मृगेन्द्र | [ ᴗ – ᴗ ] |
| ५ कमल | [ ᴗ ᴗ ᴗ ] | १० सुरतरु | [ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ] |

टीपा

[ ज्या नावापुढे कंसांत हे हें अक्षर आहे पण पुढे आकडा नाही तें नाव हेमचन्द्राने दिलेलें नसून हेमचन्द्राने दुसऱ्याचें टिपून ठेविलेलें आहे असें समजावें ]

**१ श्री** ( हे २/१ ), ह्री ( भ ३२/४६ ), गौ ( वित्र ५/१ ). **२ मद** ( हे २/३ ), पुष्प ( हे ), मधु ( प्रापै २/५ ), गिरिधर ( ना ). **३ सुख** ( हे २/५ ), मही ( प्रापै २/७ ), दिगन्त ( ना ). **४ दुक्ख** ( हे २/४ ), सारु ( प्रापै २/९ ). **५ कमल** ( प्रापै २/२५ ), परम ( ना ).

**६ स्त्री** ( हे २/२ ), पद्म ( हे ), नौ ( वित्र ५/२ ), काम ( प्रापै २/३ ), गर्व ( ना ). **७ रजनी** ( भ ३२/५४, हे ), मदन ( हे २/९ ), रमण ( प्रापै २/१७ ), प्रवर ( ना ). **८ मन्दर** ( प्रापै २/२३ ). **९ मृगेन्द्र** ( प्रापै २/२१ ). **१० सुरतरु** ( ना ).

## २ अिन्द्रवज्रा-वर्ग

### अिन्द्रवज्रा—अुपेन्द्रवज्रा—वसन्ततिलका

| | |
|---|---|
| ११ **अिन्द्रवज्रा** | [ – – ⏑ – – । ⏑ ⏑ – ⏑ – – ] |
| १२ **आन्दोलिका** | [ – – ⏑ – – । ⏑ – ⏑ – – ] |
| १३ **‘आनन्दशब्द’** | [ – – ⏑ – – । ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ⏑ – – ] |
| १४ **केकिरव** | [ ⏑ ⏑ – ⏑ – – । ⏑ ⏑ – ⏑ – – ] |
| १५ **अुपेन्द्रवज्रा** | [ ⏑ – ⏑ – – । ⏑ ⏑ – ⏑ – – ] |
| १६ **कोल** | [ ⏑ – ⏑ ⏑ ⏑ – । ⏑ ⏑ – ⏑ – – ] |
| १७ **“प्रतिष्ठित”** | [ ⏑ – ⏑ ⏑ ⏑ – । – – ⏑ – – ] |
| १८ **“व्यवस्थित”** | [ ⏑ – ⏑ ⏑ ⏑ – । – – ⏑ ⏑ ⏑ – – ] |
| १९ **“समुपस्थिता”** | [ – – ⏑ ⏑ – । ⏑ ⏑ – ⏑ – – ] |
| २० **वसन्ततिलका** | [ – – ⏑ – ⏑ ⏑ ⏑ – । ⏑ ⏑ – ⏑ – – ] |
| २१ **ऋषभ** | [ ⏑ ⏑ – ⏑ – ⏑ ⏑ ⏑ – । ⏑ ⏑ – ⏑ – – ] |
| २२ **शिशु** | [ – – ⏑ ⏑ – ⏑ ⏑ ⏑ – । ⏑ ⏑ – ⏑ – – ] |
| २३ **स्वर्णाक्षी** | [ – – – ! ⏑ – ⏑ ⏑ ⏑ – ! ⏑ ⏑ – ⏑ – – ] |
| २४ **केतन** | [ – ⏑ ⏑ ⏑ – – ⏑ ⏑ – । ⏑ ⏑ – ⏑ – – ] |
| २५ **विमला** | [ ⏑ ⏑ – ⏑ – – ] |

### टीपा

११ **अिन्द्रवज्रा** (पि ६/१५), “तौ जो गुरू चेद्भवतीन्द्रवज्रा” (अुवबृ १०३/३४). १२ “**आन्दोलिका** ततरगाः सायकैः सायकैर्यतिः” (ममच १६). १४ “स्यौ स्यौ **केकिरवम्**” (हे २/१९२). १५ **अुपेन्द्रवज्रा** (पि ६/१६), “अुपेन्द्रवज्रा तु जतौ जगौ गः” (अुवबृ १०३/११)

१६ “ज्सौ स्यौ **कोलः**” (हे २/१९४). १७ “**प्रतिष्ठित**”; अुपस्थित (हे २/१३४), शिखण्डित (गछ २/५७), “अुपस्थितमिदं ज्सौ ताद्गकारौ” (के ३/४४). प्रतिष्ठितवृत्ताची मोडणी [ । ⏑ – ⏑ ⏑ ⏑ – । – – ⏑ – ऽ । – ] अशी केल्यास तें पद्मावर्तनी होअील. १८ “**व्यवस्थित**”, “अुपस्थितमिदं ज्सौ त्सौ यदि गुरुः स्यात्” (गछ २/१०६). १९ “**समुपस्थिता,**” “तो जौ

गौ अुपस्थिता" ( हे २/१३३ ). २० **वसन्ततिलका** ( पि ७/८ ), सिंहोन्नता ( वित्र ५/३१ ); "त्भौ जौ वसन्ततिलकं गुरुकद्वयं चेत्" (अुवबृ १०३/३३)

२१ **ऋषभ** ( हे २/२४३ ), "ऋषभाख्यमेतदुदितं सजसाः सयौ चेत्" ( गच्छ २/१४४ ). २२ " त्जसस्याः **शिशुः** " ( हे २/२६० ). २३ मो ज्सौ स्यौ **स्वर्णाक्षी**. हें नाव विद्याधर वा. भिडे यांनी भिजी १८४ व्या कवितेवर दिलें आहे. या वृत्ताची मोडणी [ | – – – ऽ ऽ | ᴗ – ᴗ ᴗ ᴗ – | ᴗ ᴗ – ᴗ – ऽ | – ] अशी धरिल्यास तें पद्मावर्तनीहि होअील. २४ " भ्यसस्याः **केतनं** " ( हे २/२६१ ). २५ " स्यौ **विमला** " ( हे २/४१ ); याच्याच द्विरावृत्तीने केकिरव वृत्त सिद्ध होतें. या वृत्ताची मोडणी [ | ᴗ ᴗ – ᴗ | – – ] अशी धरल्यास तें हरावर्तनी होतें.

## ३ अिन्द्रवंशा–वर्ग

### वंशस्थ–रुचिरा–प्रहर्षिणी

| | |
|---|---|
| २६ **अिन्द्रवंशा** | [ – – ᴗ – – \| ᴗ ᴗ – ᴗ – ᴗ – ] |
| २७ **सुदन्त** | [ ᴗ ᴗ – ᴗ – – \| ᴗ ᴗ – ᴗ – ᴗ – ] |
| २८ **वंशस्थ** | [ ᴗ – ᴗ – – \| ᴗ ᴗ – ᴗ – ᴗ – ] |
| २९ **मञ्जुभाषिणी** | [ ᴗ – ᴗ – – \| ᴗ ᴗ ᴗ – ᴗ – ᴗ – ] |
| ३० **मृदङ्ग** | [ – – ᴗ – ᴗ ᴗ ᴗ – \| ᴗ ᴗ – ᴗ – – ] |
| ३१ **लक्ष्मी** | [ – – ᴗ – ! ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ᴗ – ᴗ – ] |
| ३२ **रुचिरा** | [ ᴗ – ᴗ – ! ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ᴗ – ᴗ – ] |
| ३३ **रुक्मिणी** | [ ᴗ – ᴗ – \| ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ᴗ – ᴗ – – ] |
| ३४ **"सु"-रुचिरा** | [ ᴗ – ᴗ – ! ᴗ ᴗ ᴗ ᴗ – – ᴗ – – ] |
| ३५ **प्रहर्षिणी** | [ – – – ! ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ᴗ – ᴗ – – ] |
| ३६ **'म्लेञ्छ'** | [ – – – ᴗ ᴗ – ᴗ – ᴗ – ᴗ – – ] |
| ३७ **घनमाला** | [ ᴗ ᴗ – – ! ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ᴗ – ᴗ – – ] |
| ३८ **'मधुमक्षिका'** | [ – ᴗ ᴗ – ! ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ᴗ – ᴗ – – ] |
| ३९ **रमा** | [ ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ! ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ᴗ – ᴗ – – ] |
| ४० **" निर्मला "** | [ ᴗ ᴗ – ᴗ – ᴗ – ] |

टीपा

२६ **अिन्द्रवंशा** ( पि ६/२९ ). "ताविन्द्रवंशा जरसंहितौ मता" ( अुवबृ १०३/१८ ). २७ "स्यौ स्जौ गः **सुदन्तं**" ( हे २/२१८ ). २८ **वंशस्थ** ( पि ६/२८ ), वंशस्थविल ( श्रुबो ३२, गछ २/६६ ), वसन्तमञ्जरी ( वित्र ५/२६ ), अभ्रवंशा ( हे ); "जतौ तु वंशस्थमुदीरितं जरौ" ( के ३/४६ ). २९ "ज्तौ स्जौ गो **मञ्जुभाषिणी**" ( हे २/२०७ ), मञ्जुहासिनी ( गछ २/१०७ ), मत्तहासिनी ( निस ९१ ). हें वृत्त जेव्हा [ । ᴗ – ᴗ – – । ᴗ ᴗ ᴗ – ᴗ – । ᴗ – ] असें पद्मावर्तनी मोडणीचें असेल तेव्हा त्याला मञ्जुहासिनी म्हणावें. ३० "त्भौ जौ रो **मृदङ्गः**" ( हे २/२६२ ).

३१ "**लक्ष्मी**रियं तभसजगैरुदाहृता" ( अुवबृ १०३/३६ ), ( ह २/२१५ ), प्रभावती ( श्रुबो ३४ ). 'युगग्रहैः' म्हणून श्रुतबोधकारच तेवढा यति साङ्गतो. ३२ **रुचिरा** ( पि ७/२ ), प्रभावती ( भ १६/५८ ), सदागति ( वित्र ५/३० ). "जभौ सजौ गिति रुचिरा चतुर्ग्रहैः" ( अुवबृ १०३/२१ ). ३३ ज्भौ स्जौ गौ **रुक्मिणी** घैः हें नाव मराठींत रूढ आहे पण याचा अुगम गावत नाही. कुसुम्भिनी ( रपि ९३६ ) या नावालाहि आधार दिलेला नाही. ३४ **"सु"-रुचिरा,** "ज्भौ सरौ गोऽतिरुचिरा चतुर्भिर्नवभिर्यतिः" ( ममच १७ ), रुचिरा ( निस ८७ ). ३५ **प्रहर्षिणी** ( पि ७/१ ), प्रहर्षणीय ( वबृ १०३/२२ ), मयूरपिच्छ ( वित्र ५/२९ ), "म्नौ ज्रौ गस्त्रिकदशकैः प्रहर्षणीयं" ( अुवबृ १०३/२२ ).

३६ म्सौ ज्रौ ग् '**म्लेञ्छ**'. ३७ स्भौ स्जौ गौ **घनमाला** घैः हें नाव विद्याधर वा. भिडे यांनी भिजी १४९ व्या कवितेवर दिलें आहे; पण आधार दिला नाही. वंशमूल ( रपि ९३४ ) यालाहि आधार दिलेला नाही. ३८ भौ स्जौ गौ '**मधुमक्षिका**'. ३९ न्जौ न्रौ य् **रमा** ङैः हें नाव मराठींत रूढ आहे; पण अुगम गावत नाही. ४० "**निर्मला**" "स्जौ गो विमला" ( हे २/६२ ) आणि ( भ ३२/१०३ ). या वृत्ताची मोडणी [ । ᴗ ᴗ – ᴗ – ᴗ । – ] अशी घेतल्यास तें पद्मावर्तनी आणि [ ᴗ ᴗ । – ᴗ – ᴗ । – ] अशी घेतल्यास तें भृङ्गावर्तनी होतें.

## ४ रथोद्धता—वर्ग

प्रियंवदा—कनकप्रभा

४१ रथोद्धता [–ᵕ–ᵕᵕᵕ–|ᵕ–ᵕ–]
४२ प्रियंवदा [ᵕᵕᵕ–ᵕᵕᵕ–|ᵕ–ᵕ–]
४३ ' अभीष्ट ' [ᵕᵕᵕ–ᵕᵕ–|ᵕ–ᵕ–]
४४ ललिता [––ᵕ–ᵕᵕᵕ–|ᵕ–ᵕ–]
४५ कनकप्रभा [ᵕᵕ–ᵕ–ᵕᵕᵕ–|ᵕ–ᵕ–]
४६ बुद्बुद [ᵕᵕ–ᵕ–ᵕᵕᵕ–|ᵕ–ᵕ–|–ᵕ–ᵕ–]

### टीपा

**४१ रथोद्धता** (पि ६/२२), अपरान्तिका (हे). "रौ नरौ लगुयुता रथोद्धता" (अुवबृ १०३/३१). नागवर्मा सहाव्या अक्षरानन्तर यति साङ्गतो; तसा घेतल्यास वृत्त पद्मावर्तनी होअील. **४२ प्रियंवदा** (हे २/१७५, कद ४/४८), मत्तकोकिल (हे), निरुपमा (ना१३१) "भुवि भवेन्नभजरैः प्रियंवदा" (के ३/५७). **४३** न्भौ लौं ग् **अभीष्ट**. **४४ ललिता** (हे २/१७६); "धीरैरभाणि ललिता तभौ जरौ" (के ३/५९). **४५ कनकप्रभा** स्जौ स्जौ ग् ( पि ८/७ ), जया, सुमङ्गली ( हे ), मनोवती ( भ, हे ), नन्दिनी ( स्वछ ३, हे २/२११ ), [ अर्थात् ' सुनन्दिनीति शम्भौ ' ( गछ ) हें चूक असावें ], मञ्जुभाषिणी ( के ३/७४ ), प्रबोधिता ( गछ २/१०२). ४६ "स्जौ स्जौ त्नौ बुद्बुदं" ( हे २/३२१ ). [|ᵕᵕ–ᵕ–ᵕ| ᵕᵕ–ᵕ–ᵕ|––ᵕ–ᵕ|–] अशी मोडणी घेतल्यास हें वृत्त पद्मावर्तनी होतें.

## ५ स्वागता—वर्ग

लङ्का—कुटजा—प्रमिताक्षरा—यूथिका—द्रुतविलम्बित

४७ स्वागता [–ᵕ–ᵕᵕᵕ–|ᵕᵕ––]
४८ द्रुतपदा [ᵕᵕᵕ–ᵕᵕᵕ–|ᵕᵕ––]
४९ अम्बुज [–ᵕᵕᵕ–ᵕᵕᵕ–|ᵕᵕ––]
५० चन्द्रवर्त्म [–ᵕ–ᵕᵕᵕ–|ᵕᵕᵕᵕ–]

| | | |
|---|---|---|
| ५१ | मणिरङ्ग | [– ᴗ – ᴗ ᴗ – \| ᴗ ᴗ – –] |
| ५२ | ‘लङ्का’ | [ᴗ ᴗ ᴗ – ᴗ ᴗ – \| ᴗ ᴗ – –] |
| ५३ | कुटजा | [ᴗ ᴗ – ᴗ – ᴗ ᴗ ᴗ – \| ᴗ ᴗ – –] |
| ५४ | प्रमिताक्षरा | [ᴗ ᴗ – ᴗ – ᴗ ᴗ ᴗ – \| ᴗ ᴗ –] |
| ५५ | प्रमिता | [ᴗ ᴗ – ᴗ – ᴗ ᴗ ᴗ – \| –] |
| ५६ | अुत्थापनी | [– – ᴗ – ᴗ ᴗ ᴗ – \| ᴗ ᴗ –] |
| ५७ | मणिकटक | [ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ᴗ – ᴗ ᴗ ᴗ – \| ᴗ ᴗ –] |
| ५८ | यूथिका | [– ᴗ – ᴗ ᴗ ᴗ – \| ᴗ ᴗ – ᴗ –] |
| ५९ | अच्युत | [– ᴗ – ᴗ ᴗ – \| ᴗ ᴗ – ᴗ –] |
| ६० | ‘जनकात्मजा’ | [ᴗ ᴗ ᴗ – ᴗ ᴗ ᴗ – \| ᴗ ᴗ – ᴗ –] |
| ६१ | द्रुतविलम्बित | [ᴗ ᴗ ᴗ – ᴗ ᴗ – \| ᴗ ᴗ – ᴗ –] |
| ६२ | अभ्रक | [– – ᴗ – ᴗ ᴗ ᴗ – \| ᴗ ᴗ – ᴗ –] |
| ६३ | कमलिनी | [ᴗ ᴗ – ᴗ – ᴗ ᴗ ᴗ – \| ᴗ ᴗ – ᴗ –] |
| ६४ | सुन्दर | [– ᴗ – ᴗ ᴗ ᴗ – \| ᴗ ᴗ – \| ᴗ ᴗ – ᴗ –] |
| ६५ | मङ्गला | [ᴗ ᴗ ᴗ – ᴗ ᴗ ᴗ – \| ᴗ ᴗ – \| ᴗ ᴗ – ᴗ –] |
| ६६ | “प्रगुणीकृता” | [ᴗ ᴗ ᴗ – ᴗ ᴗ – \| ᴗ ᴗ – \| ᴗ ᴗ – ᴗ –] |
| ६७ | कुसुमाङ्घ्रिप | [ᴗ ᴗ ᴗ – ᴗ ᴗ – \| ᴗ – \| ᴗ ᴗ – ᴗ –] |

## टीपा

४७ **स्वागता** (पि ६/२३), “स्वागता रनभगैर्गुरुतोऽन्ते” (अुवबृ १०३/१९). या वृत्ताची मोडणी [। – ᴗ – ᴗ ᴗ ᴗ । – ᴗ ᴗ – –] अशी घेतल्यास तें पद्मावर्तनी होअील. ४८ **द्रुतपदा** (हे), “द्रुतपदं नभजयैः कथितं तत्” (अुवबृ १०३/२०), कलहंसा (हे २/१६१), मुखर (हे). “द्रुतपदं भवति नभनयाश्चेत्” (गछ २/८८) असेंहि लक्षण आढळतें. ४९ भ्जौ सौ ग् **अम्बुज** (ना १४५) हें वृत्त द्रुतपदाच्या आरम्भीं अेक गुरु अधिक घातल्याने होतें. ५० **चन्द्रवर्त्म** (हे २/१६२), “चन्द्रवर्त्म निगदन्ति रनभसैः” (के ३/४५). हें वृत्त [। – ᴗ – ᴗ ᴗ ᴗ । – ᴗ ᴗ ᴗ ᴗ –] अशी मोडणी घेतल्यास पद्मावर्तनी होअील.

५१ " रः सौ गो **मणिरंगः** " ( हे २/११६ ), ( ना १११ ). हेमचन्द्राच्या अुदाहरणांत मणिराग आहे. हें वृत्त [ – ᴗ – ! ᴗ ᴗ – ᴗ ᴗ – । – ] याप्रमाणे पद्मावर्तनी मोडणीचें असेल तेव्हा त्याला मणिराग म्हणावें. ५२ न्भौ भ्गौ ग् **'लङ्का.'** रोधक ( रपि ५८१ ) हें नाव आहे; पण आधार नाही. मणिरागाप्रमाणे लङ्कावृत्तहि [ ᴗ ᴗ ᴗ – ! ᴗ ᴗ – ᴗ ᴗ – । – ] पद्मावर्तनी होअू शकतें. ५३ **कुटजा** ( मल्लिनाथ शिशु० ६/७३ ), " स्जौ सौ गः कुटजं " ( हे २।२१३ ); भ्रमर ( हे ), कलहंस ( गछ २/१०१ ), नवनन्दिनी ( मोसग्र ८/५१३ पहा ). ५४ **प्रमिताक्षरा** ( पि ६/३९ ) चित्रा ( हे ), प्रवराक्षरा ( ना १३५ ). " प्रमिताक्षरा सजयुतावथ सौ " ( अुवबृ १०३/३७ ). नागवर्मा ६ व्या अक्षरानन्तर यति साङ्गतो तेव्हा [ । ᴗ ᴗ – ᴗ – ᴗ ! ᴗ ᴗ – ᴗ ᴗ – ] या मोडणीच्या पद्मावर्तनी वृत्ताला प्रवराक्षरा म्हणावें. याव्यतिरिक्त पद्मावर्तनी मोडणींतच [ ᴗ ᴗ – । ᴗ – ᴗ ᴗ ᴗ – । ᴗ ᴗ – ] आणि [ ᴗ ᴗ । – ᴗ – ᴗ ᴗ ᴗ । – ᴗ ᴗ – ] असे दोन प्रकार सम्भवतात. ५५ स्जस्गाः **प्रमिता** ( भ ३२/१४४ हे ), माला ( हे २/१२६ ). या वृत्ताची मोडणी जेव्हा [ ᴗ ᴗ – । ᴗ – ᴗ ᴗ ᴗ – । – ] अशी पद्मावर्तनी असेल तेव्हा त्याला "शशि"माला आणि [ ᴗ ᴗ । – ᴗ – ᴗ ᴗ ᴗ । – – ] अशी पद्मावर्तनी असेल तेव्हा त्याला "विधु"माला म्हणावें.

५६ "तभजल्गा **अुत्थापनी**" ( हे २/१४८ ), धारावलिका ( पि ९८ टीप ). प्रमिताक्षरावृत्ताप्रमाणेच अुत्थापनीचेंहि [ – – । ᴗ – ᴗ ᴗ – । ᴗ ᴗ – ] आणि [ – । – ᴗ – ᴗ ᴗ ᴗ । – ᴗ ᴗ – ] असे दोन प्रकार सम्भवतात. ५७ **मणिकटक** ( हे ), " न्जभ्जल्गा धृतिः " ( हे २/२३६ ), प्रमदा ( गछ २/१२४ ), कुररीरुता ( मल्लिनाथ शिशु० ४/४१ ). या वृत्ताची मोडणी जेव्हा [ । ᴗ ᴗ ᴗ ᴗ – SS । ᴗ – ᴗ ᴗ ᴗ – । ᴗ ᴗ – ] अशी असेल तेव्हा त्याला प्रमदा म्हणावें. ५८ नौं भ्रौ **यूथिका** ( रपि ८७१ ), पण या नावाचा अुगम सापडत नाही. ५९ " रः सौ ल्गौ **अच्युतं**" ( हे २/१२८ ); या वृत्ताची मोडणी [ – ᴗ – ! ᴗ ᴗ – ᴗ ᴗ – । ᴗ – ) अशी पद्मावर्तनीहि होअू शकेल. ६० **'जनकात्मजा'** न्भौ जौ ग्. या वृत्ताला वृत्तदर्पणकार विभावरी म्हणतो; पण हेमचन्द्र विभावरी नावाचें निराळेंच वृत्त साङ्गतो. सारसनावलि ( रपि ८७१ ) या नावाला तसा आधार गवसत नाही.

६१ **द्रुतविलम्बित** ( पि ६/३० ), हरिणप्लुता ( भ १६/४८,) सुन्दरी (प्रापै २/१३९). "द्रुतविलम्बितमाह नभौ भरौ" (के ३/४९). द्रुतविलम्बिताची मोडणी [ ⏑ ⏑ ⏑ – ! ⏑ ⏑ – ⏑ ⏑ – । ⏑ – ] अशी घेतल्यास तें अच्युताप्रमाणे पद्मावर्तनी होईल. ६२ " त्भौ जौ गो **अभ्रकं** " ( हे २।२१६ ); या वृत्ताच्या अन्तीं एक गुरु वाढविल्याने वसन्ततिलकावृत्त होतें. ६३ स्जौ सौ ल्गौ **कमलिनी.** हें वृत्त विद्याधर वा. भिडे यांनी सिद्ध केलें असून नामकरणहि त्यांनीच केलें आहे. ६४ " रान्नभभ्राः **सुन्दरं** " ( हे २।२५७ ), मणिविभूषण ( ना १५५ ), मणिभूषण, रमणीय ( हे ). हें वृत्त [ – । ⏑ – ⏑ ⏑ ⏑ – । ⏑ ⏑ – ⏑ ⏑ – । ⏑ – ] आणि [ । – ⏑ – ⏑ ⏑ ⏑ । – ⏑ ⏑ – ⏑ ⏑ । – ऽ ⏑ – ] अशा दोन प्रकारांनी पद्मावर्तनी होऊं शकतें; यांना अनुक्रमें मणिभूषण आणि रमणीय म्हणावें. ६५ **मङ्गला** ( ना १५९ ), " न्भौ जिगौ मङ्गलमङ्गना घैः " ( हे २।२७१ ). सुन्दर वृत्ताप्रमाणेच हें वृत्तहि [ ⏑ ⏑ । ⏑ – ⏑ ⏑ ⏑ – । ⏑ ⏑ – ⏑ ⏑ – । ⏑ – ] आणि [ । ⏑ ⏑ ⏑ – ⏑ ⏑ ⏑ । – ⏑ ⏑ – ⏑ ⏑ । – ऽ ⏑ – ] अशा दोन प्रकारांनी पद्मावर्तनी होऊं शकतें.

६६ नभिराः " **प्रगुणीकृता.** " हें समवृत्त आढळांत नाही; पण मकरावली नामक अर्धसमवृत्तांतील समचरण या लगावलीचे असतात. प्रगुणीकृता हें नाव हेमचन्द्राच्या मकरावलीच्या अुदाहरणांतील दुसऱ्या चरणावरून घेतलें आहे. ६७ न्भौ सौं ल्गौ **कुसुमाङ्घ्रिप** ( ना १४८ ).

## ६ शालिनी–वर्ग

वातोर्मि–वैश्वदेवी–अनङ्गलेखा

| | | |
|---|---|---|
| ६८ | **शालिनी** | [ – – – – ! – ⏑ – – ⏑ – – ] |
| ६९ | **वातोर्मि** | [ – – – – ! ⏑ ⏑ – – ⏑ – – ] |
| ७० | **वैश्वदेवी** | [ – – – – – ! – ⏑ – – ⏑ – – ] |
| ७१ | **कोडुम्भो** | [ – – – – – ! ⏑ ⏑ ⏑ – – ⏑ – – ] |
| ७२ | **चन्द्रिणी** | [ ⏑ – – – – – ! – ⏑ – – ⏑ – – ] |
| ७३ | **"राज"–लक्ष्मी** | [ – – – – ⏑ – – ! – ⏑ – – ⏑ – – ] |
| ७४ | **चित्रा** | [ – – – – । – – – – ! – ⏑ – – ⏑ – – ] |

७५ **पद्म** [ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ! – – – – ! – ⏑ – – – ⏑ – – ]
७६ **चन्द्रमाला** [ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ! – – – – ! – ⏑ – – – ⏑ – – ]
७७ **अनङ्गलेखा** [ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ! – – – – – – ! – ⏑ – – – ⏑ – – ]

टीपा

६८ **शालिनी** (पि ६/१९), "मात्तौ गौ चेत् शालिनी वेदलोकैः" (अुवबृ १०३/३०). ६९ **वातोर्मि** (पि ६/२०), अूर्मिमाला (वबृ १०३/४५) "वातोर्मीयं कथिता म्भौ तगौ गः" (के ३/३५). ७० **वैश्वदेवी** (पि ६/४१), चन्द्रलेखा (भ १६/४२), चन्द्रकान्ता (हे). "मौ यौ पञ्चाश्वैर्वैश्वदेवीति नाम्ना" (अुवबृ १०३/४४).

७१ "म्तौ स्तौ गः **कोडुम्भो** ङैः" (हे २/२१७). ७२ "य्मौ रौ गः **चन्द्रिणी** चैः" (हे २/२०५), चञ्चरीकावली (गछ २/१०४, ममच १७). ७३ "**राज**"**लक्ष्मी**; "म्रौ तौ गौ लक्ष्मीः" (हे २/२२६). ७४ "मियौ **चित्रा** जैः" (हे २/२५०), मण्डूकी, चञ्चला (हे). ७५ "नः स्मौ तौ गौ **पद्मं** चघैः" (हे २/२९५). ७६ "नौ मौ यौ **चन्द्रमाला** छघैः" (२/३०८). ७७ "न्सौ मौ यौ **अनङ्गलेखा** चङैः" (हे २/३१३).

७ मन्दाक्रान्ता-वर्ग

कुसुमितलता–स्रग्धरा–मालिनी

७८ **चन्द्रलेखा** [ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ! – ⏑ – – – ⏑ – – ]
७९ **मन्दाक्रान्ता** [ – – – – ! ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ! – ⏑ – – – ⏑ – – ]
८० **कुसुमितलता** [ – – – – – ! ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ! – ⏑ – – – ⏑ – – ]
८१ **विस्मिता** [ ⏑ – – – – – – ! ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ! – ⏑ – – – ⏑ – – ]
८२ **चित्रमाला** [ – – – – ⏑ – – ! ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ! – ⏑ – – – ⏑ – – ]
८३ **नन्दीमुखी** [ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ! – ⏑ – – – ⏑ – – ]
८४ **चित्रलेखा** [ – – – – ! ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ! – ⏑ – – – ⏑ – – ]
८५ **पुष्पदाम** [ – – – – – ! ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ! – ⏑ – – – ⏑ – – ]
८६ **शोभा** [ ⏑ – – – – – – ! ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ! – ⏑ – – – ⏑ – – ]
८७ **मुग्धक** [ ⏑ – – – – – – ! ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ! ⏑ – – – ⏑ – – ]

८८ स्रग्धरा [ – – – – ᴗ – – ! ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ! – ᴗ – – ᴗ – – ]
८९ महास्रग्धरा [ ᴗ ᴗ – – – ᴗ – – ! ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ! – ᴗ – – ᴗ – – ]
९० मालिनी [ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ – – ! – ᴗ – – ᴗ – – ]
९१ मालाचित्र [ शालिनी ! ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ – । – ᴗ – – ᴗ – – ]
९२ सिंहविस्फूर्जित [ – – – – – – ! – – ᴗ ᴗ – – ! – ᴗ – – ᴗ – – ]
९३ चूतकुञ्ज [ ᴗ ᴗ – – – – – – ᴗ – ᴗ ᴗ ᴗ – ! – ᴗ ᴗ । – ᴗ – – ᴗ – – ]

टीपा

७८ **चन्द्रलेखा** ( हे २/२०८ ), " नसरयुगगैश्चन्द्रलेखर्तुलोकैः " ( गछ २/१०५ ). ७९ **मन्दाक्रान्ता** ( पि ७/१९ ), श्रीधरा ( भ १६/८० ); " मन्दाक्रान्ता मभनततगा गः समुद्रर्तुलोकैः " ( अुवबृ १०३/९ ). ८० **कुसुमितलता** ( ममच १८ ), कुसुमितलतावेल्लिता ( पि ७/२० ), चित्रलेखा ( भ १६/८६ ), " घछैश्चित्रलेखा " ( हे २/३०४ ), चन्द्रलेखा ( वित्रृ ५/३९), कन्दर्पजात ( ना १६९ ); " स्याद्भूतर्त्वश्वैःकुसुमितलतावेल्लिता म्तौ नयौ यौ " ( के ३/१०० ).

८१ " **विस्मिता** य्मौ न्सौ रौ ग् रसर्तुस्वराः " ( पि ८/१८ ), सुवृत्ता ( वबृ १०३/७ ), चन्द्रकान्ता ( वित्रृ ५/४१ ), रम्भा ( स्वछ १०२ ), मेघविस्फूर्जिता ( हे २/३२४ ). ८२ **चित्रमाला** ( स्वछ ११० ), सुप्रभा ( वित्रृ ५/४२ ), सुवंशा ( गछ २/२१० ), " म्मौ भ्नौ तौ गौ चित्रमाला छचैः " ( हे २/३४० ). ८३ **नन्दीमुखी** ( स्वछ ११ ), वसन्त ( हे २/२२५, ना १५१ ), " स्वरभिदि यदि नौ तौच नान्दीमुखी गौ " ( गछ २/११७ ). ८४ **चित्रलेखा** (स्वछ ७३), चन्द्रलेखा (हे २/३०५); "मन्दाक्रान्ता नपरलघुयुता कीर्तिता चित्रलेखा" (गछः २/१७९). ८५ **पुष्पदाम** (स्वछ ९८, हे २/३२८); " मो गौ नौ तौ गौ शरहयतुरगैः फुल्लदाम प्रसिद्धम् " ( गछ २/२०० ).

८६ **शोभा** ( स्वछ १०८ ), " य्मौ नौ तौ गौ शोभा चछैः " ( ह २/३३९ ). ८७ " य्मौ नौ रौ गो **मुग्धकं** चछैः " ( हे २/३३० ). ८८ **स्रग्धरा** ( पि ७/२४ ), " म्रौ भ्नौ याश्च त्रयः स्युः स्वरमुनितुरगैः स्रग्धरा स्याद्विरामैः " ( अुवबृ १०३/५ ). ८९ **महास्रग्धरा**, " स्तौ त्नौ स्रौ गौं महास्रग्धरा जछैः "

( हे २/३५५ ); परन्तु " सजता नसौ ररौ गः फणितुरगहयैः स्यान्महास्रग्धरा‍ख्या " ( गछ २।२१६ ) असेंहि लक्षण ( चुकीनें ) साङ्गितलेलें आहे. ९० **मालिनी** ( पि ७/१४ ), नान्दीमुखी ( भ १६/७० ). " वसुमुनिविरतिश्चेन्मालिनी नौ मयौ यः " ( अुवबृ १०३/२४ ).

९१ " मतिनायि **मालाचित्रं** टैः " ( हे २/३८२ ). ९२ " तद्भूतर्त्वश्वैर्मौम्भौ विरतिश्चेत् सिंहविस्फूर्जितं यौ " ( गछ २/१९१ ). ९३ स्मौ सौं भ्रौ गौं **चूतकुञ्ज** ( ना १८६ )

## ८ क्षमा–वर्ग

### कुटिलगति–शरभललिता–शिखरिणी–पुट

९४ **क्षमा** [ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ! – – – ⏑ – – ]
९५ **तत** [ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ! – – – ⏑ – ]
९६ **नदी** [ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ! – ⏑ ⏑ – ⏑ – – ]
९७ **चन्द्रकान्ता** [ – ⏑ – – ⏑ – – ! – – ⏑ ⏑ – ⏑ – – ]
९८ **चन्द्रिका** [ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ! ⏑ – ⏑ – – – ]
९९ **वाहिनी** [ – – ⏑ ⏑ – – – ! – – ⏑ – – ]
१०० **भोगिनी** [ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – | ⏑ – ⏑ – – ⏑ – – ]
१०१ **कुटिलगति** [ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ! – ⏑ – – ⏑ – ]
१०२ **शरभललिता** [ – – – – ! ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – | – ⏑ – – ]
१०३ **प्रवरललिता** [ ⏑ – – – – – ! ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ! – ⏑ – – ]
१०४ **शिखरिणी** [ ⏑ – – – – – ! ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – – ⏑ ⏑ ⏑ – ]
१०५ **"चन्द्रकान्ति"** [ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ! – ⏑ – – ]
१०६ **पुट** [ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – – ! – ⏑ – – ]
१०७ **"कनक–"गौरी** [ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – – ! ⏑ ⏑ ⏑ – – ]
१०८ **गौरी** [ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ | ⏑ ⏑ ⏑ – – ]
१०९ **क्षमा** [ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – – ! ⏑ – ⏑ – – ]
११० **शिखण्डिनी** [ ⏑ – – – – – ]

टीपा

९४ "नौ म्रौ गः **क्ष्मा** छैः" (हे २।२०४). ९५ "**ततं** नौ म्रौ" (पि ६।३४, हे २।१६६), ललित (गच्छ २।८७) या वृत्ताची मोडणी [।ᵕ ᵕ ᵕ ᵕ ᵕ ᵕ।– – –।– ᵕ –] अशी घेतल्यास वृत्त भृङ्गावर्तनी होईल.

९६ **नदी**, "ननतजगुरुगैः सप्तयतिर्नदी स्यात्" (गच्छ २।११९). ९७ "**चन्द्रकान्ता** भिधा रौ म्सौ यो विरमः स्वराष्टौ" (गच्छ २।१४२). ९८ "नौ यौं ग **श्चन्द्रिका**" (हे २।२०६). ९९ "**वाहिनी** त्यौ म्यौ ऋषिकामशराः" (पि ६।४२); येथे यति सहाव्या अक्षरानन्तर घेणें स्वाभाविक वाटतें; पण अुदाहरणांच्या अभावीं निश्चित काही साङ्गतां येत नाही. १०० "नौ रो यौ **भोगिनी**" (हे २।२५९).

१०१ "**कुटिलगति** नौं तौ ग् स्वरर्तवः" (पि ८।८, हे २।२०३), नर्तकी (हे), क्षमा (के ३/६९), चन्द्रिका (के ३/७५). १०२ **शरभललिता** हें भरताच्या अुदाहरणांतील नाव आहे; तो (भ १६/६८) शरभा म्हणतो. हेमचन्द्र हा शरभललिताचें लक्षण 'म्भन्ता गौ' असें न साङ्गतां 'न्भन्ता गौ' असें साङ्गतो (हे २/२४०); आणि 'घचैः' असे यति घेतल्यास त्याला तो शरभा म्हणतो (हे २।२४१)! पण हें चुकीचें लक्षण असावें, कारण शरभललिताचें प्राचीन अुदाहरण उपलब्ध आहे. **१०३ प्रवरललिता** (भ १६/७४), जयानन्द (हे २/२७४), विजयानन्द (ना १६२). "यमौ नः स्रौ गश्च प्रवरललितं नामवृत्तं" (गच्छ २/१५४). **१०४ शिखरिणी** (पि ७/२०); "यमौ न्सौ भो ल्वन्ता रसहरविरामा शिखरिणी" (अुवबृ १०३/८). १०५ "**चन्द्रकान्ति,**" "ननगगलगगैश्चन्द्रिका स्यात्" (पि ९८ टीप).

१०६ **पुट** (पि ६/३२), श्रीपुट (?) (वबृ १०३/४३), स्फुट (ममच १७), "वसुजलधिविरामौ नौ पुटो म्यौ" (अुवबृ १०३/४३). १०७ "**कनक**" **गौरी**, "नौ त्सौ गो गौरी" (हे २/२१४). १०८ "**गौरी** नौ न्सौ ग्" (पि ७/४). या वृत्ताची मोडणी [ᵕ।ᵕ ᵕ ᵕ ᵕ ᵕ।ᵕ ᵕ ᵕ ᵕ ᵕ।– –] अशी हरावर्तनीहि होअू शकेल. १०९ "नौ त्रौ गः **क्षमा**" (हे २/२०१). अुदाहरण पहातां यति 'घैः' नसून 'जैः' असावा. ११० "यमौ **शिखण्डिनी**"

(हे २/४६), हें वृत्त शिखरिणीत्यादि अनेक वृत्तांच्या आरम्भीं गणरूपें असतें.

## ९ अपराजिता—वर्ग

भाराक्रान्ता—भुजङ्गविजृम्भित—पिपीलिका

| | |
|---|---|
| १११ लय | [ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ! ᴗ – ᴗ ᴗ – ᴗ – ] |
| ११२ भाराक्रान्ता | [ – – – – ! ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ! ᴗ – ᴗ ᴗ – ᴗ – ] |
| ११३ कान्ता | [ ᴗ – – – ! ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ! ᴗ – ᴗ ᴗ – ᴗ – ] |
| ११४ कुरङ्गिका | [ – – – – – ! ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ! ᴗ – ᴗ ᴗ – ᴗ – ] |
| ११५ मकरन्दिका | [ ᴗ – – – – – ! ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ! ᴗ – ᴗ ᴗ – ᴗ – ] |
| ११६ अपराजिता | [ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ! ᴗ – ᴗ ᴗ – ᴗ – ] |
| ११७ चल | [ – – – – ! ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ! ᴗ – ᴗ ᴗ – ᴗ – ] |
| ११८ कथागति | [ – – ᴗ – ᴗ – – ! ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ! ᴗ – ᴗ ᴗ – ᴗ – ] |
| ११९ अुपमालिनी | [ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ – – ! ᴗ – ᴗ ᴗ – ᴗ – ] |
| १२० मणिमञ्जरी | [ ᴗ – – – ! ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ – – ! ᴗ – ᴗ ᴗ – ᴗ – ] |
| १२१ भुजङ्गविजृम्भित | [ ८ ग ! ८ ल ᴗ ᴗ – ! ᴗ – ᴗ ᴗ – ᴗ – ] |
| १२२ प्रमोदमहोदय | [ ४ ग ! – ᴗ ᴗ – – – – ! ८ ल ᴗ ᴗ – ! ᴗ – ᴗ ᴗ – ᴗ – ] |
| १२३ पिपीलिका | [ ८ ग ! १४ ल ग ! ᴗ – ᴗ ᴗ – ᴗ – ] |
| १२४ पिपीलिका-करभ | [ ८ ग ! १९ ल ग ! ᴗ – ᴗ ᴗ – ᴗ – ] |
| १२५ पिपीलिका-पणव | [ ८ ग ! २४ ल ग ! ᴗ – ᴗ ᴗ – ᴗ – ] |
| १२६ पिपीलिका-माला | [ ८ ग ! २९ ल ग ! ᴗ – ᴗ ᴗ – ᴗ – ] |

### टीपा

१११ "न्सौ जौ गो लयः" (हे २/२०९). ११२ **भाराक्रान्ता** (स्वछ ७१, हे २/२९२), "भाराक्रान्ता मभनरसला गुरु श्रुतिषड्हयैः" (गछ २/१७१). ११३ **कान्ता,** "भवेत्कान्ता युगरसहयैर्यभौ नरसा लगौ" (गछ २/१७३). ११४ **कुरङ्गिका** (स्वछ ८१), "म्तन्जभ्राः कुरङ्गिका ङ्छैः" (हे २/३१२). भाराक्रान्ता-मकरन्दिका यांच्याशी तुलना करून पहातां आणि स्वयम्भूच्छन्दांतील ब्रह्मअत्ताचा श्लोक पहातां कुरङ्गिकावृत्ताचे

यति ‘ञ्चैः’ असेच पाहिजेत. ११५ **मकरन्दिका** ( स्वछ १०६, हे २/३२५); “रसैः षड्भिर्लोकैर्यमनसजजा गुरुर्मकरन्दिका” ( गछ २/२०३ ).

११६ **अपराजिता** ( पि ७/६ ); “ननरसलघुगैः स्वरैरपराजिता” ( गछ २/११३ ). ११७ **चल** ( हे २/३०६ ), अचल ( स्वछ ८७ ); “म्भौ न्जौ भ्रौ चेत् चलमिदमुदितं युगैर्मुनिभिः स्वरैः” ( गछ २/१८८ ). ११८ “त्रौ भ्नौ ज्भौ रः **कथागतिः** छछैः” ( हे २/३४७ ). ११९ **उपमालिनी** ( स्वछ २९, हे २/२४९ ); “ननतभरकृताऽष्टः स्वरैरुपमालिनी” ( गछ २/१४३). १२० **मणिमञ्जरी**, “अिनाश्वैः स्याद् यभनयजजगाः कीर्तिता मणिमञ्जरी” ( गछ २/२०४ ).

१२१ **भुजङ्गविजृम्भित** ( पि ७/३० ); “मौ त्नौ नौ रः सल्गाः प्राहुर्वसुमदनदहनमुनिभिर्भुजङ्गविजृम्भितम्” (अुवबृ १३०/ ४७). १२२ “म्तौ य्तौ निर्सल्गाः **प्रमोदमहोदयो** घछटैः” ( हे २/३८३ ). **१२३** “मातनीजभ्राः **पिपीलिका** जणैः” ( हे २/३८७ ). १२४–१२५–१२६ पिपीलिका वृत्तांत आठव्या अक्षरानन्तर पाच, दहा आणि पन्धरा लघू अधिक घातल्याने अनुक्रमें **पिपीलिका–करभ, पिपीलिका–पणव** आणि **पिपीलिका–माला** हीं वृत्तें सिद्ध होतात ( हे २/३८८–३९० ).

## १० हरिणी–वर्ग

### जननीमुद–हरिणीपद

१२७ **सिंह** [⏑ ⏑ ⏑ — — — — ! ⏑ — ⏑ ⏑ — ⏑ —]
१२८ **श्रेयोमाला** [— — — — , — — ! ⏑ — ⏑ ⏑ — ⏑ —]
१२९ **जया** [— — — — ⏑ — — ! ⏑ — ⏑ ⏑ — ⏑ —]
१३० **दर्दुरक** [— ⏑ ⏑ — ⏑ ⏑ — | ⏑ — ⏑ ⏑ — ⏑ —]
१३१ **कलभाषिणी** [⏑ ⏑ ⏑ ⏑ — ⏑ ⏑ — | ⏑ — ⏑ ⏑ — ⏑ —]
१३२ **वनमञ्जरी** [⏑ ⏑ ⏑ ⏑ — ⏑ ⏑ — | ⏑ ⏑ — ⏑ ⏑ — | ⏑ — ⏑ ⏑ — ⏑ —]
१३३ **हरि** [⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ! — — — — ! ⏑ — ⏑ ⏑ — ⏑ —]
१३४ **हरिणी** [⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ — ! — — — — ! ⏑ — ⏑ ⏑ — ⏑ —]
१३५ **‘जननीमुद’** [⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ — ! — — ⏑ ⏑ — ! ⏑ — ⏑ ⏑ — ⏑ —]

१३६ हरिणीपद [ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ! – – – – – ! ⏑ – ⏑ ⏑ – ⏑ – ]
१३७ "अभिनव"ललिता [ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ! – – – – ! ⏑ – ⏑ ⏑ – ⏑ – ]

टीपा

१२७ " नम्रसल्गाः **सिंहः** छैः" ( हे २/२२९ ). १२८ " मौ जौ गः **श्रेयोमाला** घैः" ( हे २/२०२ ); यति 'चैः' असावा हें बरें. १२९ **जया** ( स्वछ २५ ); " मो रौ सो ल्गौ जया छैः" ( हे २/२२७ ). १३० " भौ रसल्गा **दर्दुरकः**" ( हे २/२३७ ), सुन्दर ( ना १५० ). प्लुताचा अवलम्ब केल्यास या वृत्ताची मोडणी [ । – ⏑ ⏑ – ⏑ ⏑ । – ऽ ⏑ – ⏑ ⏑ । – ऽ ⏑ – ] अशी पद्मावर्तनी होऊं शकेल.

१३१ " नो जौ भ्रौ **कलभाषिणी**" ( हे २/२५६ ), अरविन्द ( हे ), नवनलिन ( ना १५७ ). प्लुताचा अवलम्ब केल्यास कलभाषिणी वृत्ताचीहि मोडणी [ । ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ⏑ ⏑ । – ऽ ⏑ – ⏑ ⏑ । – ऽ ⏑ – ] अशी पद्मावर्तनी होऊं शकते. १३२ " नजीभ्रा **वनमञ्जरी**" ( हे २/३५२ ). या वृत्ताची मोडणी [ । ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ⏑ ⏑ । – ⏑ ⏑ – ⏑ ⏑ । – ऽ ⏑ – ⏑ ⏑ । – ऽ ⏑ – ] अशी पद्मावर्तनी करणें बरें. १३३ " रसयुगहययुङ् नौ म्रौ सो लगौ हि यदा **हरिः**" ( गछ २/१७२ ). १३४ **हरिणी** ( पि ७/१६ ), वृषभचरित ( वबृ १०३/१० ), वृषभचेष्टित ( भ १६/७८ ); परन्तु अुदाहरणांत वृषभललित आहे, हरिणीप्लुत ( ना १६७ ); " रसयुगहयै न्सौ म्रौ स्लौ गो यदा हरिणी तदा" ( के ३/९६ ). १३५ न्सौ त्जौ भ्रौ '**जननीमुद**' चङैः

१३६ **हरिणीपद** ( स्वछ ८५ ); " न्सौ म्तौ भ्रौ हरिणीपदं चघैः" ( हे २/३१९ ); यति 'चङैः' असणें बरें १३७ " **अभिनव**"**ललिता**; " नौ म्तौ भ्रौ ललितं छघैः" ( २/३०९ ).

## ११ हारिणी–वर्ग

केसर–रोहिणी–शार्दूलविक्रीडित

१३८ विद्युत् [ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ! – – ⏑ – – – ⏑ – ]
१३९ हारिणी [ – – – – ! ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ! – – ⏑ – – – ⏑ – ]

१४० कोमलता [----!-ᴗᴗᴗ-!--ᴗ--ᴗ-]
१४१ छाया [ᴗ-----!ᴗᴗᴗᴗᴗ-!--ᴗ---ᴗ-]
१४२ करिमकरभुजा [ᴗᴗᴗᴗᴗᴗ-!--ᴗ--ᴗ-]
१४३ केसर [----!ᴗᴗᴗᴗᴗᴗᴗ-!--ᴗ--ᴗ-]
१४४ वञ्चित [-----!ᴗᴗᴗᴗᴗᴗ-!--ᴗ--ᴗ-]
१४५ चन्द्रोद्योत [ᴗᴗᴗᴗᴗᴗ--!--ᴗ--ᴗ-]
१४६ रोहिणी [ᴗᴗᴗᴗᴗ-!----!--ᴗ---ᴗ-]
१४७ ज्योत्स्ना [----ᴗ--!--ᴗ--ᴗ-]
१४८ चन्द्रसेना [----ᴗ--!--ᴗ--ᴗ--]
१४९ "सोम"लेखा [-ᴗ--ᴗ--!--ᴗ--ᴗ--]
१५० काञ्ची [-----ᴗ--|ᴗᴗᴗ-!--ᴗ--ᴗ-]
१५१ शार्दूलविक्रीडित [---ᴗᴗ-ᴗ-ᴗᴗᴗ-!--ᴗ--ᴗ-]
१५२ शार्दूल [---ᴗᴗ-ᴗ-ᴗᴗᴗ-!-ᴗ----]
१५३ मत्तेभविक्रीडित [ᴗᴗ--ᴗ-ᴗ-ᴗᴗᴗᴗ-!--ᴗ--ᴗ-]
१५४ सद्रत्नमाला [---ᴗᴗ!ᴗᴗᴗ-ᴗᴗᴗ-!--ᴗ--ᴗ-]
१५५ विभ्रमगति [शार्दूलविक्रीडित।ᴗᴗ-ᴗ-]
१५६ घट [ᴗᴗᴗᴗᴗᴗ-!--ᴗ--]

टीपा

**१३८ विद्युत्**; "ऋतुमुनियतिर्विद्युन्नसौ तौ गुरुः" (के परिशिष्ट); "न्सौ तौ गो विद्युन्मालिका" (हे २।२१०); परन्तु उदाहरणावरून विद्युन्मालिका वृत्ताची मोडणी [।ᴗᴗᴗᴗᴗ।-ऽ-।-ᴗ-।-ᴗ-] अशी हरावर्तनी वाटते. **१३९ हारिणी** (स्वछ ६०, हे २।२९३); "वेदर्त्वश्वैर्मभनमयला गश्चेत् तदा हारिणी" (गछ २।१७०). **१४०** "म्तौ स्तौ त्गौ **कोमललता** घङैः" (हे २।२८६).

**१४१ छाया** (स्वछ १०४, हे २/३२६); "अियं छाया ख्याता ऋतुरसहयै र्यो मो नसौ तौ गुरुः". के परिशिष्टांत "र्यो मनसा म्तौ गुरुः" असा पाठभेद दिला आहे तो चुकीचा वाटतो. **१४२ करिमकरभुजा** (स्वछ १७); "नौ म्यौ ल्गौ करिमकरभुजा छैः" (हे २/२२४). **१४३ केसर** (स्वछ ८९,

हे २/३०७ ); "अर्थाश्वाश्वैर्मभनयरयुगैर्वृत्तं मतं कसेरं" ( गछ २/१८७ ). १४४ **वञ्चित** ( हे २/३२९ ), विचित ( हे ), चन्द्रबिम्ब ( स्वछ १०० ), बिम्ब ( गछ २/२०२ ); "म्तौ न्सौ तौ गो वञ्चितं ङ्छैः" ( हे २/३२९ ). १४५ **चन्द्रोद्योत**( स्वछ ३१ ); "नौ मो रौ चन्द्रोद्योतः जैः" ( हे २/२४८ ).

१४६ **रोहिणी** ( स्वछ ६७ ); "नस्मम्यल्गा रोहिणी चघैः" ( हे २/२९६ ). १४७ **ज्योत्स्ना** ( स्वछ २३ ); "म्रम्यल्गा ज्योत्स्ना छैः" ( हे २/२२८ ). १४८ **चन्द्रसेना** ( ममच ), चन्द्रलेखा ( हे २/२५१ ); "म्रौ मयौ यश्चन्द्रसेना घौटकैर्वसुभिर्भिदा" ( ममच १८ ). १४९ "**सोम**" **लेखा**; "राद्रम्ययाश्चन्द्रलेखाः छैः" ( हे २/२५२ ). १५० "म्रभ्या रौ **काञ्ची** टैः" ( हे-२/३०१ ), वाचालकाञ्ची ( हे ).

१५१ **शार्दूलविक्रीडित** ( पि ७/२१ ); "म्सौ ज्सौ तौ गुरुकं च सूर्यतुरगैः शार्दूलविक्रीडितम्" ( अवबृ १०३/४ ). १५२ "**शार्दूलं** वद मासषट्कयति मः सो जसौ रो मश्चेत्" ( गछ २/१८६ ). १५३ **मत्तेभविक्रीडित** ( हे २/३३७ ); "सभरा न्मौ यलगास्त्रयोदशयतिर्मत्तेभविक्रीडितम्" ( गछ २/२११ ). १५४ "म्नौ स्नौ म्यौ ल्गौ **सद्रत्नमाला** ङ्जैः" ( हे २/३४१ ). १५५ "म्सौ ज्सौ तौ भ्रौ **विभ्रमगतिः**" ( हे २/३७२ ). १५६ **घट** ( ना १३६ ). या वृत्तांत लगक्रम पुटाचाच आहे; पण यति सातव्या अक्षरानन्तर आहे. केदारभट्ट पुटवृत्तांतच हे यती साङ्गतो. "मुनिशरविरतिर्नौ म्यौ पुटोऽयम्" ( के ३/५० ).

## १२ मदनललिता—वर्ग

सुवदना—शार्दूलललित—पृथ्वी—सुरतललिता

१५७ **मदनललिता** [ – – – – ! ◡ ◡ ◡ ◡ ◡ – ! – – ◡ ◡ ◡ – ]
१५८ **क्रीडा** [ ◡ – – – – – – ! ◡ ◡ ◡ ◡ ◡ – ! – – ◡ ◡ ◡ – ]
१५९ **सुमधुरा** [ – – – – ◡ – – ! ◡ ◡ ◡ ◡ ◡ – ! – – ◡ ◡ ◡ – ]
१६० **सुवदना** [ – – – – ◡ – – ! ◡ ◡ ◡ ◡ ◡ ◡ – ! – – ◡ ◡ ◡ – ]
१६१ **सुरसा** [ – – – – ◡ – – ! ◡ ◡ ◡ ◡ ◡ ◡ – ! – ◡ ◡ ◡ – ]
१६२ **शार्दूलललित** [ – – – ◡ ◡ – ◡ – ◡ ◡ ◡ – ! – – ◡ ◡ ◡ – ]
१६३ **वायुवेगा** [ – – – ◡ ◡ – ◡ – ◡ ◡ ◡ – ! ◡ ◡ ◡ ◡ – ◡ – ]

१६४ **पृथ्वी** [ ᴗ – ᴗ ᴗ ᴗ – ᴗ – ! ᴗ ᴗ ᴗ – ᴗ – – ᴗ – ]
१६५ **वृन्दारक** [ पृथ्वी ! – ᴗ – – ᴗ – ]
१६६ **शशाङ्कचरित** [ – – । पृथ्वी ]
१६७ **मालाधर** [ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ᴗ – ! ᴗ ᴗ ᴗ – ᴗ – – ᴗ – ]
१६८ **मञ्जरी** [ ᴗ ᴗ – ᴗ – ! ᴗ ᴗ ᴗ – ᴗ – – ᴗ – ]
१६९ **विपिनातिलक** [ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ! ᴗ ᴗ ᴗ – ᴗ – – ᴗ – ]
१७० **कुसुमिता** [ ᴗ ᴗ ᴗ – ᴗ – – ᴗ – ]
१७१ **समुद्रतता** [ ᴗ – ᴗ ᴗ ᴗ – ᴗ – ! ᴗ ᴗ ᴗ – ! – – ᴗ – ᴗ ᴗ – ]
१७२ **गजेन्द्रलता** [ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ᴗ – – ! ᴗ ᴗ – ᴗ – ᴗ ᴗ – ]
१७३ **सुरतललिता** [ – – – ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ – | – – ᴗ – ᴗ – – ]
१७४ **माधवीलता**[ – – – – ᴗ – – ! ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ᴗ ᴗ | – ᴗ – ᴗ – ]
१७५ **लालित्य** [ – – – ᴗ ᴗ – – ᴗ – ᴗ ᴗ – – – ᴗ ᴗ – ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ]

## टीपा

१५७ **मदनललिता** ( स्वछ ५०, हे २/२७६ ), " म्भौ नो म्नौ गो मदनललिता वेदैः षड्ऋतुभिः " (गछ २/१५२). १५८ "य्मौ न्सौ त्सौ **क्रीडा** चचैः" ( हे २/३१८), सुधा (गछ २/१८३). १५९ "म्रौ भ्नौ म्नौ ग् **सुमधुरा** छचैः" हें वृत्त रूढ दिसतें; पण याला प्राचीन आधार गावत नाही. १६० **सुवदना** ( पि ७/२२ ), वृत्त ( विवृ ५/४३ ); " म्रौ भ्नौ य्भौ ल्गौ मुनिव्योमगरसविरतिः ख्याता सुवदना " ( अुवबृ १०३/६ ).

१६१ **सुरसा**; " म्रौ भ्नौ यो नो गुरुश्चेत् स्वरमुनिकरणैराहसुरसाम् " ( गछ २/१९९ ). १६२ **शार्दूलललित** ( स्वछ ७९, हे २/३११ ); " मः सो जः सतसा दिनेशऋतुभिः शार्दूलललितम् " ( गछ २/१८० ). १६३ " म्सौ ज्सौ न्जौ गो **वायुवेगा** छैः" ( हे २/३२३ ). शार्दूलललिताप्रमाणे यति 'ठैः' पाहिजे हें हेमचन्द्राच्याच अुदाहरणावरून दिसतें. या वृत्ताची मोडणी [ । – – – ᴗ ᴗ ! – ᴗ – ᴗ ᴗ ᴗ ! – ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ! ᴗ – ] अशी घेतल्यास हें वृत्त पद्मावर्तनी होतें. १६४ **पृथ्वी** ( पि ७/१७ ), विलम्बितगति ( भ १६/८४, वबृ १०३/१६ ). " जसौ जसयला वसुग्रहयतिश्च पृथ्वी गुरुः"

(के ३।९४). या वृत्ताची मोडणी [ ᴗ – ᴗ ᴗ ᴗ – ! ᴗ – ᴗ ᴗ ᴗ – ! ᴗ – – ᴗ –] अशी असेल तेव्हा त्या पञ्चावर्तनी वृत्ताला विलम्बितगति म्हणावें. १६५ "ज्सौ ज्सौ यिल्गा **वृन्दारकं**" (हे २/३६५).

१६६ **शशाङ्कचरित** (वित्र ५/४४); "त्भौ ज्भौ ज्भौ ल्गौ शशाङ्करचितं" (हे २/३४५). १६७ न्सौ ज्सौ य्लौ ग् **मालाधर** (प्रापै २/१७८); या वृत्ताची मोडणी [ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ऽ ! ᴗ – ᴗ ᴗ ᴗ – । ᴗ – – ᴗ –] अशी पञ्चावर्तनीहि घेतां येते. १६८ "सजसा यलौ गिति शरग्रहैर् **मञ्जरी**" (गछ २/१२५); पथ्या सजसयल्गैः स्यात् ककुब्भिः श्रुतिभिर्यति" (ममच १८). १६९ "**विपिनतिलकं** नसनरेफयुग्मैर्भवेत्" (गछ २/१३६). हें वृत्त [। ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ । – ᴗ ᴗ ᴗ । – ᴗ – । – ᴗ –] असें हरावर्तनी घेणें अधिक चाङ्गलें दिसतें. १७० "**कुसुमिता** नरौ रो यदा" (पि ९२ टीप), बृहतिका (हे २/८८) या वृत्ताची मोडणी [। ᴗ ᴗ ᴗ – ᴗ – । – ऽ ᴗ –] आणि [ᴗ ᴗ । ᴗ – ᴗ – – । ᴗ –] अशी दोन प्रकारांनी पञ्चावर्तनी होऊं शकते.

१७१ "गजाब्धितुरगैर्जसौ जसतभा गश्चेत् **समुद्रतता**" (गछ २/२०५). १७२ "भवति नयुगलं रभौ सौ दशभिर्**गजेन्द्रलता**" (गछ २/१९०). १७३ "म्नस्तर्गाः **सुरतललिता**" (हे २/२८१). 'गचैः' असे यति घेतले तर हें वृत्त [। – – – ऽ ऽ ! ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ऽ ! – – ᴗ – ᴗ । – –] असें पञ्चावर्तनी होऊं शकतें. १७४ "म्रौ भः सौ ज्गौ **माधवीलता** छैः" (हे २/३२३). हेंहि वृत्त प्लुताचा अवलम्ब करून [। – – – – । ᴗ – ऽ – ऽ ऽ ! ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ᴗ ᴗ । – ᴗ – ᴗ –] असें पञ्चावर्तनी होऊं शकेल. १७५ "**लालित्यं** भुजगेन्द्रेण भाषितमेतच्चेन्मसरस्तजनगुभिः" (गछ २/२१५). हेंहि वृत्त [– । – – ᴗ ᴗ – । – ऽ ᴗ – ᴗ ᴗ । – – – ᴗ ᴗ । – ᴗ ᴗ ᴗ ᴗ –] असें पञ्चावर्तनी होऊं शकतें.

---

## परिच्छेद २ रा

# पद्मावर्तनी वृत्तें

जीं वृत्तें म्हणतां म्हणतां सहज अष्टमात्रक आवर्तनांत बसतात त्यांचा समावेश या परिच्छेदांत केला आहे. काही वृत्तें अष्टमात्रक आणि षण्मात्रक अशा दोन्ही आवर्तनांत बसूं शकतात; पण सर्वसामान्य प्रवृत्ति अष्टमात्रक आवर्तनांत म्हणण्याकडे विशेष असल्याने अशा वृत्तांचा समावेश पद्मावर्तनी वृत्तांतच केला आहे. जेथे यतिस्थानावरून वा अुदाहरणांतील मोडणीवरून षण्मात्रक आवर्तनाची स्पष्टपणें जाणीव होते तेथे त्या वृत्ताची गणना भृङ्गावर्तनी वृत्तांत केली आहे. अुदाहरणार्थ, [– – ᵕ ᵕ । – – ᵕ ᵕ । – – ᵕ ᵕ । – –] या भृङ्गावर्तनी वृत्ताची मोडणी [। – – ᵕ ᵕ – । – ᵕ ᵕ – – । ᵕ ᵕ – –] अशी पद्मावर्तनीहि होअील; वा [। – ᵕ ᵕ ᵕ । – ᵕ ᵕ ᵕ । – ᵕ ᵕ ᵕ । ᵕ –] या हरावर्तनी वृत्ताची मोडणी [– ᵕ ᵕ ᵕ – ᵕ । ᵕ ᵕ – ᵕ ᵕ ᵕ ᵕ । –] अशी पद्मावर्तनी होअूं शकेल. पण जेथे चरणांत अेका विशिष्ट गणाची आवृत्ति आढळते तेथे जेणें करून ती आवृत्ति भङ्गेल अशी मोडणी घेणें अुचित नाही. आवर्तन ठरवितांना क्वचित् प्लुताचा अुपयोग ग्राह्य मानिला आहे; परन्तु मारून मुटकून वृत्त आवर्तनी करण्याचा प्रयत्न केलेला नाही. जेथे पहिली अुभी रेघ आहे तेथून आवर्तनारम्भ समजावा.

### १३ भ्रमरी—वर्ग

१७६ **भ्रमरी** [। ᵕ ᵕ – –]

१७७ **सुमुखी** [। – ᵕ ᵕ –]

१७८ **कमलमुखी** [। ᵕ ᵕ ᵕ ᵕ –]

१७९ **नलिनी** [ᵕ ᵕ । – ᵕ ᵕ –]

१८० **मधुभार** [ᵕ ᵕ । – ᵕ – ᵕ]

१८१ **सुमालतिका** [ᵕ । – ᵕ ᵕ – ᵕ]

टीपा :

१७६ सगौ **भ्रमरी** ( भ ३२/५९, हे ), सुमति ( हे २/१६ ), मृगनेत्रा ( ना ). १७७ " भगौ **सुमुखी** " ( हे २/११ ), ललिता अिति भरतः ( हे ). १७८ न्लौ ग् **कमलमुखी** ( भ ३२/६७, हे ), आभिमुखी ( हे २/२७ ), मृगचपला ( हे ), सरसिरुहा ( ना ). १७९ सौ **नलिनी** (भ ३२/९६, हे), रमणी ( हे २/३० ), तिलका (प्रापै २/४३), कुंमुद (ना ७९), वसुधा ( निस ३१ ). १८० **मधुभार,** "सगणं निधाय जगणं विधाय। कविसौख्यधाम कलगीतनाम ॥ मधुभारनामेदमन्यत् " ॥ रूस्तमा टीका ( पृ. १८७ ), पण कलगीत हें नांव ( ममच १३ ) निराळ्याच अेक वृत्ताचें आहे. १८१ जौ **सुमालतिका** ( वाभू २/५३ ), मालती ( प्रापै २/५४ ).

## १४ कन्यावर्ग

| | |
|---|---|
| १८२ **कन्या** | [।– – – –] |
| १८३ **घनपङ्क्ति** | [।ᴗ ᴗ – – –] |
| १८४ **कुन्तलतन्वी** | [।– ᴗ ᴗ – –] |
| १८५ **नन्दा** | [।– – ᴗ ᴗ –] |
| १८६ **मकरकशीर्षा** | [।ᴗ ᴗ ᴗ ᴗ – –] |
| १८७ **'सम्मदजनक'** | [।– ᴗ ᴗ ᴗ ᴗ –] |
| १८८ **'सौरीतटचर'** | [।– – ᴗ ᴗ ᴗ ᴗ] |
| १८९ **गुरुमध्या** | [।ᴗ ᴗ – – ᴗ ᴗ] |
| १९० **'सौरभसज्जित'** | [।– ᴗ ᴗ – ᴗ ᴗ] |
| १९१ **द्रुतगति** | [।ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ –] |
| १९२ **'करुणापरिमल'** | [।ᴗ ᴗ – ᴗ ᴗ ᴗ ᴗ] |
| १९३ **सुवासक** | [।ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ᴗ ᴗ] |
| १९४ **अचल** | [।ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ] |
| १९५ **सती** | [।ᴗ – ᴗ – –] |
| १९६ **अपरभा** | [।ᴗ – ᴗ ᴗ ᴗ –] |

१९७ **'प्रपन्ननन्दन'** [ | ⏑ – ⏑ – ⏑ ⏑ ]
१९८ **"दुर्"–जया** [ | ⏑ – – – ⏑ – ]
१९९ **वागुरा** [ | – ⏑ – ⏑ – ]
२०० **गिरा** [ | ⏑ ⏑ ⏑ – ⏑ – ]
२०१ **कच्छपी** [ | – ⏑ – ⏑ ⏑ ⏑ ]
२०२ **रति** [ | – ऽ ⏑ ⏑ ⏑ – ]
२०३ **'पन्नगदलन'** [ | – ऽ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ]

टीपा

१८२ " मगौ **कन्या** " ( हे २/१० ), तीर्णा ( प्रापै २/२७ ). १८३ **घनपङ्क्ति** ( भ ३२/७३ ), सन्मृगनेत्रा ( ना ); " सो गौ घनपङ्क्तिः " ( हे २/२६ ). १८४ " **कुन्तलतन्वी** अिति भरतः " ( हे ); भूतलतन्वी ( भ ३२/६५ ), अक्षरपङ्क्ति ( वित्र ५/५१, श्रुबो ७ ), " भो गौ पङ्क्तिः " ( हे २/२० ), हंस ( प्रापै २/३७ ), काञ्चनमाला ( ना ). १८५ " त्लगा **नन्दा** " ( हे २/२३ ), तिलका ( ना ), " मन्दा तलगैः " ( केनिआ ३१ ).

१८६ न्यौ **मकरकशीर्षा** ( भ १६/४, ३२/८० ); शशिवदना ( श्रुबो ८, हे २/३४ ), मुकुलित ( हे ), चतुरंसा ( प्रापै २/४७ ), अुदात्त ( ना ). १८७ भसौ '**सम्मदजनकः**'; सौरभि ( रपि ९३ ). याची मोडणी [ | – ⏑ ⏑ ⏑ ⏑ | – ] अशी भृङ्गावर्तनीहि होअू शकेल. १८८ त्नौ '**सौरीतटचर.**' १८९ " स्भौ **गुरुमध्या** " ( हे २/३२ ). १९० भौ '**सौरभसञ्जित.**'

१९१ ननौ ग् **द्रुतगति** ( भ ३२/१०१, हे ), हरिविलसित ( वित्र ५/८, हे २/५९ ), मधुमती ( गछ २/१३ ), चपला ( भ ३२/१०१, हे ), सुलभ ( ना ८९ ), सुमना ( निस ३९ ). या वृत्ताची मोडणी [ | ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ | – ] अशी भृङ्गावर्तनीहि होअू शकेल; तेव्हा त्या वृत्ताला हरिविलसित म्हणावें. १९२ स्नौ ल् '**करुणापरिमल.**' १९३ न्जौ ल् **सुवासक** ( प्रापै २/६० ). १९४ **अचल,** ' वसुलमचलमिति ' ( पि ९० टीप ). १९५ " जो गौ **सती** " ( हे २/२२ ), शिखा ( भ ३२/७१, हे ), अनङ्ग ( ना ).

१९६ जसौ **अपरभा** ( रपि ९२ ). १९७ जभौ '**प्रपन्ननन्दन.**' १९८ "**दुर्जया**"; "यलगा जया" ( हे २/२४, कद ४/८ ). १९९ रलौ ग् **वागुरा** ( भ ३२/६९, हे ), नन्दक ( ना ). या वृत्ताची मोडणी [ | – ⏑ – ⏑ | – ] अशी भृङ्गावर्तनी घेतल्यास त्या वृत्ताला विदग्धक ( हे २/१९ ) म्हणावें. २०० नगौ **गिरा** ( भ ३२/८६, हे ). मोडणी [ | ⏑ ⏑ ⏑ – ⏑ | – ] अशी भृङ्गावर्तनी घेतल्यास त्या वृत्ताला शफरिका ( हे २/३८ ) म्हणावें.

२०१ "नौं **कच्छपी**" ( हे २/३९ ). २०२ "भ्लगा **रतिः**" ( हे २/२१ ), प्रेम ( ना ). मोडणी प्रमाणे या लगावलीची [ – ⏑ ⏑ ⏑ – ] आणि [ – ⏑ ⏑ ⏑ | – ] अशीं दोन वृत्तें होऊं शकतात; पहिलें अग्न्यावर्तनी आणि दुसरें हरावर्तनी. २०३ भ्नौ '**पन्नगदलन**'.

### १५ विद्युद्भ्रान्ता—वर्ग

तनुमध्या—कुमारललिता—राजरमणीय

| | |
|---|---|
| २०४ **विद्युद्भ्रान्ता** | [ | – – – – | – ] |
| २०५ **सूचीमुखी** | [ | ⏑ ⏑ – – – | – ] |
| २०६ **विक्रान्ता** | [ | – ⏑ ⏑ – – | – ] |
| २०७ **तनुमध्या** | [ | – – ⏑ ⏑ – | – ] |
| २०८ **मुकुल** | [ | – – – ⏑ ⏑ | – ] |
| २०९ **भोगवती** | [ | – ⏑ ⏑ – ⏑ ⏑ | – ] |
| २१० **कुमुदवती** | [ | ⏑ ⏑ ⏑ ⏑ – – | – ] |
| २११ **विधुवक्त्रा** | [ | – ⏑ ⏑ ⏑ ⏑ – | – ] |
| २१२ **मधुकरिका** | [ | – – ⏑ ⏑ ⏑ ⏑ | – ] |
| २१३ **"अमर"—नदी** | [ | – ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ | – ] |
| २१४ **विमलजला** | [ | ⏑ ⏑ – ⏑ ⏑ ⏑ ⏑ | – ] |
| २१५ **ललितगति** | [ | ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ⏑ ⏑ | – ] |
| २१६ **रतिमाला** | [ | ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – | – ] |
| २१७ **लघुमणिगुणनिकर** | [ | ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ | – ] |

२१८ **कुमारललिता** [ । ⏑ – ⏑ ⏑ ⏑ – । – ]
२१९ **शालिनीवितान** [ । – ⏑ – ⏑ – । – ]
२२० **प्रकाशिता** [ । ⏑ ⏑ ⏑ – ⏑ – । –
२२१ **निर्मला** [ । ⏑ ⏑ – ⏑ – ⏑ । – ]
२२२ **मणिमाला** [ तनुमध्याद्विरावृत्ता ]
२२३ **राजरमणीय** [ कुमारललिताद्विरावृत्ता ]

टीपा

२०४ मो गौ **विद्युद्भ्रान्ता** ( भ ३२/६३ ), पङ्क्ति ( पि ८६ टीप ), सम्मोहा ( प्रापै २/३३ ). हें वृत्त [ । – – – । – – ] असें भृङ्गावर्तनी असेल तेव्हा त्यास सम्मोहा म्हणावें. २०५ " स्मौ **सूचीमुखी** " ( हे २/४५ ).

२०६ " भ्मौ **विक्रान्ता** " ( हे २/४४ ). २०७ **तनुमध्या** त्यौ ( पि ६/२ ). तनुमध्यावृत्ताची मोडणी [ । – – ⏑ ⏑ । – – ] अशी भृङ्गावर्तनीहि होऊं शकते. २०८ "म्सौ **मुकुलं**" ( हे २/३७ ), वीथीति भरतः ( हे ); पण वीर्य ( भ ३२/८४ ), पङ्क्ति ( भ ३२/९४ ), कमल ( ना ८० ). २०९ भौ ग् **भोगवती** ( भ ३२/१०९, हे ), कलिका ( हे २/५५ ), सोपान ( हे ), कमल ( ना ८३ ). २१० "न्यौ गः **कुमुदवती**" ( हे २/६४ ); पण अुदाहरणांत कुमुदिनी ग्रथित आहे; कुसुमवती ( भ ३२/११५ ).

२११ " भ्सौ गो **विधुवक्त्रा** " ( हे २/५६ ). २१२ " त्नगा **मधुकरिका**" ( हे २/६१, भ ३२/१११ ), वज्र ( हे ). २१३ " **अमर**"**नदी**; भ्नौ ल्गौ नदी ( भ ३२/१३९ ). हें वृत्त जेव्हा [ । – ⏑ ⏑ ⏑ । ⏑ ⏑ ⏑ – ] असें हरावर्तनी होतें तेव्हा त्याला " सुर "नदी म्हणावें. २१४ स्नौ ल्गौ **विमलजला** ( भ ३२/१२८ ). २१५ " न्जा ल्गौ **ललितगतिः**" ( हे २/७६, भ ३२/१३० ), ललिता ( भ ३२/१३१ ), नलिनी ( भ ३२/१३७ ).

२१६ " ना गौ **रतिमाला** " ( हे २/८२ ), तुङ्ग ( प्रापै २/७२ ). [ । ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ । – – ] अशा भृङ्गावर्तनी मोडणीच्या वृत्ताला तुङ्ग म्हणावें. २१७ "ना सो **लघुमणिगुणनिकरः** " ( हे २/१०४ ), कमला ( प्रापै २/८२ ). [ । ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ । ⏑ ⏑ ⏑ – ] अशी हरावर्तनी मोडणी असेल

तेव्हा वृत्ताला कमलजा म्हणावें. २१८ **कुमारललिता** ज्सौ ग् ( पि ६/३ ). [ ᴗ – ! ᴗ ᴗ ᴗ – । – ] अशा मोडणीचें जें वृत्त यतिभेदाने होतें त्याला 'वदन पद्म' म्हणावें. २१९ यौं **शालिनीवितान** (ना), पिकाली (रपि ७३) या वृत्ताची मोडणी [ । – ᴗ – ᴗ । – ऽ – ] अशी भृङ्गावर्तनीहि होऊं शकेल. २२० न्तौ ग् **प्रकाशिता** (भ ३२/११९), शशाङ्कवक्त्रा (ना ८७), मनोज्ञा ( हे २/६६ ). [ । ᴗ ᴗ ᴗ – ᴗ । – ऽ – ] अशा भृङ्गावर्तनी मोडणीच्या वृत्ताला मनोज्ञा म्हणावे.

२२१ "**निर्मला,**" मागे ४० पहा. २२२ **मणिमाला** ( हे २/१९१ ) हें तनुमध्याच्या द्विरावृत्तीने सिद्ध होतें. "त्या त्यौ मणिमाला छिन्ना गुहवक्त्रैः" ( गछ २१७९ ). याच लगक्रमाच्या पण निराळ्या मोडणीच्या [ । – – ᴗ ᴗ – । – – – ᴗ ᴗ । – – ] या वृत्ताला पुष्पविचित्रा ( हे २/१९० ) म्हणतात. २२३ "ज्सौ नौं गौ **राजरमणीयं** छैः" ( हे २/२३० ). "प्रफुल्लकुसुमाली सतीयमतिमोदा । जसौ रगणनौ चेत्ततो गुरुकयुग्मम्" रूस्तमा टीका ( पृ. १८९ ).

## १६ लघुमालिनी–वर्ग

ज्या गुरूपुढे ऽ अशी खूण आहे तो गुरु प्लुत म्हणजे त्रिमात्रक समजावा.

| | |
|---|---|
| २२४ **सावित्री** | [ । – – – ऽ ᴗ । – ] |
| २२५ **लघुमालिनी** | [ । – ᴗ ᴗ – ऽ ᴗ । – ] |
| २२६ **प्रीति** | [ । – ऽ ᴗ – – । – ] |
| २२७ **कामलतिका** | [ । – ऽ ᴗ ᴗ ᴗ – । – ] |
| २२८ "**सौम्यमति**" | [ ᴗ ᴗ । – ᴗ ᴗ – ᴗ ᴗ । – ] |
| २२९ **शलभविचलिता** | [ ᴗ ᴗ । ᴗ ᴗ ᴗ – ᴗ – । – ] |
| २३० **अक्षि** | [ ᴗ ᴗ । – ᴗ – ᴗ ᴗ ᴗ । – ] |
| २३१ **वृन्ता** | [ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ! ᴗ ᴗ ᴗ ᴗ – – । – ] |
| २३२ **विभा** | [ – – । ᴗ – ᴗ – – । – ] |
| २३३ "**सुवर्ण–**"**रुचिरा** | [ – – । ᴗ – ᴗ ᴗ ᴗ ᴗ – । – ] |
| २३४ "**शशि**"–**माला** | [ ᴗ ᴗ – । ᴗ – ᴗ ᴗ ᴗ ᴗ – । – ] |

२३५ **मणिराग** [– ᴗ – । ᴗ ᴗ – ᴗ ᴗ – । –]
२३६ **लङ्का** [ᴗ ᴗ ᴗ – । ᴗ ᴗ – ᴗ ᴗ – । –]
२३७ **बन्धूक** [– ᴗ ᴗ ᴗ । ᴗ ᴗ – – – । –]
२३८ **लालिनी** [– ᴗ – । ᴗ ᴗ – ᴗ – ᴗ । –]
२३९ **पद्मिनी** [प्रीतिद्विरावृत्ता]

टीप.

२२४ "म्लगाः **सावित्री**" (हे २/२५). २२५ "भ्रौ **लघुमालिनी**" (हे २/४०), मालिनी (भ ३२/७८). सावित्री आणि लघुमालिनी या वृत्तांत प्लुताचा सहज होणारा अवलम्ब न केल्यास तीं अनुक्रमें [। – – – ᴗ । –] आणि [। – ᴗ ᴗ – ᴗ । –] अशीं अन्यावर्तनी होतात.

२२६ "रो गौ **प्रीतिः**" (हे २/१८) या वृत्ताची मोडणी [। – ᴗ – – । –] अशी अग्न्यावर्तनी वा [। – ᴗ – । – ऽ –] अशी हरावर्तनीहि होऊं शकते. २२७ "भ्यौ **कामलतिका**" (हे २/३६), शशिकान्त (ना). कामलतिका-वृत्ताची मोडणी प्रीतिवृत्ताप्रमाणेच [। – ᴗ ᴗ ᴗ – । –] अशी अग्न्यावर्तनी वा [। – ᴗ ᴗ ᴗ । – ऽ –] अशी हरावर्तनीहि होऊं शकते. २२८ "**सौम्यमतिः**" "सिः सौम्या" (हे २/९९). २२९ न्सौ यू **शलभविचलिता** (भ ३२/२०६), गुर्वी (विवृ ५/१६), विशाला (हे २/१०१), बिम्ब (प्रापै २/८४), मयूर (ना १०५). या वृत्ताची मोडणी [ᴗ ᴗ । ᴗ ᴗ ᴗ – ᴗ । – –] अशी भृङ्गा-वर्तनी असेल तेव्हा त्याला गुर्वी म्हणावें; आणि [। ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ । – ᴗ – । –] अशी हरावर्तनी असेल तेव्हां त्याला विशाला म्हणावें. २३० "स्जसा **अक्षि**" (हे २/९६) या वृत्ताचीहि मोडणी [ᴗ ᴗ । – ᴗ – ᴗ । ᴗ ᴗ –] अशी भृङ्गा-वर्तनी वा [। ᴗ ᴗ – ᴗ । – ᴗ ᴗ ᴗ । –] अशी हरावर्तनी असूं शकते.

२३१ "नौ सो गौ **वृन्ता** घैः" (हे २/१३९, पि ६/४). आवर्तनारम्भ चरणारम्भीं घेतल्याने [। ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ । – – –] असें जें वृत्त होतें त्याला पुढे "सद्"–वृत्ता म्हटलें आहे. २३२ "तौ गौ **विभा**" (हे २/६८). २३३ "**सुवर्ण**"–**रुचिरा**; "तभ्या रुचिरा" (हे २/१००). याची मोडणी

[।––⏑।–⏑⏑⏑।––] अशी हरावर्तनीहि होईल. २३४ "शशि-माला, "रजसगा माला" (हे २/१२६), मागे ५५ प्रमिता पहा. २३५ मणिराग, मागे ५१ पहा. "रश्च सौ सगुरुर्मणिरागः" (केनिआ ३८).

२३६ लङ्का, मागे ५२ टीप पहा. २३७ "भ्नौ मौ बन्धूकं" (हे २/११७). २३८ "लालिनी स्याद् रसजगाः" (ममच २०). २३९ पद्मिनी हें नाव विद्याधर वा. भिडे यांनी भिजी ३८ व्या कवितेवर दिलें आहे; आधार दिलेला नाही.

## १७ तटी–वर्ग

### नाराच–विदुषी–उज्ज्वला

| | |
|---|---|
| २४० तटी | [।––––।⏑–] |
| २४१ कोमला | [।⏑⏑–––।⏑–] |
| २४२ मही | [।⏑⏑–⏑⏑–।⏑–] |
| २४३ अपच्युत | [।⏑⏑⏑⏑⏑⏑–।⏑–] |
| २४४ निलया | [।⏑⏑⏑⏑⏑⏑⏑⏑।⏑–] |
| २४५ सुमालती | [।⏑⏑⏑–⏑–।⏑–] |
| २४६ अुत्सुक | [–।⏑⏑–⏑⏑–।⏑–] |
| २४७ "संस्तुति" | [–।⏑–⏑––।⏑–] |
| २४८ कुसुमिता | [⏑⏑।⏑–⏑––।⏑–] |
| २४९ भद्रिका | [–।⏑–⏑⏑⏑–।⏑–] |
| २५० नाराच | [–।–⏑–⏑–।⏑–] |
| २५१ भुजङ्गसङ्गता | [⏑⏑।–⏑–⏑–।⏑–] |
| २५२ पणव | [––।–⏑⏑⏑⏑–।⏑–] |
| २५३ हंसी | [––।––⏑⏑⏑⏑।⏑–] |
| २५४ अुपस्थिता | [––!⏑⏑–⏑⏑–।⏑–] |
| २५५ विदुषी | [⏑⏑–।⏑⏑–⏑⏑–।⏑–] |
| २५६ अुज्ज्वला | [⏑⏑⏑⏑।⏑⏑–⏑⏑–।⏑–] |

२५७ **अच्युत** [–⏑–।⏑⏑–⏑⏑–।⏑–]
२५८ **द्रुतविलम्बित** [⏑⏑⏑–।⏑⏑–⏑⏑–।⏑–]
२५९ **पङ्क्तिका** [–⏑–।⏑––⏑–।⏑–]

टीपा

२४० " म्रौ **तटी** " ( हे २/२९ ). २४१ स्तौ ग् **कोमला** ( ना ९१ ). २४२ " सौ ल्गौ **मही** " ( हे २/८१ ). २४३ " नौ र **अुपच्युतं** " ( हे २/९५ ), विनुत ( ना १०२ ). याची मोडणी [।⏑⏑⏑⏑⏑⏑।–⏑–] अशी भृङ्गावर्तनी असेल तेव्हा विनुत म्हणावें. २४४ " निगौ **निलया** " (हे २/११४); याचीहि मोडणी [।⏑⏑⏑⏑⏑⏑।⏑⏑⏑–] अशी भृङ्गावर्तनी होअू शकते. २४५ " न्रा ल्गौ **सुमालती** " ( हे २/७२ ); याचीहि मोडणी [।⏑⏑⏑–⏑।–⏑–] अशी भृङ्गावर्तनी होअू शकते.

२४६ " भौ र **अुत्सुकं** " (हे २/९३); अुत्सुकवृत्ताची मोडणी [।–⏑⏑–⏑⏑।–ऽ⏑–] अशीहि पद्मावर्तनी होते. २४७ " **संस्तुति** " " यौं ल्गौ अनुष्टुभ् " ( हे २/६९ ); या वृत्ताचीहि मोडणी [।–⏑–⏑–। –ऽ⏑–] अशी पद्मावर्तनी होअू शकते. २४८ **कुसुमिता**, मागे १७० टीप पहा. २४९ " **भद्रिका** भवति रो नरौ " ( गछ २/२८ ), श्रीविलासिनी (ना ९९). भद्रिकावृत्ताचीहि [।–⏑–⏑⏑⏑।–ऽ⏑–] अशी पद्मावर्तनीच पण निराळी मोडणी होअू शकते. २५० " त्रौ ल्गौ **नाराचं** " (हे २/७४), नाराचिका ( गछ २/२३ ). या वृत्ताचा समावेश पिङ्गल वितानांत करितो.

२५१ " सजरै **भुजङ्गसङ्गता** " ( गछ २/२६ ). २५२ **पणव** " म्नौ ज्गौ चेति पणवनामकं " ( के ३/२२). हें लक्षण नारायणभट्टसम्मत आहे. परन्तु निर्णयसागरी शीलस्कन्धमहास्थविरसंशोधित आवृत्तींत ( पृ. ३७ ) " म्नौ य्गौ चेति पणवनामेदम् " असा पाठ आहे. २५३ हंसी ( श्रुबो १७ ), " ज्ञेया हंसी मभनगयुता " ( गछ २/४० ). " हंसी मभनगाः प्रोक्ता यतिर्वेदैर्गुहाननैः " ( ममच १३ ). २५४ **उपस्थिता** ( पि ६/१४, हे २/११९ ), " तो जौ गुरुणेयमुपस्थिता " ( गछ २/३८). २५५ " सिल्गा **विदुषी** " ( हे २/१३१), अुपचित्र (गछ २/५८).

२५६ **अुज्ज्वला** (हे २/१६७), चपलनेत्रा (हे), " ननभरसहिता गदितोज्ज्वला " (गछ २/८४). पणव, अुपस्थिता, विदुषी, अुज्ज्वला या चार वृत्तांत आद्यतालकपूर्व गण द्विमात्रक घेतला तर अन्त्य गण (।–ऽ ⏑ –) असा राहतो. पणव, हंसी, अुपस्थिता, विदुषी आणि अुज्ज्वला या वृत्तांत आवर्तनारम्भ चरणारम्भींहि धरितां येअील. २५७ **अच्युत**, मागे ५९ पहा. **२५८ द्रुतविलम्बित**, मागे ६१ पहा. २५९ **पङ्क्तिका**, " यंजगाः पङ्क्तिका " (हे २/१०८); रो यजौच पथ्या गुरूत्तरा " (पि ९४ टीप). या लगावलीची मोडणी (१) [– ⏑ –। ⏑ – – ⏑ –। ⏑ –], (२) [–। ⏑ – ⏑ – –। ⏑ – ⏑ –], (३) [।– ⏑ – ⏑ –।– ⏑ – ⏑ –], (४) [– ⏑ – ⏑।–ऽ– ⏑।– ⏑ –], (५) [।– ⏑ – ⏑।–ऽऽऽऽ। – ⏑ – ⏑।–ऽऽऽऽ] अशी पाच प्रकारची असूं शकते. पहिले तीन प्रकार पद्मावर्तनी आणि पुढील दोन भृङ्गावर्तनी आहेत. ४ थ्या प्रकारास सुपथ्या आणि ५ व्या प्रकारास मरालिका म्हणावें; " मरालिका रयजगाः शिवातनशरैर्यतिः " (ममच १४). या वृत्ताची जाति होते तेव्हा तिला कामदा म्हणावें.

## १८ विद्युल्लेखा—वर्ग

| | |
|---|---|
| २६० **विद्युल्लेखा** | [।– – – –।– –] |
| २६१ **मदलेखा** | [।– – – ⏑ ⏑।– –] |
| २३२ **'मणिचित्र'** | [। ⏑ ⏑ – – ⏑ ⏑ ⏑।– –] |
| २६३ **चित्रपदा** | [।– ⏑ ⏑ – ⏑ ⏑ ⏑।– –] |
| २६४ **शशिलेखा** | [। ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ⏑ ⏑ ⏑।– –] |
| २६५ **भुजगशिशुसृता** | [। ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ –।– –] |
| २६६ **नीलतोया** | [।–ऽ ⏑ – –।– –] |
| २६७ **अुद्धता** | [।–ऽ ⏑ – ⏑ ⏑।– –] |
| २६८ **सरल** | [।– – – –। ⏑ ⏑ –] |
| २६९ **"शार्ङ्गी"** | [। ⏑ ⏑ ⏑ ⏑ – –। ⏑ ⏑ –] |
| २७० **"गुण"–रुचिरा** | [।– ⏑ ⏑ – ⏑ ⏑। ⏑ ⏑ –] |
| २७१ **अमृतगति** | [। ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ⏑ ⏑। ⏑ ⏑ –] |

२७२ "**मदनदमन**" [।ᴗᴗᴗᴗᴗᴗᴗᴗ।ᴗᴗ–]
२७३ '**तृष्णा**' [।––ᴗᴗ–।–ᴗᴗ]
२७४ '**सख्खल**' [।–ᴗᴗᴗᴗᴗᴗ।–ᴗᴗ]
२७५ **अलोला** [मदलेखा द्विरावृत्ता]

२६० "**विद्युल्लेखा** मो मः" (के ३/९), सावित्री (हे २/२८), शेषा (प्रापै २/४१), मातङ्गी (निस ३३). तिसऱ्या अक्षरानन्तर यति कोणीहि साङ्गितला नाही; तो पाळला तर वृत्त [।–––!–––] असें भृङ्गावर्तनी होईल. त्या वृत्ताला मातङ्गी म्हणावें.

२६१ **मदलेखा** (श्रुबो ९, वित्र ५/७, हे २/५१, कद ४/११,), "म्सौ गः स्यान् मदलेखा" (के ३/११). २६२ '**मणिचित्र**;' या वृत्ताला अतिमोहा (रपि २८४) असें नाव आढळतें, पण आधार नाही. [।ᴗᴗ––!ᴗᴗ––] अशा भृङ्गावर्तनी मोडणीच्या वृत्ताला अतिमोहा म्हणावें. २६३ **चित्रपदा** (पि ६/५, हे २/७१), "भौ गिति चित्रपदा गः" (के ३/१२). कविदर्पणांत चौथ्या अक्षरानन्तर यति साङ्गितल्यामुळें मोडणी [।–ᴗᴗ–!ᴗᴗ––] अशी भृङ्गावर्तनी होते; पण हेमचन्द्राचें अुदाहरण पहातां वृत्त पद्मावर्तनीच वाटतें. २६४ **शशिलेखा** (भ ३२/२०४), "नज्या शशिलेखा" (हे २/१०३). २६५ **भुजगशिशुसृता** (पि ६/७), "भुजगशिशुभृता नौ मः" (के ३/२०), मधुकरिका (भ १६/१८, हे). असा आम्नाय आहे म्हणून हलायुध सातव्या अक्षरानन्तर यति साङ्गतो.

२६६ **मौ नीलतोया** (भ ३२/९८), मालिनी (भ १६/६, हे २/३५). या वृत्ताची मोडणी [।–ᴗ––।–ऽ–] अशी धरल्यास तें अभ्यावर्तनी होतें. २६७ "सौ ग **अुद्धता**" (हे २/५२). या वृत्ताची मोडणी [।–ᴗ–ᴗ। ᴗ––] अशी भृङ्गावर्तनी घेतल्यास प्लुताचा अुपयोग करावा लागत नाही. २६८ "म्भौ गः **सरलं**" (हे २/५७), चित्र (ना ८६). २६९ न्यौ सू "**शार्ङ्गी**", सरगिक्का (प्रापै २/७८), सारसा, शार्ङ्गिका (पि ९२ टीप). २७० भौ सो "**गुण–**"**रुचिरा**; रुचिरा (भ ३२/१४२), प्रियतिलका (रपि ४००).

२७१ न्जौ न्गौ **अमृतगति** ( प्रापै २/९८ ); चरणमध्यावर यति असला म्हणजे जें [। ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ! ⏑ ⏑ ⏑ ⏑ –] भृङ्गावर्तनी वृत्त होतें त्याला कुलटा ( ममच १६ ) आणि त्वरितगति ( वित्र ५/१७, हे २/११२ ) अशीं दोन नावें आहेत. २७२ नौ न्लौ ग् **"मदनदमन;"** दमनक ( प्रापै २/१०८) याची मोडणी [। ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ । ⏑ ⏑ ⏑ ⏑ –] अशी भृङ्गावर्तनीहि होऊं शकते. २७३ **'तृष्णा'**, सम्फुल्लक त्यौ लौ; सम्फुल्लक ह नाव स्तवमालेचा भाष्यकार जीवदेव हा देतो. पिङ्गल या वृत्ताचा समावेश वितानांतच करितो. या वृत्ताची मोडणी [। – – ⏑ ⏑ ! – – ⏑ ⏑] अशी भृङ्गावर्तनी घेणें बरें वाटतें; तेव्हा त्याला सम्फुल्लक म्हणावें. २७४. भ्नौ ज्लौ **'सञ्चल'**. २७५ म्सौ म्भौ **अलोला** छैः ( हे २/२२२ ) हें मदलेखाच्या द्विरावृत्तीने होतें.

## १९ तार–वर्ग

| | |
|---|---|
| २७६ **तार** | [ ⏑ ⏑ । – ⏑ ⏑ – – । – – ] |
| २७७ **सम्बुद्धि** | [ ⏑ ⏑ । – – – ⏑ ⏑ । – – ] |
| २७८ **मेघवितान** | [ ⏑ ⏑ । – ⏑ ⏑ – ⏑ ⏑ । – – ] |
| २७९ **"विधु"माला** | [ ⏑ ⏑ । – ⏑ – ⏑ ⏑ ⏑ । – – ] |
| २८० **'रामा'** | [ – – । ⏑ – ⏑ – – । – – ] |
| २८१ **"नवशालिनी"** | [ – ⏑ ⏑ । – ⏑ – ⏑ ⏑ ⏑ । – – ] |
| २८२ **नवमालिनी** | [ ⏑ ⏑ ⏑ ⏑ । – ⏑ – ⏑ ⏑ ⏑ । – – ] |
| २८३ **कलिका** | [ – ⏑ – । – – – ⏑ ⏑ । – – ] |
| २८४ **अुत्थापनी** | [ – – । ⏑ – ⏑ ⏑ ⏑ – । ⏑ ⏑ – ] |
| २८५ **प्रमिताक्षरा** | [ ⏑ ⏑ – । ⏑ – ⏑ ⏑ ⏑ – । ⏑ ⏑ – ] |
| २८६ **अभ्युदिता** | [ ⏑ ⏑ ⏑ – ! ⏑ ⏑ – ⏑ ⏑ – । ⏑ ⏑ – ] |

२७६ "सौ मः **तारं**" ( हे २/९८ ); या वृत्ताची मोडणी [। ⏑ ⏑ – ⏑ ⏑ – । – – – ] अशीहि होअूं शकेल. २७७ स्ता य् **सम्बुद्धि** ( रपि ३७० ); 'अुत्तमवंशा' नामक अर्धसमवृत्तांत समचरण सम्बुद्धीचे असतात. २७८ **मेघवितान** ( वब्र १०३/४६ ); "त्रिसगा अपि मेघवितानम्" ( केनिआ पृ. ३८ );

पण अुत्पल "त्रिसगैरपि विद्धि वितानम्" अेवढेंच म्हणतो. २७९ "**विधु**"–**माला**; "स्जस्गा माला" ( हे २/१२६ ), मागे ५५ प्रमिता पहा. २८० त्तौ म् '**रामा**'.

२८१ भर्नगगा "**नवशालिनी**"; हें वृत्त आढळांत नाही; परन्तु केतुमती या अर्धसमवृत्तांतील समचरण या लगावलीचे असतात; ही मोडणी नवमालिनी सारखी आहे म्हणून "नवशालिनी" हें नाव दिलें आहे. २८२ **नवमालिनी** ( पि ६/४३ ), "न्जौ भ्यौ नवमालिनी जैः" ( हे २/१८० ), नवमालिका ( गछ २/८५ ), "वनमालिनीति सोक्ता नजभययुक्तार्वसायकैश्छिन्ना" ( ममच १७ ). "नवशालिनी" आणि नवमालिनी या दोन्ही वृत्तांची मोडणी पहिल्या गणांत सहा सशब्द मात्रा घेअून अनुक्रमें [।– ᴗ ᴗ – ऽऽ। ᴗ – ᴗ ᴗ ᴗ – ।– ] आणि [। ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ऽऽ। ᴗ – ᴗ ᴗ ᴗ – ।– ] अशी करितां येअील. २८३ "म्स्गाः **कलिका**" ( हे २/१२० ); या वृत्तांत छन्दोभङ्ग होतो; पण [।– ऽ ᴗ – –।– – ᴗ ᴗ –।– ] अशी मोडणी घेतल्यास तो टळतो. २८४–२८५ **अुत्थापनी**–**प्रमिताक्षरा** मागे ५६, ५४ वरील टीपा पहा. २८६ न्भौ भा ग् **अभ्युदिता** ( ना १४० ). या वृत्तांतहि छन्दोभङ्ग होतो.

## २० गान्धर्वी-वर्ग

| | |
|---|---|
| २८७ **गान्धर्वी** | [।– – – –।– – – ] |
| २८८ **मेरुरूपा** | [।– – – ᴗ ᴗ।– – – ] |
| २८९ **तार** | [। ᴗ ᴗ – ᴗ ᴗ –।– – – ] |
| २९० **कलह** | [। ᴗ ᴗ – – ᴗ ᴗ।– – – ] |
| २९१ **कनकलता** | [।– – ᴗ ᴗ ᴗ ᴗ।– – – ] |
| २९२ **विपुलभुजा** | [। ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ᴗ ᴗ।– – – ] |
| २९३ "**सद्**"-**वृत्ता** | [। ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ।– – – ] |
| २९४ "**अभिरामा**" | [।– – ᴗ ᴗ –। ᴗ ᴗ – – ] |
| २९५ **मकरलता** | [।– – – ᴗ ᴗ। ᴗ ᴗ – – ] |
| २९६ **मणिबन्ध** | [।– ᴗ ᴗ – –।– ᴗ ᴗ – ] |
| २९७ **कनक** | [।– – – ᴗ ᴗ।– ᴗ ᴗ – ] |

२९८ **चित्रगति** [| – ∪ ∪ – ∪ ∪ | – ∪ ∪ – ]
२९९ **वनज** [| – S ∪ – ∪ ∪ | – ∪ ∪ – ]
३०० **द्रुतपादगति** [| ∪ ∪ ∪ ∪ – ∪ ∪ | – ∪ ∪ – ]
३०१ **सिंहाक्रान्ता** [| – – – – | ∪ ∪ ∪ ∪ – ]
३०२ **सुरदयिता** [| – ∪ ∪ – – | ∪ ∪ ∪ ∪ – ]
३०३ **विकचकुमुदिनी** [| – – – ∪ ∪ | ∪ ∪ ∪ ∪ – ]
३०४ **कमलदलाक्षी** [| ∪ ∪ ∪ ∪ – – | ∪ ∪ ∪ ∪ – ]
३०५ **मुखचपला** [| – – ∪ ∪ ∪ ∪ | ∪ ∪ ∪ ∪ – ]
३०६ **त्वरितगति** [| ∪ ∪ ∪ ∪ ∪ ∪ ∪ ∪ | ∪ ∪ ∪ ∪ – ]
३०७ **"सुलोचना"** [| – – ∪ ∪ – | ∪ – ∪ – ]
३०८ **'चारुलोचना'** [| ∪ ∪ – ∪ ∪ – | ∪ – ∪ – ]
३०९ **प्रसभ** [| ∪ ∪ ∪ ∪ ∪ ∪ – | ∪ – ∪ – ]
३१० **'नृपात्मजा'** [| ∪ – ∪ – – | ∪ – ∪ – ]
३११ **'कटाक्षललिता'** [| ∪ – ∪ ∪ ∪ – | ∪ – ∪ – ]
३१२ **मनोरमा** [| ∪ ∪ ∪ – ∪ – ! ∪ – ∪ – ]
३१३ **'पिच्छ'** [| – ∪ ∪ – ∪ ∪ | – ∪ – ∪ ]
३१४ **अुत्सुक** [| – ∪ ∪ – ∪ ∪ | – S ∪ – ]
३१५ **"संस्तुति"** [| – ∪ – ∪ – | – S ∪ – ]
३१६ **कुसुमिता** [| ∪ ∪ ∪ – ∪ – | – S ∪ – ]
३१७ **भद्रिका** [| – ∪ – ∪ ∪ ∪ | – S ∪ – ]

टीपा

२८७ "मौ गो **गान्धर्वी**" (हे २/४७), शीर्षरूपक (प्रापै २/६४), हेमाक्षी (निस ३८). २८८ "मः सो गुरुयुग्मं **मेरुरूपा**" (पि ९८ टीप). २८९ **तार**, मागे २७६ पहा. २९० स्भौ म् **कलह** (रपि ३६३). भिजी २८० या कवितेवर सरला हें नाव दिलें आहे तें निराधार आणि अग्राह्य आहे.

२९१ तन्माः **कनकलता** (भ ३२/२००), मकरलता (हे २/१०२). २९२ "नज्यगा **विपुलभुजा**" (हे २/१२५, भ ३२/२२१). ५९३

"**सद्**"-**वृत्ता**; "ननसगगुरुरचिता वृत्ता" (गछ २/५४), चित्रा (कद ४/३३), वक्त्रा (ममच १७). मागे २३० वृन्ता पहा. २९४ त्जौ य् "**अभिरामा**", हें वृत्त स्वतन्त्रपणें आढळांत नाही; परन्तु 'सुविनीता' नामक अर्धसमवृत्तांत विषमचरण या लगावलीचे असतात. २९५ **मकरलता**; "मो नो यो मगरलया अे" (कद ४/२१).

२९६ **मणिबन्ध** (श्रुबो १६), "स्यान्मणिमध्यं चेद्भमसः" (गछ २/२५). २९७ "मः सौ **कनकं**" (हे २/९७). २९८ "भिगौ **चित्रगतिः**" (हे २/११३), सारवती (प्रापै २/९४), हारवती (पि ९४ टीप), चित्रपद (ना ११०). नागवर्म्याच्या वृत्ताची मोडणी [–∪∪|–∪∪–∪∪!–] अशी दिसते. २९९ सौं स् **वनज** (ना १०१). ३०० न्जौ ज्लौ ग् **द्रुतपादगति** (भ ३२/२२९), सुमुखी (हे २/१४५), "पृषत्कऋतुभिर्यतिः" (ममच १६).

३०१ "मभ्साः **सिंहाक्रान्ता**" (हे २/१०५, भ ३२/२१०), पवित्रा (प्रापै २/८०), कुसुमवती (पि ९२ टीप). ३०२ भ्तौ न्गौ **सुरदयिता** (भ ३२/२१३), मृगचपला (हे २/१२१). ३०३ म्नौ न्गौ **विकचकुमुदिनी** वा कुसुमसमुदिता (भ ३२/२१५), कुमुदिनी (हे २/१२२). ३०४ "न्यनल्गाः **कमलदलाक्षी**" (हे २/१५०), रुचिरमुखी वा कमललताक्षी (भ ३२/२२५), कमलनिभा (भ ३२/२३१). ३०५ "तो नौ ल्गौ **मुखचपला**" (हे २/१४९).

३०६ "नीगौ **त्वरितगतिः**" (हे २/२२०), लघुगति, चपला (हे). या वृत्ताची मोडणी [|∪∪∪∪∪∪|∪∪∪∪∪∪∪|–] अशी भृङ्गावर्तनी घेतल्यास त्याला लघुगति म्हणावें. ३०७ त्जौ र् "**सुलोचना**", रवोन्मुखी (रपि ३८१). 'श्रुतकीर्ति'नामक अर्धसमवृत्तांत विषमचरण या लगावलीचे आहेत. ३०८ सौ ज्गौ '**चारुलोचना**.' ३०९ "**प्रसभ**मपि ननौ रलौ गुरुः" (अुवबृ १०३/१३), भद्रिका (हे २/१४३, कद ४/३०), अुत्तरान्तिका (हे), चन्द्रिका (ना ११८). "अपरवक्त्रमिति भरतः" (हे): या वृत्ताची मोडणी [|∪∪∪∪∪∪|–∪–∪|–] अशी भृङ्गावर्तनी असेल तेव्हा त्याला "**चित्तचन्द्रिका**" म्हणावें. "कुपुरुषजनिताच्च सङ्गमात् प्रसभमपि करोति

चाशुभम्" (वबृ १०३/१३) या श्लोकार्धाच्या आद्यशब्दावरून तर **कुपुरुष जनिता** हें नाव सुचलें नसेल? "कुपुरुषजनिता ननौ गौं गः" (गछ २।५९) यांत 'ननौ र्लगाः, अशी सुधारणा मात्र हवी. **३१०** ज्तौ र् **नृपात्मजा.'**

**३११** ज्सौ ज्गौ '**कटाक्षललिता.' ३१२ मनोरमा** (हे २/११८), "नरजगैर्भवेन्मनोरमा" (के ३/२६), मनोहरा (निस ५०). 'शास्त्रसागरैः' म्हणून (ममच १६) यति साङ्गितला आहे. जेव्हा या वृत्ताची मोडणी [।ᴗ ᴗ ᴗ – ᴗ । – ᴗ – ᴗ । –] अशी भृङ्गावर्तनी असेल तेव्हा त्या वृत्तास मनोहरा म्हणावें. **३१३** भौ र्लौ '**पिच्छ**'. **३१४–३१७ अुत्सुक, "संस्तुति," कुसुमिता, भद्रिका;** मागे तटी वर्गांत २४६–२४९ पहा.

## २१ पणवक-वर्ग

| | |
|---|---|
| ३१८ **पणवक** | [–।– – ᴗ ᴗ ᴗ ᴗ ! – – –] |
| ३१९ **मोटक** | [–।– ᴗ ᴗ – ᴗ ᴗ ।– ᴗ ᴗ –] |
| ३२० **तोटक** | [ᴗ ᴗ ।– ᴗ ᴗ – ᴗ ᴗ ।– ᴗ ᴗ –] |
| ३२१ **अुत्थापनी** | [–।– ᴗ – ᴗ ᴗ ᴗ ।– ᴗ ᴗ –] |
| ३२२ **प्रमिताक्षरा** | [ᴗ ᴗ ।– ᴗ – ᴗ ᴗ ᴗ ।– ᴗ ᴗ –] |
| ३२३ **"अति"–विमला** | [ᴗ ᴗ ।– – – – ।ᴗ ᴗ ᴗ ᴗ –] |
| ३२४ **पङ्क्तिका** | [–।ᴗ – ᴗ – – ।ᴗ – ᴗ –] |
| ३२५ **अुषिता** | [ᴗ ।– ᴗ ᴗ – ᴗ ᴗ ।– ऽ ᴗ –] |
| ३२६ **विदुषी** | [ᴗ ᴗ ।– ᴗ ᴗ – ᴗ ᴗ ।– ऽ ᴗ –] |
| ३२७ **पणव** | [–।– – ᴗ ᴗ ᴗ ᴗ ।– ऽ ᴗ –] |
| ३२८ **अुज्ज्वला** | [ᴗ ᴗ ।ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ᴗ ᴗ ।– ऽ ᴗ –] |
| ३२९ **मौक्तिकदाम** | [ᴗ ।– ᴗ ᴗ – ᴗ ᴗ ।– ᴗ ᴗ – ᴗ] |
| ३३० '**तेजस्पति**' | [। – – – – ! – – ᴗ –] |
| ३३१ **पणव** | [। – – – ᴗ ᴗ ।ᴗ ᴗ – ᴗ – ऽ] |
| ३३२ **विदुषी** | [।ᴗ ᴗ – ᴗ ᴗ – ।ᴗ ᴗ – ᴗ – ऽ] |
| ३३३ **अुज्ज्वला** | [।ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ।ᴗ ᴗ – ᴗ – ऽ] |
| ३३४ **हंसी** | [। – – – – ! ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ –] |

## टीपा

**३१८ पणवक** (ना १०७), नागवर्मा सातव्या अक्षरानन्तर यति साङ्गतो. **३१९ मोटक** (भ १६/२६), मोटनक (हे २/१४७), "स्यान्मोटनकंतजजाश्चलगौ" (गछ २/५२). **३२० तोटक** (पि ६/३१), "अिह तोटकमम्बुधिसैः प्रथितम्" (के ३/४८).

**३२१ अुत्थापनी,** मागे ५६ पहा. **३२२ प्रमिताक्षरा,** मागे ५४ पहा. **३२३ "अति" विमला;** "स्मनल्गा विमला" (हे २/१५१, भ ३२/२३३). **३२४ पङ्क्तिका,** मागे २५९ पहा. **३२५ "जिगौ अुषिता"** (हे २/११५).

**३२६ विदुषी,** मागे २५५ पहा. **३२७ पणव,** मागे २५२ पहा. **३२८ अुज्ज्वला** मागे २५६ पहा. **३२९ मौक्तिकदाम** (हे २/१७३), "चतुर्जगणं वद मौक्तिकदाम" (के ३/५४). **३३०** मौ लगौ **'तेजस्पतिः'** या वृत्ताची मोडणी [– – ! – – – – – । ᴗ –] अशी अधिक चाङ्गली वाटते. तशी मोडणी धरल्यास वृत्त तटी–वर्गात पडेल.

**३३१ पणव,** मागे २५२ पहा. **३३२ विदुषी,** मागे २५५ पहा. **३३३ अुज्ज्वला,** मागे २५६ पहा. **३३४ हंसी,** मागे २५३ पहा.

## २२ विद्युन्माला–वर्ग

| | |
|---|---|
| ३३५ **विद्युन्माला** | [। – – – – । – – – –] |
| ३३६ **स्निग्धा** | [। – ᴗ ᴗ – – ! – – – –] |
| ३३७ **बिन्दु** | [। – ᴗ ᴗ – ᴗ ᴗ । – – – –] |
| ३३८ **वार्ताहारी** | [। ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ᴗ ᴗ । – – – –] |
| ३३९ **शुद्धान्त** | [। ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ । – – – –] |
| ३४० **कलगीत** | [। ᴗ ᴗ – – – ! ᴗ ᴗ – – –] |
| ३४१ **'पङ्क्तिरथ'** | [। – – ᴗ ᴗ – । ᴗ ᴗ – – –] |
| ३४२ **कुवलयमाला** | [। – – – ᴗ ᴗ ! ᴗ ᴗ – – –] |
| ३४३ **'सुरपति'** | [। ᴗ ᴗ ᴗ ᴗ – – । ᴗ ᴗ – – –] |
| ३४४ **'क्षत्रक्षयकर'** | [। – – ᴗ ᴗ ᴗ ᴗ । ᴗ ᴗ – – –] |
| ३४५ **अर्धक्षामा** | [। – – – – । – ᴗ ᴗ – –] |

| | |
|---|---|
| ३४६ कमला | [।⏑ ⏑ — — — ! — ⏑ ⏑ — —] |
| ३४७ रुक्मवती | [।— ⏑ ⏑ — — ! — ⏑ ⏑ — —] |
| ३४८ "उन्नत" | [।— — — ⏑ ⏑ । — ⏑ ⏑ — —] |
| ३४९ अनवसिता | [।⏑ ⏑ ⏑ ⏑ — — ! — ⏑ ⏑ — —] |
| ३५० वर्णबलाका | [।⏑ ⏑ — ⏑ ⏑ — । — ⏑ ⏑ — —] |
| ३५१ दोधक | [।— ⏑ ⏑ — ⏑ ⏑ । — ⏑ ⏑ — —] |
| ३५२ तामरस | [।⏑ ⏑ ⏑ ⏑ — ⏑ ⏑ । — ⏑ ⏑ — —] |
| ३५३ परितोषा | [।⏑ ⏑ — ⏑ ⏑ ⏑ ⏑ । — ⏑ ⏑ — —] |
| ३५४ कमलाक्षी | [।⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ । — ⏑ ⏑ — —] |
| ३५५ स्वागता | [।— ⏑ — ⏑ ⏑ ⏑ । — ⏑ ⏑ — —] |
| ३५६ पावक | [।— ⏑ ⏑ — — । — — ⏑ ⏑ —] |
| ३५७ कलस्वन | [।— ⏑ ⏑ — ⏑ ⏑ । — — ⏑ ⏑ —] |
| ३५८ सुषमा | [।— — ⏑ ⏑ — । — — ⏑ ⏑ —] |
| ३५९ मत्ता | [।— — — — ! ⏑ ⏑ ⏑ ⏑ — —] |
| ३६० कुड्मलदन्ती | [।— ⏑ ⏑ — — ! ⏑ ⏑ ⏑ ⏑ — —] |
| ३६१ 'महर्षि' | [।— — — ⏑ ⏑ । ⏑ ⏑ ⏑ ⏑ — —] |
| ३६२ विरतिमहती | [।— — ⏑ ⏑ ⏑ ⏑ । ⏑ ⏑ ⏑ ⏑ — —] |
| ३६३ 'नयनविशाला' | [।— ⏑ ⏑ — ⏑ ⏑ । ⏑ ⏑ ⏑ ⏑ — —] |
| ३६४ कुसुमविचित्रा | [।⏑ ⏑ ⏑ ⏑ — — ! ⏑ ⏑ ⏑ ⏑ — —] |
| ३६५ 'सखिजन'–"वन्धा" | [।— ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ! ⏑ ⏑ ⏑ ⏑ — —] |
| ३६६ मदललिता | [।⏑ ⏑ ⏑ ⏑ — ⏑ ⏑ । ⏑ ⏑ ⏑ ⏑ — —] |
| ३६७ विधुरवितान | [।⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ — । ⏑ ⏑ ⏑ ⏑ — —] |
| ३६८ सुपवित्रा | [।⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ! ⏑ ⏑ ⏑ ⏑ — —] |
| ३६९ 'मण्डलाकृति' | [।— ⏑ — ⏑ — । ⏑ ⏑ ⏑ ⏑ — —] |
| ३७० 'मञ्जुलवचना' | [।— ⏑ ⏑ — — । — ⏑ ⏑ ⏑ ⏑ —] |
| ३७१ नगमहिता | [।⏑ ⏑ — — ⏑ ⏑ । — ⏑ ⏑ ⏑ ⏑ —] |
| ३७२ सम्मदवदना | [।— ⏑ ⏑ — ⏑ ⏑ । — ⏑ ⏑ ⏑ ⏑ —] |
| ३७३ चन्द्रवर्त्म | [।— ⏑ — ⏑ ⏑ ⏑ । — ⏑ ⏑ ⏑ ⏑ —] |
| ३७४ प्रवराक्षरा | [।⏑ ⏑ — ⏑ — ⏑ ! ⏑ ⏑ — ⏑ ⏑ —] |

| | | |
|---|---|---|
| ३७५ | मोदक | [\| — ⏑ ⏑ — ⏑ ⏑ \| — ⏑ ⏑ — ⏑ ⏑ ] |
| ३७६ | पङ्कज | [\| — ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ \| — ⏑ ⏑ — ⏑ ⏑ ] |
| ३७७ | भ्रमरविलसिता | [\| — — — — ! ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ — ] |
| ३७८ | ‘सुर’ललना | [\| — ⏑ ⏑ — — ! ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ — ] |
| ३७९ | ‘सुवसना’ | [\| — — — ⏑ ⏑ \| ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ — ] |
| ३८० | चक्रपद | [\| — ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ \| ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ — ] |
| ३८१ | प्रहरणकलिता | [\| ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ — ! ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ — ] |
| ३८२ | मणिगुणनिकर | [\| ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ! ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ — ] |
| ३८३ | ‘कृशा’ | [\| ⏑ — ⏑ — — ! ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ — ] |
| ३८४ | ‘अम्बर’ | [\| — ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ \| ⏑ ⏑ ⏑ ⏑ — ⏑ ⏑ ] |
| ३८५ | ‘मदनरसङ्घात’ | [\| ⏑ ⏑ ⏑ ⏑ — ⏑ ⏑ \| — ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ] |
| ३८६ | ‘अमलकमलरुचि’ | [\| ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ \| — ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ] |
| ३८७ | ‘अुद्याद्विद्युत्’ | [\| — — — — \| ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ] |
| ३८८ | ‘बल्लवलीला’ | [\| — ⏑ ⏑ — — \| ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ] |
| ३८९ | अचलधृति | [\| ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ \| ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ] |
| ३९० | “त्रिलोकगामी” | [\| — — — — \| ⏑ — ⏑ — — ] |
| ३९१ | ‘वैष्णव’ | [\| — ⏑ ⏑ — — \| ⏑ — ⏑ — — ] |
| ३९२ | “अिरा” | [\| — — ⏑ ⏑ — \| ⏑ — ⏑ — — ] |
| ३९३ | “अमला” | [\| ⏑ ⏑ — ⏑ ⏑ — \| ⏑ — ⏑ — — ] |
| ३९४ | काममत्ता | [\| ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ — \| ⏑ — ⏑ — — ] |
| ३९५ | “जलौघवेगा” | [\| ⏑ — ⏑ — — \| ⏑ — ⏑ — — ] |
| ३९६ | मयूरसारिणी | [\| — ⏑ — ⏑ — \| ⏑ — ⏑ — — ] |
| ३९७ | जलोद्धतगति | [\| ⏑ — ⏑ ⏑ ⏑ — ! ⏑ — ⏑ ⏑ ⏑ — ] |
| ३९८ | प्रभा | [\| ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ — ! ⏑ — — ⏑ — ] |
| ३९९ | दीपकमाला | [\| — ⏑ ⏑ — — \| — ⏑ — ⏑ — ] |
| ४०० | शुद्धविराट् | [\| — — — ⏑ ⏑ ! — ⏑ — ⏑ — ] |
| ४०१ | सीधु | [\| ⏑ ⏑ — — ⏑ ⏑ \| — ⏑ — ⏑ — ] |
| ४०२ | मालती | [\| ⏑ ⏑ ⏑ ⏑ — ⏑ ⏑ \| — ⏑ — ⏑ — ] |
| ४०३ | “चारुलक्षणा” | [\| ⏑ — ⏑ — — \| — ⏑ — ⏑ — ] |

मनोरमा ३१२ पहा. ६९३ **चित्त-चन्द्रिका,** चन्द्रिका ( ना ११८ ), मागे प्रसभ ३०९ पहा. ६९४ **लघुगति** ( हे ), मागे त्वरितगति ३०६ पहा. ६९५ जौं गौ **सिंहलेखा** ( भ १५/१७ गाप्राग्रमा, हे २/७७ ), सिंहलीला ( भ १६/१२ ), मालिनी ( विवृ ५/१३ ).

६९६ **मयूरसारिणी** ( पि ६/१२, हे २/१११ ), मागे ३९४ पहा. ६९७ जौं लौंग **श्येनिका,** श्येनी ( पि ६/२५, हे २/१४४ ), निःश्रेणिका ( हे ). ६९८ **सुपथ्या,** पथ्या ( पि ९४ टीप ), मागे २५८ पहा. ६९९ **वैतिका** रजौ रलौ गुरुर्यदा, ( केनिआ ४८ ). ७०० जौं जौं ग् **कलापति,** कलापतिप्रभा ( रपि ८५११ ).

७०१ **ललितभृङ्ग,** "विद्धि ललितभृङ्गमखिलवन्दिहृदयलोभि पञ्चकयतिधारि भसनजे तनगलशोभि" ( रूस्तमा टीका २१७ ). ७०२ जौं जौं र् '**देवराज**', तोलअ ( स्वछ ३३ ), तूणक ( हे २/२५५ ), चामर ( प्रापै २/१५८ ); मागे ६६७ टीप पहा. ७०३ भ्सौ न्जौ न्रौ **हरि** ङङः ( प्रापै १/१९९ ). ७०४ जौं जौं लौं **चञ्चला** ( प्राप २/१७२ ), चित्रशोभा ( स्वछ ४३ ), चित्र ( गछ २/१४८ ). ७०५ जौं जौं गौं "**विं**"–**चित्रा,** चिंत्र ( स्वछ ४५, हे २/२८०, कद ४/७५ ).

७०६ नौ जौं जौं ग् **प्रपञ्च** ( रपि १२१० ), पञ्चचामर ( के परिशिष्ट ). ७०७ जौं जौं जौं ग्लौ **गण्डका** ( प्रापै २/१९८ ), चित्र ( कद ४/८९ ), वृत्त ( पि ७/२३, हे २/२३२, गछ २/२०८ ). "रजत्रयलगैर्युक्तं मालवं केचिदूचिरे" (ममच १९) या सूत्रांत "लगैर्युक्तं हें चुकीचें असून खरा पाठ "गलैर्युक्तं" असावा. असें जर नसेल तर हें वृत्त [ चञ्चला । – ‿ ‿ – ] असें होईल. ७०८ **अशोकपुष्पमञ्जरी दण्डक** ( हे २/४०८ ), "यत्र दृश्यते गुरोः परो लघुः क्रमात् स अुच्यते बुधैरशोकमञ्जरीति" ( गछ २/२३२ ). ७०९ **समुद्रदण्डक** ( वबृ १०३/६३ ) "अत्र नद्वयात् परतः पञ्च रेफा जकारान्तरिता भवत्यन्ते लघुगुरू" ( अुत्पल ).

## ४२ मरालिका–वर्ग

७१० **मरालिका** [ विदग्धक द्विरावृत्ता ]
७११ '**सुरवधू**' [ । ‿ ‿ ‿ – ‿ , – ! ‿ ‿ ‿ – ‿ , – ]

७१२ "मत्तमधुप" [।– ᴗ ᴗ ᴗ ᴗ ,–!– ᴗ ᴗ ᴗ ᴗ ,–]
७१३ 'पवनसुत' [। ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ,–! ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ,–]
७१४ अिन्दिरा [। ᴗ ᴗ ᴗ – ᴗ ,–!– ᴗ – ᴗ ,–]
७१५ द्रुता [।– ᴗ – ᴗ ,–! ᴗ ᴗ ᴗ – ᴗ ,–]
७१६ 'अजितसत्प्रिया' [। ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ,–! ᴗ ᴗ ᴗ – ᴗ ,–]
७१७ 'शिवविधी' [।– ᴗ – ᴗ ,–।– ᴗ ᴗ ᴗ ᴗ ,–]
७१८ 'भद्र' [। ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ,–।– ᴗ ᴗ ᴗ ᴗ ,–]
७१९ 'श्रित' [। ᴗ ᴗ ᴗ – ᴗ ,–। ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ,–]
७२० "प्रमद्वरा"* [–,– ᴗ – ᴗ ,–!–,– ᴗ – ᴗ ,–]
७२१ 'आनन्दकन्द'* [–,– ᴗ – ᴗ ,––!–,– ᴗ – ᴗ ,––]
७२२ "अनुराग"* [ ᴗ ᴗ ,– ᴗ – ᴗ ,––! ᴗ ᴗ ,– ᴗ – ᴗ ,––]
७२३ "कन्दर्प"* [–,– ᴗ – ᴗ ,– ᴗ ᴗ !–,– ᴗ – ᴗ ,––]
७२४ "विद्युल्लता"* [–,– ᴗ – ᴗ ,––!–,– ᴗ – ᴗ ,–]
७२५ "वैशाख"* [–,– ᴗ – ᴗ ,– ᴗ ᴗ ।–,– ᴗ – ᴗ ,–]
७२६ "धवलकुसुम"
[ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ।– ᴗ –! ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ।– ᴗ –]

## टीपा

७१० "**मरालिका** रयजगाः शिवाननशरैर्यतिः" ( ममच १४ ), मनोरमा ( निस ५२ ), मागे पङ्क्तिका २५८ पहा. या वृत्ताला कामदा म्हणतात; पण कामदा म्हणून जी रचना होते ती ( अुदाहरणार्थ, अनन्तकृत व्यङ्कटेश स्तुति आणि ताम्बेकृत मार्गप्रतीक्षा ) पुष्कळदा शिथिल, जवळजवळ जातिस्वरूप असते. म्हणून जातीला कामदा हें नाव निश्चित करून वृत्ताला मरालिका हें नाव देणें बरें. ७११ '**सुरवधू**' म्हणजे शफरिकाद्विरावृत्ता होय. "मता नरौ नरौ भिन्ना वज्रकोणै गुहाननैः" ( ममच १७ ). ७१२ भ्सौ भ्सौ "**मत्तमधुप**" चैः ७१३ '**पवनसुत**,' मागे प्रहरणकलिता ३८१ पहा. ७१४ न्रौ लौं ग् **अिन्दिरा** चैः, वन्दिता ( पि ९८ टीप ), राजहंसी ( ममच ९ ), शुद्धकामदा ( वृद ), "नररलैर्गुराविन्दिरामता" ( गच्छ २/६४ ).

७१५ जौं स्लौ ग् द्रुता ङैः ( गछ २/६३ ), रञ्जिता ( ममच १४ ), अुपदारिका ( रपि ६०९ ), ललित ( वृद ). ७१६ नौ भ्जौ ग् '**अजितसत्प्रिया**' छैः. ७१७ यौं न्लौ ग् '**शिवविधी**', ङैः ७१८ नौ त्नौ ग् '**भद्र**' छैः. ७१९ न्रौ नौ ग् श्रित चैः ७२० तौ तौ "**प्रमङ्करा**" चैः हें वृत्त म्हणजे जला–द्विरावृत्ता होय.

७२१ तौ म्जौ गौ '**आनन्दकन्द**' छैः म्हणजे "आनन्द"-द्विरावृत्ता होय. ७२२ स्जौ त्जौ गौं "**अनुराग**" जैः म्हणजे मुदद्विरावृत्ता होय. ७२३ तौ स्नौ य् "**कन्दर्प**" जैः. ७२४ तौ म्जौ ग् "**विद्युल्लता**" छैः. ७२५ तौ स्नौ ल्गौ "**वैशाख**". ७२६ नौ नौं न्रौ '**धवलकुसुम**' झैः म्हणजे विनुतद्विरावृत्ता होय.

४३ नारी–वर्ग

७२७ **नारी** [ | – – – ]
७२८ **दमनक** [ | ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ]
७२९ **सम्मोहा** [ | – – – | – – ]
७३० **तनुमध्या** [ | – – ᴗ ᴗ | – – ]
७३१ **तुङ्ग** [ | ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ | – – ]
७३२ "**हाला**" [ – | – ᴗ ᴗ – | – – ]
७३३ **अधिकारी** [ | ᴗ ᴗ – – | ᴗ ᴗ – ]
७३४ **मुदिता** [ | ᴗ – – ᴗ | ᴗ – – ]
७३५ **अुद्धता** [ | – ᴗ – ᴗ | ᴗ – – ]
७३६ **चित्तविलासित** [ | ᴗ ᴗ ᴗ ᴗ – | ᴗ – – ]
७३७ **मातङ्गी** [ | – – – ! – – – ]
७३८ **नागरक** [ | – ᴗ ᴗ – | ᴗ – ᴗ – ]
७३९ **सुविलासा** [ | ᴗ ᴗ – – | ᴗ – – ᴗ ]
७४० **चित्रपदा** [ | – ᴗ ᴗ – | ᴗ ᴗ – – ]
७४१ '**सुजनकलित**' [ | ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ | ᴗ ᴗ – – ]
७४२ **माणवक** [ | – ᴗ ᴗ – ! – ᴗ ᴗ – ]
७४३ **सम्फुल्लक** [ | – – ᴗ ᴗ | – – ᴗ ᴗ ]
७४४ '**पुरुषोत्तम**' [ ᴗ ᴗ – ᴗ ᴗ | – – ᴗ ᴗ ]

७४५ कुलटा [ ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ! ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ]
७४६ "मदनदमन" [ । ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ । ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ]
७४७ तरलनयन [ । ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ । ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ]
७४८ 'साशङ्क'* [ हाला द्विरावृत्ता ]

टीपा

७२७ **नारी** ( वित्र ५/३, हे २/६ ), ताली ( प्रापै २/११ ), वामाङ्ग ( ना ). ७२८नौ **दमनक** ( प्रापै २/५६ ). ७२९ **सम्मोहा** ( प्रापै २/३३ ), मागे विद्युद्भ्रान्ता २०४ पहा. ७३० **तनुमध्या**, मागे २०७ पहा.

७३१ **तुङ्ग** ( प्रापै २/७२ ), मागे रतिमाला २१६ पहा. ७३२ त्यौ ग् "**हाला**", वेधा ( रपि १३९ ). याची मोडणी [ । – – ᴗ ᴗ – । – – ] अशीहि होईल. ७३३ स्भौ ग् **अधिकारी** ( रपि १७८ ). ७३४ " य्सौ गो **मुदिता** " ( हे २/६५, भ ३२/११७ ). ७३५ **अुद्धता** मागे २६७ पहा.

७३६ न्जौ गौ **चित्तविलासितं** ( भ १५/२६ गाप्राग्राभा ) मागे ६०९ पहा. ७३७ **मातङ्गी** ( निस ३३ ), मागे विद्युल्लेखा २६० पहा. ७३८ "**नागरकं** भरौ लगौ" ( केनिआ ३४ ). ७३९ **सुविलासा** सरौ ग्लौ हि ( पि ९० टीप ). ७४० **चित्रपदा** मागे २६३ पहा.

७४१ नौ स्गौ '**सुजनकलित**.' ७४२ "भ्तौ लगौ **माणवकं** घैः" ( २/७३ ), माणवकाक्रीडितक ( पि ६/४ ). ७४३ त्यौ लौ **सम्फुल्लक** ( रूस्तमा टीका २१० ), मागे तृष्णा २७३ पहा. ७४४ सौ भ् '**पुरुषोत्तम**.' ७४५ **कुलटा**, "कुलटा स्यान्नजनगाः पञ्चभिः पञ्चभिर्यतिः" ( ममच १६ ), मागे अमृतगति २७१ पहा.

७४६ नौ न्लौ ग् "**मदनदमन**" मागे २७२ पहा. ७४७ नी **तरलनयन** चैः ( प्रापै २/१३७ ). ७४८ त्यौ म्सौ गौ "**साशङ्क**" छैः हें वृत्त हाला-वृत्ताच्या द्विरावृत्तीने होतें.

## ४४ लघुगति—वर्ग

७४९ लघुगति [। ∪ ∪ ∪ ∪ ∪ ∪ । ∪ ∪ ∪ ∪ ∪ ∪ । – ]
७५० "रम्याकृति"* [। – – ∪ ∪ । – – ∪ ∪ । – – ]
७५१ "मदिराक्षी"* [। ∪ ∪ – – । ∪ ∪ – – । ∪ ∪ – ]
७५२ "वनमाला"* [। ∪ ∪ – – । ∪ – ∪ – । ∪ ∪ – ]
७५३ स्रक् [। ∪ ∪ ∪ ∪ ∪ ∪ । ∪ ∪ ∪ ∪ ∪ ∪ । ∪ ∪ – ]
७५४ "स्नेहलता"* [। – ∪ ∪ – । – ∪ ∪ – । – ऽ ∪ – ]
७५५ तत [। ∪ ∪ ∪ ∪ ∪ ∪ । – – – । – ऽ ∪ – ]
७५६ "सु" रति [। ∪ ∪ – – ! ∪ ∪ ∪ ∪ ∪ ∪ । ∪ – ऽ – ]
७५७ "मानवती"* [। – ∪ ∪ – । – ∪ ∪ – । – ∪ ∪ – ]
७५८ "काञ्चनकान्ति"* [। – ∪ ∪ – । – ∪ – ∪ । – ∪ ∪ – । – ]
७५९ "प्रेय" * [ – ∪ ∪ – । – ∪ – ! – ∪ ∪ – । – ∪ – ]
७६० कुमुदिनी [। – ∪ – ∪ । – ऽ ऽ – ! ∪ ∪ ∪ ∪ – । – ]
७६१ धवल [। ∪ ∪ ∪ ∪ ∪ ∪ । ∪ ∪ ∪ ∪ ∪ ∪ । ∪ ∪ ∪ ∪ ∪ ∪ । – ]
७६२ हंसश्येनी [ – । – – – ! ∪ ∪ ∪ ∪ ∪ ∪ ! – – – । – ]
७६३ "कनक"- मयी [। तरलनयन । ∪ ∪ ∪ ∪ ∪ ∪ । ∪ – ]
७६४ 'शुभकामी'* [। – – ∪ ∪ । – – ∪ ∪ । – – ∪ ∪ । – – ]
७६५ "कलावती"* [। ∪ – ∪ – । ∪ ∪ – – । ∪ – ∪ – । – – ]
७६६ "मरीचिका"* [। ∪ – ∪ – । ∪ ∪ – – । ∪ – ∪ – । ∪ ∪ – ]
७६७ "शरयू"* [। ∪ ∪ – – । ∪ ∪ – – । ∪ ∪ – – । – – ]
७६८ "प्रियशिष्या"* [। ∪ ∪ – – । ∪ ∪ – – । ∪ ∪ – – । ∪ ∪ – ]
७६९ सुरभि [। ∪ ∪ – ∪ ∪ । ∪ ∪ – ∪ ∪ । ∪ ∪ – ∪ ∪ । ∪ ∪ – ]
७७० "यशोगन्ध"* [। ∪ – – ∪ । ∪ – – ∪ । ∪ – – ∪ । ∪ – – ]
७७१ "श्यामकान्त"* [। – ∪ – ∪ । ∪ – – ∪ । – ∪ – ∪ । ∪ – – ]
७७२ "नूपुर"* [। – ∪ ∪ – । – ∪ – ∪ । – ∪ ∪ – । – ∪ – ]
७७३ "रसोदात्त"* [। ∪ – – ∪ । – ∪ – ∪ । ∪ – – ∪ । – ∪ – ]
७७४ 'अुषा'* [। ∪ – – ∪ । – – – ! ∪ – – ∪ । – ∪ – ]
७७५ श्रीलीला [। – – – । – – – ! – – – । – – – ]

७७६ "**मनोमोहिनी**"* [।ᴗ – – ᴗ। – – –!ᴗ – – ᴗ। – – –]
७७७ "**रङ्गराग**"* [। – ᴗ – ᴗ। – – –! – ᴗ – ᴗ। – – –]
७६८ "**गिरिबाला**"* [।ᴗ ᴗ – –।ᴗ ᴗ – –।ᴗ ᴗ – –।ᴗ ᴗ – –]
७७९ "**वसुन्धरा**"* [।ᴗ – ᴗ –।ᴗ ᴗ – –!ᴗ – ᴗ –।ᴗ ᴗ – –]
७८० "**अिन्दुमुखी**"* [। – ᴗ ᴗ –। – ᴗ ᴗ –। – ᴗ ᴗ –। – ᴗ ᴗ –]
७८१ "**प्रमाथिनी**"* [।ᴗ – ᴗ –। – ᴗ ᴗ –!ᴗ – ᴗ –। – ᴗ ᴗ –]
७८२ "**पाणिबन्ध**"* [। – ᴗ – ᴗ। – ᴗ ᴗ –! – ᴗ – ᴗ। – ᴗ ᴗ –]
७८३ "**मानसभन्जनी**"* [। – ᴗ ᴗ –।ᴗ – ᴗ –! – ᴗ ᴗ –।ᴗ – ᴗ –]
७८४ **वरूथिनी** [।ᴗ – ᴗ ᴗ ᴗ!ᴗ – ᴗ ᴗ ᴗ!ᴗ – ᴗ ᴗ ᴗ।ᴗ – ᴗ –]
७८५ **मदकलनी** [चारदा (ᴗ ᴗ ᴗ ᴗ –)]
७८६ **माध्वी** [।ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ! तरलनयन।ᴗ ᴗ ᴗ ᴗ –]
७८७ **विदलितसरसिज** [चारदा (ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ) आणि अेक ग]
७८८ **अपवाहक**
[। – – –।ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ!ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ!ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ!ᴗ ᴗ – –। –]

## टीपा

७४९ नीगौ **लघुगति** (हे), मागे त्वरितगति ३०६ पहा. ७५० त्यौ स्गौ "**रम्याकृति**" यति ङै: घेतला तर मात्र हें वृत्त पज्झावर्तनी [। – – ᴗ ᴗ –! – ᴗ ᴗ – –] होअील.

७५१ स्भौ त्लौ ग् "**मदिराक्षी**"; हें वृत्तहि [।ᴗ ᴗ – – ᴗ ᴗ। – – ᴗ ᴗ –] असें पज्झावर्तनी होअू शकतें. ७५२ स्रौ ज्लौ ग् "**वनमाला**". ७५३ "नीसौ **स्रक्** चैः" (हे २/२४५), माला (पि ७/१२), मागे मणिगुणनिकर ३८० टीप पहा. ७५४ भ्तौ य्लौ ग् "**स्नेहलता**". ७५५ तत मागे ९५ पहा.

७५६ "**सु**"–रति, (ममच १७) मागे ४३१ पहा. ७५७ भ्तौ य्सौ "**मानवती**". ७५८ भ्तौ सौं ग् "**काञ्चनकान्ति**". हें वृत्त [। – ᴗ ᴗ – –।ᴗ – ᴗ – ᴗ ᴗ। – –] असें पज्झावर्तनीहि होअू शकेल. ७५९ भ्तौ त्यौ ल्गौ **प्रेय** छैः ७६० **कुमुदिनी**, मागे ४१३ टीप पहा.

७६१ नूगौ **धवल** (प्रापै २/१९२). हें वृत्त [। ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ । ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ । ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ । ⏑ ⏑ ⏑ –] असें हरावर्तनीहि होऊं शकतें. ७६२ म्भौ न्यौ गौ **हंसश्येनी** घचैः, कुटिला (पि ८/१०) मागे ४६२ मध्यक्षामा टीप पहा. ७६३ कनक "**मयी**"; "कनकलता सा कथिता षण्नैर्युक्ता तथा लगाभ्यांच" (ममच १९). ७६४ त्यौ स्भौ गौ '**शुभकामी**' ७६५ ज्भौ त्रौ गौ "**कलावती**".

७६६ ज्भौ त्रौ स् "**मरीचिका**". ७६७ स्भौ त्यौ गौ "**शरयू**". ७६८ स्भौ त्यौ स् "**प्रियशिष्या**". ७६९ "स्नज्नभ्साः **सुरभि**स्त्रिडैः" (हे २/३१७), शुभ (ममच १९), मागे हंसक ४०२ पहा. ७७० य्सौ भ्तौ य् "**यशोगन्ध**".

७७१ सौं जौं य् "**श्यामकान्त**". ७७२ भ्तौ सौं र् "**नुपूर**". ७७३ य्जौ भ्तौ र् "**रसोदात्त**". ७७४ यौ रौ ल्गौ "**अुषा**" छैः. ७७५ मौ मौ **श्रीलीला** हें वृत्तनाम श्रीनिवासपण्डित म्हणजे रावजी महाराज हा आपल्या लक्ष्मीसहस्रा-वरील टीकेंत देतो; मागे कल्याण ४८८ पहा.

७७६ यौ रौ गौ "**मनोमोहिनी**" छैः. ७७७ यौं त्रौ गौ "**रङ्गराग**" छैः. ७७८ स्भौ त्यौ स्गौ "**गिरिबाला**". ७७९ ज्भौ त्रौ स्गौ "**वसुन्धरा**" जैः. ७८० भ्तौ य्सौ भ्गौ "**अिन्दुमुखी**", "प्रमदा सत्यसभगा वर्णैर्वर्णयतिर्भ-वेत्" (ममच १८), यांत वस्तुतः लक्षण भत्यसभगा तर नसेल?

७८१ ज्तौ ज्रौ भ्गौ "**प्रमाथिनी**" जैः. ७८२ जौं य्जौ भ्गौ "**पाणिबन्ध**" जैः. ७८३ भ्रौ य्सौ ज्गा "**मानसभञ्जनी**" जैः. हें वृत्त नागर-काच्या द्विरावृत्तीने सिद्ध होतें. ७८४ **वरूथिनी**, "शरत्रयैर्युगादिछिन्ना जन्भस्न ज्गा वरूथिनी" (ममच १९). ७८५ "**मदकलनी** नजनभसा नलगादिछिन्ना शराङ्गबाणाङ्गैः" (ममच १९).

७८६ **माध्वी**, "तुरङ्गना लगौ माध्वी मासै रुद्रैश्च वा यतिः" (ममच १९). ७८७ नृगौ **विदलितसरसिज** (ना १९५). ७८८ **अपवाहक** (पि ७/३१), "मनूसगगा" अपवाहो झचचैः" (हे २/३७८).

---

## परिच्छेद ५ ला

# हरावर्तनी वृत्तें

### ४५ केशा-वर्ग

७८९ केशा [ ᴗ – – ]
७९० सोमराजी [ ᴗ – – | ᴗ – – ]
७९१ ह्रा [ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ | ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ | ᴗ – ]
७९२ "प्रमीला"* [ ᴗ – – | ᴗ – – | ᴗ – – ]
७९३ सौदामिनी* [ ᴗ – – | ᴗ – – | ᴗ – – | ᴗ – ]
७९४ मेघावली [ ᴗ ᴗ ᴗ – | ᴗ – – | ᴗ – – | ᴗ – ]
७९५ भुजङ्गप्रयात [ ᴗ – – | ᴗ – – | ᴗ – – | ᴗ – – ]
७९६ कन्द [ ᴗ – – | ᴗ – – | ᴗ – – | ᴗ – – | ᴗ ]
७९७ कन्दुक [ ᴗ – – | ᴗ – – | ᴗ – – | ᴗ – – | – ]
७९८ सिंहपुच्छ [ ५ वेळा यगण ]
७९९ क्रीडचन्द्र [ ६ वेळा यगण ]
८०० सुधा [ ६ वेळा ( ᴗ – ᴗ ᴗ ) | ᴗ – ]
८०१ विद्युदाला [ ७ यगण ]
८०२ वागीश्वरी [ ७ यगण | ᴗ – ]
८०३ महानाग [ ८ यगण ]
८०४ सिंहविक्रीड दण्डक [ ९ यगण ]
८०५ प्राचित दण्डक [ २ नगण | ७ यगण ]
८०६ सिंहविक्रान्त दण्डक [ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ | ८ यगण ]
८०७ "महा"मेघमाला दण्डक [ २ नगण | १ मगण | ६ यगण ]

### टीपा

७८९ यः केशा ( हे २/७ ), धूरिति भरतः ( हे ), धृति ( भ ३२/५२ ), शशी ( प्रापै २/१५ ), रतान्त ( ना ). ७९० "यौ सोमराजी" ( हे २/३३ ), शङ्खनारी ( प्रापै २/५२ ), विचित्र ( ना ).

७९१ "निसौ ह्रीः" (हे २/१९३). ७९२ यौ यू "**प्रमीला,**" बृहती (ना १०६), विशल्य (रपि ३६७). ७९३ यिलौ ग् **सौदामिनी**. हें वृत्त विद्याधर वामन भिडे यांनी मराठींत आणिलें आणि नामकरण त्यांनीच केलें; भुजङ्गी (रपि ५९०). ७९४ "नो रिर्मे**घावली**" (हे २/१८९), वसन्त (हे). १९५ **भुजङ्गप्रयात** (पि ६/३७), अप्रमेया (भ १६/५२). Nicolaus Mironow हा आपल्या Die Dharmaparíkshā Des Amitagati मध्ये या वृत्ताला शुभंप्रयात कशाच्या आधारें म्हणतो तें समजत नाही.

७९६ यौ यौ ल् **कन्द** (प्रापै २/१४५). ७९७ **कन्दुक** "अिदं कन्दुकं यत्र येभ्यश्चतुर्भ्यो गः." (गछ २/१०९). ७९८ **सिंहपुच्छ** (रपि १०११). ७९९ **क्रीडचन्द्र** (रपि ११५८), क्रीडाचक्र (प्रापै २/१८२). या सहा यगणाच्या क्रीडाचन्द्रवृत्तांत दुसऱ्या यगणाच्या ठिकाणीं मगण घालून त्या वृत्ताला कोणी क्रीडाचक्र म्हणतात. "अिदं क्रीडाचक्रं यमाभ्यां समस्तैर्य-कारैः समेतम्" (गछ २/१९३); अथवा या सूत्रांत 'क्रीडचक्रं ययाभ्यां' असाच शुद्ध पाठ असेल. ८०० ज्सौ न्भौ ज्सौ न्भौ ल्गौ **सुधा** (निस १२९), अवन्ध्योपचार (रपि १२४०).

८०१ **विद्युदाली** (रपि १२५७). ८०२ **वागीश्वरी** (रपि १३१६), "सुमन्दारमाला". ८०३ **महानाग** (रपि १३३९). ८०४ **सिंहविक्रीड,** यत्र यथेष्टं यगणाः प्रयुज्यन्ते स सिंहविक्रीडः (हे २/४०६).

८०५ **प्रचित** (हे २/३९९). ८०६ **सिंहविक्रान्त** (हे २/४०२); परन्तु स्वयम्भूच्या व्याख्येवरून आणि अुदाहरणावरून (स्वछ १५८–१५९) अेक यगण अधिक असतो असें दिसतें. ८०७ "**महा**" **मेघमाला,** "लघुषट्काद्गुरु-त्रयाच्च परे यथेष्टं यगणा यत्र प्रयुज्यन्ते सा मेघमाला नाम दण्डकः" (हे २/४०३).

## ४६ पञ्चाल-वर्ग

८०८ **पञ्चाल** [।— — ᵕ]
८०९ **हारीत** [।— — ᵕ ।— —]
८१० **विमला** [। ᵕ ᵕ — ᵕ ।— —]
८११ **कामलतिका** [।— ᵕ ᵕ ᵕ ।— —]

८१२ सुविशाला [ । ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ । – – ]
८१३ वसुमती [ । – – ⏑ । ⏑ ⏑ – ]
८१४ अुलपा [ । – ⏑ ⏑ ⏑ । ⏑ ⏑ – ]
८१५ कुसुम [ । ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ । ⏑ ⏑ – ]
८१६ मन्थान [ । – – ⏑ । – – ⏑ ]
८१७ श्यामा [ । – – ⏑ । ⏑ ⏑ – ⏑ । – ]
८१८ अक्षि [ । ⏑ ⏑ – ⏑ । – ⏑ ⏑ ⏑ । – ]
८१९ केतुमाला [ । – – ⏑ । – – ⏑ । – – ]
८२० "सुवर्ण"-रुचिरा [ । – – ⏑ । – ⏑ ⏑ ⏑ । – – ]
८२१ गौरी [ ⏑ । ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ । ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ । – – ]
८२२ 'संनीत' [ – – ⏑ । – – ⏑ । – – ⏑ ]
८२३ "तारामती" [ – – ⏑ । – – ⏑ । – – ⏑ । – ]
८२४ सारणी [ ⏑ ⏑ – ⏑ । – ऽ ⏑ ⏑ । – – ⏑ । – ]
८२५ लयग्राहि [ – – ⏑ । – – ⏑ । – – ⏑ । – – ]
८२६ सारङ्ग [ – – ⏑ । – – ⏑ । – – ⏑ । – – ⏑ ]
८२७ अमृतध्वनि

[ । – – ⏑ । – ⏑ ⏑ ⏑ । – – ⏑ । – ⏑ ⏑ ⏑ । – – ⏑ । – ⏑ ⏑ ⏑ । – ]

८२८ कलकण्ठ

[ । ⏑ ⏑ – ⏑ । – ⏑ ⏑ ⏑ । ⏑ ⏑ – ⏑ । – ⏑ ⏑ ⏑ । ⏑ ⏑ – ⏑ । – ⏑ ⏑ ⏑ । – ]

८२९ मन्दारमाला [ । ७ तगण । १ गुरु ]
८३० "निर्झरध्वनि" [ अमृतध्वनि । – ⏑ – ]
८३१ सर्वगामी [ ७ तगण । २ गुरु ]
८३२ आभार [ ८ तगण ]
८३३ कामबाण दण्डक [ ९ तगण । २ गुरु ]
८३४ "स्वानन्दसम्राट्" [ हारीताद्विरावृत्ता ]

टीपा

८०८ पञ्चाल (प्रापै २/१९). ८०९ त्गौ ग् हारीत (प्रापै २/३५) ८१० विमला, मागे २५ पहा.

८११ **कामलतिका** मागे २२६ पहा. ८१२ "**सु**"**विशाला,** मागे ६३४ पहा. ८१३ "त्सौ चेद् **वसुमती**" (के ३/१०). ८१४ भ्नौ ग् **अुलपा** (रपि १८९). ८१५ नौ ल्गौ **कुसुम** (वित्र ५/१४).

८१६ तौ **मन्थान** (प्रापै २/५०). ८१७ **श्यामा** (विवृ ५/१०), मागे ६७८ पहा. ८१८ **अक्षि** (हे २/९६), मागे २३० पहा. ८१९ तौ गौ **केतु-माला** (रपि २७६). ८२० "**सुवर्ण**"–**रुचिरा,** मागे २३२ पहा.

८२१ **गौरी** नौ न्सौ ग् (पि ७/४), मागे १०८ पहा. ८२२ तौ त् '**संनीत**'. ८२३ ता त्गौ "**तारामती**", विशालान्तिका (रपि ४१५). ८२४ **सारणी** (हे २/१५३), मागे ४३० पहा. ८२५ "तिर्गौ **लयग्राहि**" (हे २/१२९), विध्वङ्कमाला (गछ २/६१).

८२६ तौ तौ **सारङ्ग,** सारङ्गरूपक (प्रापै २/१३१), कामावतार (हे २/१६८) भृङ्गार (रूस्तमा टीका २३०). ८२७ त्भौ य्जौ स्तौ न्गौ **अमृतध्वनि** (रपि १३००). या नावाचें मूळ सापडलें नाही. मत्तेभ (ममच १९), कल्पलतिका (निस १२३). रणपिङ्गलकार या वृत्ताला अश्वधाटी म्हणून सुभाषितरत्नाकरांतील (पृ. ३१६–३३०) जगन्नाथ पण्डिताच्या अश्वधाटिकाव्याकडे बोट दाखवितो तर वृत्तदर्पणांत मन्दारमालावृत्तालाच अश्वधाटी म्हटलें आहे. ८२८ **कलकण्ठ,** "कलकण्ठारव्यं सजनजभनरनगाश्वाहिभोगिनिधिभिन्ना" (ममच १९). ८२९ **मन्दारमाला** (रपि १२८९). या नावाला आधार सापडत नाही. ८३० त्भौ य्जौ स्तौ न्तौ ग् "**निर्झरध्वनि**".

८३१ **सर्वगामी** (रपि १३०९). ८३२ **आभार** (रपि १३६२). ८३३ **कामबाण दण्डक** (हे २/४०९). ८३४ त्मौ गौं "**स्वानन्दसम्राट्**" ङैः.

## ४७ तडित्-वर्ग

८३५ **तडित्** [। – ᵕ –]
८३६ **मृगवधू** [। ᵕ ᵕ ᵕ –]
८३७ **कमलमधु** [। ᵕ ᵕ ᵕ ᵕ ᵕ]
८३८ **रति** [। – ᵕ ᵕ ᵕ । –]
८३९ '**वदनपद्म**' [ᵕ – । ᵕ ᵕ ᵕ – । –]

८४० 'भाविनी' [।–ᵕ–।–ᵕ]
८४१ 'नन्दकुलचन्द्र' [।–ᵕᵕᵕ।–ᵕ]
८४२ "करभीर" [।ᵕᵕᵕᵕᵕ।–ᵕ]
८४३ प्रीति [।–ᵕ–।–ऽ–]
८४४ सुललित [।ᵕᵕᵕ–।–ऽ–]
८४५ कामलतिका [।–ᵕᵕᵕ।–ऽ–]
८४६ सुविशाला [।ᵕᵕᵕᵕᵕ।–ऽ–]
८४७ द्वियोधा [।–ᵕ–।–ᵕ–]
८४८ शारदी [।–ᵕᵕᵕ।–ᵕ–]
८४९ मुखकमल [।ᵕᵕᵕᵕᵕ।–ᵕ–]
८५० "सुर"-नदी [।–ᵕᵕᵕ!ᵕᵕᵕ–]
८५१ गजगती [।ᵕᵕᵕ–।ᵕᵕᵕ–]
८५२ कमलजा [।ᵕᵕᵕᵕᵕ।ᵕᵕᵕ–]
८५३ 'वीरवर' [।ᵕᵕᵕ–।–ᵕᵕᵕ]
८५४ हंसमाला [।–ᵕ–।–ᵕ–।–]
८५५ विशाला [।ᵕᵕᵕᵕᵕ।–ᵕ–।–]
८५६ अुदय [।–ᵕᵕᵕ।–ᵕᵕᵕ।–]
८५७ हलमुखी [।–ᵕ–!ᵕᵕᵕᵕᵕ।–]
८५८ श्रुतानन्द [।–ᵕ–।–ᵕ–।–ऽ–]
८५९ अशोका [।ᵕᵕᵕᵕᵕ।–ᵕᵕᵕ।–ऽ–]
८६० वीरलक्ष्मी [।–ᵕ–।–ᵕ–।–ᵕ–]
८६१ भामिनी [।–ᵕ–।–ᵕ–।–ᵕ–।–]
८६२ चलधृति [।ᵕᵕᵕᵕᵕ।ᵕᵕᵕᵕᵕ।ᵕᵕᵕᵕᵕ।–]
८६३ कुड्मलमयूर [–।ᵕᵕᵕ–!ᵕᵕᵕ–।ᵕᵕᵕ–।–]
८६४ अिन्दुवदना [।–ᵕᵕᵕ।–ᵕᵕᵕ।–ᵕᵕᵕ।ᵕ–]
८६५ वरसुन्दरी [।–ᵕᵕᵕ।–ᵕᵕᵕ।–ᵕᵕᵕ।–ऽ–]
८६६ विचित्रललिता [।ᵕᵕᵕᵕᵕ।–ᵕᵕᵕ।–ᵕᵕᵕ।–ऽ–]
८६७ ललितपद [।ᵕᵕᵕᵕᵕ!ᵕᵕᵕᵕᵕ।–ᵕᵕᵕ।–ऽ–]
८६८ वसुधारा [।ᵕᵕᵕᵕᵕ!ᵕᵕᵕᵕᵕ।ᵕᵕᵕᵕᵕ।–ऽ–]

८६९ स्रग्विणी [ ।–⏑–।–⏑–।–⏑–।–⏑– ]
८७० अुर्वशी [ ।⏑⏑⏑–।–⏑–।–⏑–।–⏑– ]
८७१ ‘जनकतनया’ [ ।⏑⏑⏑⏑⏑⏑।–⏑–।–⏑–।–⏑– ]
८७२ विद्युन्मालिका [ ।⏑⏑⏑⏑⏑⏑।–ऽ–।–⏑–।–⏑– ]
८७३ विपिनतिलक [ ।⏑⏑⏑⏑⏑⏑।–⏑⏑⏑।–⏑–।–⏑– ]
८७४ निशिपालक [ ।–⏑⏑⏑।–⏑⏑⏑।–⏑⏑⏑।–⏑– ]
८७५ ‘नवमधु’ [ ।⏑⏑⏑⏑⏑⏑।–⏑–!⏑⏑⏑⏑⏑⏑ ।–⏑– ]
८७६ ‘सरसिरुहलोचना’ [ ।⏑⏑⏑⏑⏑⏑।⏑⏑⏑⏑⏑⏑।⏑⏑⏑⏑⏑⏑।–⏑– ]
८७७ ‘विलोलनयना’ [ ।–⏑–।⏑⏑⏑–।⏑⏑⏑–।⏑⏑⏑– ]
८७८ ‘वंशतिलक’ [ ।⏑⏑⏑–।⏑⏑⏑–।⏑⏑⏑–।⏑⏑⏑– ]
८७९ चन्द्र [ ।⏑⏑⏑⏑⏑⏑।⏑⏑⏑⏑⏑⏑।–⏑⏑⏑।⏑⏑⏑⏑⏑⏑ ]
८८० “दया” [ हंसमाला द्विरावृत्ता ]

टीपा

८३५ **तडित्** अिति भरतः ( हे ), तटि ( भ ३२/५० ), मृगी ( हे २/८ ), प्रिया ( प्रापै २/१३ ), पावन ( ना ). ८३६ “न्गौ **मृगवधू**” ( हे २/१४, विवृ ५/४ ), सती ( गछ २/६ ). ८३७ न्लौ ल् “**कमलमधु**,” यमक ( प्रापै २/३९ ). ८३८ **रति** ( हे २/२१ ), मागे २०२ पहा. ८३९ ‘**वदनपद्म**,’ हें वृत्त कुमारललितापासून यतिभेदें सिद्ध होतें ( पि ८९ ), मागे कुमारललिता २१८ पहा. ८४० गौं ल् ‘**भाविनी**’.

८४१ भ्जौ ‘**नन्दकुलचन्द्र**’; याला कुन्द असेंहि नाव आहे ( रूस्तमा टीका १४४ ). ८४२ न्सौ ल् ‘**करभीर**’, करहंच ( प्रापै २/६२ ). ८४३ **प्रीति** ( हे २/१८ ), मागे २२६ पहा. ८४४ **सुललित** ( ना ८१ ), मागे ६३२ पहा. ८४५ **कामलतिका** ( हे २/३६ ), मागे २२७ पहा.

८४६ “**सु**”-**विशाला**, विशाला ( ना ८२ ), मागे ६३४ पहा. ८४७ रौ **व्रियोधा** ( प्रापै २/४५ ), मालती ( भ १५/९ गाप्राग्रामा ). विमोहा ( वाभू २/४५ ), वल्लरी ( पि ८७ टीप ). ८४८ “भ्जौ गः **शारदी**” ( हे २/६० ), छ. १३.

पञ्चमगति ( भ ३२/१२५ ). ८४९ न्सौ ल्गौ "**मुख**"-**कमल,** कमल ( प्रापै २/७४ ), मही ( भ ३२/१३३ ), अञ्चल ( पि ९० टीप ). ८५० भ्नौ ल्गौ "**सुर**"-**नदी** घैः, मागे "अमर" नदी २१३ पहा.

८५१ "नभलगा **गजगतिः**" ( गछ २/२१ ). ८५२ नौ सः "**कमलजा**", कमला ( प्रापै २/८२ ), मागे लघुमणिगुणनिकर २१७ पहा. ८५३ भ्जौ लौ '**वीरवर**'. ८५४ "रौ गो **हंसमाला**" ( हे २/५४ ), पद्ममाला ( पि ९० टीप ). हें वृत्त म्हणजे शालिनीवर्गातील आणि मन्दाक्रान्ता वर्गातील वृत्तांचा शेवटला गण होय. ८५५ "नस्या **विशाला**" ( हे २/१०१ ), मागे शलभ-विचलिता २२९ पहा.

८५६ **अुदय** ( हे २/९२ ), मागे ६३८ पहा. ८५७ **हलमुखी** ( के ३/१९ ), मागे ६३९ पहा. ८५८ रौ गौ **श्रुतानन्द** ( ना ९७ ). ८५९ **अशोका** ( हे २/१५२ ), मागे ६४० पहा. ८६० "**वीरलक्ष्मी**रियं रत्रया" ( पि ९२ टीप ), महालक्ष्मी ( प्रापै २/७६ ).

८६१ रौ र्गौ **भामिनी** ( निस ५१ ). ८६२ "नुगौ **चलधृतिः**" ( हे २/२७० ). ८६३ भ्जौ स्नौ गौ **कुट्मलमयूर** ङैः ( ना १५२ ). ८६४ "भ्जौ स्नौ ल्गौ **अिन्दुवदना**" ( हे २/२३९ ), अुदाहरणावरून मोडणी निर्णीत होत नाही; पण या वृत्ताची मोडणी [ । – ᵕ ᵕ ᵕ – ᵕ, । ᵕ ᵕ – ᵕ ᵕ ᵕ ᵕ । – ] अशी पद्मावर्तनीहि होअूं शकेल; परन्तु जेथे अेखाद्या विशिष्ट लगक्रमाची आवृत्ति चरणांत आढळते तेथे जेणेंकरून ती आवृत्ति भङ्गेल अशी मोडणी घेणें अुचित वाटत नाही. ८६५ **वरसुन्दरी** ( पि ८/९ ), स्खलित ( हे २/२३८ ), महिता, कान्ता ( हे ), वनमयूर ( हे, ना १४९ ), अिन्दुवदना ( के ३/८२ ). लगक्रमदृष्ट्या वरसुन्दरी हें वृत्त कुट्मलमयूरासारखेंच आहे; यती वेगळे म्हणजे 'घघैः' असे आहेत.

८६६ न्सौ न्भौ य् **विचित्रललिता** ( ना १५८ ). ८६७ "निजस्गा **ललितपदं** ङैः" ( हे २/२७३ ), ८६८ "नुर्गौ **वसुधारा** ङैः" ( हे २/२९७ ), वनजदल ( ना किटेल पृ. ५४ ), कुसुमशर ( निस १०८ ); पण खाली ८८३ पहा. ८६९ **स्रग्विणी** ( पि ६/३८ ), पद्मिनी ( भ १६/५४ ), लक्ष्मीधर

(प्रापै २/१२७), "रैश्चतुर्भिर्युता स्रग्विणी सम्मता" (के ३/५६). ८७० "नतिगा अुर्वशी" (हे २/१९५).

८७१ न्सौ यौ ल्गौ '**जनकतनया**' ङै:. ८७२ "न्सौ तौ गो **विद्युन्मालिका**" (हे २/२१०), मागे विद्युत् १३८ पहा. ८७३ "**विपिनतिलकं** नसनरेफयुग्मैर्भवेत्" (गच्छ २/१३६). ८७४ **निशिपालक** (प्रापै २/१६०), "शंस निशिपालकमिदं भजसनाश्वर:" (गच्छ २/१४७). ८७५ न्सौ ज्नौ ज्गौ '**नवमधु**'. "नगणसगणाङ्कितो जनजगुरुसंयुतो। भवति किल 'गुच्छको' वसुयतिविभूषित:" (रूस्तमाटीका १७१).

८७६ नुरौ '**सरसिरुहलोचना**' ङै:. ८७७ नौं भ्जौ स् '**विलोलनयना**'. ८७८ न्भौ ज्सौ न्गौ '**वंशतिलक**' घै:, सुललिता (ममच १८). ८७९ नौ न्जौ नौ ल् **चन्द्र** (वाभू २/२०१), चन्द्रमाला (प्रापै २/१९०). ८८० "**दया**" म्हणजे हंसमाला द्विरावृत्ता होय.

## ४८ आद्धरान्ता-वर्ग

८८१ **आद्धरान्ता** [।– ᴗ –।– ᴗ –।– ᴗ –।– ᴗ –।–]
८८२ "**कनकमयता**" [५ ल। ५ ल। ५ ल। ५ ल। –]
८८३ **कुसुमशर** [। ५ ल। ५ ल। ५ ल। ५ ल। ५ ल। – ᴗ ᴗ ᴗ। – –]
८८४ **केकिनी** [। ७ रगण। १ गुरु]
८८५ **नृत्तललित** [७ वेळा (– ᴗ ᴗ ᴗ) आणि २ गुरु]
८८६ **ललितलता** [७ वेळा (ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ) आणि (ᴗ ᴗ –)]
८८७ **स्वैरिणीक्रीडन** [८ रगण]
८८८ **मत्तमातङ्ग दण्डक** [९ रगण]
८८९ **पन्नग दण्डक** [। ᴗ ᴗ ᴗ –। ८ रगण]
८९० **चण्डकाल दण्डक** [। ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ। ८ रगण]
८९१ **दम्भोलि दण्डक** [। ᴗ ᴗ ᴗ –। ९ रगण]
८९२ **हेलावली दण्डक** [। ᴗ ᴗ ᴗ –। १० रगण]
८९३ **मालती दण्डक** [। ᴗ ᴗ ᴗ –। ११ रगण]

८९४ **केलि दण्डक** [ । ᵕ ᵕ ᵕ – । १२ रगण ]
८९५ **कङ्केलि दण्डक** [ । ᵕ ᵕ ᵕ – । १३ रगण ]
८९६ **लीलाविलास दण्डक** [ । ᵕ ᵕ ᵕ – । १४ रगण ]

## टीपा

८८१ रौ रौ गु **आक्रान्ता** ( रपि ८०६ ). ८८२ नूसौ "**कनकमयता**" ङैः, कनकलता ( निस १२१ ). हें वृत्त पद्मावर्तनी धरल्यास [ । ᵕ ᵕ ᵕ ᵕ ᵕ ᵕ ᵕ ᵕ । ᵕ ᵕ ᵕ ᵕ ᵕ ᵕ ᵕ ᵕ ᵕ । ᵕ ᵕ ᵕ ᵕ ᵕ – ] अशी त्याची मोडणी होऊन यती 'जजैः' असे होतील. ८८३ नृजसगाः **कुसुमशर** अञः ( ना २०५ ). ८८४ **केकिनी** ( रपि १२८० ). ८८५ "द्विर्भजसना भ्यौ **नृत्तललितं**" ( हे २/३८५ ), ललितवृत्त जजैः ( ना २०४ ).

८८६ "द्वादशना ल्गौ **ललितलता** त्रिर्जैः" ( हे २/३८६ ). ८८७ "**स्वैरिणीक्रीडनं** प्रोक्तमष्टभी रगणैर्युतम्" ( ममच १९ ). ८८८ **मत्तमातङ्ग दण्डक** ( हे २/४०४ ), मत्तमातङ्गलीलाकर ( गछ २/२३० ). ८८९ **पन्नग दण्डक** ( हे २/४०० ). ८९० **चण्डकाल दण्डक** ( हे २/४०१ ).

८९१ **दम्भोलि दण्डक,** ८९२ **हेलावली दण्डक,** ८९३ **मालती दण्डक,** ८९४ **केलि दण्डक,** ८९५ **कङ्केलि दण्डक** आणि ८९६ **लीलाविलास दण्डक** हे दण्डक अनुक्रमें १,२,३,४,५ आणि ६ रगण पन्नग दण्डकांत मिळवून होतात.

## ४९ चञ्चलाक्षी–वर्ग

८९७ **चञ्चलाक्षी** [ ᵕ ᵕ ᵕ ᵕ ᵕ ᵕ । – ᵕ – । – ᵕ – ]
८९८ "**ऋजुगति**" [ ᵕ ᵕ ᵕ ᵕ ᵕ । – ᵕ – । – ᵕ – । – ᵕ – ]
८९९ **निशा** [ २ नगण । स्रग्विणी ]
९०० **लालसा** [ – – ᵕ ᵕ ᵕ ᵕ । – ᵕ – ! ३ रगण ]
९०१ '**हेमकाञ्ची**' [ २ नगण । ५ रगण ]

| | | |
|---|---|---|
| ९०२ | मेघमाला | [ २ नगण । ६ रगण ] |
| ९०३ | चण्डवृष्टि दण्डक | [ २ नगण । ७ रगण ] |
| ९०४ | अर्ण दण्डक | [ २ नगण । ८ रगण ] |
| ९०५ | अर्णव दण्डक | [ २ नगण । ९ रगण ] |
| ९०६ | व्याल दण्डक | [ २ नगण । १० रगण ] |
| ९०७ | जीमूत दण्डक | [ २ नगण । ११ रगण ] |
| ९०८ | लीलाकर दण्डक | [ २ नगण । १२ रगण ] |
| ९०९ | उद्दाम दण्डक | [ २ नगण । १३ रगण ] |
| ९१० | शङ्ख दण्डक | [ २ नगण । १४ रगण ] |
| ९११ | आराम दण्डक | [ २ नगण । १५ रगण ] |
| ९१२ | सङ्ग्राम दण्डक | [ २ नगण । १६ रगण ] |
| ९१३ | सुराम दण्डक | [ २ नगण । १७ रगण ] |
| ९१४ | वैकुण्ठ दण्डक | [ २ नगण । १८ रगण ] |
| ९१५ | सोत्कण्ठ दण्डक | [ २ नगण । १९ रगण ] |
| ९१६ | सार दण्डक | [ २ नगण । २० रगण ] |
| ९१७ | कासार दण्डक | [ २ नगण । २१ रगण ] |
| ९१८ | विस्तार दण्डक | [ २ नगण । २२ रगण ] |
| ९१९ | संहार दण्डक | [ २ नगण । २३ रगण ] |
| ९२० | नीहार दण्डक | [ २ नगण । २४ रगण ] |
| ९२१ | मन्दार दण्डक | [ २ नगण । २५ रगण ] |
| ९२२ | केदार दण्डक | [ २ नगण । २६ रगण ] |
| ९२३ | साधार दण्डक | [ २ नगण । २७ रगण ] |
| ९२४ | सत्कार दण्डक | [ २ नगण । २८ रगण ] |
| ९२५ | संस्कार दण्डक | [ २ नगण । २९ रगण ] |
| ९२६ | माकन्द दण्डक | [ २ नगण । ३० रगण ] |
| ९२७ | गोविन्द दण्डक | [ २ नगण । ३१ रगण ] |
| ९२८ | सानन्द दण्डक | [ २ नगण । ३२ रगण ] |
| ९२९ | सन्दोह दण्डक | [ २ नगण । ३३ रगण ] |
| ९३० | नन्द दण्डक | [ २ नगण । ३४ रगण ] |

### टीपा

८९७ **चञ्चलाक्षी,** चञ्चलाक्षिका ( पि ६/३६ ), गौरी ( पि ८/५ हे, ), प्रमुदितवदना ( हे २/१८२ ), मन्दाकिनी ( गछ २/६५ ), मागे प्रभा ३९८ पहा. ८९८ "**ऋजुगति**"; या वृत्ताला रणपिङ्गलकार किरात वा कुटिलगति ( रपि ८४२ ) म्हणतो; परन्तु कुटिलगति नावाचें निराळेंच वृत्त आहे, मागे १०१ पहा. ८९९ "**नौ रीर्निशा** डैः" ( हे २/३१५ ), नाराचक ( पि ८/१७ ), नाराचिका ( गछ २/२२३ ), तारका ( कद ४/८५ ), कोकिला ( नि ११५ ), महामालिका ( के परिशिष्ट ), सिंहविक्रीडित ( केनिआ ६५ ). ९०० **लालसा,** "सैका वसुविरातिस्तनौ रैश्चनुर्भिर्युता लालसा" ( गछ २/१८९ ).

९०१ '**हेमकाञ्ची**'. ९०२ **मेघमाला** ( भ १६/१०३–१०४ ), "नौ रूर्मेघमाला" ( हे २/३६८ ), भृङ्गाब्जनीलालका ( हे ). ९०३ "नार्कै **चण्डवृष्टि**" ( हे २/३९१ ), चण्डवृष्टिप्रपात ( पि ७/३३ ). ९०४–९१० "प्रतिचरणविवृद्धरेफाः स्युरर्णार्णवव्यालजीमूतलीलाकरोद्दामशङ्खादयः" ( के ३/११३ ). ९११–९३० वृत्तरत्नाकरावरील नारायणभट्टीय व्याख्या ( पृ. १०६ ) पहा.

## परिच्छेद ६ वा

# अर्धसम-वृत्तें

अर्धसमवृत्तांतील चतुष्पदी ही दोन प्रकारांनी सिद्ध होअू शकते. पहिले दोन चरण अेका लगावलीचे आणि पुढील दोन चरण भिन्न लगावलीचे मिळून जी चतुष्पदी होअील तिचें वृत्त अर्धसम समजायला प्रत्यवाय नसावा. अशा अर्धसम रचनेचीं आढळलेलीं अुदाहरणें पुढील अध्यायांत म्हणजे वृत्तविहारांत दिली आहेत. परन्तु ( ९३१ ) **सौम्या** आणि ( ९३२ ) **ज्योति** ( मागे पृ. २३, ९३ पहा ). हीं दोन वगळल्यास या प्रकारच्या अर्धसमवृत्तांना अद्यापि मान्यता मिळालेली नाही.

अितर अर्धसमवृत्तें हीं दोन निरनिराळ्या लगावली मिळून जी रचना होते तिच्या द्विरावृत्तीने होतात. हीं अर्धसम वृत्तें सुद्धा साहजिकपणेंच सम-

वृत्तांप्रमाणे अनावर्तनी, पद्मावर्तनी, अग्न्यावर्तनी, भृङ्गावर्तनी आणि हरावर्तनी अशीं आहेत.

## अनावर्तनी अर्धसम-वृत्तें

### ५० आख्यानकी-वर्ग

९३३ **आख्यानकी** { [— — ⏑ — — | ⏑ ⏑ — ⏑ — —] अिन्द्रवज्रा
[⏑ — ⏑ — — | ⏑ ⏑ — ⏑ — —] अुपेन्द्रवज्रा

९३४ **विपरीताख्यानकी** { [⏑ — ⏑ — — | ⏑ ⏑ — ⏑ — —] अुपेन्द्रवज्रा
[— — ⏑ — — | ⏑ ⏑ — ⏑ — —] अिन्द्रवज्रा

९३५ **शिशिरा** { [— — ⏑ — — | ⏑ ⏑ — ⏑ — ⏑ —] अिन्द्रवंशा
[⏑ — ⏑ — — | ⏑ ⏑ — ⏑ — ⏑ —] वंशस्थ

९३६ **हरिणप्लुता** { [⏑ ⏑ — ⏑ ⏑ — | ⏑ ⏑ — ⏑ —] विदुषी
[⏑ ⏑ ⏑ — ⏑ ⏑ — | ⏑ ⏑ — ⏑ —] द्रुतविलम्बित

९३७ **मकरावली** { [⏑ ⏑ ⏑ — ⏑ ⏑ — | ⏑ ⏑ — ⏑ —] द्रुतविलम्बित
[⏑ ⏑ ⏑ — ⏑ ⏑ — | ⏑ ⏑ — | ⏑ ⏑ — ⏑ —]
"प्रगुणीकृता"

९३८ **'तनुतमा'** { [⏑ ⏑ ⏑ — ⏑ ⏑ — | ⏑ ⏑ — ⏑ —] द्रुतविलम्बित
[⏑ ⏑ — ⏑ — ⏑ ⏑ ⏑ — ⏑ ⏑ —] प्रमिताक्षरा

#### टीपा

**९३३ आख्यानकी** "ताजगगा जतजगगा **आख्यानकी. ९३४** "व्यत्यये विपरीतादिः" (हे ३/६). **९३५** ताजरा जतजरा **शिशिरा.** (वैद्यनाथ शास्त्री वरकल यांची टीप के पृ. ७९).

**९३६ हरिणप्लुता** (वबृ १०३/२८, हे ३/१), हरिणोद्धता (कद ४/११४), "त्रिसकारचितैर्भवतो लगौ। नभभरैश्च गणैर्हरिणप्लुतम्" (अुवबृ १०३/२८). **९३७** "नभभ्रा नभिरा **मकरावली**" (हे ३/१०). **९३८** नभभ्राः सजससाः **'तनुतमा.'**

## पद्मावर्तनी अर्धसमवृत्तें

### ५१ केतुमतीवर्ग

९३९ केतुमती { [⏑ ⏑ – | ⏑ – ⏑ ⏑ ⏑ – | –] प्रमिता
[– ⏑ ⏑ | – ⏑ – ⏑ ⏑ ⏑ | – –] " नवशालिनी "

९४० अिला { [⏑ ⏑ – ⏑ – ऽ] मदनप्रिया
[⏑ ⏑ – ⏑ ⏑ – | ⏑ ⏑ – ⏑ – ऽ] विदुषी

९४१ मृगाङ्कमुखी { [⏑ ⏑ – ⏑ – ऽ] मदनप्रिया
[⏑ ⏑ | मदिरा ] दुर्मिल

९४२ अच्युतक { [| ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ⏑ ⏑ | – ⏑ ⏑ –] द्रुतपादगति
[| – ⏑ ⏑ – ⏑ ⏑ | – ⏑ ⏑ –] चित्रगति

९४३ 'मधुपिङ्गल' { [⏑ ⏑ | – ⏑ ⏑ – ⏑ ⏑ | – ⏑ ⏑ –] तोटक
[– | – ⏑ ⏑ – ⏑ ⏑ | – ⏑ ⏑ –] मोटक

९४४ 'सुविनीता' { [| – – ⏑ ⏑ – | ⏑ ⏑ – –] " कपिलाक्षी "
[| – ⏑ ⏑ – ⏑ ⏑ | – ⏑ ⏑ – –] दोधक

९४५ वेगवती { [| ⏑ ⏑ – ⏑ ⏑ – | ⏑ ⏑ – –] मेघवितान
[| – ⏑ ⏑ – ⏑ ⏑ | – ⏑ ⏑ – –] दोधक

९४६ कौमुदी { [⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – | ⏑ ⏑ – ⏑ ⏑]
[| ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – | ⏑ – – ⏑ –] प्रभा

९४७ 'क्षुत्क्षीण' { [| – – ⏑ ⏑ – | ⏑ – ⏑ –] " सुलोचना "
[| – – – ⏑ ⏑ | – ⏑ – ⏑ –] शुद्धविराट्

९४८ वियोगिनी { [| ⏑ ⏑ – ⏑ ⏑ – | ⏑ – ⏑ –] 'चारुलोचना'
[| ⏑ ⏑ – – ⏑ ⏑ | – ⏑ – ⏑ –] सीधु

९४९ अपरवक्त्र { [| ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – | ⏑ – ⏑ –] प्रसभ
[| ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ⏑ ⏑ | – ⏑ – ⏑ –] मालती

९५० 'श्रुतकीर्ति' { [| – – ⏑ ⏑ – | ⏑ – ⏑ –] " सुलोचना "
[| – ⏑ – ⏑ ⏑ ⏑ | – ⏑ – ⏑ –] रथोद्धता

९५१ 'सम्पदा' { [| ⏑ ⏑ – ⏑ ⏑ – | ⏑ – ⏑ –] 'चारुलोचना'
[| – ⏑ – ⏑ ⏑ ⏑ | – ⏑ – ⏑ –] रथोद्धता

९५२ 'माण्डवी' { [ | ∪ — ∪ — — | ∪ — ∪ — ] 'नृपात्मजा'
[ | — — — ∪ ∪ | — ∪ — ∪ — ] शुद्धविराट्

९५३ 'अुर्मिळा' { [ | ∪ — ∪ — — | ∪ — ∪ — ] 'नृपात्मजा'
[ | ∪ — ∪ — — | — ∪ — ∪ — ] 'चारुलक्षणा'

९५४ 'विदाहिनी' { [ ∪ — ∪ — — | ∪ — ∪ — ] 'नृपात्मजा'
[ | — ∪ — ∪ ∪ ∪ | — ∪ — ∪ — ] रथोद्धता

९५५ 'शुभोदय' { [ ∪ — ∪ ∪ ∪ — | ∪ — ∪ — ] 'कटाक्षललिता'
[ — ∪ — ∪ ∪ ∪ | — ∪ — ∪ — ] रथोद्धता

९५६ अुपचित्र { [ | ∪ ∪ — ∪ ∪ — | ∪ ∪ — ∪ — ] विदुषी
[ | — ∪ ∪ — ∪ ∪ | — ∪ ∪ — — ] दोधक

९५७ द्रुतमध्या { [ | — ∪ ∪ — ∪ ∪ | — ∪ ∪ — — ] दोधक
[ | ∪ ∪ ∪ ∪ — ∪ ∪ | — ∪ ∪ — — ] तामरस

९५८ 'विपुलकरा' { [ | ∪ ∪ ∪ ∪ — ∪ ∪ | — ∪ ∪ — — ] तामरस
[ | — ∪ ∪ — ∪ ∪ | — ∪ ∪ — — ] दोधक

९५९ करिणी { [ | — — — ∪ ∪ | — ∪ ∪ — — ] "अुन्नत"
[ | ∪ ∪ — — ∪ ∪ | — ∪ ∪ ∪ ∪ — ] नगमाहिता

९६० विकसितलीला { [ | — ∪ ∪ — ∪ ∪ | — — ∪ ∪ — ] कलस्वन
[ | ∪ ∪ ∪ ∪ — ∪ ∪ | ∪ ∪ ∪ ∪ — — ] मदललिता

९६१ 'वरमानिनी' { [ | — ∪ ∪ — ∪ ∪ | — ∪ ∪ — ∪ ∪ ] मोदक
[ | — ∪ ∪ — ∪ ∪ | — ∪ ∪ — S ∪ | — ]

९६२ भद्रविराट् { [ | — — ∪ ∪ — | ∪ — ∪ — — ] "अिरा"
[ | — — — ∪ ∪ | — ∪ — ∪ — | — ] अेकरूप

९६३ मालभारिणी { [ | ∪ ∪ — ∪ ∪ — | ∪ — ∪ — — ] "अमला"
[ | ∪ ∪ — — ∪ ∪ | — ∪ — ∪ — | — ] बधिरा

९६४ पुष्पिताग्रा { [ | ∪ ∪ ∪ ∪ ∪ ∪ — | ∪ — ∪ — — ] काममत्ता
[ ∪ ∪ ∪ ∪ — ∪ ∪ | — ∪ — ∪ — | — ] सुवक्त्रा

९६५ दिविजकल्पलता { [ — ∪ — ∪ ∪ ∪ | — ∪ — ∪ — ] रथोद्धता
[ ∪ ∪ ∪ — ∪ ∪ ∪ | — ∪ — ∪ — ] प्रियंवदा

९६६ मञ्जुसौरभ { [ | ∪ ∪ ∪ ∪ — ∪ ∪ | — ∪ — ∪ — ] मालती
[ | ∪ ∪ — ∪ — S | ∪ ∪ — — — | ∪ — ∪ — ]
"सौरभी"

९६७ मितभाषिणी { [ ⏑ ⏑ – ⏑ – ⏑ | ⏑ ⏑ – ⏑ – ⏑ | – ]
[ ⏑ ⏑ – ⏑ – ⏑ | ⏑ ⏑ – ⏑ ⏑ – ] प्रमिताक्षरा

९६८ मानिनी
{ [ – ⏑ ⏑ | – ⏑ – ⏑ ⏑ ⏑ | ⏑ – ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ | – ] "सुरसरिता"
[ ⏑ ⏑ ⏑ ⏑ | – ⏑ – ⏑ ⏑ ⏑ | – ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ | – ] 'अुडुपथ'

९६९ रविप्रभा
{ [ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ⏑ ⏑ | – ⏑ ⏑ – ⏑ ⏑ | – ⏑ ⏑ – ⏑ ⏑ | – ]
[ – ⏑ ⏑ – ⏑ ⏑ | – ⏑ ⏑ – ⏑ ⏑ | – ऽ ⏑ – ⏑ ⏑ | – ]

९७० 'अन्तर'
{ [ | – ⏑ ⏑ – ⏑ ⏑ | – ⏑ ⏑ – ⏑ ⏑ | – ⏑ ⏑ – ⏑ ⏑ | – ⏑ ⏑ – ] मदिरा
[ ⏑ ⏑ | – ⏑ ⏑ – ] नलिनी

९७१ 'अुत्तमवंशा'
{ [ ८ ल | ८ ल | ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ⏑ ⏑ | – – ] "तिलकित"
[ ⏑ ⏑ | – – – ⏑ ⏑ | – – ] सम्बुद्धि

९७२ शिखा { [ ८ ल | ८ ल | ८ ल | ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ]
[ ८ ल | ८ ल | ८ ल | ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ]

९७३ खञ्जा { [ ८ ल | ८ ल | ८ ल | ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ]
[ ८ ल | ८ ल | ८ ल | ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ]

टीपा

९३९ "सजस्गा भर्नगगाः **केतुमती**" (हे ३/५), "असमे सजौ सगुरुयुक्तौ। केतुमती समे भरनगाद्गः" (के ४/५). ९४० "स्लगा सिल्गा **अिला**" (हे ३/२८).

९४१ "स्लगाः **सुर्मृगाङ्कमुखी**" (हे ३/२९). ९४२ नजजल्गा भिगौ **अच्युतक** (ना २०७). ९४३ सीः तजजलगा '**मधुपिङ्गल**'. ९४४ तज्या भिगगा '**सुविनीता**'. ९४५ **वेगवती** (हे ३/२), आपातलिका (हे). "विषमे प्रथमाक्षरहीनं। दोधकमेवाहि वेगवती स्यात्" (गच्छ ३/२).

९४६ "अयुजि ननभभाः समकेऽपि तु। नयुगरयुगलं तदा **कौमुदी**" (गच्छ ३/१३). ९४७ तजरा मस्जगाः '**क्षुत्क्षीण**'. ९४८ **वियोगिनी**

( मल्लिनाथ, ममच २१ ), प्रबोधिता ( हे ३/१२ ), सुन्दरी ( गछ ३/६ ), ललिता (केनिआ ७७), " विषमे ससजा गुरुः समे । सभरालोऽथ गुरुर्वियोगिनी" ( मल्लिनाथ कुस ४/१ ). ९४९ **अपरवक्त्र,** " ननरलगयुतौ नजौ जरौ भवति सदापरवक्त्र मीदृशम् " ( अुवबृ १०३/१५ ). ९५० तजरा रनरल्गाः '**श्रुतकीर्ति** '.

९५१ ससजगा रनरल्गाः '**सम्पदा**'. ९५२ जतरा मसज्गा '**माण्डवी**'. ९५३ जतरा जमज्गा '**अुर्मिळा.**' ९५४ जतरा रनरल्गा '**विदाहिनी.**' ९५५ जस्जगा रनरल्गाः '**शुभोदय**'.

९५६ **अुपचित्र** ( स्वछ २/३, हे ३/२ ). " विषमे यदि सौ सलगा दले । भौ युजि भाद् गुरुकावुपचित्रम् " ( के ४/१ ). ९५७ **द्रुतमध्या** ( हे ३/२, कद ४/११५ ), चलमध्या ( स्वछ २/५ ), श्रुतमध्या ( निस १३५ ); " भत्रय मोजगतं गुरुणी चेत् । युजिच नजौ ज्ययुतौ द्रुतमध्या " ( के ४/२ ). ९५८ द्रुतमध्याव्यत्यये '**विपुलकरा**'. ९५९ " मसागाः सभासाः **करिणी** " (हे ३/११) ९६० " भातल्गा न्जन्सगा **विकसितलीला** " ( हे ३/१६ ).

९६१ भभभभा भभभरा '**वरमानिनी**'. ९६२ **भद्रविराट्** ( हे ३/४ ); " ओजे तपरौ जरौ गुरुश्चेत् । म्सौ ज्गौ ग् भद्रविराड् भवेदनोजे " ( के ४/४). ९६३ साज्गागाः स्भर्या **मालभारिणी** ( हे ३/१५ ), नितम्बिनी ( हे ); फलिताग्र ( ममच २२ ). " विषमे ससजा यदा गुरूचेत् सभरा येन तु माल भारिणीयम्" ( गछ ३/१५ ). ९६४ **पुष्पिताग्रा** ( हे ३/१४ ), " भवति जगति नौ ततश्च रो यो । नजसहितैर्जरगैश्च पुष्पिताग्रा " ( अुवबृ १०३/१७ ). ९६५ रनरल्गा नभज्रा **दिविजकल्पलता** ( ना २०८ ).

९६६ **मञ्जुसौरभ;** "यदि विषमे भवतो नजौ जरौ । सजयाः समे तु रलौ गो मञ्जुसौरभम्" ( गछ ३/१४). ९६७ **मितभाषिणी,** "ओजे सज्सजगा युक्ते सज्ससा मितभाषिणी" ( ममच २२ ). ९६८ "भ्नन्जनल्गा ञैः । न्जभजनसाष्टै**र्मानिनी**" ( हे ३/१७ ); हे यती मात्र अस्वाभाविक वाटतात. ९६९ नजुल्गा भीरसा **रविप्रभा** ( ना २०९ ). ९७० भृगौ सौ '**अन्तर**'.

९७१ 'अुत्तमवंशा'. हें वृत्त आणि त्याचें नाव हीं प्रापै ( २/२१५ ) या श्लोकावरून घेतलीं आहेत. या चतुष्पदींत चरणांत तीन खटके पडून खटक्या खटक्यांनी यमकें आहेत म्हणून हिला त्रिभङ्गी म्हटलें आहे. दुसऱ्या खटक्याचें स्थान निश्चित नसल्याने तो न मानतां चतुष्पदीची अष्टपदी करून अर्धसमवृत्तच मानणें अधिक सयुक्तिक वाटतें. ९७२ **शिखा** ( के २/३९ ). ९७३ **खञ्जा** ( के २/४० ). शिखा आणि खञ्जा या वृत्तरत्नाकरांत द्विपद्या आहेत; पण स्वयम्भू चतुष्पद्यांचीं अुदाहरणें देतो.

## अग्न्यावर्तनी अर्धसमवृत्तें

### ५२ भ्रान्तवर्ग

९७४ '**भ्रान्त**' *

{ [ | – ⏑ – – | – ⏑ – – | – ⏑ – – | – ⏑ – ] "देवप्रिया"
{ [ | – ⏑ – – | – ⏑ – ] "कादम्बरी"

टीपा

९७४ रतमयरा रतगा 'भ्रान्त'.

## भृङ्गावर्तनी अर्धसमवृत्तें

### ५३ वार-कामिनी-वर्ग

९७५ "**वार**"-कामिनी { [ – ⏑ – ] तडित्
{ [ ⏑ – ⏑ – | ⏑ – ⏑ – ] प्रमाणिका

९७६ **वानरी** { [ ⏑ – ⏑ – | ⏑ – ⏑ – ] प्रमाणिका
{ [ – ⏑ – ] तडित्

९७७ **शिखी** { [ – ⏑ – ] तडित्
{ [ ⏑ – ⏑ – | ⏑ – ⏑ – | ⏑ – ⏑ – ] विभावरी

९७८ **शिखण्डी** { [ ⏑ – ⏑ – | ⏑ – ⏑ – | ⏑ – ⏑ – ] विभावरी
{ [ – ⏑ – ] तडित्

९७९ **नितम्बिनी** { [ – ⏑ – ] तडित्
{ [ चार वेळा ( ⏑ – ⏑ – ) ] 'कलिन्दनन्दिनी'

९८० सारसी { [चार वेळा (ᴗ – ᴗ –)] 'कलिन्दनन्दिनी'
[– ᴗ –] तडित्

९८१ वारुणी { [– ᴗ –] तडित्
[५ वेळा (ᴗ – ᴗ –)] "मृणालिनी"

९८२ अपरा { [५ वेळा (ᴗ – ᴗ –)] "मृणालिनी"
[– ᴗ –] ताडित्

९८३ वतंसिनी { [– ᴗ –] तडित्
[६ वेळा (ᴗ – ᴗ –)] विपक्ष

९८४ सुहंसिक { [६ वेळा (ᴗ – ᴗ –)] विपक्ष
[– ᴗ –] तडित्

९८५ "प्रदीप्त" { [– ᴗ – ᴗ | – ᴗ –] 'सु" कामिनी
[ᴗ – ᴗ – | ᴗ – ᴗ –] प्रमाणिका

९८६ यवान्विता { [– ᴗ – ᴗ | – ᴗ – ᴗ | – ᴗ – ᴗ] "अिन्दुकान्त"
[ᴗ – ᴗ – | ᴗ – ᴗ – | ᴗ – ᴗ – | ऽ –] "धरित्री"

९८७ षट्पदावली { [ᴗ – ᴗ – | ᴗ – ᴗ – | ᴗ – ᴗ – | ऽ –] "धरित्री"
[| – ᴗ – ᴗ | – ᴗ – ᴗ | – ᴗ – ᴗ] "इन्दुकान्त"

९८८ "मोदमयी" *
{ [ᴗ ᴗ – – | ᴗ ᴗ – – | ᴗ ᴗ – – | ᴗ ᴗ –] "प्रियशिष्या"
[ᴗ ᴗ – – | ᴗ ᴗ –] अधिकारी

९८९ "रात्रिवितान"*
{ [| – – ᴗ ᴗ | – – ᴗ ᴗ | – – ᴗ ᴗ | – –] 'शुभकामी'
[– – ᴗ ᴗ | – –] तनुमध्या

टीपा

९७५ "**वार**"-**कामिनी,** "रो ज्रल्गाः कामिनी" (हे ३/१८) ९७६ वारकामिनीव्यत्यये **वानरी** (हे ३/२३). ९७७ "रो ज्रज्रा **शिखी**" (हे ३/१९). ९७८ शिखिव्यत्यये **शिखण्डी** (हे३/२४). ९७९ "रो ज्रज्रा ज्गौ **नितम्बिनी**" (हे ३/२०). ९८० नितम्बिनीव्यत्यये **सारसी** (हे ३/२५).

९८१ "रस्त्रि ज्रौं ल्गा **वारुणी**" (हे ३/२१). ९८२ वारुणीव्यत्यये **अपरा** (हे ३/२६). ९८३ "रश्चतुर्ज्रौं **वतंसिनी**" (हे ३/२२). ९८४ **सुहंसिका,** वतंसिनी व्यत्यये हंसी (हे ३/२७). ९८५ रज्गा ज्रल्गा '**प्रदीप्त**'.

९८६ **यवान्विता,** "र्जर्जा ज्रज्रगा यववती। छन्दोवशाच्च यवान्विता-मित्युक्तम्" (हे ३/८), परावती (ममच २२). पण पहा 'स्यादयुग्मके रजौ रजौ समेतु। जरौ जरा गुरुर्यवात् परामतीयम्' (केनिआ ७९) म्हणजे, यवात् यवशब्दांत परा मतीयवमती अित्यर्थः! ९८७ यवान्विताव्यत्यये **षट्पदावली** (हे ३/९),. ९८८ सभतयसाः सभगा "**मोदमयी***". ९८९ तयसभगगाः स्त्यौ '**रात्रिवितान**'.*

## हरावर्तनी अर्धसमवृत्तें

### ५४ कल्पना-वर्ग

९९० "**कल्पना**" { [।— ⏑ —।— ⏑ —।— ⏑ —।— ⏑ —] स्रग्विणी
[।— ⏑ —।— ⏑ —।— ⏑ —] वीरलक्ष्मी

### टीपा

९९१ री रिः "**कल्पना**".

### पुरवणी

३२ अ '**कोणोदय**' [— — ⏑ —! ⏑ ⏑ ⏑ ⏑ — ⏑ — ⏑ — —]
त्भौ स्जौ गौ '**कोणोदयः**' घैः.

---

अध्याय ४ था

# वृत्तविहार

ज्या वृत्तांचीं अुदाहरणें वाङ्मयांत आढळतात त्या वृत्तांचीं प्राचीन वा मी स्वतः रचून घातलेलीं अुदाहरणें या प्रकरणांत दिलीं आहेत. वृत्ताच्या नावापुढे जो अनुक्रमाङ्क आहे तो त्या वृत्ताचा मागील प्रकरणांतील अनुक्रमाङ्क समजावा. ज्या श्लोकाच्या पुढे कंसांत अनुक्रमाङ्क आहे तो श्लोक मी रचिला आहे असें समजावें.

**अिन्द्रवज्रा** ( ११ ) [ – – ᴗ – – । ᴗ ᴗ – ᴗ – – ]

जें अेक सत्यासच नित्य सेवी
तें चित्त लोकोत्तर होय केवी ?
पुष्पाहुनी कोमल अन्तरङ्गीं
तें **अिन्द्रवज्रा**हि सलील भङ्गी. ( १ )

‘**आनन्दशब्द**’ ( १३ ) [ – – ᴗ – – । ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ᴗ – – ]

“ छन्दो गृहीत्वा हयवरुभूषणानि
अुद्यान प्राप्तो नरवरुपुङ्गवस्य
अुद्यानपालः प्रमुदितु वेगजातः
**आनन्दशब्द** प्रति भणि शाकियानाम् ” ( लवि २८६ )

ललितविस्तरांतील या प्रकारच्या रचनेंत प्रथमाक्षर कोठे गुरु तर कोठे लघु आढळतें.

अिन्द्रवज्राच्या आद्याक्षराच्या ठिकाणीं दोन लघू घालून जें वृत्त स्वाभाविकपणें सिद्ध झालें त्याला कान्होबा रणछोडदास कीर्तिकर यांनी आपल्या अिन्दिरा काव्यांत अिन्दिरा हें नाव दिलें आहे. पण हें वृत्त केकिरव या नावाने छन्दोनुशासनांत आढळतें. या वृत्ताचीं अुदाहरणें अिन्दिरा काव्यांत अनेक आहेत.

**केकिरव** ( १४ ) [ ᴗ ᴗ – ᴗ – – । ᴗ ᴗ – ᴗ – – ]

पसरी पिसारा जरि मत्त केकी,
मिरवूं स्वतःला पिक ना शके की,
वचनीं पिकाच्या परि हृद्य भाव,
अुलटा परी **केकिरव**—प्रभाव. ( २ )

**अुपेन्द्रवज्रा** ( १५ ) [ ‿ – ‿ – – । ‿ ‿ – ‿ – – ]

करी कसूनी प्रियभूमिसेवा
तयास पोटास असे नसे वा;
परी तया जो अळशी विलासी
**अुपेन्द्र वज्रा**सन दे मिराशी. ( ३ )

अिन्द्रवज्रा आणि अुपेन्द्रवज्रा यांच्या मिश्रणास मुख्यत्वें **अुपजाति** म्हणतात. विरहाङ्क ( वित्र ५/२१ ) तेवढा अुपजातीस **मिश्र** म्हणतो. दीर्घ काव्यांत सर्गाचे सर्ग अुपजातींत रचलेले असतात. अुपजातींत अिन्द्रवज्रा–अुपेन्द्रवज्राचे चरण किती आणि कोणत्या क्रमाने येअूं शकतील याचा विचार करून जे चौदा प्रकार ( मागे पृ. २६ पहा ) कल्पण्यांत आले आहेत त्यांचीं अुदाहरणें मराठींत निरञ्जनमाधवाने आपल्या श्रीमहालक्ष्मीस्तोत्रांत ( निक १/६० ) दिलीं असून त्यांतच त्यांचीं नावेंहि ग्रथित केलीं आहेत.

**वसन्ततिलका** ( २० ) [ – – ‿ – ‿ ‿ ‿ – । ‿ ‿ – ‿ – – ]

आम्रांसवें बहरते ‘ मधुमाधवी ’ ती,
‘ अुद्धर्षिणी ’ श्रवणिं ये पिकभावगीती,
‘ सिंहोन्नता ’ अुपवनीं ठुमके कपोती—
कोठे **वसन्ततिलका** दयिता अहो ती ! ( ४ )

**ऋषभ** ( २१ ) [ ‿ ‿ – ‿ – ‿ ‿ ‿ – । ‿ ‿ – ‿ – – ]

नृप नाभि होय जगतांत खरा सुदैवी,
महिषीहि धन्यच तयापरि मेरुदेवी,
सुत हो तयांस, जिन तोच विरक्तराज,
**ऋषभ** प्रणम्य म्हणुनीच जगास आज. ( ५ )

**स्वर्णाक्षी** ( २३ ) [ – – – ! ⏑ – ⏑ ⏑ ⏑ – ! ⏑ ⏑ – ⏑ – – ]

सोनेरी किती विपुल हा तव केशभार,
कान्तीचें सुवर्ण विलसे किति हें अपार !
प्रेमाची कुणी भिक तुझ्या जवळोनि याची,
—**स्वर्णाक्षी** ! क्षुधा अजुनि का तुज सोनियाची ? ( ६ )

**अिन्द्रवंशा** ( २६ ) [ – – ⏑ – – । ⏑ ⏑ – ⏑ – ⏑ – ]

खाणींतही दुर्मिळ रत्न सुन्दर,
होती जरी प्राप्त अुदण्ड पत्थर;
देती कसे मान तयांस सन्मती
जे **अिन्द्रवंशा**मधि फक्त जन्मती ? ( ७ )

भरत हें वृत्त देत नाही. याचीं अुदाहरणें फारच दुर्मिळ आहेत. वंशस्था-प्रमाणे या वृत्तांत सर्गचे सर्ग लिहिलेले आढळत नाहीत. ( वब्रृ ३०/१५, ४२/५८ ) हीं दोन अिन्द्रवंशाचीं अुदाहरणें आहेत. भागवतांत अधिक मिळ-तील. श्रीरामचन्द्रसूरिप्रणीत 'जिनस्य दृष्टान्तगर्भस्तुतिद्वात्रिंशिका' हें स्तोत्र मात्र अिन्द्रवंशावृत्तांत आहे. मराठींत वर्नाविहार १ ला सर्ग आणि 'मजुरावर अुपासमारीची पाळी', ( केक ४२ ) ही कविता हीं अिन्द्रवंशावृत्तांत आहेत.

"अश्रान्त देखूनि वनप्रिया रवा
साङ्गे कनिष्ठा वचनाप्रिया रवा
हे द्रौपदी जे सुकुमार राणी
चालोनिया कष्टलि फार रानीं" ( वाविप १/६२ )

हें अिन्द्रवंशा आणि अिन्द्रवज्रा यांच्या मिश्रणाचें अुदाहरण आहे.

**वंशस्थ** ( २८ ) [ ⏑ – ⏑ – – । ⏑ ⏑ – ⏑ – ⏑ – ]

कवी म्हणूनी भजतां तया जनीं
म्हणे तुका, बोलविता दुजा धनी;
असे हरि प्रेरक राग-योजनीं,
क्षणैक **वंशस्थ** दिसे दिसो ध्वनी. ( ८ )

"अनेन दष्टो मदनाहिना हि ना
न कश्चिदात्मन्यनवस्थितः स्थितः
मुमोह वोध्योर्ह्यचलात्मनो मनो
बभूव धीमांश्च स शन्तनुस्तनुः" ( असौ १०/५६ )

हा आणि याच्या पुढील श्लोक दोन्ही, चरणान्तीं येणाऱ्या निरन्तर अक्षरावृत्तीसाठी विचारणीय आहेत.

अिन्द्रवंशा–वंशस्थ मिळून होणाऱ्या अुपजातीचीं अुदाहरणें भागवत वगळल्यास संस्कृतांत दुर्मिळच आहेत. भाक २२ हें अेकच अुदाहरण मला आढळलें. कुस १४ व्या आणि १५ व्या सर्गांत अशीं अुदाहरणें आढळतात हें ते सर्ग प्रक्षिप्त आहेत याचेंच अेक द्योतक आहे. अमरचन्द्रसूरीनें मात्र बालभारत आदिपर्व ८ वा सर्ग आणि पद्मानन्द ३ रा सर्ग हे या अुपजातींत रचिले आहेत. शिशुपालवधाचा १२ वा सर्ग आणि हरिचन्द्रकृत धर्मशर्माभ्युदयाचा ९ वा सर्ग हे अिन्द्रवंशा–वंशस्थ मिळून होणाऱ्या शिशिरानामक अर्धसमवृत्तांत आहेत. वब्रृ ( १२/९, ४२/३४ ) हीं दोन अुदाहरणेंहि शिशिराचींच आहेत.

" अरक्षितं तिष्ठति दैवरक्षितं
सुरक्षितं दैवहतं विनश्यति
जीवत्यनाथोऽपि वने विसर्जितः
कृतप्रयत्नोपि गृहे न जीवति " ( शाप ४४६ ).

मराठींत पुढील अुदाहरण सुप्रसिद्ध आहे.

" पितां स्तनातें क्षणमात्र राहणें,
महादरें मातृमुखासि पाहणें,
वक्त्रांत तें दुग्ध तसेंचि वाहणें,
तेणेंचि फूत्कार करूनि नाहणें ". ( मोसारा ७/२ )

हा ७ वा सर्ग (मोसग्र ८/४९७ ) या अुपजातींत आहे.

**मञ्जुभाषिणी** ( २९ ) [ ⏑ – ⏑ – – । ⏑ ⏑ ⏑ – ⏑ – ⏑ – ]

अुगीच का हें हृदय ने हरूनि ती ?
अहा प्रियेची चतुरता स्मरूं किती !

दुरूनि नेत्रां दिपवि ती सुहासिनी
धरी श्रुतीही करुण **मञ्जुभाषिणी.** ( ९ )

" प्रतोलिकानां प्रतिदिशं बहिर्दिवि
ध्वजाः सहस्रेण लघुभिर्ध्वजैर्वृताः
बभुः पताका ध्रुवममीषु पल्लवा
विभोर्नभोमण्डपगकीर्तिवल्लिजाः" ( अप १४/९० )

भिजी १४३ वी कविता या मञ्जुभाषिणीवृत्तांत आहे.

**मृदङ्ग** ( ३० ) [ – – ⏑ – ⏑ ⏑ ⏑ – | ⏑ ⏑ – ⏑ – ⏑ – ]

आशालुनीच कुणि देंअिल अैकुनी धन
चाटूक्तिने निज महत्त्व गमाविती जन;
आधीच घे करुनिया मुखलेप-सोय तो
काढी **मृदङ्ग** मधुर ध्वनि, धन्य होय तो. ( १० )

हें वृत्त कविप्रिय होण्याजोगें आहे.

**लक्ष्मी** ( ३१ ) [ – – ⏑ – ! ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ⏑ – ⏑ – ]

लक्ष्मीमुळे अुलट खुलेच लक्ष्म तें,
लक्ष्मीविना अिहसुख सर्व भस्मतें;
लक्ष्मी करी प्रखर रणींहि नन्दन—
**लक्ष्मी** ! तुला कवण करी न वन्दन ? ( ११ )

**रुचिरा** ( ३२ ) [ ⏑ – ⏑ – ! ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ⏑ – ⏑ – ]

न जीवनीं मधु रुचि अङ्गनेविणें,
रुचे कसें अरुचिर कण्ठणें जिणें;
वियत्पदाहुनि घडतां घडो च्युती,
धरी अुरीं घन **रुचिरा** क्षणद्युती. ( १२ )

भिजी १३९ वी कविता या रुचिरा वृत्तांत आहे. पुढील श्लोकांत रुचिरा नि वंशस्थ यांचें मिश्रण आहेः—

" निहत्य तं नरपतिमिन्द्रविक्रमं
सखायमिन्द्रस्य तदैन्द्रिराहवे
ततो परांस्तव जयकाङ्क्षिणो नरान्
बभञ्ज वायुर्बलवान्द्रुमानिव " ( मभा–द्रोप २९ )

हा श्लोक अर्धसमवृत्तासारखा आहे; पुढील तसा नाही.

" ततो रथद्विपभटसादिनायकैः
करालया परिवृत आत्मसेनया
मृदङ्गभेर्यानकशङ्खगोमुखैः
प्रघोषघोषितककुभो निराक्रमत् " ( भाग १०/७१/१४ )

' **कोणोदय** ' ( ३२ अ ) [ – – ⏑ – । ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ⏑ – ⏑ – – ]

" **कोणोदये** भृगुतनयेऽस्तचक्रसन्धौ
वन्ध्यापतिर्यदि न सुतर्क्षमिष्टयुक्तम्
पापग्रहैर्व्ययमदलग्नराशिसंस्थैः
क्षीणे शशिन्यसुतकलत्रजन्मधीस्थे " ( वबृजा २३/४ )

**रुक्मिणी** ( ३३ ) [ ⏑ – ⏑ – ! ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ⏑ – ⏑ – – ]

वरील का कधि गवळ्यास राजबाळी
जरी तिच्या मनसिज अन्तरास जाळी ?
परी शके अवगणुं नीच रुक्मि-नीती
हरीस हो प्रिय म्हणुनीच **रुक्मिणी** ती. ( १३ )

" कृपाघना, मजवर सुप्रसन्न व्हावें,
अनाथ मी, सतत सहाय तू असावें;
तुझ्याविना अितरसखा नसेचि मातें,
त्वदाश्रयें सहज तरेन मी भवातें ". ( पार )

( मोकुल ४/४८ ) हा श्लोक रुक्मिणी वृत्ताचाच आहे.

**" सु "–रुचिरा** ( ३४ ) [ ⏑ – ⏑ – ! ⏑ ⏑ ⏑ ⏑ – – ⏑ – – ]

हवी भवीं रुचिर सखी शान्तवाया,
तिच्यामुळे अधन भुले भ्रान्त वाया;

समर्थ जो अुचित पहा तोच्च तीज—
जगांत का न **सुरुचिरा** युद्धबीज? ( १४ )

भिजी १४० वी कविता या सुरुचिरा वृत्तांत आहे.

**प्रहर्षिणी** ( ३५ ) [– – – ! ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ᴗ – ᴗ – –]

आकाशीं जलकण तो त्यजूनि माय
रङ्गूनी रविकरसङ्गतींत जाय;
येतां तो दुरि न करीच दुर्दिनीं ती,
वात्सल्यें अुरिंच धरी **प्रहर्षिणी** ती. ( १५ )

संस्कृतांत सौन्दरनन्द ( १७/७१–७३ ) हे श्लोक प्रहर्षिणीचे आहेत. मराठींत प्रहर्षणरामायण ( मोसग्र ७/४४३ ), वनविहार २ रा सर्ग आणि रेन्दाळकरकृत 'शुक्राची चान्दणी' ( रेक १/३०५ ) हीं प्रकरणें प्रहर्षिणी वृत्तांत आहेत.

'**म्लेञ्छ**' ( ३६ ) [– – – ᴗ ᴗ – ᴗ – ᴗ – ᴗ – –]

" **म्लेञ्छा**नामथ दोष्मतामधीशितारा–
वादत्तावधिकालपालनात्तचित्तौ
वीरेन्द्रान्कथमप्यमूनिवार्य युद्धात्
भेजाते शिबिरं निजं निजं रयेण " ( नह १२/७९ )

**घनमाला** ( ३७ ) [ᴗ ᴗ – – ! ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ᴗ – ᴗ – –]

हिणवी का कुणि तुजला म्हणून काळी?
नयनें हीं मदिर किती भरून आलीं?
अलि न शिवे कधि बघ केतकीस पोरी,
**घनमाला** सरस पहा कधी न गोरी. ( १६ )

भिजी १४९ वी कविता या घनमाला वृत्तांत आहे.

'**मधुमक्षिका**' ( ३८ ) [– ᴗ ᴗ – ! ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ᴗ – ᴗ – –]

कां बनतां अुगिच्च जगांत दीन गाअी?
दीनसखा प्रभु न दिसे, दशा बघा ही?
तृप्त तुम्ही अजुनिहि त्या भिकेवरी कां?
सङ्घ करा, मधु **मधुमक्षिकेपरी** खा. ( १७ )

" सृष्टिमधे असति अनेक दाखले, ते
पाहुनिया बहु मनुजा सुबुध्दि येते;
साचविती मधु **मधुमक्षिका** जुळून
कोट्यवधिद्रुमशिखरांवरि भ्रमून." (भिजी पृ. १०३ )

भिजी १६५ वी कविता ही रुक्मिणी वृत्तांत आहे म्हणून तेथे म्हटलें आहे तें चुकीचें आहे. ती या नवीन 'मधुमक्षिका' वृत्तांत आहे.

**रमा** ( ३९ ) [ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ! ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ⏑ – ⏑ – – ]

त्यजुनि हरी हरु बघतां हरिप्रियेला
अुर फुटुनी कवण रसातलीं न गेला?
कनक कुठे ? तनुहि बने अखेर माती,
हरिचरणीं रमुनि ठरू शके **रमा** ती. ( १८ )

" नृपति तदा नमुनि करें कुशासनातें;
कुलगुरुच्या करि बहु मान्य शासनातें;
हरिजिदरिप्रति हरिसैन्यराज राजा
मग जनक क्षितिपतिच्या म्हणे घरा जा. " ( मोकुल २/९ )

भिजी १७९ वी कविता रमावृत्तांत आहे.

"**निर्मला**" ( ४० ) [ ⏑ ⏑ – ⏑ – ⏑ – ]

सखि, तू जशी मला
तशि या महीतला
सुख देअि कौमुदी
हिमशीत **निर्मला**. ( १९ )

**रथोद्धता** ( ४१ ) [ – ⏑ – ⏑ ⏑ ⏑ – । ⏑ – ⏑ – ]

चन्द्रकोर गगनांत शोभते,
तारकागण झुले सभोवतें,
देवलोकमहिषीमनोज्ञता
ही जणू प्रकटवी **रथोद्धता**. ( २० )

**प्रियंवदा** ( ४२ ) [ ᴗ ᴗ ᴗ – ᴗ ᴗ ᴗ – । ᴗ – ᴗ – ]

काशि जिवास जगतीं हवी सखी
रुचिर जी करिल संसृतीस की ?
खचित ती विमलसौख्यसम्पदा
ऋत न जी अवगणी **प्रियंवदा**. ( २१ )

'चित्तबोधपञ्चक' ( खाक १९ ) आणि 'हलवा' ( च २४ ) या कविता प्रियंवदा वृत्तांत आहेत.

"**अभीष्ट**" ( ४३ ) [ ᴗ ᴗ ᴗ – ᴗ ᴗ – । ᴗ – ᴗ – ]

"नरक-अद्वयपाश जो हरी
वरि तयां युवतींस तो हरी;
द्विज तयाच सुमङ्गलाष्टकीं
रमति तेच जगीं **अभीष्ट** कीं." ( वाद्वा १/१० )

"सदनिं ठेवुनि सून एकली
प्रथम यौवनसुन्दरी भली
कलश आपण घेउनी करीं
द्विरदगामिनि जाय लौकरी." ( आकृ १ )

या प्रकरणांतील ३ रा श्लोकहि याच वृत्तांत आहे.

**ललिता** ( ४४ ) [ – – ᴗ – ᴗ ᴗ ᴗ – । ᴗ – ᴗ – ]

दारिद्र्यशोकमय हा असे भव,
प्रेमें तयांतहि मिळेच वैभव;
येवोत मेघ कितिही नभीं तरी
सौवर्ण हास्य **ललिता** गृहीं भरी. ( २२ )

हम्मीर महाकाव्य १२ वा सर्ग, अमरचन्द्रसूरिप्रणीत पद्मानन्द ५ वा सर्ग, आणि अमरचन्द्रसूरिप्रणीत बालभारत, विराटपर्व, ३ रा सर्ग हे ललितावृत्तांत आहेत.

**कनकप्रभा** ( ४५ ) [ ᴗ ᴗ – ᴗ – ᴗ ᴗ ᴗ – | ᴗ – ᴗ – ]

वरवर्णिनी विधुमुखी सुवासिनी
असतां गृहांतच सुधांशुहासिनी
सुकुमार चम्पकदलापरी निकी
न पडेल केंवि **कनकप्रभा** फिकी ? ( २३ )

विक्रमोर्वशीय ( ४/३३, ४/४३ ) आणि वबृजा ( २/१३ ) हीं संस्कृतांतील कनकप्रभावृत्ताचीं प्राचीन अुदाहरणें होत. मराठींत 'त्यज सर्व रोप, मज पाव, कां सया' ( मोसप्र ८/४७८ ) हें कनकप्रभावृत्ताचें अुदाहरण आहे. वनविहार ५ वा सर्ग, रणविहार ९ वा सर्ग, आणि गृहविहार १३ वा सर्ग, हे या कनकप्रभा वृत्तांत आहेत. या वृत्ताला मञ्जुभाषिणी म्हणणें योग्य नाही.

**स्वागता** ( ४७ ) [ – ᴗ – ᴗ ᴗ ᴗ – | ᴗ ᴗ – – ]

पद्मजेपरिस सुन्दर बाला
सिद्ध अर्थ चहुंही करण्याला
पातलीच जर होअुनि गेहीं
**स्वागता** कवण धाव न घेअी ? ( २४ )

प्राचीन मराठी कवितेंत कविकिङ्करकृत गरुडगर्वमोचन हें प्रकरण बहुतेक स्वागता वृत्तांत आहे.

**द्रुतपदा** ( ४८ ) [ ᴗ ᴗ ᴗ – ᴗ ᴗ ᴗ – | ᴗ ᴗ – – ]

जलधिजा जरि शके सुख द्याया,
परि तिचें सकल कौतुक वाया !
स्थिरमति प्रियतमा न सदा ही,
**द्रुतपदा** प्रणयि-मानस दाही. ( २५ )

वबृ ( ८/५३ ), वबृजा ( ४/६, ११/१० ) हीं द्रुतपदाचीं संस्कृतांतील अुदाहरणें आहेत. मराठींत सुमादु ( १३ ) हें अुदाहरण द्रुतपदाच्या निराळ्या आणि चुकीच्या लक्षणाप्रमाणे आहे. पुढील अुदाहरणांत द्रुतपदा आणि स्वागता यांचें मिश्रण आहे.

“ अनुचरैः समनुवर्णितवीर्य
आदिपूरुष अिवाचलभूतिः
वनचरो गिरितटेषु चरन्ती-
वेंणुनाह्वयति गाः स यदा हि ” ( भाग १०/३५/८ )

**चन्द्रवर्त्म** ( ५० ) [ – ᵕ – ᵕ ᵕ ᵕ – । ᵕ ᵕ ᵕ ᵕ – ]

रूप चन्द्रमुखि, श्यामल तव हें
शुक्रतुल्यसुमनोगुणनिवहें
भासतें सुभग अन् रुचिर जसें
**चन्द्रवर्त्म** अुडुमण्डित विलसे. ( २६ ).

**मणिरङ्ग** ( ५१ ) [ – ᵕ – ᵕ ᵕ – । ᵕ ᵕ – – ]

वर्ण हा हिमगौर तुझा गे
सुन्दरी, खुलुं दे अनुरागें
गुञ्जवी किति तैं बहिरङ्ग
बिम्बतां मधि **हृन्मणिरङ्ग** ! ( २७ )

**‘ लङ्का ’** ( ५२ ) [ ᵕ ᵕ ᵕ – ᵕ ᵕ – । ᵕ ᵕ – – ]

विभवमत्त हरी परजाया
तर बघे यश सत्वर जाया;
जनकजा टिकली अकलङ्का,
मलिन हो गतभर्तृक **लङ्का**. ( २८ )

‘ अभीष्ट ’वृत्ताप्रमाणेच ‘ लङ्का’वृत्तहि संस्कृतांत आढळत नाही. याचें नाव ‘ जळतसे त्रिकुटाचल लङ्का ’ ( भीमरूपी स्तोत्रें १२/३ ) या श्लोका-वरून घेतलें आहे. “ नमन गा तुज हें भिमराया ” हें रामदासी स्तोत्र ‘ लङ्का ’ वृत्तांत आहे. ‘ लङ्का ’ वृत्ताचें आणखीहि अक अुदाहरण आहे.

“ हरि म्हणे गरुडा, हृदयांत
अभय होअुनि जाअि वनांत;
वद तुं दाशरथी तुज बाहे,
वचन बोलुनिया मग पाहे. ” ( अग ३८ )

पुढील पद्य हें लङ्का आणि स्वागता यांच्या अहेतुक मिश्रणाचें दिसतें.

" सरसि सारसहंसविहङ्गा-
श्चारुगीतहृतचेतस अेत्य
हरिमुपासत ते यतचित्ता
हन्त मीलितदृशो धृतमौनाः" (भाग १०/३५/११)

**कुटजा** (५३) [ ⏑ ⏑ – ⏑ – ⏑ ⏑ ⏑ – | ⏑ ⏑ – – ]

कमलें तळ्यांत भरलीं मधुनें तीं,
नलगे निमन्त्रण, अली मधु नेती;
झुकला चुकूनि रसिकोत्तम राया,
**कुटजा**, प्रसन्न कर रे भ्रमरा या. (२९)

हें वृत्त कनकप्रभावृत्तासारखें कविप्रिय झालेलें दिसत नाही. शिशु (६/७३) या श्लोकानन्तर अप (१४/३८) हा श्लोक कुटजावृत्ताचा आढळतो. मराठींत वाद्वा (१/६) हा श्लोक कुटजावृत्ताचा आहे. मोरोपन्तकृत साररामायणाचा १८ वा सर्ग आणि राप १४ वा सर्ग हे या कुटजा वृत्तांत आहेत. विठ्ठलकृत विद्वज्जीवन काव्यांतील (७/३१) या श्लोकांत कनकप्रभा आणि कुटजा यांचें मिश्रण आहे.

**प्रमिताक्षरा** (५४) [ ⏑ ⏑ – ⏑ – ⏑ ⏑ ⏑ – | ⏑ ⏑ – ]

जरि निर्झरी कलरवें रमवी,
न परी निदाघसमयीं शमवी;
परि ही गभीर अतिशान्तजला
**प्रमिताक्षरा**च जिववी मजला. (३०)

" गळतीसमान नयनें गळती
लपनें न येति घड आलपनें
निज विग्रहासि अुठवी निजवी
जनकात्मजा स्मरतसे जनका". (मोकुल ४/७०)

मोरोपन्तकृत वरदरामायण (मोसग्र ८/३३) आणि रणविहार ३ रा सर्ग आणि गर्वध्वनि (सानिस १/५१) हीं प्रकरणें प्रमिताक्षरावृत्तांत आहेत.

**अुत्थापनी** ( ५६ ) [ – – ᵕ – ᵕ ᵕ ᵕ – | ᵕ ᵕ – ]

" द्रष्टव्यमेव मृधमद्य सुरा–
नित्याह्वयन्त अिव केतुकरैः
धुर्याश्वशब्दमदहासभृतो-
ऽन्योन्यं रथा रथजुषां मिलिताः " ( अप १७/२०३ )

याच्या पुढील चार श्लोकहि अुत्थापनीवृत्ताचेच आहेत.

**यूथिका** ( ५८ ) [ – ᵕ – ᵕ ᵕ ᵕ – | ᵕ ᵕ – ᵕ – ]

रुष्ट होअुनि बसे दयिता दुरी,
तप्त होय विरहें प्रिय तों अुरीं;
तीस तो कळवि धाडुनि दूतिका,
'मण्डपीं स्मित करी बघ **यूथिका**' ! ( ३१ )

" सुन्दरे प्रियतमे तर कोमळे
मातृकेपसि तुवा कृत सोहळे
चिन्तिले पुरविसी मम डोहळे
मैत्रिणी म्हणुनि केलिसि निर्मळे ". ( डिरुस्व ३/९९ )

" बोलती विटपिं रम्य पिकावली,
कल्कलाट करिती कपिकावली,
माण्डिलें सरस नृत्य शिखावलीं,
पाहतां द्रुपदि फार सुखावली ". ( वाविप १/६० )

राप १३ वा सर्ग, किरातकृत 'आअी, भूक !' ही कविता ( आमा सप्टेम्बर १९१८ ) आणि 'गोविन्दाग्रजास' ( ज्यो ४३ ) हीं यूथिकावृत्तांत आहेत. अनन्तकवीच्या रचनेंत यूथिका–जनकात्मजा यांचीं अुदाहरणें विपुल आढळतात. पुढील श्लोकांत स्वागता आणि यूथिका यांचें मिश्रण आहे.

" जो सखा परम लोकपित्याचा,
राखितो ध्वज सदा कपि त्याचा,
तो युधिष्ठिर रवी सरतां धरी
स्कन्धयान करवी अमृताधरीं " ( वावि १/६३ )

“ बोलतां सकृप जानकिवल्लभा
दुर्भयें गजबजे हरिची सभा
लागती कितिक ते क्षणिं कानीं
‘श्रीपते, न करि हे जन-हानी.’ ” ( असु ५४ )

**अच्युत** ( ५९ ) [ – ᴗ – ᴗ ᴗ – | ᴗ ᴗ – ᴗ – ]

रङ्क हा, कुणि त्यास न मोजितें
कष्टुनी पिकवी धन जो जितें;
हो नृपालि पदच्युत मातली,
लीन **अच्युत** हाच रसातलीं. ( ३२ )

विद्याधर वा. भिडे यांच्या अन्योक्तिमञ्जरींतील २५ वा श्लोक या अच्युत वृत्ताचा आहे.

**‘ जनकात्मजा ’** ( ६० ) [ ᴗ ᴗ ᴗ – ᴗ ᴗ ᴗ – | ᴗ ᴗ – ᴗ – ]

“ रुदन ते करितसे **जनकात्मजा,**
कुमति हे अुपजली कशि आत्मजा ?
तुरग बान्धुनि जिवावरि अूठला,
पडतसे जननि होअुनि व्याकुला ”. ( अकुल १/१९ )

राप ८ वा सर्ग हा या ‘ जनकात्मजा ’ वृत्तांत आहे. या वृत्ताला विभावरी म्हणणें निराधार आणि चुकीचें आहे.

**द्रुतविलम्बित** ( ६१ ) [ ᴗ ᴗ ᴗ – ᴗ ᴗ – | ᴗ ᴗ – ᴗ – ]

खचित चञ्चल यौवनमाधुरी,
अुचित तेढ न ही, नच जा दुरी.
अुलटतां क्षण होशिल सम्मुख,
**द्रुतविलम्बित** गे मग तें सुख ! ( ३३ )

पुढील श्लोकांत द्रुतपदा आणि द्रुतविलम्बित यांचें मिश्रण आहे.

“ कपिवरा, नगरि हे नव्हे लङ्का,
सुदृढ हे भवनदींतिल नौका;
पुससि नाम हिचें तरि द्वारका
रसिकभाविकलोक-सुतारका ”. ( अग १० )

**कमलिनी** ( ६३ ) [ ᴗ ᴗ – ᴗ – ᴗ ᴗ ᴗ – । ᴗ ᴗ – ᴗ – ]

भ्रमशी खरोखर अरे भ्रमरा, कुठे ?
किति गुङ् निरर्थकच शब्द तुझा अुठे !
तपते अुन्हीं मधुरभावविशिष्ट ते
बघ मौनिनी **कमलिनी** जलिं तिष्ठते. ( ३४ )

भिजी १४५ वी कविता या कमलिनी–वृत्तांत आहे.

**सुन्दर** ( ६४ ) [ – ᴗ – ᴗ ᴗ ᴗ – । ᴗ ᴗ – । ᴗ ᴗ – ᴗ – ]

तूजवीण सखि, भूतल हें 'रमणीय' न,
सङ्गतींत तव नन्दन हो रमणी, वन;
भूषवी न तुजला 'मणिभूषण' हें तर
यास भूषविशि तूच खरोखर **सुन्दर**. ( ३५ )

शिशु ( १३/६९ ), रह ( ५/१२३ ) आणि सिद्धर्षिकृत अुपमितिभव प्रपञ्चकथामधील ( प्रस्ताव ४, पृ. ७२१ ) 'यो हि गर्वमविवेकभरेण करिष्यते' हीं सुन्दर–वृत्ताचीं अुदाहरणें आहेत.

**मङ्गला** ( ६५ ) [ ᴗ ᴗ ᴗ – ᴗ ᴗ ᴗ – । ᴗ ᴗ – । ᴗ ᴗ – ᴗ – ]

कवण भूलविल अन्य तुझ्याविण अङ्गना ?
जवळ तू न तर अिन्द्रसभेंतहि रङ्ग ना !
खाचित सान्धशिल तूच मनोरथ मङ्गला,
रमणि, देअि मज गे तव सङ्गति **मङ्गला**. ( ३६ )

रह ( ४६/६७ ) 'त्रिदिववर्त्म घटितान्सहसाहितकम्पया' हा श्लोक या मङ्गलावृत्तांत आहे.

**शालिनी** ( ६८ ) [ – – – – ! – ᴗ – – ᴗ – – ]

थोरां सेवी आदराने सुखाने,
पोरां पाळी कष्टुनी कौतुकाने;
शालीनत्वें आचरी प्रीति–नीती,
संसाराची श्रीच हो **शालिनी** ती. ( ३७ )

महाभाष्यांतील "वृद्धिश्चिण्वद्युक्च हन्तेश्च घत्वं" ही शालिनीवृत्तांतील कारिका हें या वृत्ताचें प्राचीनतम अुदाहरण असेल. वबृजा ( २८/३ ) या

श्लोकांतील ‘ निर्याणं स्यान्नष्टजन्मद्दकाणः ’ या दुसऱ्या चरणांत ऋकारयुक्त व्यञ्जनापूर्वील अक्षरास गुरुत्व आलें आहे ही गोष्ट चिन्तनीय आहे.

**वातोर्मि** ( ६९ ) [ – – – – ! ᴗ ᴗ – – ᴗ – – ]

देखें टेके क्षितिजीं हेमगोल,
सिन्धुपृष्ठीं लहरी नृत्यलोल;
कष्टाचा तो ज्वर सारा निमाला,
भेटे क्रीडातुर **वातोर्मि**–माला. ( ३८ )

वबृ ( ४६/१७, ८४/६ ) हीं वातोर्मीचीं संस्कृतांतील अुदाहरणें आहेत.

“ लग्नांशकाद् ग्रहयोगेक्षणाद्वा
वर्णान्वदेद् बलयुक्ताद्वियोनौ
दृष्ट्या समानान्प्रवदेत्स्वसङ्ख्यया
रेखां वदेत्स्मरसंस्थैश्च पृष्ठे ” ( वबृजा ३/४ )

या श्लोकांतील तिसऱ्या चरणाचा दुसरा गण जर ( ᴗ ᴗ – – ᴗ – – ) च्या ठिकाणीं ( – ᴗ ᴗ – ᴗ – ᴗ – ) असा आहे तो नसता तर हें अेक नवीनच वृत्त झालें असतें.

**वैश्वदेवी** ( ७० ) [ – – – – – ! – ᴗ – – ᴗ – – ]

तारुण्यद्वारीं ठाकतो जों किशोर
आश्चर्याची तों सृष्टि पाही समोर;
केवी स्त्रीत्वाची चारुता मुग्ध ठेवी !
सेवी तो अेक प्रीति ही **वैश्वदेवी**. ( ३९ )

संस्कृतांत वैश्वदेवीचीं अुदाहरणें भासांत ( भाअ ६/५, भास्व १/९ ) हीं दोन आहेत. वाग्भटाच्या अष्टाङ्गहृदयांतील अुत्तरस्थानांतील ( १३/९७ ) हा श्लोक वैश्वदेवीचाच आहे. मराठींत कुण्टेकृत राजा शिवाजी या काव्यांत सारखें भुजङ्गप्रयात वृत्त कण्टाळवाणें होअूं नये म्हणून मधून मधून वैश्वदेवीची योजना केली आहे.

**चन्द्रिणी** ( ७२ ) [ ᴗ – – – – – ! – ᴗ – – – ᴗ – – ]

जरी तूझ्या शीर्षीं लोटते मेघमाला,
तरी लोटी मागे चन्द्र वेगें तमाला;

सुहासाचें कान्ते, तेज माझ्या घरांत
करी या जीवाची **चन्द्रिणी** चान्द-रात. ( ४० )

" सुवर्णप्राकारेशानदिग्भित्तिभागे
बभौ देवच्छन्दः स्वामिविश्रामहेतोः
किलोत्कण्ठापूर्णं प्राप सर्वार्थसिद्धि-
विमानं तन्मानीभूय नाभेयनाथम् " ( अप १४/४७ )

भिजी १४१ वी कविता या चन्द्रिणी-वृत्तांत आहे.

**"राज"–लक्ष्मी** ( ७३ ) [ – – – – ⌣ – – ! – ⌣ – – ⌣ – – ]

कष्टाळू भाबडे ते राजधानींत जाती,
ऐश्वर्यें तीं पहातां काय वाटे मजा ती !
स्वत्वाची विस्मृती दे लक्ष का राज-लक्ष्मीं ?
शोभे सारें, न कोणा मोहवी **राज-लक्ष्मी** ? ( ४१ )

" तत्त्वानां विस्तराद्वा तेषु सङ्क्षेपतो वा
जीवाद्यानां नवानां योऽवबोधो यथावत्
सम्यग्ज्ञानं तदेतत् तच्च पञ्चप्रकारं
ज्ञेयं मत्यादि मुक्त्यारोहसोपानरूपम् " ( अप १४/२०८ )

**मन्दाक्रान्ता** ( ७९ ) [ – – – – ! ⌣ ⌣ ⌣ ⌣ ⌣ – ! – ⌣ – – ⌣ – – ]

मेघांनी हें गगन भरुनी गाढ आषाढमासीं
होतां पर्युत्सुक मनिं कुणी कान्त एकान्तवासी
तन्निःश्वास श्रवुनि रिझवी कोण त्याच्या जिवासी ?
**मन्दाक्रान्ता** ? सरस कविता कालिदासी विलासी. ( ४२ )

**कुसुमितलता** ( ८० ) [ – – – – – ! ⌣ ⌣ ⌣ ⌣ ⌣ – ! – – – ⌣ – – ]

वस्त्रालङ्कारीं सजुनि रमणी वाट पाही प्रियाची,
होतां शङ्कांहीं विकल मधुनी आशसाह्यासि याची;
तों ये मागूनी रमण, तिचिया स्पर्शितां पल्लवातें
होई ती जैशी **कुसुमितलता** वेल्लिता मन्द वातें. ( ४३ )

" तस्माद्भिक्षार्थं मम गुरुरितो यावदेव प्रयात-
स्त्यक्त्वा कार्यार्थं गृहमहमितस्तावदेव प्रयास्ये
पूज्यं लिङ्गं हि स्खलितमनसो बिभ्रतः क्लिष्टबुद्धे-
र्नामुत्रार्थः स्यादुपहतमतेर्नाप्ययं जीवलोकः " ( असौ ७/५२ )

मराठींत मोसग्र ( ८/५०८ ) हा श्लोक या कुसुमितलतावृत्तांत आहे.

**विस्मिता** ( ८१ ) [ ᴗ – – – – – – ! ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ! – ᴗ – – – ᴗ – – ]

किती शोभे तुझ्या नयनतिमिरीं हृद्यविद्युद्विलास !
भिती का गे केकी कृतककलहे मेघविस्फूर्जितास ?
पुरें झालें आता ! वळुनि बघुनी अमृतदृष्टिरागें
स्मिताची ती वृष्टी कर, नजर कां रोखिशी **विस्मिता** गे ? ( ४४ )

संस्कृतांत शिशु ( २०/७९ ) आणि अप ( १४/३९ ) हीं दोन विस्मिता-वृत्ताचीं अुदाहरणें आहेत. पहिल्या अुदाहरणाच्या तिसऱ्या चरणाच्या शेवटीं विस्मिता हा शब्द आहे. मराठींत भिजी २२४ वी कविता या विस्मितावृत्तांत आहे.

**चित्रमाला** ( ८२ ) [ – – –.– ᴗ – – ! ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ! – ᴗ – – – ᴗ – – ]

राहे सौन्दर्य कोठे ? मुकुलरदनीं, फुल्लपद्माननीं का ?
प्रेमाचें स्थान कोठे ? मदिर नयनीं, मत्त पीन स्तनीं का ?
छे छे ! चन्द्रानना ती सकल मनिंच्या घालवी जा तमाला,
प्रेमाची सुप्रभा ती प्रतिपदिं भवीं रङ्गवी **चित्रमाला**. ( ४५ )

**नन्दीमुखी** ( ८३ ) [ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ! – ᴗ – – ᴗ – – ]

अभिरुचिच नसे स्त्रीस का ? केवि साहे
प्रियतम तिज तो स्वामि हो जो विवाहें ?
शशिमुखिविण कां हो न छन्दी सुखी तो ?
निरखुनि परि घ्या शुद्ध **नन्दीमुखी** तो ! ( ४६ )

" शिशिररससरा राविविर्मर्मरारा
ददममततरा राजिजित्सत्सरारा
ससववसुसुरा-राममध्वध्वरारा
ततललददरा-रासमत्वत्वरारा " ( रह ५/१३५ )

**चित्रलेखा** ( ८४ ) [ – – – – ! ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ! – ⏑ – – ⏑ – – ]

स्वप्नीं कोणी प्रतिरति अपुल्या ध्येयमूर्तीस पाही,
आशापूर्तीस्तव हरिखुनि ती त्यास हृत्पद्म वाही;
तों जागी हो, हळहळुनि म्हणे, ' कोण ते ? वञ्चिलें का ?'
ये साह्याला प्रणयिजनपुनर्मीलनीं **चित्रलेखा**. ( ४७ )

**पुष्पदाम** ( ८५ ) [ – – – – – ! ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ! – ⏑ – – ⏑ – – ]

होऊं ये दोघें निगडित सखये, प्रीतिच्या पुष्पपाशीं,
खेळूं कष्टूंही प्रणयमयमनें अन्धकारीं–प्रकाशीं;
जेथे तू तेथे घर, तुजविण तो स्वर्गही दुक्खधाम,
प्रार्थी मी तूतें, शिर नमवुनि घे, अर्पितों **पुष्पदाम**. ( ४८ )

**शोभा** ( ८६ ) [ ⏑ – – – – – ! ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ! – ⏑ – – ⏑ – – ]

किती वाटे चिन्ता जंव तुजवर मी प्रेम लागें कराया,
लिहूं दावूं केवी गहन भयतमीं भावनालेख राया ?
तुवां येवोनी तों अुलट विनवुनी दावितां प्रेमलोभा
कशी हृच्चन्द्रा रे, सरस पसरली पौर्णिमेचीच **शोभा** ! ( ४९ )

**स्रग्धरा** ( ८८ ) [ – – – – ⏑ – – ! ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ! – ⏑ – – ⏑ – – ]

दृष्टिक्षेपें जियेने सहज मज दिली पावन प्रीतिदीक्षा,
प्राप्तीसाठी जियेच्या तपभरच्च जणू मीहि केली प्रतीक्षा,
साधाया अर्थ चारी शुभ घटि बघुनी शान्त त्या मध्यरातीं
सम्राज्ञी व्हावया ये मजसह हरिखें मद्गृहीं **स्रग्धरा** ती. ( ५० )

**महास्रग्धरा** (८९) [ ⏑ ⏑ – – – ⏑ – – ! ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ! – ⏑ – – ⏑ – – ]

ममता ठेवी घना, तू वरुनि दिसुनिही अन्तरङ्गीं न काळा,
निधि मोठा अमृताचा तव हृदयिं असे, कां न यावा अुमाळा ?
पडली सर्वसहा ही सुतविरहतपें होअुनी दग्ध राही
फुलवी भेटूनि हीतें, बघ कशि खुलते रे **महास्रग्धरा** ही. ( ५१ )

माझे दुर्दिन या काव्याच्या अन्तीं 'करुणाब्धि माय बाळा' म्हणून जो श्लोक आहे तो ( गछ २/२१६ ) मधील चुकीच्या लक्षणाप्रमाणे आहे. माझे

सहाध्यापक प्रो. कुन्दनगार यांनी मत्तेभविक्रीडित आणि महास्रग्धरा हीं दोन वृत्तें मिळून होणाऱ्या अर्धसमवृत्तांत रचिलेला कानडी भाषेंतील रत्नकृत गदा-युद्ध (७/४१) हा जो खिस्तशक ९८२ मधील श्लोक माझ्या दृष्टोत्पत्तीस आणला आहे त्यावरून पहातां महास्रग्धरा वृत्ताचें शुद्ध लक्षण मी वर दिलेल्या लक्षणाप्रमाणेच आहे असें दिसतें.

**मालिनी** ( ९० ) [ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ – – ! – ᴗ – – ᴗ – – ]

रुचिर मदिर नेत्रीं लोल नीलोत्पलें हीं,
अुजळ नितळ देहीं चम्पकाचीं दलें हीं,
मृदुल मधुर ओठीं लाल डाळिम्बफूल–
बघुनि तुज पडावी **मालिनी**, कां न भूल ? ( ५२ )

**चन्द्रिका** ( ९८ ) [ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ – | ᴗ – ᴗ – – – ]

विधुसम मुख हें म्हणूं कसें वाया ?
विधु वचनसुधा न देअि सेवाया.
विधु वितरिल काय ? बाह्यता शान्ती.
सखिमुख पसरीच **चन्द्रिका** स्वान्तीं. ( ५३ )

**कुटिलगति** ( १०१ ) [ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ! – ᴗ – – ᴗ – ]

लपत छपत जे वाकडे चालती
अुरग-गण, नसे अुच्च त्यांना गती;
गरुड बघ कसा अमृतासी हरी,
**कुटिलगति** न रे भेटवी श्रीहरी. ( ५४ )

“ रघुकुलतिलका, मेदिनीपालका,
सहृदयपदका, पापपङ्कोदका,
सुहृदलिकमला, नीरदश्यामला,
अतुलभुजबळा, भग्नरक्षोबला ! ” ( मोकुल ४/७४ ).

किरात ( ५/१८ ) हें कुटिलगतीचें संस्कृत अुदाहरण असून मराठींत भिजी १३४ वी कविता या वृत्तांत आहे.

**शरभललिता** ( १०२ ) [ – – – – ! ᵕ ᵕ ᵕ ᵕ ᵕ – । – ᵕ – – ]

हासे खेळे गुटगुटित हें बाळ गोड,
पावे याच्याजवळ न कसें चित्त ओढ ?
चेण्डूवाणी रमुनि दमवी हा दुज्यांना
दावी केवी **शरभललिता** हा पहा ना ! ( ५५ )

" यावत्तत्त्वं न भवति हि दृष्टं श्रुतं वा
तावच्छ्रद्धा न भवति बलस्था स्थिरा वा
दृष्टे तत्त्वे नियमपरिभूतेन्द्रियस्य
श्रद्धावृक्षो भवति सफलश्चाश्रयश्च " ( असौ १२/४३ )

असौ ( १३/५६ ) हाहि श्लोक या शरभललितावृत्ताचाच आहे.

**प्रवरललिता** ( १०३ ) [ ᵕ – – – – – – ! ᵕ ᵕ ᵕ ᵕ ᵕ – । – ᵕ – – ]

दिली तीतें आधी सहृदय किती दक्षिणा मी,
दिसूनी ये तीचा नवलपरिची वृत्ति नामी;
तिच्या औदासीन्यें हृदय अिकडे हाय चूर—
जयानन्दध्यानीं **प्रवरललिता** जाय दूर ! ( ५६ )

**शिखरिणी** ( १०४ ) [ ᵕ – – – – – – ! ᵕ ᵕ ᵕ ᵕ – – ᵕ ᵕ ᵕ – ]

जिच्या प्रीतीसाठी सरस कवनें नित्य रचिलीं,
महायत्नें रत्नें मिळवुनि सु-वर्णात खचिलीं;
जिची छाया वाया भुलविच जिवा या निशिदिनीं
कुठे आता कान्ता शिखरिदशना ती **शिखरिणी** ? ( ५७ )

" गजालिश्रेष्ठा या अतिनिबिडकान्तारजठरीं
मदान्धाक्षा मित्रा, क्षणभरहि वास्तव्य न करीं.
नखप्रांनी येथे गुरुतरशिला भेदुनि करि–
भ्रमाने, आहे रे गिरिकुहरिं हा निद्रित हरी " ( खाप्राक २६ )

असा ( १४/५० ) हें शिखरिणीचें अेक प्राचीनतम अुदाहरण आहे.

**पुट** ( १०६ ) [ ᵕ ᵕ ᵕ ᵕ ᵕ ᵕ – – ! – ᵕ – – ]

वरवर बघशी तों मृत्तिका ही,
श्रम कर तरुणा, निवृत्ति कां ही ?
चल खण कुदळीने, हाण यत्नें,
कर–**पुट** भरुनी दे खाण रत्नें. ( ५८ )

“ **कनक** ”–**गौरी** ( १०७ ) [ ᵕ ᵕ ᵕ ᵕ ᵕ ᵕ ᵕ – – ! ᵕ ᵕ ᵕ – – ]

जुळुनि कर घडे का हृदययोग ?
प्रणयहि म्हणवे का निवळ रोग ?
बघ हरि किति काळा, भुलुनि सौरी
बनलिच कशि राधा **कनकगौरी**. ( ५९ )

**क्षमा** ( १०९ ) [ ᵕ ᵕ ᵕ ᵕ ᵕ ᵕ – – ! ᵕ – ᵕ – – ]

किति जरि कुणि केले प्रहार, साही
करि सतत तपस्या पहा रसा ही.
प्रभु अवतरतो या क्षमा–प्रभावें,
जन हिज म्हणतात **क्षमा** स्वभावें. ( ६० )

भिजी १३५ वी काविता या क्षमावृत्तांत आहे.

**लय** ( १११ ) [ ᵕ ᵕ ᵕ ᵕ ᵕ – ! ᵕ – ᵕ ᵕ – ᵕ – ]

मधुर अधरीं तुझ्या मिळता सुधा
कुठुनि दुसरी उरेल अता क्षुधा ?
मदिरनयने, नकोच सुरालय,
प्रणयिं तुझिया घडोच पुरा **लय**. ( ६१ )

**भाराक्रान्ता** ( ११२ ) [ – – – – ! ᵕ ᵕ ᵕ ᵕ ᵕ – ! ᵕ – ᵕ ᵕ – ᵕ – ]

श्रीरामाच्या सरल चरितीं प्रमाद न सापडे,
सम्मोहीं तो नरमणि पुढे कसा मनसा पडे ?
‘ हा हा सीते ! ’ वचनिं, हृदयीं वसे तंव नित्य जी
**भाराक्रान्ता** असुनि तिज तो कसा विपिनीं त्यजी ? ( ६२ )

**कुरङ्गिका** ( ११४ ) [ – – – – – ! ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ! ᴗ – ᴗ ᴗ – ᴗ – ]

गाण्याने तुझ्या अुचित गमतें मुकेपण ये पिका,
कान्तीने तुझ्या असुनि गहिरा गुलाब पडे फिका,
स्वारस्यें तुझ्या भ्रमर झुलतां रडे न सुरङ्गि कां ?
पाहूनी तुझीं रुचिर नयनें दडेच **कुरङ्गिका**. ( ६३ )

**मकरन्दिका** ( ११५ ) [ ᴗ – – – – – – ! ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ! ᴗ – ᴗ ᴗ – ᴗ – ]

शिरीषवृक्षातें कुसुमभर ये, पलाशहि रङ्गतो,
न गे हा आम्राचा परिमल परी प्रमत्त अनङ्ग तो !
सुयोगाची आता विरहिहृदया विलम्बित सन्धि कां ?
किती वृक्षीं आर्तिस्वर मधुर ही करी **मकरन्दिका** ! ( ६४ )

**अपराजिता** ( ११६ ) [ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ! ᴗ – ᴗ ᴗ – ᴗ – ]

तरुण अकरुणे, अिथे लवले किती,
तुडविलि हृदयें तुवां अबले, किती !
प्रगटविं महिला–स्वभाव खरा जिता,
रडतच बसती स्त्रिया **अपराजिता**. ( ६५ )

**चल** ( ११७ ) [ – – – – ! ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ! ᴗ – ᴗ ᴗ – ᴗ – ]

कान्तेहूनी प्रबलतर तसें प्रतिष्ठित काञ्चन !
त्याच्यामागे कुणि धडपडतां न त्यामधि लाञ्छन !
आसक्ती ही कधि न अुपशमे, अखण्ड करी छल,
त्याच्याठायीं अचल जनरति, स्वतःच जरी **चल** ! ( ६६ )

**भुजङ्गविजृम्भित** (१२१) [विद्युन्माला ! ८ ल। ᴗ ᴗ –। ᴗ – ᴗ ᴗ – ᴗ –]

" लक्ष्मीच्या अुन्मादें दीना सतत तुडवि अकरुण तो
पडे नरकामधी,
दुर्दैवाने गेली लक्ष्मी तर अनुभवि नर नरका
अिथे मरणावधी;
दारोदारीं भिक्षेसाठी भ्रमण करिल सहुनि अहो
तिरस्कृति दुक्खदा,

लक्ष्मीपुत्रांनो, अुन्मादा त्यजुनि अुपकृति करित जा
अनाथ जनीं सदा" ( भिजी २५३ वी )

भुजङ्गविजृम्भित हे वृत्त भरतपिङ्गलांनी साङ्गितलें असून प्राचीन वाङ्मयांत याची अुदाहरणें गावत नाहीत. शूद्रककृत पद्मप्राभृतकांत दोन आणि वररुचिकृत उभयाभिसारिकामध्ये अेक अशीं तीनच अुदाहरणें मला सापडलीं.

**हरिणी** ( १३४ ) [ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ –! – – – –! ⏑ – ⏑ ⏑ – ⏑ – ]

खचित दुबळें होणें मोठें असे जगिं पातक,
प्रभुहि दुबळ्यांचा देखा हा खरोखर घातक;
नहि सुभगता दौर्बल्यीं या, छळूं कुणि ही शके,
तरि हरिकटी, कां व्हावें तू मनें **हरिणी** सखे ! ( ६७ )

'विरह' ( टिक ९६ ) ही कविता हरिणी वृत्तांत आहे.

'**जननीमुद**' ( १३५ ) [ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ –! – – ⏑ ⏑ –! ⏑ – ⏑ ⏑ – ⏑ – ]

" बहुतरमनूराधारयता मुखैरखिलश्रुती–
र्नलिनजनुषा निर्मातुमहो यदम्ब न शक्यते
कथमिह तव स्तोत्रे कवयः शक्ता ( ? ) स्वयमिन्दिरे
जगति शिशवः शक्याऽर्थ कुतोऽथ वा **जननीमुदे** " (वेलस १५/१७)

**हारिणी** ( १३९ ) [ – – – –! ⏑ ⏑ ⏑ ⏑ –! – – ⏑ – – ⏑ – ]

दृष्टिक्षेपें मृत जरि करी, सञ्जीवनी तन्मुखीं,
अुच्चारीना जरि मधुवचें, चर्या सदा कौतुकी;
प्रेमामाजीं बुडवुनि पहा होओी भवीं तारिणी,
सेवाधर्मे बनुनि महिषी चित्तास हो **हारिणी**. (६८ )

**छाया** ( १४१ ) [ ⏑ – – – – – –! ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ –! – – ⏑ – – – ]

सदा जीवातें या प्रिय सुखद जी ग्रीष्मांत छाया जशी,
मुखच्छाया जीची बघुनि गगनीं घे पाण्डुतेला शशी;
विनम्रा छाया जी जणु पद धरी, माजे न सत्तामदें,
मिळे ती या वक्षीं सहजच जशी **छाया** प्रकाशामधे. ( ६९ )

**केसर** ( १४३ ) [ – – – – ! ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ! – – ⏑ – – – ⏑ – ]

पुष्पामाजी दिसति कुठकुठे रङ्गाकृती मात्र तीं,
कोठे गन्ध प्रखर अरुचिर, प्रेमास ना पात्र तीं;
जातां कोमेजुनि कुणि न बघे निर्वारि जैसें सर,
नासाग्रीं जें धरिति जरि सुकें तें अेकलें **केसर.** ( ७० )

**वञ्चिता** ( १४४ ) [ – – – – – – ! ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ! – – ⏑ – – – ⏑ – ]

नाथा, अर्धाङ्गी घनतमविपिनीं अर्ध्याच वस्त्रानिशीं
टाकोनी गेलां अवचित अुठुनी कोठे कशाला निशीं ?
निन्दावें आता खडतर अपुल्या माझ्याच मी सञ्चिता—
दुर्दैवें राजन्, चुकुनिहि मजला कां हो असे **वञ्चितां** ? ( ७१ )

**रोहिणी** ( १४६ ) [ ⏑ ⏑ ⏑ – ! – – – – ! – – ⏑ – – – ]

जशि न कविता ये तर्काच्या व्याख्येमधे कोण्डितां
तशि निसटशी हातांतूनी, पाशीं जवें ओढितां;
मग झुलविशी कां गे अैशी घालूनि तू मोहिनी ?
प्रिय अशि कशी होशी कान्ते, चन्द्रा जशी **रोहिणी** ? ( ७२ )

**ज्योत्स्ना** ( १४७ ) [ – – – – ⏑ – – ! – – ⏑ – – – ⏑ – ]

जीच्या सौम्य प्रभावें भावाम्बुधी नाचतो,
क्रीडामत्त प्रमाथी होओी न केव्हाच तो;
स्वप्नसृष्टीवरी ये जीच्या वचें मोहर,
अैशी माझी सखी ती **ज्योत्स्नाच** चेतोहर. ( ७३ )

" सिद्धान्तोक्तेषु शुद्धा तत्त्वेषु यद्वासना
सम्यक् सम्यक् तमेतच्छङ्कादिदोषोज्झितम्
जायेतैतन्निसर्गात्संसर्गतो वा गुरोः
संसारस्फाररूपाऽकूपारपारप्रदम्" ( अप १४/२०९ )

**शार्दूलविक्रीडित** (१५१) [ – – – ⏑ ⏑ – ⏑ – ⏑ ⏑ ⏑ – ! – – ⏑ – – ⏑ – ]

शाहाच्या पुढती लवे न, न लगे याला जहागीर हा !
स्थापाया बघतो स्वराज्य ?– चल जा वेड्या ! अभागी रहा !

नात्याचे म्हणती, कुलाधम पहा आम्हां करी व्रीडित—
शार्दूलासच कौतुकास्पद गमे **शार्दूलविक्रीडित.** ( ७४ )

असौ ( ११/६० ) हें शार्दूलविक्रीडिताचें अेक प्राचीनतम अुदाहरण दिसतें.

**मत्तेभविक्रीडित** ( १५३ )

[ ᴗ ᴗ – – ᴗ ᴗ – ᴗ – ᴗ ᴗ ᴗ – ! – – ᴗ – – ᴗ – ]

जन येती चढुनी तटावर किती देखावया कौतुक,
दिसती काय तरी प्रफुल्ल अितक्या दाटींत अत्युत्सुक !
परि होती किति आगडांत हृदयें नावेक सम्मीलित
जंव हो सादिसवें भयङ्कर असें **मत्तेभविक्रीडित.** ( ७५ )

संस्कृतांत अैहोळेशिलालेखांतील 'वरदातुङ्गतरङ्गरङ्गविलसद्हंसावली-मेखलां' हा अेक श्लोक आणि वेलस ( १५/१३, १५/१५ ) हे दोन श्लोक मत्तेभविक्रीडिताचे आढळले. मराठींत भिजी २२८ वी कविता ही मत्तेभ-विक्रीडितांत आहे.

शार्दूलविक्रीडिताच्या रचनेंत मध्येच अनवधानाने अेखादा चरण मत्तेभ-विक्रीडिताचा येतोः—

( १ ) "स्थाप्या चासनमस्य चाह नृपतिर्गच्छ प्रवेशं दद
अंसितः सारथिवाक्य श्रुत्वमुदितः प्रोत्या सुखेनान्वितः"
( लवि पृ. १२५ )

( २ ) "पहिल्याने नृप काय वाक्य वदला ? हेही कशा अुत्तरा
देअूनी नृप तोषला, वद भला त्या सर्वही विस्तरा"
( वावि २/६ ).

**मदनललिता** ( १५७ ) [ – – – – ! ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ! – – ᴗ ᴗ ᴗ – ]

शब्दांना का जुळवुनि लयीं ये त्यांत कविता ?
पाडी स्वान्तीं दुरुनि ठिणगी का दिव्य सविता ?
का ये लक्ष्मी हृदयमथनीं जी कश्मल हरी ?
का ही आहे **मदनललिता** आनन्दलहरी ? ( ७६ )

**क्रीडा** ( १५८ ) [ ⏑ – – – – – – ! ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ! – – ⏑ ⏑ ⏑ – ]

सुधादृष्टीने ती मज भुलवुनी नेऊनि विपिनीं
कितीक स्वान्तींचीं करुण गुपितें साङ्गे मधुदिनीं,
दरीमाजी लोटी चढवुनि सुखप्रोत्तुङ्गशिखरीं–
अहा ती चार्वङ्गी अदय दयिता **क्रीडा** कशि करी ! ( ७७ )

**सुमधुरा** ( १५९ ) [ – – – – ⏑ – – – ! ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ! – – ⏑ ⏑ ⏑ – ]

देवी केवी रुचावा तुजविण असा हा लौकिक मला ?
ठावा साऱ्या सुखाचा अनुपमच गे त्वत्सङ्ग गमला.
चिन्ता वाटे गृहींची जवळ असतां तू की सुम–धुरा,
कायावाचामनाच्या सुमधुरगुणें होशी **सुमधुरा.** ( ७८ )

भिजी २१८ वी अेकश्लोकी कविता ही सुमधुरावृत्तांत आहे.

**सुवदना** ( १६० ) [ – – – – ⏑ – – – ! ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ! – – ⏑ ⏑ ⏑ – ]

सारी जीचा मुखेन्दू सकल तिमिर अन् सन्तापहि दुरी,
दृष्टि स्निग्ध प्रसन्न प्रणय अुसळवी गम्भीरहि अुरीं,
आणी आकर्षुनी जी विबुधगुणबळें स्वर्ग स्वसदना,
संसारीं या असावी चतुर नरसखी अैशी **सुवदना.** ( ७९ )

संस्कृतांत आरम्भीं आरम्भीं ( असौ ११/६२,१८/६४, भाप्र ३/७,११) सुवदनावृत्ताचीं अुदाहरणें पुष्कळ आढळतात; अुत्तरोत्तर तीं दुर्मिळ होत जातात.

**सुरसा** ( १६१ ) [ – – – – ⏑ – – ! ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ! – ⏑ ⏑ ⏑ – ]

वाहे खड्गें जयाच्या नररुधिरनदी हिंस्रक रणीं,
राहे स्वाधीन त्याच्या गणुनि सकल ती स्तुत्य करणी !
काळें लाभो न लाभो त्रिदिव खचित त्या जो असुरसा,
भाळे त्याच्या प्रतापा क्षिति शिव शिव ! ही काय **सु-रसा** ! ( ८० )

भिजी २१९ वी कविता या सुरसावृत्तांत आहे.

**शार्दूलललित** ( १६२ ) [ – – – ⏑ ⏑ – ⏑ – ⏑ ⏑ ⏑ – ! – – ⏑ ⏑ – ]

सौन्दर्यासह हिंस्रता अशि कशी अेकत्रचि वसे !
पाचूचा रमणीय रङ्ग गरलीं नाचूनि विलसे.

वाटे भीति अथाङ्ग मोहुनि तरी हो चित्त चलित—
स्त्रीलालित्य न हें तुझें अकरुणे **शार्दूलललित** ! ( ८१ )

श्रीसद्गुरुशतीस्तोत्र ( सानिस २/१ ), भिजी २१२ वी, 'नारायण वामन टिळक' ( अुपा ६१ ) या कविता शार्दूलललितवृत्तांत आहेत.

**पृथ्वी** ( १६४ ) [ ᴗ – ᴗ ᴗ ᴗ – ᴗ – ! ᴗ ᴗ ᴗ – ᴗ – – ᴗ – ]

बलाढ्यतम भेटतां नर तयास **पृथ्वी** वरी,
स्वराज्य निजमानसावर परी तपस्वी करी;
नृपास जन पूजिती निजहितार्थ सत्ता–भयें,
परन्तु यति–दर्शना नृप अुठूनि आपाप ये. ( ८२ )

दिसे नच परस्परीं प्रणय, अन्तरें वाञ्छित,
सुधाकर पहा स्वता सुकुनि हो वरी लाञ्छित;
करास नच याचिया, परि सुधेस भू स्वीकरी–
स्वताहि रविभोवती भ्रमण फोल **पृथ्वी** करी. ( ८३ )

वबृ ( २८/१४ ) या पृथ्वीवृत्तांतील श्लोकांत यति पाळलेला नाही.

**मञ्जरी** ( १६८ ) [ ᴗ ᴗ – ᴗ – ! ᴗ ᴗ ᴗ – ᴗ – – – ᴗ – ]

तुज वाटते प्रणयभावना नश्वर
म्हणुनीच का करिशि तार आर्तस्वर ?
चल जा कुठेतरि पडूं नको पञ्जरीं,
सहकार हा बघ, कुठे परी **मञ्जरी** ? ( ८४ )

संस्कृतांत शिशु ( ४/२४ ) आाणि रह ( ५/४० ) हीं दोन मञ्जरीचीं अुदाहरणें आहेत. मराठींत भिजी १४६ वी कविता मञ्जरीवृत्तांत आहे.

**नलिनी** ( १७९ ) [ ᴗ ᴗ । – ᴗ ᴗ – ]

कमलें सुकलीं,
मधुतें मुकलीं,
म्हणुनी अलिनी
त्यजिली **नलिनी** ( ८५ )

“ स्मितविस्फुरिते
ऽजनि यत्र हिते
रतिरुल्लसिते
सुदृशां ललिते ” ( रूस्तमा १६१ )

“ सहसि व्रतिनीरभितः ” ( रूस्तमा २३७ ) या पद्यांत रमणीचीच चरणावली आहे. भिजी १० वी कविता नलिनीवृत्तांत आहे.

**मधुभार** ( १८० ) [ ᵕ ᵕ । – ᵕ – ᵕ ]

“ जय चारुदाम-
ललनाभिराम
जगतीललाम
रुचिहृत ( ? ) वाम.” ( रूस्तमा १२५ )

**सुमालतिका** ( १८१ ) [ ᵕ । – ᵕ ᵕ – ᵕ ]

पुणा ( ९/२१ ) हें कडवअ या सुमालतिकावृत्तांत आहे.

**कन्या** ( १८२ ) [ । – – – – ]

“ काका काका
मारा हाका
बोका बोका
ठोका ठोका ” ( ना. गं. लिमये )

भिर्जा १ ली आणि २ री कविता या कन्यावृत्तांत आहेत.

**कुन्तलतन्वी** ( १८४ ) [ । – ᵕ ᵕ – – ]

प्रेममुदें ही
जीवन देअी
संसृतिधन्वीं
**कुन्तलतन्वी.** ( ८६ )

“ रागिणि माळा
आळवि बाळा

श्रीहरिलीळा
चित्त रसाळा " ( मका )

" गाञ्जिति मातें
षड्रिपु भारी
सत्वर त्यातें
ईश, निवारीं. " ( पार )

भिजी ३ री कविता या कुन्तलतन्वीवृत्तांत आहे.

**मकरकशीर्षा** ( १८६ ) [ ।ᵕ ᵕᵕᵕ – – ]

विधुवदना ही
झुलवित राही;
न चढवि शीर्षा
**मकरकशीर्षा**. ( ८७ )

" दिसबहुतंसो
णहसरहंसो
णिहुअणकन्दो
पसरअि चन्दो " ( राक ३/२९ )

रूस्तमा १२१ वरील ' जयजयवीर ' मकरकशीर्षाच्या ७ चतुष्पद्या आहेत. भिजी ८ वी कविता याच वृत्तांत आहे.

' **सम्मदजनक** ' ( १८७ ) [ ।– ᵕ ᵕ ᵕ ᵕ – ]

" यः स्थिरकरुण–
स्तर्जितवरुण–
स्तर्पितजनकः
**सम्मदजनकः** " ( रूस्तमा १६१ )

" वङ्कटभवया
रेखिव निळया
अम्बुजनयना
सिन्धुजवदना " ( डिरुस्व २० )

"अञ्जन नयनीं
ज्यासम रचुनी
भ्रूयुगधनुषें
वाऊनि रवसें" (मका)

**'सौरीतटचर'** (१८८) [।– – ᴗ ᴗ ᴗ ᴗ]

"सौरीतटचर
गौरीव्रतपर–
गौरीपटहर
चौरीकृतकर" (रूस्तमा १६४)

"स त्वं जयजय
दुष्प्रतिभय
भक्तस्थिरदय
लुप्तव्रजभय" (रूस्तमा १६१)

**गुरुमध्या** (१८९) [ᴗ ᴗ – – ᴗ ᴗ]

"धृतगोवर्धन
सुरभीवर्धन
पशुपालप्रिय
रचितोपक्रिय" (रूस्तमा ११८)

"खलिनीडुम्बक
मुरलीचुम्बक
जननीवन्दक
पशुपीनन्दक" (रूस्तमा १२०)

**'सौरभसञ्जित'** (१९०) [।– ᴗ ᴗ – ᴗ ᴗ]

"माधव विस्फुर
दानवनिष्ठुर
यौवतरञ्जित
**सौरभसञ्जित**" (रूस्तमा १५०)

" कुङ्कुमपुण्ड्रक
गुम्फितपुण्ड्रक
सङ्कुलकङ्कण
कण्ठगरङ्गण " ( रूस्तमा १३० )

द्रुतगति ( १९१ ) [ । ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ]

अनुदिन झगडा
करिं धन पकडा;
निसटुनि परि तें
**द्रुतगति** वरितें. ( ८८ )

भिजी १५ वी कविता या द्रुतगतिवृत्तांत आहे.

'**करुणापरिमल**' ( १९२ ) [ । ᴗ ᴗ – ᴗ ᴗ ᴗ ᴗ ]

" वरुणालयसम–
**करुणापरिमल**
कलभायितबल–
शलभायितखल " ( रूस्तमा १२६ )

" प्रकटीकृतगुण " ( रूस्तमा १२६ ) या पद्यांत या लगावलीच्या ६ चतुष्पद्या आहेत.

'**प्रपन्ननन्दन**' ( १९७ ) [ ᴗ – ᴗ – ᴗ ᴗ ]

" अरिष्टखण्डन
स्वभक्तमण्डन
प्रयुक्तचन्दन
**प्रपन्ननन्दन** " ( रूस्तमा १२० )

तनुमध्या ( २०७ ) [ । – – ᴗ ᴗ – । – ]

स्फूर्ती हृदयाला
देई मधुबाला
शोभे मग पद्या–
माजी **तनुमध्या**. ( ८९ )

" चित्तेच्छित साङ्गे,
ऐसा वर मागे;
स्वार्थी बहुसज्जा
जाली गतलज्जा " ( मोसग्र ८/५२२ )

संस्कृतांत भाट्टिकाव्य ( १०/१२ ) हें तनुमध्यावृत्ताचें अुदाहरण आहे.

**कुमारललिता** ( २१८ ) [ । ᴗ – ᴗ ᴗ ᴗ – । – ]

हसूनि सुमनें तीं
हरूनि तम नेती;
प्रमोद किति देती
**कुमारललितें** तीं ! ( ९० )

भिजी १४ वी कविता कुमारललितावृत्तांत आहे.

**मणिमाला** ( २२२ ) [ तनुमध्याद्विरावृत्ता ]

माझी प्रिय कन्या मुक्ता जणु वाटे
दृष्टी पडतां ती कौतूहल दाटे;
वक्षीं तिज घेतां शोभे कशि बाला
शोभे जशि तीच्या कण्ठीं **मणिमाला**. ( ९१ )

" विप्राप्रति सामें सन्नन्दनमोहें
जोडूनि करांतें प्रार्थी नृप तो हें,
देहासहि देता दाता कवि शूर
द्यावा सुत कैसा प्राणाहुनि दूर ?" ( मोसग्र ८/५०३ )

भिजी १२२ वी कविता मणिमालावृत्तांत आहे.

**राजरमणीय** ( २२३ ) [ कुमारललिताद्विरावृत्ता ]

" व्रजेन्दुरुपनन्दान्तरीणमतिनोदी
मनोज्ञतरवृन्दावनान्तरनुमोदी
अनःस्थजनयित्र्या निजाङ्कमुपनीतः,
कुरङ्गनयनाभिः सहर्षमनुगीतः " ( रूस्तमा १७७ )

या प्रकरणांत राजरमणीयाच्या ६ चतुष्पद्या आहेत.

**प्रीति** ( २२६ ) [ । – ऽ ‿ – – । – ]

बन्ध पैक्याचा,
तन्तु अैक्याचा;
ज्यास न श्री ती
त्या कुठे **प्रीती** ? ( ९२ )

भिजी ४ थी कविता प्रीतिवृत्तांत आहे.

**पद्मिनी** ( २३९ ) [ प्रीतिद्विरावृत्ता ]

गीतवाद्यांची आवडी मोठी,
हृद्य शब्दांची माधुरी ओठीं,
चारुवेषा ये खावया वारें,
पद्मगन्धा ती **पद्मिनी** वा रे ! ( ९३ )

भिजी ३८ वी कविता या पद्मिनीवृत्तांत आहे.

**मदलेखा** ( २६१ ) [ । – – – ‿ ‿ । – – ]

आला माज गजाला,
हा अुच्छृङ्खल झाला;
हें गण्डस्थल देखा
या काळ्या **मदलेखा**. ( ९४ )

“ वृष्णी फार दरारे
सूरा ये अति श्यारे
वीरां अन्त न लेखा,
छन्दीं हे **मदलेखा**. ” ( ओलख ३/६ )

“ देवा दीन–दयाळा
तारीं या मज बाळा,
तोडीं या भवजाळा
जो तू दण्डिशि काळा ” ( पार )

‘ **मणिचित्र** ’ ( २६२ ) [ । ᴗ ᴗ – – ᴗ ᴗ । – – ]

“ हृदयं यस्य विशालं
गगनाभोगसमानं
लभतेऽसौ **मणिचित्रं**
नृपतिर्मूर्ध्नि वितानम् ” ( पि ५४ टीका )

**चित्रपदा** ( २६३ ) [ । – ᴗ ᴗ – ᴗ ᴗ । – – ]

वाक्य रसात्मक साधें
काय कुणास न साधे ?
सौख्य कुणास वदा तें
पाहुनि **चित्र पदांतें** ? ( ९५ )

भिजी २५ वी कविता या चित्रपदावृत्तांत आहे.

“ **गुण** ”**रुचिरा** ( २७० ) [ । – ᴗ ᴗ – ᴗ ᴗ । ᴗ ᴗ – ]

सुन्दर जें वरिवरि तें
शीघ्र मना वश करितें;
वस्तु खरोखर अुशिरा
मोहवि जी **गुणरुचिरा**. ( ९६ )

“ चित्रकलाविद रमणी
पञ्चसुरङ्गित सुमनी
गुम्फित वेलिसि तरुणी
ओढिलि मन्मथजननी. ” ( डिरुस्व १/३१ )

**अमृतगति** ( २७१ ) [ । ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ᴗ ᴗ । ᴗ ᴗ – ]

विसर तुझा मज न पडो,
स्वहितच केवळ न घडो,
नित मज निर्मल मति दे,
हरि, मज **अमृतगति** दे. ( ९७ )

**'तृष्णा'** ( २७३ ) [ । – – ᴗ ᴗ – । – ᴗ ᴗ ]

“ तृष्णां त्यज धर्मं भज
पापे हृदयं मा कुरु
अिष्टा यदि लक्ष्मीस्तव
शिष्टाननिशं संश्रय ” ( पि ५४ टीका )

**'सञ्चल'** ( २७४ ) [ । – ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ । – ᴗ ᴗ ]

“ **सञ्चल**विचकिलकुण्डल
मण्डितवरतनुमण्डल
कुण्डलिपतिकृतसङ्गर
खण्डितभुवनभयङ्कर ” ( रूस्तमा १२४ )

“ अम्बुजकिरणविडम्बक
खञ्जनपरिचलदम्बक
चुम्बितयुवतिकदम्बक
कुन्तललुठितकदम्बक ” ( रूस्तमा १३८ )

**अलोला** ( २७५ ) [ मदलेखाद्विरावृत्ता ]

“ भ्रूलेखां किमरालां त्वं निर्मासि करालां
किं वा पश्यसि वामं संरम्भादभिरामम्
दिष्ट्या काननलोला हेलोत्फुल्लकपोला
वृत्ता त्वं हरिहस्ते त्रातान्यो भुवि कस्ते ” ( रूस्तमा २५० )

याच्या नन्तरचा श्लोकहि अलोलावृत्ताचाच आहे.

श्लोकांत मध्यान्त्य यमक असल्याने चतुष्पदीची अष्टपदी करून वृत्त मद-लेखाच मानण्याकडे प्रवृत्ति होते. भिजी १६३ वी कविता ही अलोलावृत्तांत आहे.

**मेघवितान** ( २७८ ) [ ᴗ ᴗ । – ᴗ ᴗ – ᴗ ᴗ । – – ]

जरि दुर्दिन येअि घरांत
तरि सुप्रभ तू दिनरात;

गृहभूषण तू हसितांनी
शशि ज्यापरि **मेघवितानीं**. ( ९८ )

**‘रामा’** ( २८० ) [ – – । ᴗ – ᴗ – – । – – ]

“ **रामा**सि तो म्हणे, रे तोका,
नाहीच तूज काही धोका;
मन्नाम मीरवीशी लोकीं,
तें सोडवावया आलों कीं.” ( मोसग्र ८/५१६ )

स्त्रीतें म्हणोत काही कोणी,
जाती अचूक ते झिङ्गोनी !
कां मा नकोच मध्यक्षामा
श्यामा मनोभिरामा **रामा** ? ( ९९ )

**नवमालिनी** ( २८२ ) [ ᴗ ᴗ ᴗ ᴗ । – ᴗ – ᴗ ᴗ ᴗ । – – ]

कुसुमित हेमचम्पक न अेक,
सुधवल पारिजाततरु देख;
सरसिज पुञ्ज नेत्र सुखदायी,
बघ **नवमालिनी**च वसुधा ही. ( १०० )

**गान्धर्वी** ( २८७ ) [ । – – – – । – – – ]

ब्रह्मानन्दीं जीवाला
झोके देअी जी बाला
गङ्गा काव्याची वाहे
**गान्धर्वी** ती जाणा हें. ( १०१ )

भिजी १२ वी कविता गान्धर्वीवृत्तांत आहे. धात्री हें तेथे दिलेलें नाव निराधार दिसतें.

**कलह** ( २९० ) [ । ᴗ ᴗ – – ᴗ ᴗ । – – – ]

“ रसनालोल नरा टाळा,
बहु तो पोटीं असे काळा

रसनेचेच तया भोग
प्रिय होती न सुहृद्योग " ( भिजी )

ही भिजी २८ वी कविता सरलावृत्तांत नव्हे तर या कलहवृत्तांत आहे.

"**सद्**"–**वृत्ता** ( २९३ ) [ । ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ । – – – ]

स्तुति जरि किति कवि मद्याची
करिति तरि न बुध तें याची;
रुचिर चषकिं करि तें नृत्ता,
अुचित न लव परि "**सद्**"–**वृत्ता.** ( १०२ )

भिजी ८९ वी कविता सहदळावृत्तांत नव्हे तर या सद्वृत्तावृत्तांत आहे.

"**अभिरामा**" ( २९४ ) [ । – – ᴗ ᴗ – । ᴗ ᴗ – – ]

कां पाण्डुर तूं शशिराया ?
ही प्रीति पहा कशि वाया !
माझी न कुणी नभिं रामा—
अन् दूर सदा **अभिरामा**. ( १०३ )

**मणिबन्ध** ( २९६ ) [ । – ᴗ ᴗ – – । – ᴗ ᴗ – ]

चाटुवचांनी कां झुकतां ?
स्वत्वमहत्त्वा कां मुकतां ?
होय कसें लोकीं न हसे ?
की **मणिबन्ध** क्षीण असे. ( १०४ )

भिजी २६ वी नि २७ वी या कविता मणिबन्धवृत्तांत आहेत.

**कनक** ( २९७ ) [ । – – – ᴗ ᴗ । – ᴗ ᴗ – ]

कान्तेची रति हाय अुरीं,
तारुण्यासह जाय दुरी;
आसक्ती परी भीषण की
जी आ–जीव वसे **कनकीं** ! ( १०५ )

“नाना वाजति वाद्यध्वनी.
घोषें कापतसे अवनी
भूपा लागुनि जोर महा
दक्षा छन्द मनोरम हा.” ( ओलस्व ४/७ )

दक्षा या नावाला कोठे आधार गावत नाही.

**चित्रगति** ( २९८ ) [ । – ᴗ ᴗ – ᴗ ᴗ । – ᴗ ᴗ – ]

हीन गुणें नर त्याजकडे
जाय तरी गुणिराज पडे;
दंशुनि त्यास दरिद्र-मती
व्यक्त करी निज **चित्र गती.** ( १०६ )

“सद्घन चिद्घन नायक जो
संसृतिसागरतारक वा
तद्गुणकीर्तनिं गायक जो
तोचि जना शिव-कारक वा.” ( डिरुस्व २/९३ )

“**सुलोचना**” ( ३०७ ) [ । – – ᴗ ᴗ – । ᴗ – ᴗ – ]

रूपावर भाळुनी कुणी
नेऔी रमणीस जिङ्कुनी;
तें प्रेम खुळें जुळोच ना,
दासी तरि घ्या **सुलोचना.** ( १०७ )

‘**चारुलोचना**’ ( ३०८ ) [ । ᴗ ᴗ – ᴗ ᴗ – । ᴗ – ᴗ – ]

“अयि मन्मथचूतमञ्जरि
श्रवणायत**चारुलोचने**
अपहृत्य मनः क्व यासि मे
किमराजकमत्र राजते” ( काशृ १९ )

“स्मरति स्म रतिप्रियाद्यतः
क्षणमीक्षणमीलितं रतम्

परमाप रमात्र तत्तम–
स्तरसास्तरसा वियोगिनी ” ( हृधश १०/४५ )

**प्रसभ** ( ३०९ ) [ । ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ – । ᴗ – ᴗ – ]

चिररुचिर दिसे रती परी,
नहि हृदयगुणें सती परी,
अुघड न पण तें अरित्व रे–
**प्रसभ** जनमनें हरी त्वरें. ( १०८ )

संस्कृतांत रह ( ५/१२९ ) हें प्रसभवृत्ताचें अुदाहरण आहे.

**'नृपात्मजा'** ( ३१० ) [ । ᴗ – ᴗ – – । ᴗ – ᴗ – ]

“ अजात्मजें दिग्रथें सुखें
विलोकिलीं सत्स्नुषामुखें;
स्वपुत्रयोग्या विलासिनी
**नृपात्मजा** चारुहासिनी.” ( मोसग्र ८/५१६ ).

३ ऱ्या आणि ४ थ्या चरणांची मी येथे आलटापालट केली आहे.

**'कटाक्षललिता'** ( ३११ ) [ । ᴗ – ᴗ ᴗ ᴗ – । ᴗ – ᴗ – ]

“ मनाक्प्रसृतदन्तदीधितिः
स्मरोल्लसितगण्डमण्डला
**कटाक्षललिता** तु कामिनी
मनो हरति चारुहासिनी ” ( पि ४४ टीका )

जगांत गुणलुब्ध सुन्दरी
दुराप दिसते खरोखरी;
धनास वरिती क्षितीवरी
**कटाक्षललिता** किती तरी ! ( १०९ )

**मनोरमा** ( ३१२ ) [ । ᴗ ᴗ ᴗ – ᴗ – । ᴗ – ᴗ – ]

प्रणयवाहिनी स्वतन्त्र जी
अधम दास्यभावना त्यजी

हृदयवैभवें तिलोत्तमा
कवण तीहुनी **मनोरमा** ? ( ११० )

‘**पिच्छ**’ ( ३१३ ) [ । – ᴗ ᴗ – ᴗ ᴗ । – ᴗ – ᴗ ]

“ **पिच्छ**लसद्धननीलकेश
चन्दनचर्चितचारुवेश
खण्डितदुर्जनभूरिमाय ”
मण्डितनिर्मलहारिकाय ” ( रूस्तमा १५८ )

**मोटक** ( ३१९ ) [ – । – ᴗ ᴗ – ᴗ ᴗ । – ᴗ ᴗ – ]

वाहे नव जीवन हें पन्हळीं,
अुत्फुल्ल पहा झुडुपें सगळीं;
हे बैल कसे रिझती कवनें,
कां **मोट** कण्हे असहायपणें ? ( १११ )

“ भानोरुदये यदि वास्तमये
गन्धर्वपुरप्रतिमा ध्वजिनी
बिम्बं निरुणद्धि तदा नृपतेः
प्राप्तं समरं सभयं प्रवदेत् ” ( वब्रृ ४६/२६ )

**तोटक** ( ३२० ) [ ᴗ ᴗ । – ᴗ ᴗ – ᴗ ᴗ । – ᴗ ᴗ – ]

पडतां कधि गाठ न शब्द वदे,
मग धाडुनि भेट कशास्तव दे ?
सखि, शान्त विरक्त दिसो मुनि तो,
बसतो **टक** लावुनि चोरुनि तो. ( ११२ )

“ यदि जन्मजरामरणं न भवेत्
यदि चेष्टवियोगभयं न भवेत्
यदि सर्वमनित्यमिदं न भवेत्
अिहजन्मनि कस्य रतिर्नभवेत् ” ( सुभाषि ३३१४ )

हें वृत्त फार प्राचीन आहे. महाभाष्य खण्ड १ ( पृ. ३३४ ) मधील ‘ दुहि याचि रुधि ’ ही कारिका तोटकवृत्तांत आहे. मराठींत मोरोपन्तकृत हररमणीय रामायण ( मोसग्र ७/३९० ) हें तोटकवृत्तांत आहे.

**विदुषी** ( ३२८ ) [ ⏑ ⏑ | – ⏑ ⏑ – ⏑ ⏑ | – ऽ ⏑ – ]

गुणसुन्दर जी महिला तिचा
सहवास बरा सुखशान्तिचा;
मतिमन्द सुधांशुमुखीहुनी
**विदुषीच** बरी गृहिणी गुणी. ( ११३ )

" सुरभूषण राम रणाङ्गणीं
रणकर्कश देवशिरोमणी;
रिपुकाळ कराल विदारि तो
रणशूर रणीं मदहारि तो." ( राकधास ७ )

**मौक्तिकदाम** ( ३२९ ) [ ⏑ | – ⏑ ⏑ – ⏑ ⏑ | – ⏑ ⏑ – ⏑ ]

किती बघ सिन्धु भयङ्कर खोल
नि त्यांतच मौक्तिक तें बहुमोल;
मिळे परि पाणबुड्यास छदाम,
नि घालि गळां नृप **मौक्तिकदाम**. ( ११४ )

पुणा ( ९/१६ ) हें कडवअ या मौक्तिकदामवृत्तांत आहे. मोसारा ९ वा सर्ग मौक्तिकदामवृत्तांत आहे. रामदासांचेंहि अेक अुदाहरण आहेः–

" किती रडशील, किती पडशील,
किती दडशील, किती घडशील,
नको बहु चार, त्यजी अविचार,
करूनि विचार पहा निजसार. " ( राकधास १४९ )

**'तेजस्पति'** ( ३३० ) [ | – – – – | – – ⏑ – ]

" ये ये सारीं दूरी तमा,
ये तेजोमूला अुत्तमा
रात्रींच्या या मेघाप्रती
निःसारीं हे **तेजस्पती**. ( अुस ३२८ )

या कवितेंतील सारीं कडवीं या 'तेजस्पति' वृत्तांत आहेत.

**अुज्ज्वला** ( ३३३ ) [ । ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ – । ᴗ ᴗ – ᴗ – ]

जंव नव युवका युवती दिसे
तंव रुचिर गमे जडुनी पिसें,
सदय हिमकराहुनि शीतला
सुतपित कनकाहुनि **अुज्ज्वला**. ( ११५ )

“ चरणयुगुळ सुन्दर गोजिरे
मृदु कुवलय रङ्गित साजिरे
शरधि कुमरि वाञ्छिति अन्तरें
मुनिजन ह्रदिं चिन्तिति आदरें. ( डिरुस्व २/१३० )

**हंसी** ( ३३४ ) [ । – – – – ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ]

साधी साधी रुचिर महिला,
शृङ्गाराची निकड न हिला,
शब्द प्रेमें स्थिरमति वदे
दावी **हंसी**परि गति पदें. ( ११६ )

“ सेवा सेवा प्रभुपद सदा,
त्याच्या नामा निशिदिनिं वदा,
जा हो जा हो शरण सदया,
तो विश्वात्मा निरशिल भया ”. ( पार )

संस्कृतांत ममच ( १/३१ ) आणि मराठींत ‘ पर्णागारी० ’ हा श्लोक मोसग्र ( ८/५३५ ) हीं आणखी हंसीवृत्ताचीं अुदाहरणें आहेत.

**विद्युन्माला** ( ३३५ ) [ । – – – – । – – – – ]

मेघाली का ही आभाळीं
मृत्युच्छाया आली काळी
का हा श्याम स्रष्टा आला
कण्ठीं ज्याच्या **विद्युन्माला** ? ( ११७ )

महाभाष्यांत दोनदा ( १/ ३५६, २/२०४ ) कारिकेसाठी विद्युन्मालावृत्त योजिलेलें दिसतें. वब्रृ ( ६८/२७) हें आणखी अेक अुदाहरण आहे. मराठींत मोरोपन्तकृत रामायणकथासुधा ( मोसग्र ८/३८ ) हें काव्य विद्युन्माला-वृत्तांत आहे.

**स्निग्धा** ( ३३६ ) [ । – ᵕ ᵕ – – ! – – – – ]

अन्त्यज पोरा लावी पोटीं
माणुसकी ती त्याची मोठी;
जात्यभिमानें कैची दिग्धा
भूतदयेने वृत्ति **स्निग्धा** ! ( ११८ )

“ घालित खेवीं माला कण्ठीं
किन्नर देहा जाली सूटी
ब्राम्हणरूपें देवा मेटी
येअुनि मागे ज्ञानापाठीं. ” ( डिरुस्व ६/९४ )

संस्कृतांत स्निग्धावृत्ताचीं वब्रृ ( ६८/१२ ) आणि वब्रृजा ( ११/९ ), ममच ( १/२५ ) हीं तीन अुदाहरणें आढळतात.

**बिन्दु** ( ३३७ ) [ । – ᵕ ᵕ – ᵕ ᵕ ! – – – – ]

“ रुक्मिणि सुन्दरि खेळे जेथे
तें वन मङ्गळ राहे तेथे
ध्यान करी पर शास्त्र ( ? ) युक्तें
श्रीहरिपङ्कज चित्तीं चित्ते.” ( डिरुस्व २/६० )

“ हासत हासत बोले अैसें
भाग्य फळागत तूझें कैसें
वृद्धपणीं तुज पुत्राभेटी
सौख्य महा मज दाटे पोटीं ”. ( डिरुस्व )

**कलगीत** ( ३४० ) [ । ᴗ ᴗ – – – ! ᴗ ᴗ – – – ]

" कमलाकान्तः स्वयमुद्भूतो
जमदग्नेः सत्सदने रामः
परशूद्धासी धरणीभागे
कुमहीपानां विशरं कर्तुम् " ( ममच १/ ३२ )

'**पङ्क्तिरथ**' ( ३४१ ) [ । – – ᴗ ᴗ – । ᴗ ᴗ – – – ]

" तों नन्दन ये जमदग्नीचा
कीं पुञ्ज जसा ज्वलदग्नीचा
तों **पङ्क्तिरथ** स्वमनीं धाके,
जोडूनि करां विनयें ठाके. " ( मोसग्र ८/५१६ )

**कुवलयमाला** ( ३४२ ) [ । – – – ᴗ ᴗ । ᴗ ᴗ – – – ]

कीं तेजोनिधि मुख हें गोल,
डोळे कीं तम-सरसी लोल !
वाढाया विधु-सुषमा लागे
रङ्गाया **कुवलयमाला** गे. ( ११९ )

" दे तें सत्य सुख अिहामुत्र,
तैसाचि प्रिय सुमती पुत्र.
त्या दोघांत नृप महाभाग
कोणाचा तरि करिल त्याग. " ( मोसग्र ८/५२४ )

या श्लोकांतील यतिभङ्ग असह्य आहेत !

'**सुरपति**' ( ३४३ ) [ । ᴗ ᴗ ᴗ ᴗ – – । ᴗ ᴗ – – – ]

" **सुरपति**चापप्रतिमा राज्यं
नभसि विलीना जलदान् हन्ति
पवनविलोमा कुटिलं याता
न भवति शस्ता विनिवृत्ता वा " ( वबृ ३३/२९ )

या वृत्ताचीं अेक हें आणि दुसरें ( वबृ ३५/८ ) अशीं दोनच अुदाहरणें आढळलीं.

**'क्षत्रक्षयकर'** ( ३४४ ) [ । – – ⏑ ⏑ ⏑ ⏑ । ⏑ ⏑ – – – ]

" **क्षत्रक्षयकर** भृगुरामातें
बोले रघुवर, 'कथिजे मातें,
लक्ष त्वरिततर अमोघास
बाणास, न करु भुवनग्रास.' " ( मोसग्र ८/५१७ )

**अर्धक्षामा** ( ३४५ ) [ । – – – – । – ⏑ ⏑ – – ]

" नाद्यां हित्वा तारकभूमिं
गच्छत्यन्यां दर्शनधारी
सर्वस्त्रैणं नाति कदाचित्
पूज्यो पूज्ये याति न भव्यः" ( अधप २०/७९ )

" हे वो कोडे कोन निवाडे
अैस्या लक्षा काय विवक्षा
घेतो चापा स्पर्शुनि कोपा
चन्दी दक्षा हेचि परीक्षा. " ( ओलस्व ५/३२ )

**कमला** ( ३४६ ) [ । ⏑ ⏑ – – – ! – ⏑ ⏑ – – ]

दिसते बाला चञ्चल मोठी
वसली आधी सागर-पोटीं;
रमली गेली विष्णुपदीं ती
**कमला** आली निर्धनचित्तीं. ( १२० )

भिजी ३९ वी आणि ४० वी या कविता कमलावृत्तांत आहेत.

**रुक्मवती** ( ३४७ ) [ । – ⏑ ⏑ – – ! – ⏑ ⏑ – – ]

रङ्ग पहा वा गन्ध लुटा वा
मात्र मधूचा ठाव न ठावा;
भृङ्ग न होअी तेथ अतीथी
चम्पकमाला **रुक्मवती** ती. ( १२१ )

“ साधुजनांतें देखुनि निन्दी,
दारुण शब्दीं अन्तर भेदी,
तें फळ आता भोगित देखे
पुत्र वियोगें अन्तर शोके. ” ( डिरुस्व २/४९ )

संस्कृतांत वबृ (४६/९, ६३/२) हीं रुक्मवतीचीं अुदाहरणें आहेत. मराठींत भिजी ३४ वी कविता रुक्मवतीवृत्तांत आहे.

“ **अुन्नत** ” ( ३४८ ) [ । – – – ᴗ ᴗ । – ᴗ ᴗ – – ]

ही शालीन न लोकभयाने,
ना ही अुद्धत हृद्विजयाने,
अङ्गीं आर्जव ही मधु दावी,
वृत्ती **अुन्नत** कां न रुचावी ? ( १२२ )

संस्कृतांत वबृ ( ४/२७, ४६/५, ४६/१३ ) आणि वबृजा ( ६/१, ११/१६ ) हीं या अुन्नतवृत्ताचीं अुदाहरणें आहेत. मराठींत “ गौरा श्यामल सुन्दर गौरी ” ( डिरुस्व ४/३१ ) हें अेक अुदाहरण आढळतें.

**अनवसिता** ( ३४९ ) [ । ᴗ ᴗ ᴗ ᴗ – – ! – ᴗ ᴗ – – ]

मधुसुमनांची राजस राणी
तरल जिवाचीं गुञ्जत गाणीं
क्षण न फुले तों अन्तक हाणी–
**अनवसिता** जों जीव-कहाणी. ( १२३ )

“ चिरतर दैन्या भोगुनि कान्ता
बहुपरि झाली दुक्खित चित्ता;
शिण तुज देवा, हें कळवाया
मज वदली जा हे यदुराया. ” ( तरासु ७६ )

संस्कृतांत वबृ ( ५३/११९ ) आणि वबृजा ( २७/६ ) हीं अनवसितावृत्ताचीं अुदाहरणें आहेत.

**वर्णबलाका** ( ३५० ) [ । ‿ ‿ – ‿ ‿ – । – ‿ ‿ – – ]

"कमळें कमळीं रेखुनि चाङ्गें
कमळा-कमळीं धावति वेगें
कमळा-कमळीं घेति सुरङ्गें
कवळींचि हरी गुम्फिति रागें." ( डिरुस्व ४/२५ )

भिजी ५७ वी कविता या वृत्तांत आहे. तेथे वृत्ताचें नाव नलिनी दिलें आहे, पण त्याला आधार नाही.

**दोधक** ( ३५१ ) [ । – ‿ ‿ – ‿ ‿ । – ‿ ‿ – – ]

आत्मसुखास्तव काव्य करा जी,
होतिल का धनचुम्बक राजी ?
दुर्मिळ हृद्गुणशोधक तेथे,
श्रीयुत काहि **वदो धक**तें तें. ( १२४ )

कारिका साङ्गायला दोधकवृत्ताचा अुपयोग महाभाष्यांत अनेकदा केला आहे. मराठींत गिरिधरकृत सुन्दररामायण, निरञ्जनमाधवकृत ज्ञानेश्वरविजयाच्या ८ व्या अध्यायांतील पूर्वार्ध, साधुदासकृत गृहविहार, २ रा सर्ग आणि व्यसनी ( सानिसा १/५३ ) हीं प्रकरणें दोधकवृत्तांत आहेत.

**तामरस** ( ३५२ ) [ । ‿ ‿ ‿ ‿ – ‿ ‿ । – ‿ ‿ – – ]

धवल तनूपरि पातळ अङ्गीं
कच किति भङ्गुर कज्जलरङ्गी !
हरिकटि ती हरितस्थलिं आली,
अभिनव **तामरस**द्युति गाली. ( १२५ )

संस्कृतांत वभ्रू ( २८/८, ८७/३९ ), वभ्रूजा ( २०/८ ) आणि जस्तु ( ३१/११–१५ ) हीं तामरसाचीं अुदाहरणें आहेत. मराठींत भिजी ११६ वी कविता तामरसवृत्तांत आहे.

**परितोषा** ( ३५३ ) [ । ‿ ‿ – ‿ ‿ ‿ ‿ । – ‿ ‿ – – ]

" जमदग्निसुत तदा हृतशक्ति
प्रकटी सविनय तो बहु भक्ती

परलोकगति शरण्य निवेदी
विशिखें मग तिजला प्रभु भेदी." ( मोसग्र ८/५१७ )

**कमलाक्षी** ( ३५४ ) [ ।ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ।– ᴗ ᴗ – – ]

" कलकलकलकलकण्ठवदस्मा–
नव नवनवनवरोचितवाचः
भव भव भवभवभीतिभिदस्य–
न्मदमदमदमदनान्तक दूरम्" ( जस्तु ३०/६८ )

**सुषमा** ( ३५८ ) [ । – – ᴗ ᴗ – । – – ᴗ ᴗ – ]

" माझ्या हृदयीं पाहोन तिला
येअी भरती भावोदधिला,
ती काय नसे पूर्णेन्दुसमा ?
फाके भुवनीं केवी **सुषमा** ! ( १२६ )

**मत्ता** ( ३५९ ) [ । – – – – ! ᴗ ᴗ ᴗ ᴗ – – ]

ती स्वर्गीची परिचित नारी
विश्वामित्रासहि जितणारी
मानी तीची कवण न सत्ता
हाकारी ती जंव मद-**मत्ता** ? ( १२७ )

संस्कृतांत वबृ ( ४६/२७ ) हें अेक मत्तावृत्ताचें अुदाहरण आहे. मराठींत भिजी ३३ वी कविता याच वृत्तांत आहे.

**कुड्मलदन्ती** ( ३६० ) [ । – ᴗ ᴗ – – ! ᴗ ᴗ ᴗ ᴗ – – ]

कोण नरातें प्रियतम नारी ?
जी भवसिन्धूवर तरणारी
कष्टुनि कान्तश्रम हरणारी
**कुड्मलदन्ती** स्मित करणारी.( १२८ )

भिजी ८५ वी नि ८८ वी या कविता कुड्मलदन्तीवृत्तांत आहेत.

**विरतिमहती** ( ३६२ ) [ । – – ᴗ ᴗ ᴗ ᴗ । ᴗ ᴗ ᴗ ᴗ – – ]

“ दैत्यानहिमहिम हिमतरोऽध्दा
रोध्दा दलयाति यतिभयहृद्यः
हृद्यः स जगति गतिहृदसङ्ख्ये
सङ्ख्ये कृतरतिरतिगुरुरासीत् ” ( रह ४६/५१ )

**‘ नयनविशाला ’** ( ३६३ ) [ । – ᴗ ᴗ – ᴗ ᴗ । ᴗ ᴗ ᴗ ᴗ – – ]

“ रुक्मिणि सुन्दरि **नयनविशाला**
तारस कोरस तरळित लीला
लोकिति दृष्टिसि नरपदमेळा
लावुनि मानस हरि घननीळा. ” ( **डिरुस्व** )

**कुसुमविचित्रा** ( ३६४ ) [ । ᴗ ᴗ ᴗ ᴗ – – ! ᴗ ᴗ ᴗ ᴗ – – ]

मधुनि मधूनी अुघडुनि वर्षा
रुचिर अुन्हें ये भर जणु हर्षा;
रस पाहिला हा अुसळवि मित्रा
बघुनि धरित्री **कुसुमविचित्रा**. ( १२९ )

संस्कृतांत वब्रृ (२४/२०,२२) आणि वब्रृजा (१७/१३) हीं कुसुमविचित्रा-वृत्ताचीं अुदाहरणें आहेत. भिजी १२७ वी कविता याच वृत्तांत आहे.

**‘ सखिजन ’–“ वन्द्या ”** ( ३६५ ) [ । – ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ! ᴗ ᴗ ᴗ ᴗ – – ]

रञ्जित घन नभिं बहुपरि होती,
गोचर अुडुगण हलुहलु भोतीं,
शान्त सुखद किति सकरुण सन्ध्या
पावन सरसहि **सखिजनवन्द्या**. ( १३० )

“ ठाकति ठुमकति सखिजन मेळीं
चालति गजगति हलुहलु ढाळीं
बाहुसि झगतन खुराळित खेळे
हासति खुदखुद मुरडुनि डोळे ”. ( डिरुस्व ३२ )

**विधुरवितान** ( ३६७ ) [ । ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ – । ᴗ ᴗ ᴗ ᴗ – – ]

“ कलयति सकलं परगतदोषं
रचयति विकलः स्वकमतपोषं
परमिह विरलोऽमितगतिबुद्धिं
प्रथयति विमलोऽपरगुणशुद्धिम्” ( अधप १२/९७ )

**सुपवित्रा** ( ३६८ ) [ । ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ! ᴗ ᴗ ᴗ ᴗ – – ]

जलधर वरसुनि गगनिं छटा ही
गडद रुचिर शुचि निळवट पाही;
निघुनि सकल मल बघ बघ मित्रा
धरणि हसतमुख कशि **सुपवित्रा** ! ( १३१ )

‘ **मण्डलाकृति** ’ ( ३६९ ) [ । – ᴗ – ᴗ – ! ᴗ ᴗ ᴗ ᴗ – – ]

“ भार्गवोक्तिला परिसुनि धीरें
चाप साजिलें रघुकुलवीरें
बाण जोडुनी श्रुतिपथिं नेलें
**मण्डलाकृति** त्वरितचि केलें.” ( मोसग्र ८/५१७ )

‘ **मञ्जुलवचना** ’ ( ३७० ) [ । – ᴗ ᴗ – – । – ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ]

“ शिल्पकलेची देखत करणी
वाजति जन्त्रें सुस्वर पवनीं
ठिक्कत कैशी सुन्दर हरिणी
कुञ्जित पक्षी **मञ्जुळवचनीं**.” ( डिरुस्व )

**सम्मदवदना** ( ३७२ ) [ । – ᴗ ᴗ – ᴗ ᴗ । – ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ]

“ कर्णविभूषण कुण्डल झळका
त्या तळिं शोभति चम्पककलिका
नासिक बेसरिं वज्रककणिका
गण्डल मण्डल शोभति रुचिका ”. ( डिरुस्व )

**मोदक** ( ३७५ ) [ ।– ᴗ ᴗ – ᴗ ᴗ । – ᴗ ᴗ – ᴗ ᴗ ]

" मानवतीमदहारिविलोचन
दानवसञ्चयघूकविरोचन
डिण्डिमवादिसुरालिसभाजित
चण्डिमशालिभुजार्गलराजित " ( रूस्तमा १४९ )

या पद्यांत मोदकवृत्ताच्या ५ चतुष्पद्या आहेत.

**पङ्कज** ( ३७६ ) [ ।– ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ । – ᴗ ᴗ – ᴗ ᴗ ]

चिन्तन करि अलि येअिल भास्कर
मुक्त करिल मज यांतुनि सत्वर –
घे अुपटुनि तव मत्त मतङ्गज
तें मधुरुचिर निमीलित **पङ्कज**. ( १३२ )

मराठींत विद्याधर वा. भिडे यांच्या अलङ्कारनिरूपणांतील २२३ पृष्ठावरील " भूवरि निबिड तमश्चय शोभति " हें या वृत्ताचें अुदाहरण आहे.

**भ्रमरविलसिता** ( ३७७ ) [ । – – – – ! ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ]

काव्याला का रसिकच नलगे ?
त्यावाचूनी कवन विफल गे.
काव्य श्री घे रसिक-विहसितें
जैसें पद्म **भ्रमरविलसितें**. ( १३३ )

संस्कृतांत शिशु ( ४/६२ ) आणि वबृजा ( ६/१२ ) हीं भ्रमरविलसिताचीं अुदाहरणें आहेत. मराठींत मोसारा ३ रा सर्ग ( मोसग्र ८/५२१ ), साववि ( १३/६१ ) हीं भ्रमरविलसिताचीं अुदाहरणें आहेत.

**'सुर'-ललना** ( ३७८ ) [ । – ᴗ ᴗ – – । ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ]

" भक्तिभरेण प्रमुदितहृदया
व्याहतनृत्या सततमनुदिनम्
सद्गुणराजीं भवदवदवथुं
गायति नेतस्तव **सुरललना** " ( चव १४ )

**'सुवसना'** ( ३७९ ) [ ।– – – ᴗ ᴗ । ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ]

" माजीं वेष्टित कनक **सुवसना**
शोभे त्यावरि मनमथरसना
मुद्रा किङ्किणि कलरवरचना
भद्रा वाजति जनभयहरणा " ( डिरुस्व २९ )

**प्रहरणकलिता** ( ३८१ ) [ । ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ! ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ]

गणति जर न हो पतित नरमणी,
पतित नित कशी तर मग रमणी ?
कधिच करुं नये पदतलिं दलिता
ऋजुमति कलिका **प्रहरणकलिता**. ( १३४ )

संस्कृतांत भट्टिकाव्य ( १२/८६–८७ ) हीं प्रहरणकलितावृत्ताचीं अुदाहरणें आहेत. मराठींत भिजी १५० वी कविता या वृत्तांत आहे.

**मणिगुणनिकर** ( ३८२ ) [ । ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ! ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ]

" मनिं कृतिंत वचनिं शुचितम असणें
क्षणभरिहि दुरितसरणि न धरणें
व्रत कठिण सुजन दृढ अनुसरतो
व्रत मरणभयिं न सुजन विसरतो." ( भिजी १७८ )

संस्कृतांत रह ( ५/१४७ ) आणि मराठींत साववि ( १३/५६ ) हीं मणिगुणनिकराचीं अुदाहरणें आहेत.

**'कृशा'** ( ३८३ ) [ ᴗ – ᴗ – – ! ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ]

सरूपरी ती कृश सरलतनू,
सतेज गोरें वदन विधु जणू,
विलोल नेत्रीं हृदयज मदिरा,
अशी **कृशाङ्गी** खचितचि रुचिरा. ( १३५ )

" कृशः क अेष ( ? ) विहित अिगुपधा–
त्स्वरे हि दोषो भवति परिकृशे

पदस्य लोपो विहित अिति मतं
जगत्यनूना भवतिहि रुचिरा " ( मभाष्य ३/४०९ )

'अम्बर' ( ३८४ ) [ । – ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ । ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ᴗ ᴗ ]

" अम्बरगतसुरविनतिविलम्बित
तुम्बुरुपरिभवविमुरलिकरम्बित
शम्बरमुखमृगनिकरकुटुम्बित
सम्भ्रमवलयितयुवतिविचुम्बित " ( रूस्तमा १३६ )

'मदनरसङ्गत' ( ३८५ ) [ । ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ᴗ ᴗ । – ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ]

" मदनरसङ्गत सङ्गतपरिमल
युवतिविलम्बित लम्बितकचभर
कुसुमविटङ्कित टङ्कितगिरिवर " ( रूस्तमा १३३ )

'अमलकमलरुचि' ( ३८६ ) [ । ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ]

" अमलकमलरुचिखण्डनपटुपद
नटनपटिमहृतकुण्डलिपतिमद
नवकुवलयकुलसुन्दररुचिभर
घनतडिदुपमितबन्धुरपटधर ( रूस्तमा १२९ )

या पद्यांत चार चतुष्पद्या आहेत. आणखीहि एक उदाहरण आहे.

" विलसदलिकगतकुङ्कुमपरिमल
कटितटधृतमणिकिङ्किणिवरकल
नवजलधरकुललङ्गिमरुचिभर
मसृणमुरलिकलभङ्गिमधुरतर " ( रूस्तमा १३२ )

'अुद्यद्विद्युत्' ( ३८७ ) [ । – – – – । ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ]

" अुद्यद्विद्युद्द्युतिपरिचितपट
सर्पत्सर्पस्फुरदुरुभुजतट
स्वस्थस्वस्थत्रिदशयुवतिनुत
रक्षद्दक्षप्रियसुहृदनुसृत " (रूस्तमा ११९ )

याच्या खालील दोन चतुष्पद्याहि याच वृत्तांत आहेत.

**'बल्लवलीला'** ( ३८८ ) [ ।– ᴗ ᴗ – – । ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ]

" **बल्लवलीला**समुदयसमुचित
पल्लवरागाधरपुटविलसित
वल्लभगोपीप्रवणित मुनिगण–
दुर्लभकेलीभरमधुरिमकण " ( रूस्तमा १४० )

या नन्तर याच वृत्तांत षट्पदी आहे.

**अचलधृति** ( ३८९ ) [ । ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ । ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ]

" रघुवर दशरथ अमरकथितकथ
धरुनि सुनयपथ नुतसचिवसहित
सकलनृपमहित रिपुभयविरहित
अनुदिन अवहित करि निजजनाहित " ( मोसग्र ८/५१८ )

संस्कृतांत नैच ( २२/१४८ ) आणि मराठींत मोसारा ( २०/१ ) हीं अचलधृतीचीं आणखी अुदाहरणें आहेत.

**'वैष्णव'** ( ३९१ ) [ ।– ᴗ ᴗ – – । ᴗ – ᴗ – – ]

वीर भजे जो समानतेला,
व्यक्तिमहत्त्वा न जो भुकेला,
जो जनसेवा स्वधर्म मानी
**वैष्णव** तो त्या न कोण वानी ? ( १३६ )

" जीर्णधनुर्भङ्गगर्व सोडीं
**वैष्णव**चापासि शीघ्र वोडीं,
सज्ज करायास यास घेणें,
हें करुनी बाहुयुद्ध देणें." ( मोसग्र ८/५१६ )

" **अिरा** " ( ३९२ ) [ ।– – ᴗ ᴗ – । ᴗ – ᴗ – – ]

" प्याला भरला तुझ्याच साठी,
भाळीं रसिका, कशास आठी ?
भासे सुरअी जरी अिराणी
आहे पण ही **अिरा** मराठी " ( माजूग ३ )

गझलाञ्जलींतील सञ्जीवनी, रसिकास आणि हृदयराणीस या तीन कविता आणि 'टाकलेली' ( गिका ५५ ) या कविता अिरावृत्तांत आहेत.

"**जलौघवेगा**" ( ३९५ ) [ । ᴗ – ᴗ – – । ᴗ – ᴗ – – ]

" सतेज काळे टपोर डोळे
दिसावयाला गरीब भोळे
अता लबाडी स्मरूनि त्यांची
सुखासनीं मी अखण्ड पोळें." ( माजूग ६ )

**जलोद्धतगति** ( ३९७ ) [ । ᴗ – ᴗ ᴗ ᴗ – ! ᴗ – ᴗ ᴗ ᴗ – ]

अुडे जल पडे, जणूं सुमन तें,
प्रसन्नकवनद्युतिस्फुरण तें !
तुषारसुषमा रसज्ञ बघती
चमत्कृति करी **जलोद्धतगती**. ( १३७ )

" भवाब्धि सुकवी, कविप्रिय करी
करीशतम हा महादय हरी.
सुकीर्तिपरमा रमाप मिरवी
रवीडितमहा महास्पद नवी. ( मोसग्र ७/४१४)

हें मोरोपन्ती विचित्र रामायण सबन्ध या वृत्तांत आहे. पद्यांत मध्यावर जी अक्षरावृत्ति साधली आहे तीच या वृत्तांतील किरात ( ५/२७ ) आणि शिशु ( ४/५४ ) या श्लोकांत साधलेली आहे.

**प्रभा** ( ३९८ ) [ । ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ! ᴗ – – ᴗ – ]

जरि कलिकलहें जगीं ताप हो,
बिकट किति जरी भवव्याप हो,
कितिहि घनघटा झळम्बो नभा
ग्रहशशि वितरी प्रसन्न **प्रभा**. ( १३८ )

" रविकुळहित तें करावेंच मी
म्हणवुनि कथितों, न हो तू श्रमी;
त्वरित तनुज दे मुनीच्या करीं
अुशिर दशरथा, न आता करीं." ( मोसग्र ८/५०४)

किरात (५/२१, १८/१६–१७, १८/२०–२१, १८/२६) आणि शिशु (६/६७) हे श्लोक प्रभावृत्तांत आहेत. मराठींत भिजी ११७–११८ या कविता प्रभावृत्तांत आहेत.

**दीपकमाला** (३९९) [। – ᴗ ᴗ – – । – ᴗ – ᴗ –]

नित्य तमाची काय काळजी ?
स्नेहसुखाचा आज काळ जी.
आज दिवाळी गाजते किती ?
**दीपकमाला** हास्य फेकिती. (१३९)

**शुद्धविराट्** (४००) [। – – – ᴗ ᴗ । – ᴗ – ᴗ –]

" आभीराञ्छबरान् सपह्लवान्
मल्लान् मत्स्यकुरूञ्छकानपि
पाञ्चालान् विकलांश्च पीडय–
त्यन्नं चापि निहन्ति कर्कटे " (वबृ ५/३८)

वबृ (४/२५) हेंहि अुदाहरण शुद्धविराटाचेंच आहे.

**सीधु** (४०१) [ᴗ ᴗ – – ᴗ ᴗ । – ᴗ – ᴗ –]

"हस बाळे, रडतेस कां सुते ?
नयनींचे चल पूस आसु ते !
प्रिय कन्येप्रत माय बोलली,
नच अुक्ती कविकल्पनेंतली." (अुवा १/१६)

**मालती** (४०२) [। ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ᴗ ᴗ । – ᴗ – ᴗ –]

कधि हृदयास न बाधते जरा,
प्रखर रणांतहि पाझरे झरा;
अलि बनुनी भवती भ्रमाल ती
क्षण जर दाविल हार्द **मालती**. (१४०)

मराठींत भिरा (४/७०) आणि 'वात्सल्य' (अुवा १/१६) या कविता मालतीवृत्तांत आहेत.

'**रुचिरविभ्रमा** (४०६) [।– ◡ ◡ ◡ ◡ ◡ ◡ । ◡ ◡ ◡ – ◡ –]

" यत्र दधति सुरयुवतयः श्रियं
भास्वदसितमणिभवनसङ्गजाम्
व्यूढसलिलभरजलदमण्डल–
प्रेङ्खदचिररुचि**रुचिरविभ्रमाः**" (रह ३१/५४)

'**हरिलीला**' (४०८) [◡ ◡ । – ◡ ◡ – – । – ◡ ◡ – –]

" ऋषि पैं म्हणती हा श्रीगुरु आम्हां
परविद्विदुषां तो ध्यानमहात्मा
निज भक्तजनां तो जीवनमेळा
जन देखति ऐशी श्री**हरिलीला**." (डिरुस्व २/९४)

**तारक** (४०९) [◡ ◡ । – ◡ ◡ – ◡ ◡ । – ◡ ◡ – –]

" हरि दारवठा मणिमण्डित शोभा
द्विजराज न्यहाळित राहुनि अूभा
द्विकडे हयकुञ्जर राअुत अूभे
सरसम्मित मण्डित मण्डप अूभे. (डिरुस्व )

"**रूपोन्मत्ता**" (४१०) [। – – – – । – – – – । –]

कीट ज्योतीने त्या मोहून
प्रेमे जाअी रक्षा होअून;
आटाआटी योगासाठी ना ?
**रूपोन्मत्ता** कोणा गाठी ना. (१४१)

**अङ्गरुचि** (४१६) [। – ◡ ◡ – ◡ ◡ । – ◡ ◡ – ◡ ◡ । –]

नील टपोर कशी गहिरीं नयनें !
दृष्टि झणी हरुनी मनिंचें भय ने;
यष्टि अुजू सडपातळ की सरुची,
अन् हिमनिर्मल राजस **अङ्गरुची**. (१४२)

" रुक्मिणि पावालि मङ्गळ मूर्तिवरा
वन्दुनि बैसलि वामभुजे चतुरा

श्रीमुख सुन्दर लोकित कामभरा
प्रेमकळा तिसि सञ्चरली प्रवरा". ( डिरुस्व ६२/९५ )

" ही अरुणार्द्र सुरङ्ग तुझी जिवली,
वीज तुझ्या नयनांत कुरङ्ग–निळी;
कोमल, श्यामल ही कमनीय तनू
सान्ध्य तरङ्ग तुझे मदुभाव जणू !" ( नाघदे )

विश्ववाणी ( फे. १९३६, पृ. २८८ ) वरील ही सारी कविता अङ्गरुचि-वृत्तांत आहे.

**हंसमत्ता** ( ४२० ) [ । – ∪ ∪ – ∪ ∪ । – ∪ – ∪ – । – ]

" काव्यमिदं विहितं मया वलभ्यां
श्रीधरसेननरेन्द्रपालितायाम्
कीर्तिरतो भवतान्नृपस्य तस्य
प्रेमकरः क्षितिपो यतः प्रजानाम्" ( भका २२/३५ )

**सुवक्त्रा** ( ४२२ ) [ । ∪ ∪ ∪ ∪ – ∪ ∪ । – ∪ – ∪ – । – ]

जरिं हरिणीपरि थोर भीरु भोळे
दिसति खरोखर पाणिदार डोळे,
परि भय ही मृदु फेकुनी दृगस्त्रां
पर हृदयांतुनि घालवी **सुवक्त्रा**. ( १४३ )

" करकमळीं धृत शङ्खचक्रपद्मा
दितिसुतसंहरिणी गदा महात्मा
अभिनवकौस्तुभरत्न कण्ठदेशीं
विलसत सुन्दर वैजयन्ति कैशी !" ( निचि ४/१९ )

**'महर्षि'** ( ४२५ ) [ । – – – ऽ ऽ । ∪ ∪ ∪ ∪ ∪ ∪ – । – ]

" शीलन्ते शुभविमलमखण्डं
पूर्वन्ते वरशततमभाषी
शीलेना नतिसदृशु **महर्षे**
मोचेही जगु विविधकिलेशैः" ( लवि १३/३ )

**सहचरी** ( ४३९ ) [ ⏑ ⏑ – ⏑ – ऽ । ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ । ⏑ – ]

" भटकूं कुठे ? प्रखर रणच्च चहुकडे,
परि तारके, स्मित करिशिल मधु गडे
भटकेनही, न विरह सुखमय तरी
म्हणवेल का कधि परि तुज **सहचरी** ? ( १४४ )

**पद्मावर्त** ( ४४६ ) [ । – – – – । – – – – । – – ]

" तो जाऊनी श्रीरामाची सेना
पाहे चित्तीं, भी त्याला भासेना,
बोले त्याशी वीरश्रीचा कान्त
क्ष्मापुत्रीचा संहर्ता आक्रान्त ". ( मोकुल ८/२५ )

या वृत्ताला दण्डदण्डनाकाव्यांत विद्याधर वा. भिडे कोणत्या आधारें मयूरी म्हणतात तें समजत नाही.

**जलधरमाला** ( ४४९ ) [ । – – – – ! ⏑ ⏑ ⏑ ⏑ – – । – – ]

माशावाणी तळमळ कां ? घ्या शान्ती,
येअी श्यामा लगबगिने ग्रीष्मान्तीं—
अैकूनी हें हुरळुनि जों गेलों मी
तों ती होती **जलधरमाला** व्योमीं. ( १४५ )

" लीलोद्दामा **जलधरमाला**श्यामा
क्षामाः कामादभिरचयन्ती रामाः
सा मामव्यादखिलमुनीनां स्तव्या
गव्यापूर्तिः प्रभुरघशत्रोर्मूर्तिः " ( रूस्तमा ५३ )

संस्कृतांत किरात ( ५/२३ ) आणि शिशु ( ४/३० ) हीं जलधरमालावृत्ताचीं अुदाहरणें आहेत. मराठींत भिजी ९५ वी कविता याच वृत्तांत आहे.

**कासारक्रान्ता** ( ४५० ) [ । – – – – । – ⏑ ⏑ – ⏑ ⏑ । – – ]

" तोयद्रोणे चित्रकमूलतुलार्धं
साध्यं यावत्पादजलस्थमयेदम्

अष्टौ दत्त्वा जीर्णगुडस्य पलानि
काश्यं भूयः सान्द्रतया सममेतत्" ( वाअचि ८/१५३ )

**प्रमदा** ( ४५५ ) [ । ◡ ◡ ◡ ◡ – ऽ ऽ ! ◡ – ◡ ◡ ◡ – । ◡ ◡ – ]

नरजननी असूनि जगतीं महिला
कधि न गणी कृतघ्न नर वन्द्य हिला;
जरि असली भवाटवि किती श्रमदा
सुगम करी धृतिप्रमुदिता **प्रमदा**. ( १४६ )

संस्कृतांत शिशु ( ४/४१ ) आणि रह ( ५/७ ) हीं प्रमदावृत्ताचीं अुदाहरणें आहेत. मराठींत भिजी १५१ वी कविता याच वृत्तांत आहे. दण्डदण्डना ( ७३ ) या श्लोकांतील पहिला चरण " पतिस दिली सतनू अथवा जनकें " हा वृत्तदृष्ट्या चुकीचा आहे.

**असम्बाधा** ( ४५८ ) [ – । – – – – ! ◡ ◡ ◡ ◡ ◡ ◡ – । – – ]

हो प्रेमी लोकां युति सुखकर अेकान्तीं
कीं योगीं घेतीं प्रणयिजनमनें शान्ती;
ये भेटायाला हरिस हरिसखी राधा,
अुद्यानीं जागा रुचिर किति **असम्बाधा** ! ( १४७ )

विद्याधर वा. भिडे यांच्या काव्यकुसुमाञ्जलींतील ( पृ. ५७ ) ५६ वा श्लोक असम्बाधावृत्ताचा आहे.

" **माल्यश्री** " ( ४६१ ) [ । – – – – । – – – – । – – – ]

" आज्ञा होतां सीतापुत्राची हातें
वृक्षीं बान्धी श्रीरामाच्या वाहातें,
युद्धाकाङ्क्षी वाय्वग्नीसे ते बन्धू
अेके जागीं जाले शौर्याचे सिन्धू ," ( मोकुल ९/४ )

**मध्यक्षामा** ( ४६२ ) [ । – – – – ! ◡ ◡ ◡ ◡ ◡ ◡ – । – – – ]

वैराग्याच्या सरस किति कथा साङ्गे तो,
वक्तृत्वाने जनहृदय हरूं लागे तो,

तों तें लागे लटपटुं सगळें बिम्बौष्ठी
**मध्यक्षामा** जंव करि नयनें हृद्रोष्टी. ( १४८ )

मराठींत कोका ( १/५० ) आशा ही कविता मध्यक्षामावृत्तांत आहे.

**मत्तमयूर** ( ४६४ ) [ । – – – – । – ◡ ◡ – – । ◡ ◡ – – ]

माया सारी बाह्य जगाची निरसाया
लागे मेघश्याम सुधेतें बरसाया;
स्वान्तीं हो त्या अुच्छ्वसितें मोहनबाधा
वेडी होअी **मत्तमयूरी**परि राधा. ( १४९ )

"तारीं तारीं दीनदयाळा मज तारीं,
वारीं वारीं सर्वहि माझें भय वारीं
मारीं मारीं दुर्जय साही रिपु मारीं
सारी सारी दैन्यकथा ही प्रभु सारी." ( पार )

संस्कृतांत रघु ( ९/७५ ) आणि किरात ( १८/२८ ) हीं मत्तमयूराचीं अुदाहरणें आहेत. मराठींत मोरोपन्ताचें मत्तमयूररामायण ( मोसग्र ७/३४५ ) याच वृत्तांत आहे.

**सङ्गत** ( ४६७ ) [ । – ◡ ◡ – ◡ ◡ । – ◡ ◡ – ◡ ◡ । – ◡ ◡ – ]

दुर्गम तें स्थळ जेथ सुपर्ण वसे वरती;
येथ असङ्ग रहा, अुरगीं नच ठेव रती.
पार रसातळिं नेअिल तूज भुजङ्गतती,
अमृत राहिल दूरच, घातुक **सङ्गत** ती. ( १५० )

मोरोपन्ताच्या साररामायणांत ( मोसग्र ८/५२० ) सहा श्लोक या सङ्गतवृत्ताचे आहेत; आणि वासुदेव वामनशास्त्री खरे यांच्या समुद्रकाव्यांतील ३९ आणि १०९ हे दोन श्लोक सङ्गतवृत्ताचे आहेत.

**प्रभद्रक** ( ४७८ ) [ ◡ ◡ ◡ ◡ – ऽ ऽ । ◡ – ◡ ◡ ◡ – । ◡ – ◡ – ]

सबल जरी स्वतास गणिशी अुडावया,
प्रमुदित मी भितों बघुनि या तुझ्या वया;

गुण न गणी वयास, यश ने दिगन्तरीं,
करिल करो **प्रभद्रक** तुझें सदा हरी ! ( १५१ )

भिजी १८३ वी कविता प्रभद्रकवृत्तांत आहे.

**"सेमन्ती"** ( ४८५ ) [ – । – – – – – ! ⏑ ⏑ ⏑ ⏑ – – । – – – ]

सोनेरी शेङ्गा डुलति शिरीषीं या वातें,
या आकर्षीती खुळखुळ शब्दें चित्तातें;
आरामीं तैसें रुचिर न काही हेमन्तीं,
लोपूनी गेली कधिच फुलूनी **सेमन्ती.** ( १५२ )

भिजी १६६ व्या कवितेंत पाचव्या अक्षरानन्तर यति पाळला आहे म्हणून ती वासन्तीवृत्तांत नव्हे तर सेमन्तीवृत्तांत आहे असें मानिलें पाहिजे.

**'चक्रवर'** ( ४८७ ) [ ⏑ ⏑ । – ⏑ ⏑ – ⏑ ⏑ । – ⏑ ⏑ – ⏑ ⏑ । – ⏑ ⏑ – ]

" तथ शील अखण्ड अकल्मषु रक्षितु कल्पशतां
मद शान्ति सुभाषित वीर्य अलीन अमूषितका
वर ध्यान-अभिज्ञ विपश्यन प्रज्ञ अुपेक्षत मुने ( ? )
परिपूर्ण मनोरथ निर्जय वर्तय **चक्रवरम्** " ( लवि ५३९ )

**अतिशायिनी** ( ४९७ ) [ । ⏑ ⏑ – ⏑ ⏑ – । ⏑ – ⏑ – ⏑ ⏑ । ⏑ – ⏑ – – ]

दिसतात पथीं अनेकदा किति मनोज्ञ बाला
गमती टिकल्यासमान ज्या चिकटल्या नभाला;
विसरे परि चान्द्रिकेस का कुणि तयां बघोनी ?
सखये, **अतिशायिनी** तुझ्याहुनि गुणें न कोणी. ( १५३ )

संस्कृतांत शिशु ( ८/७१ ) आणि मराठींत भिजी १९५ वी कविता या अतिशायिनीवृत्तांत आहेत.

**मणिकल्पलता** ( ४९९ ) [ । ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ऽ ऽ । ⏑ – ⏑ – – । ⏑ ⏑ – ⏑ ⏑ – ]

" कललघनाङ्कुरास्थिचर्मांगजचेतनताः
सितकुजजीवसूर्यचन्द्रार्किबुधाः परतः
अुदयपचन्द्रसूर्यनाथाः क्रमशो गदिता
भवति शुभाशुभंच मासाधिपतेः सदृशम् " ( वबृजा ४/१६ )

**अुन्माल्या** ( ५०० ) [ ।— — — ऽ ऽ ! ᵕ — ᵕ ᵕ ᵕ — ! ᵕ ᵕ — ᵕ ᵕ — ]

"कोठे गे कुमार कुसुमापरि कोमल हा
कोठे तो भयङ्कर अती वनवास पहा,
हीं माझीं विलोकितिल त्या न पुन्हा नयनें,
धाडूं त्या नको वनिं, दया कर गे ललने." ( भिअनि २१५ )

भिजी १८२ वी कविता या अुन्माल्यावृत्तांत आहे. अुन्माल्या नावाला पण आधार सापडत नाही.

**शैलशिखा** ( ५०१ ) [ ।— ᵕ ᵕ — ऽ ऽ । ᵕ — ᵕ ᵕ ᵕ — । ᵕ ᵕ — ᵕ ᵕ — ]

मोहमयी सुवर्णलतिकेवरली कलिका,
गुञ्जत हा तिच्याच भवती फिरतो अलि कां ?
आणिक ही मुळी न हृदया परिसे अशि कां ?
दुर्गम ही मनोहर जरी, जशि **शैलशिखा**. ( १५४ )

भिजी १८६ वी आणि १८७ वी या दोन कविता शैलशिखावृत्तांत आहेत. तेथे दिलेल्या माल्यवती या नावाला आधार नाही.

**अवितथ** ( ५०२ ) [ । ᵕ ᵕ ᵕ ᵕ — ऽ ऽ । ᵕ — ᵕ ᵕ ᵕ — । ᵕ ᵕ — ᵕ ᵕ — ]

मनुज जरी असत्य सहजासहजी वदतो
परि न धके, प्रसङ्ग पडतो अति तापद तों,
कठिणच्च ती असत्य टिकवूं म्हटल्यास कला—
**अवितथ** तें वदा, सुगम की पथ हा सकला. ( १५५ )

"स्वकृतविचित्रयोनिषु विशन्निव हेतुतया
तरतमतश्चकास्यनलवत् स्वकृतानुकृतिः
अथवितथा स्वमूष्व**वितथं** तव धामसमं
विरजधियोऽन्वयन्त्यभिविपण्यव अेकरसम्" ( भाग १०/८७/१९ ).

संस्कृतांत वबृ (५०/२८), भका (२१/२१) आणि भागवत दशमस्कन्धाचा ८७ वा अध्याय हीं अवितथवृत्तांत आहेत. मराठींत मोरोपंताचें श्रवणामृतरामायण ( मोसग्र ८/२८ ) हें अवितथवृत्तांत आहे. भागवत ( १०/८७/१५,२४ ) या दोन

श्लोकांत मध्येच (‿ – ‿ ‿ ‿ –) या गणाच्या ठिकाणीं (‿ ‿ – ‿‿ –) हा गण येतो हें चिन्त्य आहे.

**वरयुवती** (५०३) [।– ‿ ‿ – ऽऽ। ‿ – ‿ – –। ‿ ‿ ‿ ‿ ‿ ‿ –]

निल्य तदा रचीं किती मी तिजवर कविता !
भाव न ये सुनीतबन्धीं जरि अडकवितां–
अन्तर ती खुलें करीना असुनि मधुमती–
निष्ठुर का अशाच जाल्या जगिं **वरयुवती** ? (१५६)

**वंशदल** (५०४) [।– ‿ ‿ – ऽऽ। ‿ – ‿ ‿ ‿ –! ‿ ‿ ‿ ‿ ‿ ‿ –]

वंशवनीं ध्वनी मधुर तो तरुमधुनि निघे
तों तिकडे अधीर रमणी झुकुनि कुणि रिघे–
स्वप्नचि तों दिसे सकल तें रुचिकर लटिकें,
**वंशदल** प्रभञ्जन शिवे तर वर न टिके. (१५७)

संस्कृतांत किरात (५/४३) आणि शिशु (४/६७) हीं वंशदलाचीं अुदाहरणें आहेत. मराठींत मोसारा (७/९–११) हे तीन श्लोक वंशदलवृत्तांत आहेत.

'**अुडुपथ**' (५०५)

[। ‿ ‿ ‿ ‿ – ऽऽ। ‿ – ‿ ‿ ‿ –। ‿ ‿ ‿ ‿ ‿ ‿ –]

"**अुडुपथ**मण्डलं भवतु मा शुचिरविनिपत–
द्दिनकरखण्डचण्डचडुलीनिबिडतरतडित्
दिशि दिशि मा क्षुभञ्जलधयः पिशुनितसमराः
प्रचुरविकीर्णरत्नपटलीशबलतटभुवः" (रह १४/६०)

**वाणिनी** (५०८) [। ‿ ‿ ‿ ‿ –ऽऽ। ‿ – ‿ ‿ ‿ –। ‿ – ‿ – –]

तनु विकिती धनास्तव कशा कुलस्त्रिया त्या ?
प्रणय जणू विवाहविधिने स्फुरोचि जाल्या !
पुरुष विकी मतीप्रति, गणी न वाणि–नीती,
शिथिल अशी कधींच वचनीं न **वाणिनी** ती. (१५८)

संस्कृतांत रह (५/३७) हें वाणिनीचें अुदाहरण आहे. चतुर्विजयकृत वर्धमान षट्त्रिंशिकामध्येहि अेक अुदाहरण आहे. मराठींत भिजी १९१ वी कविता या वृत्तांत आहे.

'**सुरासुरवन्द्य**' ( ५२० )

[ ᴗ । – ᴗ ᴗ – ᴗ ᴗ । – ᴗ ᴗ – ᴗ ᴗ । – ᴗ ᴗ – ᴗ ᴗ । – ]

" नुरे नुरवीत, पुरे पुरवीत, सरे सरवीत नसो
हरे हरवीत, भरे भरवीत, मरे मरवीत नसो,
**सुरासुरवन्द्य**, नव्हे जगनिन्द्य, वरावर सद्य असो,
तरे परपार, धरे निजसार, सन्तत (?) विचार असो" ( राकधास ६५ )

'**त्रिदशाङ्गना**' ( ५२१ )

[ । ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ऽ ऽ । ᴗ – ᴗ ᴗ ᴗ – । ᴗ ᴗ – ᴗ – ᴗ । – ]

" स्थितवति तत्र गोत्तरि भटैस् **त्रिदशाङ्गना**ब्जिनी
सवितरि तुङ्गतोदयमनेकपराजयोर्जिताः
दितिजगणस्य भीतिमतिदुर्धरतां दधौ क्रियाः
स वितरितुं गतोऽदयमनेकपराजयोर्जिताः" ( रह ४६/६५ )

**नन्दन** ( ५२६ ) [ । ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ऽ ऽ । ᴗ – ᴗ ᴗ ᴗ – ! ᴗ – ᴗ – – । ᴗ – ]

अयि सखये, सुधांशुवदने, मदीय हृत्स्वामिनी,
तव विरहें दिनींहि मजला छळी पहा यामिनी;
तुजविण मी कुठेहि फिरलों तथापि आनन्द न,
चल मज घे समीप तुझिया, नको मला **नन्दन.** ( १५९ )

संस्कृतांत भका ( १०/३६ ) हा श्लोक आणि मराठींत भिजी २१० वी कविता हीं नन्दनवृत्तांत आहेत.

**कामक्रीडा** ( ५३५ ) [ । – – – – । – – – – । – – – – । – – – ]

" **कामक्रीडा**सक्तोऽप्युद्यत्पापव्यापस्ते भक्त्या
प्रत्याख्यानो राज्यश्रीभुक् श्रद्धाशाली सच्चेताः
तीर्थे शल्वं नामाऽबध्नात् त्रैलोक्यार्चे सद्भिम्बि–
सारो भूपः श्रीसिद्धार्थ क्ष्माभुग्वंशाकाशार्कः" ( चव २७ )

**मदिरा** ( ५३६ ) [ । – ᴗ ᴗ – ᴗ ᴗ । – ᴗ ᴗ – ᴗ ᴗ । – ᴗ ᴗ – ᴗ ᴗ । – ᴗ ᴗ – ]

नाच तरङ्गित काचघरीं विधुयामि करी किति मोहमयी !
काञ्चनकान्त असूनिहि लाञ्छन आणि विनाशच हो समयीं.

स्वसुख भासवुनी ढकली निरयीं, करि धीस झणी बधिरा,
हीरकपोर कठोर बरी, न लगे रसरागवती **मदिरा.** ( १६० )

भिजी २४१ वी कविता मदिरावृत्तांत आहे.

**हंसगति** ( ५३७ )

[। ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ᴗ ᴗ । – ᴗ ᴗ – ᴗ ᴗ । – ᴗ ᴗ – ᴗ ᴗ । – ᴗ ᴗ – ]

अयि दयिते, तव रूप अलौकिक पाहुनि हो झणि गुङ्ग मती,
मधुर गिरा तव सूनृतवादिनि, काय अहा हृदयङ्गम ती !
वसति किती हृदयीं करिशी, परि कोण सखा तव ह्या जगतीं ?
क्षणभर पाहुनि मोह अनावर जाशि निघूनिच **हंसगती.** ( १६१ )

संस्कृतांत "मधुवनचारिणि भास्करवाहिनि जान्हविसङ्गिनि सिन्धुसुते" हें शङ्कराचार्यकृत यमुनाष्टक, आणि मराठींत मोरोपन्तकृत रघुराजस्तव ( मोस्फुका १/२६९ ) नि भिजी २४७ वी कविता हीं हंसगतिवृत्तांत आहेत.

**हंसलय** ( ५३८ ) [ मणिगुणनिकर । चित्रगति ]

विमल अुदक तव अयि रविदुहिते, गोष्ट कथी मज फार जुनी,
घुमति हृदयिं मम मधुहरिमुरलीचे पडसाद अहा अजुनी !
सुखद रुचिर शुचि तव तट गमतो ग्रीष्मऋतूंतहि हा मलय–
स्तवनकवन तव म्हणत मज मिळो पावति ज्या परि **हंस लय.** (१६२)

भिजी २५१ वी कविता या हंसलयवृत्तांत आहे.

**शशिवदना** ( ५४९ )

[। ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ऽ ऽ । ᴗ – ᴗ ᴗ ᴗ – । ᴗ ᴗ – ᴗ ᴗ – । ᴗ – ᴗ – ]

कितिहि जरी हिडीस कलहीं पडतात दिनीं कुवासना,
गुदमरुनी पडे विकल हृत्कलिका, वितरी सुवास ना,
दिनभरही असे प्रखर तो रविताप, छळी पिशी दुही,
**शशिवदना** मनःकुमुद हें फुलवी झुलवी निशीं गृहीं. ( १६३ )

शिशु ( ३/८२ ), रह ( २१/५७ ) आणि भिजी २२९ वी कविता या शशिवदनावृत्तांत आहेत. धृतश्री हें नांव शिशु ( ३/८२ ) वरून घेतलें गेलें हें अुघड आहे.

" जातिजरोरुरोगमरणातुरशोकसहस्रदीपिताः
दुःसहनरकपतनसन्त्रस्तधियः प्रतिबुद्धचेतसः
जीवितमम्बुबिन्दुचपलं तडिदभ्रसमा विभूतयः
सकलमिदं विचिन्त्यमुनयः प्रशमाय वनान्तमाश्रिताः " ( पूयो )

या श्लोकांतील विषम चरण कामलतावृत्ताचे असून चौथा चरण तेवढा शशिवदनावृत्ताचा आहे. दुसऱ्या चरणांतील शैथिल्य चिन्तनीय आहे.

**सुरनर्तकी** ( ५५० )

[ । – ᵕ – ᵕ ᵕ ᵕ । – ᵕ – ᵕ ᵕ ᵕ । – ᵕ – ᵕ ᵕ ᵕ । – ऽ ᵕ – ]

" हारनूपुरकिरीटकुण्डलविभूषितावयवशोभिनीं
कारणेशवरमौलिकोटिपरिकल्प्यमानपदपीठिकाम्
कालकालफणिपाशबाणधनुरङ्कुशामरुणमेखलां
फालभूतिलकलोचनां मनासि भावयामि परदेवताम् "

हें शङ्कराचार्यकृत नवरत्नमालिकास्तोत्र सुरनर्तकीवृत्तांत आहे.

**दुर्मिल** ( ५५९ ) [ ᵕ ᵕ । मदिरा ]

तुजवाचुनि काहि नको गमतें, अनुरागच कीं हृदयांत भरे,
धनलौकिक वा परमार्थ नको, व्यवहार अशा न वयांत बरे,
अनुकूल मुहूर्त असे जर हा अपणां मधुवैभवभूमिलते,
क्षण टाक तरी फुलवूनि पुढे मग निर्मम मीलन **दुर्मिल** तें. ( १६४ )

मराठींत मोसराअु ( ७३ ), निज्ञा ( २/३१ ) आणि अकक ( २/१२८ ) वरील राधावर्णनांतील "रतिसङ्गरिं भङ्गुर हा कचपाश" हा श्लोक हीं दुर्मिळवृत्ताचीं तीन अुदाहरणें आहेत.

**'रघुवीर'** ( ५६१ )

ᵕ ᵕ । – ᵕ ᵕ ᵕ ᵕ ᵕ ᵕ ᵕ । – ᵕ ᵕ ᵕ ᵕ ᵕ ᵕ । – ᵕ ᵕ ᵕ ᵕ ᵕ ᵕ । – ᵕ ᵕ – ]

"**रघुवीर** नृपति कुलहीर सुभररणधीर निबिडतर तीर जसा
शरभार गगनिं अनिवार रचुनि भडिमार करित सुकुमार कसा
रिपुधूर अुठति भरपूर सकळ अविदूर भरिति शरपूर तदा
चकचूर करिति कर अूरचरणशिर सूरकुलज रणशूर तदा". ( आवि २९ )

'**रघुरमण**' (५६३) [ ৺ ৺ । अचलधृति । त्वरित गति ]

अरि निकट विकट गज तुरग सकटजन
करिति लगट **रघुरमण** करी,
शर सुटति सणण रव अुठति खणण रिपु
पडति दणण रणधरणिवरी

वरि वदति अमर, 'आजि असम समर करि
नृपतिकुमर जय विजय भला!'
गजबजति असुर दरिं दडति निसुर मग
वसुमतिं सुरपरि वरि सबळा. (आवि ३०)

**हेमकला** (५६८) [ मोदक । दोधक ]

प्रेम यशोमय दे तव, केवल कीर्ति नको मज वाफ मुखाची,
शान्ति न दे हृदयाप्रति ती कधि दावित मात्र दिशाच्च सुखाची;
दाखवि कान्ति तुझी सरसत्व म्हणून तुझ्याचकडे टक लागे,
आणि तुझ्या पुढती वरवर्णिनि, होय हतप्रभ **हेमकला** गे. (१६५)

" चञ्चळ चित्त अचञ्चळ तू करिं, अञ्चळ सावरि, निश्चळ राहे,
चाल रुळे चरणाम्बुज हा, वरि कां चळकांप तुला सुटला हे?
चाल म्हणे सखि चन्द्रमुखी अुठिं, चाचरि चालिसि, सावध पाहे,
**हेमकले** प्रमदे मुकुटेश्वरि धीर धरी हरि सन्निध आहे." (विरुस्व ३/२२)

अुद्धवचिद्घनाची भगवद्गीता, मोरोपन्तकृत सवयारामायण (मोसग्र ७/२७९), गङ्गास्तव (मोस्फुका १/७०) आणि यशवन्त खण्डेराव कुळकर्णी कृत 'नेत्रचुम्बन' (कुमा ६६) या कविता हेमकलावृत्तांत आहेत.

सवाअी हा शब्द निश्चित अर्थाने योजिला जात नाही. या प्रकरणीं निरञ्जनमाधवच म्हणतो :—

" सप्त भकार गुरुद्वय भास्करशङ्करविश्रम **हेमकला** हे
होचि **अुमा** म्हणवोनि कितेक कवी वदती गुणसागर पाहें.
प्राकृत लोक न जाणति मूळ, अुगेंचि अिला कथिताति सवाअी,
अेक गुरू किति अेक नियोजिति अन्तपदीं अविचारित पाहीं. (निस १२४)

**'वरदा'** ( ५६९ ) [ मोदक । स्वागता ]

" राम रघूत्तम कामरिपुप्रिय लोकशोकहर यापरि भावें
दाशरथे, तुज होउनिया पदिं लीन दीन-जनबन्धुसि गावें,
आमरण स्मृति हेच असो, वय याच साच सुपथांत सरावें,
दे **वरदा**, वर या शरणाप्रति, पापतापजलधीस तरावें. " ( मो–वृद )

" श्रीरघुनाथचरित्र जना, बहु भव्य नव्य रस देउनि, तारी.
जोडुनि पातक त्या सुयशासचि 'रक्ष' लक्ष म्हणती नरनारी;
ये सहजांतहि जींत कसेंतरि रामनाम बरवें हितकारी;
ती सकळांसहि भेटविती शुचि भुक्ति, मुक्ति, करिती हित भारी "

( मोसराअु ७१ )

**परिमिति** ( ५७० ) [ । ∪ ∪ ∪ ∪ – ∪ ∪ । – ∪ ∪ – ∪ ∪ । स्वागता ]

**परिमिति** राखिल जो सुखसेवनिं तोचि भोगि चिरकाल सुखातें,
परिमितिने मधुरांश सुखांतिल वाटतो अधिक गोड मनातें,
नर अतिरेक करी सुखसेवनिं, तन्मना किळस येअि तयाची,
मग सुख तें असतां नसल्यापरि कीं असेव्य, मन तें बहु डाची ".

ही भिजी २४४ वी आणि २४६ वी, दोन्ही कविता या 'परिमिति'-वृत्तांत आहेत. २४४ व्या कवितेवर वृत्त मदिरा म्हटलें आहे तें चुकीचें आहे.

**'समुल्लस'** ( ५७२ )

[ । – – ∪ ∪ ∪ ∪ । – – ∪ ∪ ∪ ∪ । – – ∪ ∪ ∪ ∪ । – ∪ ∪ – ∪ ∪ ]

" अूर्वीप्रियकर खर्वीकृतखल दर्वीकरपतिगर्वितपर्वत
गोत्राहितकर गोत्राहितदय गोत्राधिपधृतिशोभनलोभन
वन्यास्थितबहुकन्यापटहर धन्याशयमणिचोर मनोरम
शम्पारुचिपट सम्पालितभवकम्पाकुलजन फुल्ल **समुल्लस** " ( रूस्तमा १५७ )

याच्यावरील चतुष्पदीहि वृत्तदृष्ट्या अशीच आहे.

**तन्वी** ( ५७३ ) [ " सुर"ललना । नयनविशाला ]

ती हरिणाक्षी म्हणति जन असें, भीरु किती तरि नजर तिची ती!
विन्धुनि टाकी नृहरि किति परी, घाव करी अतिसुखदच चित्तीं.
सज्ज सदा ती विहसित-वदना जोडुनिया शर सुनयनधन्वीं,
सावज व्हाया कवण न बघतो विन्धिल त्याप्रति जर अशी **तन्वी**? (१६६)

मोरोपन्ताचें तन्वीरामायण ( मोसग्र ८/३८० ) या वृत्तांत आहे.

**" सुरुचिर "-हंसी** ( ५७४ ) [ विद्युन्माला । सुपवित्रा ]

कोणासाठी आटाआटी ? विफल सकळ भविं तडफड वाटे,
शीत श्यामोद्यानीं मानीं भयकर रण वर खरतर काटे,
तों तन्वङ्गी हो हृत्सङ्गी, सुरसवचनिं तिज कविमन शंसी—
हृत्कासारीं क्रीडे नारी सुललितगति जणु **सुरुचिर हंसी**. ( १६७ )

**किरीट** ( ५७५ ) [ मोदक द्विरावृत्ता ]

" त्र्यक्षमनोहर, दीनजनावनदक्ष, पुमर्थद, साधुसभाधन,
लक्षकविस्तुत, दारुणपातककक्षदवानळ, सत्करुणाघन,
तक्षककोट्यधिकोग्रदशाननरक्षउपद्रुतविश्वभयापह,
रक्ष रघूत्तम, मामबलं वृतपक्षमनाथमहर्षिमहामह ! " ( मोसराअु ७२ )

अनेककविकृतकविता-सङ्ग्रह ( २/१२६ ) राधावर्णन या किरीट वृत्तांत आहे.

**क्रौञ्चपदा** ( ५७८ ) [ रुक्मवती । मणिगुणनिकर ]

" श्रीपति देवप्रार्थित जाला दशरथनृपसुत दशमुखकदना
अंश तयाचे बन्धु तिघे ते सुरुचिर करिति विगतरुचि मदना.
अग्रज राम प्राज्यगुणश्री तदनुज भरत महित करि सदना
लक्ष्मणनामा आणि रिपुघ्न प्रविकसविति निजगुरुजनवदना ".

या श्लोकाने आरम्भ होणारें मोरोपन्ताचें मन्त्ररामायण ( मोसग्र ८/४१४ ) हें क्रौञ्चपदावृत्तांत आहे.

"**हिरण्यकेशी**" ( ५८० ) [ जलौघवेगा द्विरावृत्ता ]

पुरें निमित्तें सदा नवीं हीं ! मनास चिन्ता मनस्वि देशी,
रुचे तुला मी निघूनि जावें रुसूनि कोठे तरी विदेशीं ?
भवप्रपञ्चीं श्रमूं सुखानें, हृदैक्यगीतें म्हणूं सुखानें,
करील तेजोमय गृहाला प्रसाद तूझा **हिरण्यकेशी**. ( १६८ )

**अश्वललित** ( ५८६ ) [ । ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ऽ ऽ । ᴗ – ᴗ ᴗ ᴗ – ! जलोद्धतगति ]

रचुनि कुणी प्रसन्न कविता सलील करितां चमत्कृति—पहा !
जुळवुं बघे यशास्तव दुजा प्रयत्न करुनी सुशब्दनिवहा.
श्रमुनि जरी सुपात्र घडिलें, रुचे न रसिका रसाविण रितें—
खर बनले सुशिक्षित तरी करूं न शकतील **अश्वललितें**. ( १६९ )

संस्कृतांत भका ( ८/१३२ ) आणि रह ( ५/१२७, ५/१४८, २२/६५, ४६/७० ) हीं अश्वललिताचीं अुदाहरणें आहेत.

**कामकला** ( ५८८ ) [ ᴗ ᴗ । मदिरा । – ]

म्हणतात मनोभवभाव पवित्र खरा नच मत्सर ज्यास शिवेना,
मग मत्सर दाखवितां प्रिय ओप्सित दूरच जाय नि जीव निवेना.
जर फोल बलात्कृति होय अिथे तर हो हृदयांतुनि कां मग लाही ?
कधि भक्ति अलौकिक होअुं शके नच काय विलक्षण **कामकला** ही ! ( १७० )

" दगडावरि वा गवतावरता गिरिकन्दरकुञ्जगुहान्तरवासी
वरुषाऋतुमाजि पडे अुघडा दृढ आतपशीतहि तो अुपवासी
नगणी दिनरात्र न निद्रितही, मग कोण पुसे अितरां विषयांसी ?
निजसेजसुखीं रतला तर धन्य किती पशु अन्य वृथा वय नासी !
( किशुर ३७ )

भिजी २५२ वी कविता कामकलावृत्तांत आहे.

"**सुकेशी**"* ( ५९७ ) [ ᴗ – – – । ᴗ – – ]

घटे ही प्रीति दानें
म्हणूनी का न देशी ?
परी विद्येपरी ही
दुणावे गे **सुकेशी**. ( १७१ )

“ **महामाया** ”* ( ५९८ ) [ ᴗ – – – । ᴗ – – – ]

न बान्धी प्रीति ही ज्याला
असा प्राणी नसे झाला;
कुणाला ये निवाराया
निसर्गाची **महामाया** ? ( १७२ )

“ जगाचे बन्ध कोणाला ?
जगाचा बान्धला त्याला.
मला जो थाम्बवी ऐसा
जगीं निर्बन्ध ये कैसा ? ” ( बाक ५८ )

“ **मृगाक्षी** ”* ( ५९९ ) [ ᴗ – – – । ᴗ – – – । ᴗ – – ]

जगीं जो तो पहा हा पाठि लागे,
अिथे बापूडकीने केवि भागे ?
हवें सामर्थ्य सत्यालाहि साक्षी—
विसम्बूं तू नको कोठे **मृगाक्षी**. ( १७३ )

‘ हेमन्त ’ ( माजूग १६ ) ही कविता या मृगाक्षीवृत्तांत आहे.

“ **प्रसूनाङ्गी** ”* ( ६०० ) [ ᴗ – – – । ᴗ – – – । ᴗ – – – ]

किती माधुर्य चित्तीचें कळेना तें
जुळे दृङ्मोहनें जैं प्रीतिचें नातें;
असो जिव्हा जणू क्ष्वेडप्रसू नाङ्गी,
दिसे कान्ता परी श्यामा **प्रसूनाङ्गी**. ( १७४ )

‘ परिदेवना ’ नि ‘ विलापिक ’ (माजूग १४,१५ ) या कविता या वृत्तांत आहेत.

“ **पिनाकी** ”* ( ६०१ ) [ ᴗ – – – । ᴗ – – – । ᴗ – – – । ᴗ – – ]

अशी अेकाकिनी कां गे रहाशी राजसे तू ?
भिशी स्वातन्त्र्यसिन्धूला कुणी घालील सेतु ?
क्षितीला या नसे शोभा नभश्छत्राविना की,
रुचावा शैलजेला या कुठे ऐसा **पिनाकी** ? ( १७५ )

‘ अधिष्ठात्री ’ ( माजूग १३ ) ही कविता पिनाकीवृत्तांत आहे.

"**वियद्गङ्गा**"* (६०२) [ ⏑ – – – | ⏑ – – – | ⏑ – – – | ⏑ – – – ]

रहावें पायरीने तू, कुठे तू आणि मी कोठें ?
तुझ्या या प्रेमधाष्ट्यांचें असें आश्चर्य रे मोठें !
महत्त्वाकाङ्क्षि अिन्दू का गणी सिन्धूंचिया ढङ्गा ?
कुठे ओहोळ गावींचा, कुठे देवी **वियद्गङ्गा** ? (१७६)

'प्रभुसहवासाचें सुख' (अुस ३८६), 'कविवर्य टिळक यांचें निधन' (माक ७१), 'आमची ओळख' अित्यादि ८ कविता (माजूग ६–१२) या वियद्गङ्गा वृत्तांत आहेत.

"**हिमांशुमुखी**"* (६०३)
[ ⏑ – ⏑ ⏑ – | ⏑ – ⏑ ⏑ – | ⏑ – ⏑ ⏑ – | ⏑ – ⏑ ⏑ – ]

मनोदय मी तुला कथिला मला सुमनांतला मधु दे,
परी भलतीच होय गती, अता हसशी न मुग्ध मुदें.
क्षमस्व किती तदा वदलों, पुसे नच काय अश्रु चुकी ?
किती तिमिरीं तपूं तरि मी ? करी स्मित गे **हिमांशुमुखी**. (१७७)

'फलश्रुति' (माजूग १९) ही कविता या हिमांशुमुखीवृत्तांत आहे.

**दीप्ता** (६०७) [ ⏑ ⏑ – – ⏑ | – – ]

प्रणयी ताप साही
कशि त्याची दशा ही !
असते स्नेह-लिप्ता
म्हणुनी वात **दीप्ता**. (१७८)

"**मेधावी**"* (६१३) [ – – – ⏑ | – – – ⏑ | – – – ]

धावे जो पुढे नादांमधे प्रेमीं
गुन्तेना कधी तो निष्क्रिय क्षेमीं;
बुद्धि व्यर्थ मार्ग स्वश्रमें दावी,
प्रेमाकृष्ट जो तो हो न **मेधावी**. (१७९)

'प्रेमाचें वेड' (माजूग १९) ही कविता मेधावीवृत्तांत आहे.

**'मायावी'*** ( ६१४ ) [ – – – ᴗ । – – – ᴗ । – – – ᴗ । – – – ]

प्रेमानेच मोहायास ये धावूनि ती रामा
पावे अप्रतिष्ठा ती, न कोणी निन्दिती रामा.
देवाला दया त्या दानवीची कां न मा यावी ?
होतें रूप मायावी, न होता भाव **मायावी**. ( १८० )

'प्रेममाहात्म्य' ( माजूग १८ ) आणि 'पूर्णेन्दु' ( गिका ६६ ) या कविता या मायावी वृत्तांत आहेत.

**संयुत** ( ६२० ) [ ᴗ ᴗ – ᴗ – । ᴗ ᴗ – ᴗ – ]

" हतबाहुजां बहुधा महीं
प्रविधाय तां हृदि जात्वसौ
तदचित्तयद्भुवनाद्भुतं
न पुरा कृतं भुवि कैरपि " ( ममच १/३३ )

**सम्मदमालिका** ( ६२१ ) [ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ – । ᴗ ᴗ – ᴗ – ]

" दिवि विबुधसङ्घविशेषिता
मिरविति जनांत समर्थता
यजित जन इष्ट सकामता
पुरविति मनोरथ शीघ्रता. " ( डिरुस्व )

**"वैखरी"*** ( ६२२ ) [ – – ᴗ – । – – ᴗ – । – – ᴗ – ]

कोठील तू कोठील मी, आलों अिथे
अन् गूढ तुझ्यांतील काही मोहितें;
ही गोड लागे ओढ जीवातें खरी,
हीचेंच नाव प्रीति ठेवी **वैखरी**. ( १८१ )

'आअी' ( माजूग २१ ) ही कविता वैखरी वृत्तांत आहे.

**मानसहंस** ( ६२३ ) [ ᴗ ᴗ – ᴗ – । ᴗ ᴗ – ᴗ – । ᴗ ᴗ – ᴗ – ]

अपुल्या कुलाप्रत राजसा, अवतंस तू,
कर धन्य मेळवुनी यशें निजवंश तू,

जरि दूर दिग्विजयार्थ जाशिल तू कुठे
तरि देच वार्षिक भेट, **मानसहंस** तू. ( १८२ )

'सानुली' ( माजूग २४ ) ही कविता या मानसहंस वृत्तांत आहे.

**मन्दाकिनी*** ( ६२५ ) [– – ᴗ –। – – ᴗ –। – – ᴗ –। – – ᴗ –]

नेत्रांतुनी तीच्या स्फुरे की व्याधतान्याची द्युती,
अुत्पन्न भीतीतें करी प्रीतीसवें रम्याकृती;
नेत्रें तशीं आकर्षिना, साधी तथापी रागिणी
पावित्र्यदात्री हो भवीं ती ज्यापरी **मन्दाकिनी**. ( १८३ )

" शेषाऽचलाऽधीशाऽङ्गकाऽऽश्लेषाऽचलाऽऽमोदोन्नतिः
सैषा भवोन्मेषाऽब्धिसंशोषाऽवहा विश्वप्रसूः
तोषाय नः कल्पेत दुर्दोषाऽपहं यस्याः पदं
भाषाशचीमुख्यद्युसद्योषाशिरोभूषायते " ( वेलस १५/९ )

मोरोपन्तकृत सुरामायण आणि सारामायणाचा १२ वा सर्ग, आणि 'श्यामलेस' ( माजूग २० ), 'गुलामाचें गाऱ्हाणें' ( यध ६७ ), 'न्यायासनींच्या 'देवते' ( यज ४३ ) या कविता मन्दाकिनीवृत्तांत आहेत.

"**सुरनिम्नगा**" ( ६२६ )
[ᴗ ᴗ – ᴗ –। ᴗ ᴗ – ᴗ –। ᴗ ᴗ – ᴗ –। ᴗ ᴗ – ᴗ –]

" करतालचञ्चलकङ्कणस्वनमिश्रणेन मनोरमा
रमणीयवेणुनिनादरङ्गिमसङ्गमेन सुखावहा
बहुलानुरागनिवासरासमुद्भवा भवरागिणं
विदधौ हरिं खलु बल्लवीजनचारुचामरगीतिका "—

हा गङ्गादासाने अुद्धृत केलेला श्लोक कोणत्या काव्यांतील आहे ? मराठींत विठोबा अण्पा दसरदारांचें 'अजि मानवा भज राघवा' (विदप ३५), साधुदासकृत 'प्रसादयाचन' ( सानिस २/३४ ) आणि राजकवि चन्द्रशेखरकृत 'राजनीतिगीतिका' ( च १३३ ), 'सहधर्मिणीस' (माजूग २२), 'मानससुन्दरी' ( माजूग २३ ) आणि यशवन्तकृत 'शीलवती सुन्दरीस' ( यध ११० ) ह्या कविता या सुरनिम्नगावृत्तांत आहेत.

**प्रतानिनी** ( ६२७ ) [ ᴗ – ᴗ – । ᴗ ᴗ – ᴗ – । ᴗ ᴗ – ᴗ – । ᴗ ᴗ – ᴗ – ]

“ छळूनि दीन जना तुझ्या बहु होअि हर्ष जरी मना
वदून वाक्य असत्य मेळविशी सदा जरी तू धना
तुला मनोहर वाटलें जरि आज पातक हें, तरी
तुझें तुलाच फळेल पातक, सत्य ही मम वैखरी ”—

या ( भिजी २२५ व्या ), कवितेवर प्रतानिनी हें नाव आहे; पण या नावाला आधार गावला नाही.

“ **कादम्बरी** ”* ( ६३७ ) [ – ᴗ – – । – ᴗ – ]

देख सन्ध्यासुन्दरी
रङ्गली ही अम्बरीं,
पालथ्या पात्रीं कशी
अुल्लसे **कादम्बरी** ! ( १८४ )

‘ सन्ध्यावारुणी ’ ( माजूग ५० ) ही कविता कादम्बरीवृत्तांत आहे.

**कान्तिडम्बर** ( ६४१ ) [ – ᴗ – ᴗ ᴗ । – ᴗ – ᴗ ᴗ ]

“ भूरुहोल्लसदम्बिकावन–
मण्डलान्तरभूमिपावन–
मब्जसम्भवकन्यकोदक–
निर्मिताप्लवमाक्षिमोदक–” ( रूस्तमा २१७ )

या पद्यांत कान्तिडम्बराचे तीस चरण आहेत.

“ **मेनका** ”* ( ६४३ ) [ – ᴗ – – । – ᴗ – – । – ᴗ – ]

मूढ होअूं बाह्य सौन्दर्यें नका
आत्मरूपीं रङ्गुनी जावें न कां ?
थोर विश्वामित्र त्याला जिङ्कुनी
तत्तपासङ्गेच जाअी **मेनका**. ( १८५ )

‘ जीवघेणी लीला, ’ ‘ मुक्तपक्षी, ’ ‘ निर्माल्य ’ ( माजूग ४७–४९ ) या तीन कविता आणि ‘ टेकवूं हा श्रान्त माथा मी कुठे ? ’ ( यज १९ ), ‘ पूजास्थान ’ ( गिफ ८ ) अित्यादि कविता मेनकावृत्तांत आहेत.

"**रागिणी**"* ( ६४४ ) [ – ᴗ – ᴗ ᴗ । – ᴗ – ᴗ ᴗ । – ᴗ – ]

नावडे कवणास तल्लख अुत्तरा ?
हो गमे विदुषीच ती जगदुद्धरा.
शान्त तों दिसतां सुशील अभागिनी
हृद्गुणें मज ती गमे प्रिय **रागिणी**. ( १८६ )

"**मञ्जुघोषा**"* ( ६४५ ) [ – ᴗ – – । – ᴗ – – । – ᴗ – – ]

वीज पाही दीपवी डोळे जनांचे,
सुन्दरी कैशी कडाडे, काय नाचे !
साहचर्यातें नसेना चारु योषा
ठेविते शान्ति गृहीं जी **मञ्जुघोषा**. ( १८७ )

'सौन्दर्यमोहन' ( माजूग ४६ ) ही कविता या मञ्जुघोषावृत्तांत आहे.

**राधा** ( ६४६ ) [ – ᴗ – – । – ᴗ – – । – ᴗ – – । – ]

श्रीहरीच्या सङ्गतीं ज्या रङ्गल्या गोपी
प्रेमयोगीं कोण गेली त्यांतुनी झोपीं ?
सिद्ध होअीना हटाने योग तो साधा,
साधिती सख्यें जहाली सुन्दरी **राधा**. ( १८८ )

'**नन्दराज**' ( ६४७ ) [ – ᴗ – ᴗ ᴗ । – ᴗ – ᴗ ᴗ । – ᴗ – ᴗ ᴗ । – – ]

" विप्रवृन्दमभूदलङ्कृतिगोधनैरपि पूर्णम्
गायनानापि मद्विधान्व्रजनाथ तोषय तूर्णम्
सूनुरद्भुत सुन्दरोऽजनि **नन्दराज** तवायम्
देहि गोष्ठजनाय वाञ्छितमुत्सवोचितदायम् " ( रूस्तमा २६१ )

यापुढील चतुष्पदीहि याच वृत्तांत आहे. गीतगोविन्दांतील सातवा प्रबन्धहि याच नन्दराज वृत्तांत आहे असें दिसतें.

" मामियं चलिता विलोक्य वृतं वधूनिचयेन
सापराधतया मयापि न वारितातिभयेन
किं करिष्यति किं वदिष्यति सा चिरं विरहेण
किं जनेन धनेन किं मम जीवितेन गृहेण " ( गीगो ३ रा सर्ग )

" **देवप्रिया** '* ( ६४८ ) [ – ᴗ – – । – ᴗ – – । – ᴗ – – । – ᴗ – ]

प्रीतिच्या बन्दीजनांनीं जो स्वकाव्यीं वन्दिला
शान्त सन्ध्याकाल तो हा आज ये हृत्सन्धिला
जीवनाचा ओघ वाहे गात गीतें वप्रि या
पाहिजे कोणी सखी तों हन्त ! ये–**देवप्रिया.** ( १८९ )

' प्रत्युत्तरा 'दि आठ कविता, ( माजूग ३६–४३ ), ' जलक्रीडा ' ( यध १४४ ) ' अैकून ' ( माभा ८० ) या देवप्रियावृत्तांत आहेत. श्री. वा. भा. पाठक यांचें ' प्रवासी ' हें सरस खण्डकाव्यहि याच वृत्तांत आहे. हें वृत्त प्राचीन विबुधप्रिया वृत्तासारखें आहे म्हणून याचें देवप्रिया हें नांव ठेविलें आहे.

तोटक आणि देवप्रिया यांच्या मिश्रणाने झालेली ( माजूग १०८ वी ) कविता मागे ( पृ. २५ पहा ) दिली आहे.

' **कर्मगति** ' ( ६४९ ) [ – ᴗ – – । – ᴗ ᴗ ᴗ – । – ᴗ – – । – ᴗ – ]

" लक्ष्मणा, बा **कर्मगति** ही काय माझी ओढवे ?
प्राणिमात्रां रम्य सर हें दुक्ख मातें दे नवें.
जीवनाचें जीवनचि जी मूर्त माझी जानकी
तीविणें हें जीवन विषप्राय मातें घातकी ". ( साव १३/५५ )

**बिबुधप्रिया** ( ६५० ) [ – ᴗ – ᴗ ᴗ । – ᴗ – ᴗ ᴗ । – ᴗ – ᴗ ᴗ । – ᴗ – ]

प्रीतिवाचुनि सार्थ जीवित केवि होय बघा बरें,
दूर जाय सखी तरी विरहीं बुडे मन घाबरे,
प्रीत चिन्तित गीत गुम्फित बैसणें सुखद क्रिया–
अन्य का कृति शक्य होअिल आणखी **विबुधप्रिया** ? ( १९० )

**तरल** ( ६५१ ) [ ᴗ ᴗ ᴗ – ᴗ ᴗ । – ᴗ – ᴗ ᴗ । – ᴗ – ᴗ ᴗ । – ᴗ – ]

" अमरगायक गाति नाचति अप्सराहि न राहुनी
अधिक भाग्य न जिष्णुचें पुर पामराहि न राहुनी;
विविधवाद्यरवस्तव प्रवरर्षि आदरिती मही,
रघुपुरी किति दे अुरों नच साधुवाद रिती मही. " ( मोविबु ९७ )

**‘महोद्‌य’** (६५२)

[– ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ | – ᴗ – ᴗ ᴗ | – ᴗ – ᴗ ᴗ | – ᴗ –]

“ ज्यांत न मशक दंश मत्कुण मक्षिका न अुवा पिसा;
मद्यप न खळ चोर जार, न खेळता न जुवा पिसा.
व्याघ्र वृक पवनाश वृश्चिक रोग आधि जरा जन
नेणतिच, सकल प्रजा सधना **महोद्‌य**भाजन.” (मोविबु १०१)

**‘मुकुट’** (६५३) [ᴗ ᴗ ᴗ – ᴗ ᴗ | – ᴗ – ᴗ ᴗ | ᴗ ᴗ ᴗ – ᴗ ᴗ | – ᴗ –]

“ **मुकुट** सन्मणिहार पाठवि शतमख प्रभु आदरी
करि रित्या चिर मेरुच्या बहुमत महोत्सव हा दरी.
कनकरत्नरथाश्ववारण अमित गोधन देववी,
प्रभुवर स्वकरें कपींसहि विविध भूषण लेववी ”. (मोविबु ९८)

**‘आदिकविवर’** (६५४)

[– ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ | – ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ | – ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ | – ᴗ –]

“ **आदिकविवर**शिष्य कुशलव रामसुत गुणशेवधी
तातसुचरितगानरतमति रञ्जविति मुनिदेवधी.
श्रीश करि हयमेध; निजसुतगीत निजयश आपण
स्वाप्तजनसह पी; करावि न पुरे रसिकपति हा पण.” (मोविबु १०५)

**मदनसायक** (६५५)

[ᴗ ᴗ ᴗ – ᴗ ᴗ | ᴗ ᴗ ᴗ – ᴗ ᴗ | ᴗ ᴗ ᴗ – ᴗ ᴗ | – ᴗ –]

भुवनसुन्दर सहजहृद्धर परि भयङ्कर ताप दे,
भुलति लोचन, कधिहि होच न मग विमोचन यामधे;
प्रणयबन्धन, असुनि अन्ध न, जन सवन्दन याचिती,
मग विदारक सुगतिदायक **मदनसायक** जाचिती.” (१९१)

संस्कृतांत जगद्धरकृत स्तुतिकुसुमाञ्जलींतील ३२ वें म्हणजे शरणागतोद्धरण स्तोत्र हें मदनसायकवृत्तांत आहे. पुन्हा १५व्या नि ३१व्या स्तोत्रांतहि काही श्लोक या वृत्ताचे आहेत. मराठींत भिजी २३२वी, २३३वी नि २३४वी या कविता मदनसायक वृत्तांत आहेत.

'पटह' (६५६)
[ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ | ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ | ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ | – ⏑ – ]

" पटहमुखपटुरटितमुखरितनिखिलकुलगिरिगरह्वः
परुषतरपुरुषरिचरपुरुषपरिषदुपाचितपौरुषः
धवलकरकरबहलमदभरकवलकरसितचामर–
व्यजनविजनितपवनविगलित धरणिभवरजअुत्करः" (युर १०५)

याच्यापुढील चतुष्पदीहि याच वृत्तांत आहे.

" त्रिजगदघहर' (६५७)
[ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ | ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ | ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ | ⏑ ⏑ ⏑ – ]

' त्रिजगदघहरपरमसुखकरचरित रघुवर वरद या
स्तविति; सुरमुनि म्हणति करि असि पशुहिवरि नच पर दया–
अजितगुणयश सकलनतजनिमरणजलधिसि सुकवितें;
अमरतरुहुनि अधिक शतगुण फलद बहुमत सुकवितें". (मोविबु १०६)

" व्योमगङ्गा "* (६५८) [ – ⏑ – – | – ⏑ – – | – ⏑ – – | – ⏑ – – ]

दूर राहे आणि वाहे तेथुनी ही शुभ्रवस्त्रा
विद्ध चित्तातें करीना फेकुनी केव्हा दृगस्त्रां;
गूढ भावें खेचुनी ने, शान्तवी चित्तीं अनङ्गा,
अङ्गना स्वर्गीय ऐशी कोणती ती ? व्योमगङ्गा. (१९२)

'विस्मृतीची समाधि' (माजूग ३१), 'प्रेम की हेम' (माजूग ३२), 'पाणपोअी' (यध १४), 'अनुक्त प्रीति' (गिफ १०), 'ध्येयदर्शन' (गिफ ३८), 'वियोगापूर्वी' (पारा १२५) या कविता या व्योमगङ्गावृत्तांत आहेत.

प्रमाणिका (६६०) [ ⏑ – ⏑ – | ⏑ – ⏑ – ]

अुदण्ड शब्द योजिले
अचूक पाद मोजिले
तरी प्रभावहानि कां ?
न भावना प्रमाणिका. (१९३)

संस्कृतांत ( मभाष्य खण्ड २, पृ. ८७ ) " अमावसोरहं " ही कारिका प्रमाणिकावृत्तांत आहे; आणि ( खण्ड १, पृ. ४३५ ) अुद्धृत केलेली " मृदङ्गशङ्ख तूणवः। पृथग्वदन्ति संसदि " ही द्विपदी प्रमाणिकावृत्ताचीच आहे. वबृ ( ३०/२७–२९, ४६/३, ७०/१–५, ८७/३८ ) हे श्लोक प्रमाणिकावृत्ताचे आहेत. रूस्तमा ( पृ. १८७ ) वरील " जगद्विना शिसङ्गमं। गरुत्मता गजङ्गमं " या पद्यांत प्रमाणिकाचे ८२ चरण आहेत. मराठींत अुदासदासकृत महाबळचरित्र, आणि अनन्तकृत सुरसुधन्वाख्यान ( ६७–७४ ) नि बभ्रुवाहनाख्यान ( १/५९–६५ ), आणि 'खिस्ती मनुष्याचा आश्रय' ( अुस ४३ ) अित्यादिकांची रचना प्रमाणिकावृत्तांत आहे.

**विभावरी** ( ६६२ ) [ ᴗ – ᴗ – । ᴗ – ᴗ – । ᴗ – ᴗ – ]

प्रसन्न पारदर्शि अन्धकार हा,
पहात रत्नदीप हे अुभा रहा !
रसज्ञबुद्धि हो न केवि बावरी
बघुनि गूढभाविनी **विभावरी** ? ( १९४ )

" नभांत हासतात तारका-तती
विलोल लोचनांतही तुझ्या किती !
प्रशान्त अिन्दुगोल सञ्चरे वरी
प्रतिकृती अिथे तशीच सुन्दरी. " ( ना. बा. शास्त्री )

'वसन्तकला' ( माजूग ५३ ) ही कविता विभावरीवृत्तांत आहे.

**'प्रभाव'** (६६४) [ ᴗ – ᴗ – । ᴗ – ᴗ – । ᴗ – ᴗ – । ᴗ – ]

" **प्रभाव**युक्त सौम्यता ललाट शोभवी
शिरास मण्डिलें किती सुदिव्य वैभवीं !
कृपानदीच वैखरी स्रवे मुखांतुनी;
प्रभूसवें तुलावया जगीं नसे कुणी. " ( अुस ९९ )

आणि अुस १३१ वी कविता ही समग्र या वृत्तांत आहे.

"**कलिन्दनन्दिनी**" (६६६) [ ᴗ – ᴗ – | ᴗ – ᴗ – | ᴗ – ᴗ – | ᴗ – ᴗ – ]

" मुरारिकायकालिमाललामवारिधारिणी
तृणीकृतत्रिविष्टपा त्रिलोकशोकहारिणी
मनोनुकूलकूलकुञ्जपुञ्जधूतदुर्मदा
धुनोतु नो मनोमलं **कलिन्दनन्दिनी** सदा " (श्रीशङ्कराचार्य)

अशुभ्र जाहली जणू हरीत ताप-पाप जी,
अवर्षणींहि काळजी करी दुरी अपाप जी,
व्रजाङ्घ्रि धूळितें जिच्या तटीं करी सुगन्धिनी
न काय वन्द्य हिन्दुंना अशी **कलिन्दनन्दिनी** ? (१९५)

संस्कृतांत श्रीशङ्कराचार्यकृत यमुनाष्टक आणि नर्मदाष्टक ही या वृत्तांतील प्राचीन रचना दिसते. ललितविस्तराच्या १३ व्या अध्यायांत या प्रकारची शिथिल रचना आढळते. मराठींत 'श्रीसद्‌गुरुस्तव' (निक १/३२), मोरोपन्ताचें पञ्चचामररामायण (मोसग्र ७/३५०), कमाल (माजूग ५२) हीं काव्यें कलिन्दनन्दिनीवृत्तांत आहेत. मोरोपन्ताच्या पञ्चचामररामायणांतील काही श्लोक 'देवराज' (पुढे पृ. २९३ पहा) वृत्तांत आहेत; आणि ज्यांत पञ्चचामर हें नांव गोविलें आहे तो शेवटला श्लोकहि 'देवराज' वृत्तांत आहे !

'**कुन्ददशन**' (६७२) [ । – ᴗ ᴗ ᴗ ᴗ ]

" **कुन्ददशन**
बद्धरसन
रुक्मवसन
रम्यहसन " (रूस्तमा १२८)

**जला** (६७६) [ – । – ᴗ – ᴗ । – ]

पाहूनि आजला
या मेघकज्जला
वाटे प्रभातही
ही रात्रिवत् **जला**. (१९६)

'आनन्द' (६७७) [–।–⏑–⏑।––]

" आनन्दकन्द ऐसा
हा हिन्ददेश माझा.
सत्यास ठाव देअी,
वृत्तीस ठेवि न्यायी,
सत्त्वास मानि राजा
हा हिन्द देश माझा." (आगी)

या सुप्रसिद्ध पद्यांत चरण सप्ताक्षरी आहे. या सप्ताक्षरी वृत्ताला 'आनन्द' हें नाव देणें युक्त होअील. याच लगक्रमाच्या "अल्ला तुही तुही रे मौला तुही तुही रे" या द्विपदीचें कबीराने अेका चन्द्रकान्तजातीच्या पद्याला ध्रुवपद घातलें आहे. टेकाड्यांच्या पद्धतीप्रमाणे द्विपदीचें ध्रुवपद आणि चतुष्पदीचें कडवें केलें की कडव्याच्या चतुष्पदींत यमकें साधावीं लागतात. तीं नको असल्यास आनन्दाच्या द्विरावृत्तीने साधणारें वृत्त घेअून त्याच्या द्विपद्या कराव्यात, वृत्त तितकें दीर्घ झालें की अर्थ व्यक्त करायला तितकी अधिक सवड मिळते.

'मुद' (६८२) [⏑⏑।–⏑–⏑।––]

बघ कौमुदीप्रभावें
कुमुद प्रफुल्ल व्हावें;
स्मित दाव तूंहि नामी
मुदमत्त व्हावया मी. (१९७)

"सु" कामिनी (६८५) [–⏑–⏑।–⏑–]

शान्त आणि हासरी
भावना मुखावरी–
रञ्जवील यामिनी
ती खरी सुकामिनी. (१९८)

" मन्द मन्द बोलती
जीव भाव साङ्गती
चाटु कानि वारिती
धैर्य भाव दाविती" (डिरुस्व १/३९)

संस्कृतांत वबृ (३३/२५–२८, ६८/१८, ७०/१८) हे श्लोक या सुकामिनी-वृत्तांत आहेत. णायकुमारचरिउ या प्राकृत काव्यांत ६व्या सन्धीतील १६वें कडवअ हें या सुकामिनीवृत्तांत आहे. मराठींत भिरा (११/८) आणि "पद्मपद्मलोचना" (भिअनि ११) हीं दोन अुदाहरणें आहेत. विद्याधर वा. भिडे या वृत्ताला माधवी कशाच्या आधारें म्हणतात कळत नाही.

**समानिका** (६८९) [ । – ᴗ – ᴗ । – ᴗ – ᴗ ]

मान्यता न ये अपाप,
पाहिजे जगीं प्रताप;
भूमि ही गुणें अुणी न–
तीस **मानि कां** कुणीन ? (१९९)

" अञ्जनीसुत प्रचण्ड
वज्रपुच्छ कालदण्ड
शक्ति पाहतां वितण्ड
दैत्य मारिले अुदण्ड " (राभीस्तो ३/१२०)

रूस्तमा पृ. १८० वर जें पद्य आहे त्यांत समनिकाच्या वीस चतुष्पद्या आहेत. मराठींत मोसारा (९/१३) हें आणखी अेक समानिकावृत्ताचें अुदाहरण आहे.

**मनोहरा** (६९२) [ । ᴗ ᴗ ᴗ – ᴗ । – ᴗ – ᴗ । – ]

" कुजन सद्गुणा न साहतो
विशिख कीं मनीं प्रवेशतो
खल झटे गुणी न व्हावया
सुगुण झोम्बती अहो तया." (भिजी ४१/३)

भिजी ४१ वी कविता मनोहरावृत्तांत आहे असें म्हणतां येअील.

**सिंहलेखा** (६९५) [ – ᴗ – ᴗ । – ᴗ – ऽ । – ]

राक्षसापरी प्रतापी
तो सुधी न हो कदापी;

षड्रिपूंस जिङ्किलें का ?
छे ! न त्या **नृसिंह लेखा**. ( २०० )

" प्रत्ययस्वरश्च तासे
वृत्तिसन्नियोगशिष्टः ।
तेन चाप्यसावुदात्तो
लोप्स्यते तथा न दोषः" ( मभाष्य १, पृ ५०२ )

या वरील चतुष्पदीच्या दुसऱ्या चरणांत आरम्भीं अेक लघु अक्षर अधिक आहे. असें कां व्हावें ?

**मयूरसारिणी** ( ६९६ ) [ । – ᵕ – ᵕ । – ᵕ – ᵕ । – – ]

नील शालु नेसतां जरीचा
या पहा प्रभाव सुन्दरीचा;
चाल पाहतांच चित्त लोभे
ही **मयूरसारिणी**च शोभे. ( २०१ )

**श्येनिका** ( ६९७ ) [ । – ᵕ – ᵕ । – ᵕ – ᵕ । – ᵕ – ]

लीलया लयास धाडिशी मुदें,
अमृतांतुनी न घोट, बिन्दु दे !
हिम्पुटा स्वभाव का दिसे निका ?
सारिके, कशास होशि **श्येनिका** ? ( २०२ )

" रामभोजनामकं स कंचन
क्षोणिभागपालनेऽकरोत्प्रभुम्
संततं निजाङ्घ्रिकञ्जरञ्जकं
मञ्जुपुण्यपुञ्जनीरनीरधिम् " ( ममच १/३५ )

" नम्र भूपती बहूत बोलला,
अैकतां ऋषीस हर्ष वाटला;
रामलक्ष्मणासि घेअुनी सभे
पावतांचि राव राहिले अुभे. " ( असीस्व २८ )

या अनन्त कवीने नकळत श्येनिका आणि सुपथ्या यांचें मिश्रण केलें आहे.

“ अैकतांचि रामशेष हासले
साङ्गतां मुखेंऽ बाळ धाकले
सैन्य अीतुकें असूनि ते क्षणीं
ख्याति हे तिहींऽ लाविली पणी.” ( अकुल २/७ )

**कलापति** ( ७०० ) [ | – ⏑ – ⏑ | – ⏑ – ⏑ | – ⏑ – ⏑ | – ]

जाग ये नळास आणि तो त्वरें अुठे,
सोडुनी सतीस जाय मूढ तो कुठे ?
ती अुठे बघे, दिसे न झोपला पती,
पौर्णिमेस कां अमा करी **कलापती** ? ( २०३ )

“ भक्ष्य भोज्य चोख्य चोज्य हे चतुस्परी
राअितीं विशेष शाख त्याहि अूपरी
वर्णितां कुशिम्बिरीसि पार कोण हो
चन्द्रनीति खारपर्पटासि लोण हो.” ( ओलस्व ७/२७ )

“ सर्वकाल मृत्युदण्डयोग्य नारकी
मी असें अशा कधी न देव अुद्धरी;
धैर्यहीन मी निराश घोर पातकी
भीति ही मनांत फार सर्वदा धरीं.” ( अुस २५७ )

अुस ३९५ या पद्यांतील सर्व कडवीं या वृत्तांत आहेत.

**ललितभृङ्ग** ( ७०१ ) [ | – ⏑ ⏑ ⏑ ⏑ | – ⏑ ⏑ ⏑ ⏑ | – ⏑ ⏑ ⏑ ⏑ | – ⏑ ]

“ शारदविधुवीक्षणमधुवर्धितमदपूर
अिष्टभजनवल्लभजनचित्तकमलसूर
गोपयुवतिमण्डलमतिमोहनकलगीत
मुक्तसकलकृत्यविकलयौवनपरिवीत ” ( रूस्तमा २१० )

या पद्यांत ललितभृङ्गाचे ५८ चरण आहेत.

“**देवराज**” ( ७०२ ) [ | – ⏑ – ⏑ | – ⏑ – ⏑ | – ⏑ – ⏑ | – ⏑ – ]

अुन्च तू सरू, असूनि सावली न विस्तृत,
पुष्पही तुला करी न केधवा अलङ्कृत;

वन्ध्य तू म्हणूनि तूज हीणवोत पामर—
**देवराज** सेवितेस पालवीत चामर. ( २०४ )

“ वारिशालिनासवाति वासनालिशारिवा
सारभाविनीलिमाभ्रमालिनी विभा रसा
सालतालकाननामुना न कालतालसा
राजिताश्रियापरा दुरापया श्रिताजिरा “ (रह ५/१४० )

संस्कृतांत “ देवराजसेव्यमानपावनाङ्घ्रिपङ्कजं ” हें शङ्कराचार्यकृत कालभैरवाष्टक स्तोत्र या देवराजवृत्तांत आहे. मराठींत भिरा १९ वा सर्ग आणि “ रुद्र हा समुद्र देखतां क्षणें अुठावला ” हें भीमरूपी स्तोत्र हीं या वृत्तांत आहेत. परन्तु भीमरूपीस्तोत्रांत मध्येच नकळत कलिन्दनान्दिनीचे चरण येतात. हें मिश्रण आकुच, अकुल ( १/११ ), आणि ‘आर्यभूस्तोत्र’ ( माभा ८९ ) मध्येहि आढळतें.

“ तुरङ्गकण्ठवेष्टुनी सुरम्यवस्त्रपल्लवें
कर्दळी वनांत आणुनी तयास गौरवें
बान्धुनी रणाङ्गणांत सङ्गरासि ठाकला
अश्व ते न देखतांचि सैन्यभार लोटला. ” ( अकुल १/१ )

‘पुष्पाप्रत’ ( केक ६१ ) या कवितेमध्येहि या मिश्रणाचीं स्थळें आहेत.

**हीर** ( ७०३ ) [ । – ᴗ ᴗ ᴗ ᴗ । – ᴗ ᴗ ᴗ ᴗ । – ᴗ ᴗ ᴗ ᴗ । – ᴗ – ]

हा न विनय, हा न सुनय, काय समय गाळिशी ?
प्राप्त दयित त्यास खचित दीन करित टाळिशी ?
व्यस्त कुटिल, कोण कुठिल वन्द्य गणिल ही रहा ?
शत्रुकदन, केलिसदन, वीरमदन **हीर** हा. ( २०५ )

“ क्रोध दुरित काम चरित लोभ ममत साण्डुनी
दुःखहरण जन्मदळण कृष्णचरण मानुनी
भावरमण भक्तिभजन सर्व यजन अर्पुनी
कृष्णसयन सौख्यरमण भाग गहन भोगुनी. ” ( डिरुस्व ९/९ )

"याच श्लोकाखाली असलेल्या दुसऱ्या श्लोकांचीहि रचना अगदी या श्लोकासारखीच आहे" ( को–मकाकाछ ).

**चञ्चला** ( ७०४ ) [ । – ᵕ – ᵕ । – ᵕ – ᵕ । – ᵕ – ᵕ । – ᵕ – ᵕ ]

"श्रीमदात्मने गुणैकसिन्धवे नमः शिवाय
धामलेशधूतकोकबन्धवे नमः शिवाय
नामशोषितानमद्भवान्धवे नमः शिवाय
पामरेतरप्रधानबन्धवे नमः शिवाय" –

हें शङ्कराचार्यकृत शिवचक्राक्षरनक्षत्रमालास्तोत्र या चञ्चलावृत्तांत आहे. मराठींत भिर्जी १८९ वी कविता याच वृत्तांत आहे.

**प्रपञ्च** ( ७०६ ) [ ᵕ ᵕ ᵕ ᵕ ᵕ ᵕ । – ᵕ – ᵕ । – ᵕ – ᵕ । – ᵕ – ᵕ । – ]

"नृपतियुवति सार फार किङ्करीमतासिं ते दिनीं
गणुनि हृदयिं मानि मूढ बुद्धि साधिलीच मेदिनी.
त्यजुनि वसन–भूषणस्वयें स्वरत्नहार तोडुनी
क्षितिवरि निजली मुखावरूनि केशभार सोडुनी" (मोसारा १/२३)

या वरील श्लोकहि या प्रपञ्चवृत्तांतच आहे.

**मरालिका** ( ७१० ) [ । – ᵕ – ᵕ , – ! – ᵕ – ᵕ , – ]

"भार्गवस्ततः पाथसां निधा–
वक्षिपच्छरं सारविक्रमः
तेन तद्गता राक्षसा हताः
सोऽपि वारिधिर्दूरतो ययौ" ( ममच १/३४ )

मध्वमुनीश्वरकृत 'चतुर्थीची कथा' (ममुक ५), माधवानुजकृत 'आरोग्याप्रत' ( मानुक ५९ ) आणि गजानन गोपाळ जोशीकृत 'अध्यात्मविचार' (जोप १/३५) या थोड्याच कविता या मरालिकावृत्तांत आहेत. मोरोपन्ताच्या मञ्जुरामायणांतील २९ वा, ४४ वा, आणि ६५ वा हे तीन श्लोक या वृत्तांत आहेत.

'**सुरवधू**' (७११) [।ᵕ ᵕ ᵕ – ᵕ , –!ᵕ ᵕ ᵕ – ᵕ , –]

प्रभु मनोरथा पुरवि, नाचती
**सुरवधू**, कळा अुरविनाच ती.
निववि सृष्टितें पवन वीजनें
सुरति सेविली नवनवी जनें." (मोमञ्जु ६०)

मोमञ्जु-मध्ये २०, ३३, ३६, ४२, ४९, ५१, ५२, ५५, ५७, ५८, ५९, ६०, ६३, आणि ६७ वा हे श्लोक या सुरवधूवृत्तांचे आहेत.

"**मत्तमधुप**" (७१२) [।– ᵕ ᵕ ᵕ ᵕ , –!– ᵕ ᵕ ᵕ ᵕ , –]

**मत्तमधुप** मी, रानिं भटकतां
चित्त झुलविती फुल्ल वनलता;
नित्य भटकणें थाम्बविल असें
दिव्य सुमन तें हाय न गवसे. (२०६)

'**पवनसुत**' (७१३) [।ᵕ ᵕ ᵕ ᵕ ᵕ ᵕ , –!ᵕ ᵕ ᵕ ᵕ ᵕ ᵕ , –]

"**पवनसुत** कवि प्रथम मन हरी
सुगळ बहुसुखी प्रभुसि मग करी.
रुचिर नगहि तो करुनि कणव दे
'करि न हित असा' प्रभुहि पण वदे." (मोमञ्जु २२)

**अिन्दिरा** (७१४) [।ᵕ ᵕ ᵕ – ᵕ , –!– ᵕ – ᵕ , –]

"जयति ते ऽधिकं जन्मना व्रजः
श्रयत **अिन्दिरा** शश्वदत्र हि
दयित दृश्यतां दिक्षुतावका–
स्त्वयि धृतासवस्त्वां विचिन्वते" (भाग १०/३१/१)

हें भागवतांतील गोपीगीत जसें अिन्दिरावृत्तांत आहे तसेंच

"प्रगटलासि तू नन्दगोकुळीं
म्हणुनि **अिन्दिरा**-वास ये स्थळीं
सकळही सुखी या व्रजीं हरी
विरहदुक्खिता गोपसुन्दरी." (वामन)

हें वामनाचें मराठी गोपीगीतहि अिन्दिरावृत्तांतच आहे. मोरोपन्ताचें मञ्जुरामायण ( मोसग्र ८/४३८ ) हें बहुतेक, आणि आधुनिक मराठींत ' कीर्ति आणि प्रीति ' ( च २३२ ) मधील पहिले ३४ श्लोक हीं या अिन्दिरावृत्तांत आहेत.

" परम नीच मूढां सळी, नया
न गणि, पावती आपल्या लया
परमनीं ' चमू ढांसळीन ' या
अरि म्हणे, ' रणीं ताप ल्याल, या. " ( मोमञ्जु ३८ )

या श्लोकांत होणारा यतिभङ्ग अक्षरचमत्कृतीसाठीच क्षम्य मानावा लागेल.

**द्रुता** ( ७१५ ) [ ।–⏑–⏑,–!⏑⏑⏑–⏑,– ]

बीज पेरल्याविण न पीक ये,
वृद्धि सद्व्ययांतुनि रुजे स्वयें;
कोण्डितां तमीं करुनि कद्रुता
स्वर्णदेवता दुरि पळे **द्रुता**. ( २०७ )

" रामभोजराट् धरणिमण्डलं
शास्ति स्म भूसुरकदम्बकं
दानवैभवैर्मधुरभाषितै
रञ्जयञ्जनं निजविनीतिभिः " ( ममच १/३६ )

नरहरिकृत गङ्गारत्नमाला ( १३२,१३३ ) हे दोन श्लोक या द्रुतावृत्तांत आहेत.

' **अजितसत्प्रिया** ' ( ७१६ ) [ ।⏑⏑⏑⏑⏑⏑,–!⏑⏑⏑–⏑,– ]

" स्तविति सुरमुनी प्रभुसि सर्वही
म्हणाति ' जय ! ' असे विधिहि सर्वही
बरवि करवि त्या अरिच्चिही क्रिया,
सदयहृदय तो **अजितसत्प्रिया**. " ( मोमञ्जु ६१ )

'**शिवविधी**' ( ७१७ ) [ । – ‿–‿ , –! – ‿ ‿ ‿ ‿ , – ]

" श्रीस तो पुसे कीश पुनरपी
हे कथासुधा भक्तसुनर पी
सिन्धु लङ्घितां प्राज्यबळनिधी
वानरागमें जेविं **शिवविधी.** " ( मोमञ्जु ३० )

'**भद्र**' ( ७१८ ) [ । ‿ ‿ ‿ ‿ ‿ ‿ , –! – ‿ ‿ ‿ ‿ , –

" भरत सुखविला भार अुतरिला;
भजति कवि भवीं याच सु-तरिला.
बसुनि पितृपदीं विश्व निववि़लें,
दुरित भिवविल, **भद्र** जिववि़लें. " ( मोमञ्जु ६६ )

'**श्रित**' ( ७१९ ) [ । ‿ ‿ ‿ – ‿ , –! ‿ ‿ ‿ ‿ ‿ ‿ , – ]

" **श्रित** मयूरसे म्हणति जळद या,
प्रभुसि देतसे भजनबळ दया.
करुनि ताप हा सकल पळवि तो,
अतिवदान्यता प्रकट कळवितो. " ( मोमञ्जु ६९ )

"**प्रमद्वरा**"* ( ७२० ) जला–द्विरावृत्ता
[ – । – ‿ – ‿ । – ! – । – ‿ – ‿ । – ]

" सौभाग्यसुन्दरी, गेलीस कां त्वरें ?
पाहूं कुठे तुला काव्यात्म अप्सरे ?
सौन्दर्यनन्दिनी, तू सर्व जाणशी
नैष्ठुर्य का तुला शोभे **प्रमद्वरे** ?" ( माजूग ९२ )

'**आनन्दकन्द**'* ( ७२१ ) [ – । – ‿ – ‿ । – – ! – । – ‿ – ‿ । – – ]

" **आनन्दकन्द** लोकीं हा शाहुबाळ माझा,
पाहूनि यास शोकीं अुल्लास होय ताजा.
अन्धार गाढ भोतीं, चिन्ता परी नको ती,
हास्यप्रभेस ओती हा बालचन्द्र माझा." ( माजूग ८० )

'आओीची आठवण' ( माजूग ८२ ), 'अज्ञात नाथास' ( माजूग ८४ ) आणि 'आओी' ( यध ४१ ) या कविता आनन्दकन्दवृत्तांत आहेत.

'**अनुराग**'* ( ७२२ ) [ ᴗ ᴗ | – ᴗ – ᴗ | – – ! ᴗ ᴗ | – ᴗ – ᴗ | – – ]

सकलांस हाय आहे जरि अेकलेंच जाणें,
क्षण सन्धि सङ्गतीला जगतींच गे सुजाणे.
रमुं या मिळून तू मी, त्यज वल्लभे त्रपा ही,
**अनुराग**रङ्गभूमी जगतींच अेक पाही. ( २०८ )

'बेगमेचें विरहगीत' ( माजूग ८९ ) हें या अनुराग वृत्तांत आहे.

आनन्दकन्द आणि अनुराग यांच्या मिश्रणाचीं दोन अुदाहरणें मोरोपन्ताच्या कृतींत आढळतात.

"**रसने** न राघवाच्या थोडी यशांत गोडी. ध्रु०
निन्दास्तुती जनांच्या, वार्ता वधूधनांच्या,
खोट्या व्यथा मनांच्या काही न यांत जोडी." ( मोस्फुका ४/२०६ )

"हृदया बरें विचारीं नाम स्मरें न तापें. ध्रु०
नामींच भाव राहो, दुष्कर्मपङ्क वाहो,
सौख्या मयूर लाहो, जें मोजवे न मापें." ( मोस्फुका १/३६८ )

अमृतराय कृत 'जगव्यापका हरीला नाही कसें म्हणावें !' ( अकस १३४ ) हें पदहि याच प्रकारचें आहे. या पद्यप्रकाराच्या पूर्ण जातिस्वरूपाला **रसना** हें नाव द्यावें.

"**कन्दर्प**"* ( ७२३ ) [ – | – ᴗ – ᴗ | – ᴗ ᴗ ! – | – ᴗ – ᴗ | – – ]

कां हो कुलीनतेप्रति द्यावें महत्त्व मोठें ?
रत्नांसवे खणींतुनि घेतात जन्म गोटे.
अज्ञात जन्म पावुनि सुख्यात हा तथापि
**कन्दर्प**कान्ति सुन्दर, अिन्द्रापरी प्रतापी. ( २०९ )

'जुगारी' आणि 'पुजारी' ( माजूग ८९, ९० ) या कविता कन्दर्प-वृत्तांत आहेत.

" **विद्युल्लता** "* ( ७२४ ) [ – । – ⏑ – ⏑ । – – ! – । – ⏑ – ⏑ । – ]

" **विद्युल्लते**प्रमाणे हासूनि साजणी,
अन्धार गर्दवूनी जाशी पुन्हा झणी;
रस्ता पुढे दिसेना, अन्दाज होअिना,
हा जीव पाठलागीं मी लाविला पणीं. " ( माजूग ९० )

'प्रेमाची शिक्षा' ( माजूग ८७ ) ही कविताहि बिद्युल्लतावृत्तांत आहे.

" **वैशाख** "* ( ७२५ ) [ – । – ⏑ – ⏑ । – ⏑ ⏑ – । – ⏑ – ⏑ । – ]

गेला वसन्त, मागुनि चण्डांशु ताप दे,
हिण्डेल कोण खेळत आता अुन्हामधे ?
सन्ध्या बघूनि रञ्जित येती प्रिय-प्रिया—
वाटे दिनान्त सौख्यद **वैशाख**मासिं या. ( २१० )

'क्षमस्व,' 'दिनान्त,' 'वियुक्तविलाप,' 'सृष्टि–वैभव' ( माजूग ९१–९४ ) आणि 'कविकातळ' ( गिका ३६ ) या कविता वैशाखवृत्तांत आहेत.

'**धवलकुसुम**' ( ७२६ ) [ । ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ । – ⏑ – ! ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ । – ⏑ – ]

" **धवलकुसुम**धारिणी मृदुलहसितकारिणी
विशदविमलहारिणी विविधललितहारिणी
तरुणहृदयहारिणी मदनजलधितारिणी
विपुलजघनभारिणी द्विरदमधुरचारिणी " ( युर २३३ )

**दमनक** ( ७२८ ) [ । ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ]

" प्रणयभरित-
मधुरचरित
भजनसहित-
पशुपमहित " ( रूस्तमा १४८ )

" **हाला** " ( ७३२ ) [ – । – ⏑ ⏑ – । – – ]

" नैराश्य मनीं माजे,
त्यालाहि न सीमा जे;

दे शान्ति अनीहाला
तैं रागमयी हाला. ( २११ )

**मातङ्गी** ( ७३७ ) [ । – – – । – – – ]

“ ऐकोनी हे वार्ता
जाली ते शोकार्ता,
रामाची ही वाणी
लागे वज्रावाणी.” ( मोसारा ५/३८ )

‘ **सुजनकलित** ’ ( ७४१ ) [ । ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ । ᴗ ᴗ – – ]

“ **सुजनकलित**कथनेन
प्रबलदनुजमथनेन
प्रणयिषु रतमभयेन
प्रकटरतिषु किल येन ” ( रूस्तमा १६१ )

**माणवक** ( ७४२ ) [ । – ᴗ ᴗ – ! – ᴗ ᴗ – ]

गोड अशा बालवयीं
वृत्ति सदा मोदमयी;
रम्यतम दृश्य बघें
**माणवक**–क्रीडित गे. ( २१२ )

“ भर्ममये हर्म्यतटे
शर्मसखीनर्मरताम्
पद्ममुखीं पद्मगृहां
वेद्मि सतीं मूर्तिमतीम् ” ( ममच १/२७ )

**सम्फुल्लक** ( ७४३ ) [ । – – ᴗ ᴗ । – – ᴗ ᴗ ]

“ संधुक्षितबन्धुव्रज
संचारितकीर्तिध्वज
गोपीगणशर्माकर
मां पालय दामोदर ” ( रूस्तमा २०९ )

" नीराधिपभृत्याहृतगोपेश्वरमार्गाश्रित ' ( रूस्तमा २०८ ) या पद्यांत सम्फुल्लकाचे २८ चरण आहेत.

**' पुरुषोत्तम '** ( ७४४ ) [ । ᵕ ᵕ – ᵕ ᵕ । – – ᵕ ᵕ ]

" **पुरुषोत्तम** वीरव्रत
यमुनाद्भुत तीरस्थित
मुरलीध्वनिपूरक्रिय
सुरभीव्रजनादप्रिय " ( रूस्तमा १५३ )

**कुलटा** ( ७४५ ) [ । ᵕ ᵕ ᵕ ᵕ – ! ᵕ ᵕ ᵕ ᵕ – ]

" रुचिरपटः पुलिनतटः
पशुपपतिर्गुणवसतिः
सममशुचिर्जलदरुचि–
र्मनसि परिस्फुरतु हरिः " ( रूस्तमा ५७ )

याच्या वरील चतुष्पदीहि याच वृत्तांत आहे.

" क्षितिविजितिस्थितिविहिति–
व्रतरतयः परगतयः
अुरु रुरुधुर्गुरु दुधुवु–
र्युधि कुरवः स्वमरिकुलम् " ( दण्डी ३/८५ )

**तरलनयन** ( ७४७ ) [ । ᵕ ᵕ ᵕ ᵕ ᵕ ᵕ ! ᵕ ᵕ ᵕ ᵕ ᵕ ᵕ ]

" कुसुमनिकररचितचिकुर
नखरविजितमणिजमुकुर
सुभटपटिमरमितमथुर
विकटसमरनटनचतुर " ( रूस्तमा १५२ )

या पद्यांत तरलनयनाचे १८ चरण आहेत. याव्यतिरिक्त वेदान्तदेशिककृत यादवाभ्युदयांतील ६/३९ हा श्लोक तरलनयनाचा आहे.

**' साशङ्क '***( ७४८ ) [ – । – ᵕ ᵕ – । – – ! – । – ᵕ ᵕ – । – – ]

हें काय असें होओी ? **साशङ्क** धपापे अुर्.
डोळ्यांत जमे पाणी, डोक्यांत अुठे काहूर्.

अेकान्त गमे ठेवी छातीवरती ओझें,
अन्धार फिरे भोंतीं गेला दुनियेचा नूर्." (माजूग ९५)

'काहूर' (माजूग ९५) आणि 'भयाण समुद्रांत' (गिका १०१) या कविता साशङ्कवृत्तांत आहेत.

"**रम्याकृति**"*(७५०) [ ।– – ⏑ ⏑ ।– – ⏑ ⏑ ।– – ]

ठावें न कुणा गूज हृदींचें
ठावे न कुणा रङ्ग सुधीचे,–
माझ्या हृदयीं नित्य रमो ही—
**रम्याकृति** कोणास न मोही ? (२१३)

'सुधाकर' (माजूग ६३) ही कविता या रम्याकृतिवृत्तांत आहे.

"**मदिराक्षी**"*(७५१) [ ।⏑ ⏑ – – ।⏑ ⏑ – – ।⏑ ⏑ – ]

मधुकालीं किति ही रङ्ग–मजा !
गमती या गमतीच्या गमजा.
प्रणयी मत्त न कां प्रेममुदें ?
**मदिराक्षी** नजरेने मधु दे. (२१४)

'बालमित्रास' (माजूग ६७) ही कविता या मदिराक्षीवृत्तांत आहे.

टीप. अरबी छन्दशास्त्राप्रमाणे चरणारम्भीं (⏑ ⏑ – –) हा गण असल्यास त्याच्या ठिकाणीं (– ⏑ – –) हा गण विकल्पाने येअू शकतो. आणि शास्त्राद्रूढिर्बलीयसी या न्यायानेच या विकल्पाला गज्जलाञ्जलींत वाव दिला आहे. तथापि हा विकल्प निष्ठुरपणें काढून टाकणें हेंच शास्त्रशुद्ध आणि युक्त आहे. तसेंच चरणान्तीं (⏑ ⏑ –) हा गण असल्यास तेथेहि विकल्पाने (– –) हा गण घालण्याची वहिवाट आहे; परन्तु ही वहिवाट वृत्तरचनेच्या मूलभूत तत्त्वाला बाध आणणारीच आहे.

"**वनमाला**"*(७५२) [ ।⏑ ⏑ – – ।⏑ – ⏑ – ।⏑ ⏑ – ]

नगरींचा न तो टिके अुजळा.
नलगे तो अशिक्षिते, तुजला;

पटुता ही तुझी अुरीं धरितों
**वनमाला** जशी धरी हरि तो. ( २१५ )

' मोतियाचा गजरा ' ( माजूग ७८ ) ही कविता या वनमालावृत्तांत आहे.

" **स्नेहलता** "*( ७५४ ) [ । – ᵕ ᵕ – । – ᵕ ᵕ – । – ऽ ᵕ – ]

प्रेम हटें का अुगवे साजणी ?
प्रेम मरे मात्र असूया-तर्णीं;
प्रेम हवें ? कुम्पण काढी तुझें–
**स्नेहलता** रूक्ष रणींही रुजे. ( २१६ ).

' लाज जरा, हास जरा ! ' ( माजूग ५७ ) ही कविता या स्नेहलतावृत्तांत आहे.

" **मानवती** "*( ७५७ ) [ । – ᵕ ᵕ – । – ᵕ ᵕ – । – ᵕ ᵕ – ]

प्रीति करी तूजपुढे नम्र मला,
आज कुठे जीव नसे हा भ्रमला;
देवि, मला दिग्विजयेच्छा नव्हती—
**मानवती**, जाअिल वाया नवती. ( २१७ )

' अबोला ' ( माजूग ५६ ) ही कविता या मानवतीवृत्तांत आहे.

" **काञ्चनकान्ति** "*( ७५८ ) [ । – ᵕ ᵕ – । – ᵕ – ᵕ । – ᵕ ᵕ – । – ]

पाहुनि त्या चारुतेस कोण फसेना ?
जीवन छे ! त्या मरीचिकेंत असेना.
कीव करू ये कदाच साच न कां ती ?
जीव निवे का बघूनि **काञ्चनकान्ती** ? ( २१८ )

माजूग ८१ वी कविता या काञ्चनकान्ति वृत्तांत आहे.

**हंसश्येनी** ( ७६२ ) [ – । – – – ! ᵕ ᵕ ᵕ ᵕ ᵕ ᵕ ! – – – । – ]

" नीतोच्छ्रायं मुहुरशिशिररश्मेरुस्रै–
रानीलाभैर्विरचितपरभागारत्नैः
ज्योत्स्नाशङ्कामिह वितरति **हंसश्येनी**
मध्येऽप्यह्नः स्फटिकरजतभित्तिच्छाया" (किरात ५/३१)

**'शुभकामी'***( ७६४ ) [ ।– – ᴗ ᴗ । – – ᴗ ᴗ । – – ᴗ ᴗ । – – ]

जाशील जरी दीपवुनी लोचन जाऒं,
होती सुमनें पायतळीं धन्य तुझ्या हीं.
भृङ्गापरि त्या पोटभरू लोलुप का मी ?
छे ! दिव्य पतङ्गापरि हा मी **शुभकामी** !( २१९ )

" कोलं भुवि कोऽलं जगदालम्बमवैतुम्
स्वामी **शुभकामी** किल भूमीमसुरार्ताम् ।
वाराशिगभीराम्भसि काराभवने ऽभि–
ग्रस्तामिह मुस्तामिव यस्तामुदहार्षीत् " ( वेविच ३८७ )

हें वृत्त तरी ( मन्दाकिनी कदाचित् नसलें तरी ) अरबी–फार्सी छन्दः-शास्त्राच्याच द्वारा हिंदुस्थानांत आलें आहे असें वाटतें. मराठींत तरी या वृत्तांतील ' भिल्लीण न तू सुन्दरि, बाणा न शिकारी ' ( माजूग ५९ ) ही सुपरिचित कविता फार्सी वृत्त डोळ्यांपुढें असल्यामुळेच निर्माण झाली होती; पण आता वृत्ताचें नामकरण करितांना जो संस्कृत श्लोक या वृत्ताचा आढळला त्यांतीलच ऎका शब्दावरून, तें करणें योग्य वाटतें.

'रानकिशोरी' ( माजूग ६० ) 'ध्यासांतून भास' ( यध ४० ) 'जीवितेश्वरीस' ( गिफ १३ ), या कविता या शुभकामीवृत्तांत आहेत.

**" कलावती "*** ( ७६५ ) [ ᴗ – ᴗ – । ᴗ ᴗ – – ! ᴗ – ᴗ – । – – ]

समानशील सखी ती हवी प्रपञ्चातें,
अलङ्कृतीच न जी मात्र होय मञ्चातें;
कशास केवळ ती रूपशालिनी भार्या ?
**कलावती**हि नको काय शालिनी आर्या ? ( २२० )

' ढोङ्ग ' ( माजूग ७६ ) ही कविता या कलावतीवृत्तांत आहे.

**" मरीचिका "*** ( ७६६ ) [ ᴗ – ᴗ – । ᴗ ᴗ – – ! ᴗ – ᴗ – । ᴗ ᴗ – ]

नको तुझा व्यवहारा, जिथे तिथे पगडा !
अुगाच निष्फळ माजे मनीं जनीं झगडा.

क्षणैक जीवित हें यास चारुता खुलवी—
**मरीचिका**हि रुचे जी रणीं मृगा झुलवी. ( २२१ )

'अगोटींची भेट,' 'ठुमरी,' 'स्त्रीस्वभाव,' 'कां सङ्कोच?' ( माजूग ७१–७५ ), 'अनेक सङ्क्रमणांनी' ( यध ४६ ), 'फिरस्ता' ( यज १७ ), 'संसारसखी' ( यग ८८ ) आणि 'रसिक संशयग्रस्ता' ( गिफ २३ ) या कविता मरीचिका वृत्तांत आहेत.

"**शरयू**"* ( ७६७ ) [ ⏑ ⏑ – – | ⏑ ⏑ – – | ⏑ ⏑ – – | – – ]

प्रणयावीण गमे नीरस सारी सृष्टी,
प्रणया गोड दिसे सर्व—कुठे ती दृष्टी?
कधि नांवांतिल जादू स्फुरवी प्रेमातें—
**शरयू** नांवच लावी चटका हें मातें. ( २२२ )

'सौभाग्यवती' ( माजूग ६६ ) ही कविता या शरयूवृत्तांत आहे.

"**प्रियशिष्या**"* ( ७६८ ) [ | ⏑ ⏑ – – | ⏑ ⏑ – – | ⏑ ⏑ – – | ⏑ ⏑ – ]

कुणि वागीश कलाभिज्ञ तपोराशि कवी,
नृप त्याला वदला की दुहितेला शिकवीं—
न लगे शिक्षण, जात्या पटुता स्त्रींत वसे,
**प्रियशिष्या** गुरुतें तप्त करी आग्रहसें. ( २२३ )

माजूग ६३ वी नि ६४ वी या कविता प्रियशिष्या वृत्तांत आहेत.

**सुरभि** ( ७६९ ) [ | ⏑ ⏑ – ⏑ ⏑ | ⏑ ⏑ – ⏑ ⏑ | ⏑ ⏑ – ⏑ ⏑ | ⏑ ⏑ – ]

" शरणागत–भरणातत–करुणाकर–हृदयं
सुरमानित–परमाच्युत–शरमारित–विमतम्
शमलालित–कमलासन–विमलानन–विनुतं
भज मानस निजमाश्रयमजमाहतमदनम् "

ही कविता शारदातिलकम् मधील शिवकर्णामृतांतून म्हणून ब्राउनने आपल्या Sanskrit Prosody या पुस्तकांत अुध्दृत केली आहे.

"**यशोगन्ध**"* ( ७७० ) [ । ‿ – – ‿ । ‿ – – ‿ । ‿ – – ‿ । ‿ – – ]

लताग्रीं सुमना, डोलत रे मुग्ध मुदें तू
नको आदरुं सङ्कोच, अलीला मधु दे तू ;
जरी राहिल अज्ञात तुझें रूप न खन्ती,
**यशोगन्ध** तुझा नेअिल रे वायु दिगन्तीं. ( २२४ )

'तुझ्यावीण' ( माजूग ५८ ) ही कविता आणि "–स" ( यग ८६ ) या कविता यशोगन्धवृत्तांत आहेत.

"**श्यामकान्त**"* ( ७७१ ) [ । – ‿ – ‿ । ‿ – – ‿ । – ‿ – ‿ । ‿ – – ]

दीर्घकाल नसे पुत्र, आणि देवदयेने
चार पुत्र मिळूनीहि काळसङ्कट येणें;
जाअुनी वनवासास पुत्र त्यांतुनि दोघे
भूप हाय म्हणे ' राम '! **श्यामकान्त**–वियोगें. ( २२५ )

माजूग ८३ वी कविता या श्यामकान्त वृत्तांत आहे.

"**नूपुर**"* ( ७७२ ) [ । – ‿ ‿ – । – ‿ – ‿ । – ‿ ‿ – । – ‿ – ]

दूर तुझ्यावीण मूक जीव झुरे अेकला,
राहुं तया दे क्षणैक वक्षिं तुझ्या टेकला.
स्पर्शुनिया तूज धन्य मञ्जुळ नादांत हा
**नूपुर** पायीं सकम्प गुङ्गत खेळे भला. ( २२६ )

' प्रेमसम्भ्रम ' ( माजूग ८० ) ही कविता या नूपुरवृत्तांत आहे.

"**रसोदात्त**"* ( ७७३ ) [ । ‿ – – ‿ । – ‿ – ‿ । ‿ – – ‿ । – ‿ – ]

धनाचाच लोभ देख कितीकांस नाचवी,
कुणा कीर्तिचाच नाद, किती वाद माजवी !
तुझी प्रीति हीच अेक सखे शान्तवी मला,
**रसोदात्त** जीवनीं न दुजी शक्ति शीतला. ( २२७ )

माजूग ८४ वी कविता या रसोदात्तवृत्तांत आहे.

"**अुषा**"* (७७४) [ ᴗ – – ᴗ | – – – ! ᴗ – – ᴗ | – ᴗ – ]

" जहाली **अुषा** जागी, सखे तूंहि हो झणी,
अुषेसारखा अुझी करी साज साजणी.
तिचें रूप दावाया बने सिन्धु आरसा,
पहा तू बहारीचा तुझा अिन्दु दर्पणीं." (माजूग ६९)

'प्रबोधन' (माजूग ६९) आणि 'मनोवासिनीस' (यग ६५) या कविता अुषावृत्तांत आहेत.

**श्रीलीला** (७७५) [ | – – – | – – – | – – – | – – – ]

" मन्दारा ऽ मन्दा ऽ ऽ रामं दारा मन्दा ऽ ऽ रा –
द्याधिघ्ना दैत्यारेः शेषाद्रिं तं प्राप्ताः ।
सारावासारावासारावासारा ऽ वा –
गालीढा शृङ्गाली यस्या ऽऽर्तान् सम्भर्तुम् " (वेलस १४/२७)

"**मनोमोहिनी**"* (७७६) [ ᴗ – – ᴗ | – – – ! ᴗ – – ᴗ | – – – ]

खुळ्या, अूठ खेळाया तरी ये जनामाजी,
तुला वाटती का रे अिथे सर्व दामाजी ?—
कुणाला कुणी आहे, तुम्हांला न चिन्ता हे –
**मनोमोहिनी** माझी सखी होअिना माझी. (२२८)

'जातांना' (माजूग ६८) ही कविता ही या मनोमोहिनीवृत्तांत आहे.

"**रङ्गराग**"* (७७७) [ | – ᴗ – ᴗ | – – – ! – ᴗ – ᴗ | – – – ]

वृत्ति त्या शुकाची का प्राप्त होय अन्यासी ?
आणि मी सखे, नाही वीतराग संन्यासी.
क्षुब्ध लुब्ध मी होतों देखतां तुझी मूर्ती–
**रङ्गराग** ओसण्डे गे तुझ्या पदन्यासीं. (२२९)

'प्रेमशूर' (माजूग ७७) ही कविता आणि 'याचना आणि प्रीति' (माध ५) या कविता रङ्गरागवृत्तांत आहेत.

" **गिरिबाला** "* (७७८) [ | ᴗ ᴗ – – | ᴗ ᴗ – – | ᴗ ᴗ – – | ᴗ ᴗ – – ]

न दिसे ओज पुरीं या, न दिसे कान्ति निरोगी,
सगळी संस्कृति ही सभ्य कशी वैशिक ढोङ्गी !
नहि आश्चर्य, रुचे दुर्गम रानांत शिवाला
विलसे प्रकृतिचारुत्व जिचें ती **गिरिबाला**. ( २३० )

' सखये, काय करूं मी ?' ( माजूग ६४ ) ही आणि 'शोध' (गिफ ५१) या कविता या गिरिबालावृत्तांत आहेत.

" **वसुन्धरा** "* (७७९) [ | ᴗ – ᴗ – | ᴗ ᴗ – – ! ᴗ – ᴗ – | ᴗ ᴗ – – ]

दिसे अजून मला ती प्रसन्न राजस मूर्ती
सदा श्रमव्रत साक्षात् क्षमाच, मानसपूर्ती,
दिसे जणूं अनुरागें अनर्घ्य माणिक रत्नीं—
**वसुन्धराच** अहा ती सुशील सोशिक पत्नी. ( २३१ )

' अुखाणा ' ( माजूग ७० ) ही कविता या वसुन्धरावृत्तांत आहे.

" **अिन्दुमुखी** "* (७८०) [ | – ᴗ ᴗ – | – ᴗ ᴗ – ! – ᴗ ᴗ – | – ᴗ ᴗ – ]

वाट किती पाहुं तरी ? धीर निघेना मधुरे,
गूज कथूं का मनिंचें ? तूज कळे ते चतुरे.
भूवर का मत्स्य जगे ? तूच मला जीवन गे,
**अिन्दुमुखी**, सिन्धु नको, बिन्दु मला अेक पुरे. ( माजूग )

माजूग ५४ वी कविता ही अिन्दुमुखीवृत्तांत आहे.

" **प्रमाथिनी** "* ( ७८१) [ | ᴗ – ᴗ – | – ᴗ ᴗ – ! ᴗ – ᴗ – | – ᴗ ᴗ – ]

कधीच कां तू मजला न पाहशी प्रेमभरें ?
प्रसन्न होशील पुढे परी कुठे नेम बरें ?
पडें पहा निष्क्रिय मी पुरूष होअून भला –
न बोलवे तूज पुन्हा **प्रमाथिनी**, तू अबला ! ( २३२ )

माजूग ८५ वी कविता ही या प्रमाथिनीवृत्तांत आहे.

" **पाणिबन्ध** "* (७८२) [।– ᴗ – ᴗ । – ᴗ ᴗ – । – ᴗ – ᴗ । – ᴗ ᴗ –]

पूर्ण भावसङ्गतिने होय सारखी प्रगती,
तीविना विवाह पहा बन्दिवास की जगतीं.
हस्तपादबन्धन का युक्त सागरोत्तरणीं ?
पाणिबन्ध मात्र अिथे, बन्धमोक्ष तो मरणीं. ( २३३ )

माजूग ७७ वी कविता या पाणिबन्ध वृत्तांत आहे.

" **मानसभञ्जनी** "* (७८३) [।– ᴗ ᴗ – । ᴗ – ᴗ – ! – ᴗ ᴗ – । ᴗ – ᴗ –]

यष्टि तुझी जणू सरू, गाल गुलाब की तुझे,
कस्तुरिकाच केस हे, नेत्र हिरे सखी, तुझे;
आणि हिऱ्यापरी कशी दृष्टि कठोर साजणी !
**मानसभञ्जनी** तुझें नाव पडे पहा जनीं. ( २३४ )

**सोमराजी** ( ७९० ) [ ᴗ – – । ᴗ – – ]

" धृतोत्साहपूरा –
द्युतिक्षिप्तसूरा –
व्रतो ऽ रिर्विदूरा –
व्द्रयं प्राप शूरात् " ( रूस्तमा १६१ )

णायकुमारचरिअु या काव्यांतील २ ऱ्या सन्धींतील ३ रें कडवें आणि ६ व्या सन्धींतील १३ वें कडवें हीं सोमराजीवृत्तांत आहेत.

" **प्रमीला** "* ( ७९२ ) [ ᴗ – – । ᴗ – – । ᴗ – – ]

नरांच्या पहा वैरिणीला
करी लीन ही सृष्टिलीला;
बघे अर्जुनातें प्रभावी
नि हो प्रेमवेडी **प्रमीला**. ( २३५ )

माजूग १०५ वी कविता या प्रमीला वृत्तांत आहे.

**सौदामिनी** * ( ७९३ ) [ ᴗ – – | ᴗ – – | ᴗ – – | ᴗ – ]

जरी स्थायि वा सौम्य नाही प्रभा,
जरी राहशी तू धरूनी नभा,
तरी, होय मेघावृता यामिनी
तदा दाविशी मार्ग **सौदामिनी**. ( २३६ )

मराठी कवि अमृतराय याचें हिन्दी सुदामचरित्र या सौदामिनी वृत्तांत आहे. भिरा ११ वा सर्ग या सौदामिनी वृत्तांत आहे. 'अनन्तस्तोत्र' ( तासक ९८ ), 'प्रतिज्ञा' (तासक १५९), 'रसिकास विनन्ती' ( कावि ९० ), माजूग ( १०३ वी नि १०४ वी ) या कविता याच वृत्तांत आहेत.

**मेघावली** ( ७९४ ) [ ᴗ ᴗ ᴗ – | ᴗ – – | ᴗ – – | ᴗ – ]

हृदयिं अमृताचा पहा आशय,
प्रखर दीपवी दृष्टि तेजोमय,
बसुनि वातयानीं असे पावली,
धरणिची सखी कोण ? **मेघावली**. ( २३७ )

" स्तनितघोरघोषाट्टहासातुला
तरलतारविद्युच्छटालोचना
विरहिणीजनप्राणघातोद्यता
नभसि राक्षसीयं न **मेघावली**. " ( हे २/१८९ )

**भुजङ्गप्रयात** ( ७९५ ) [ ᴗ – – | ᴗ – – | ᴗ – – | ᴗ – – ]

दिसे केतकी काञ्चनाचेंच पान
पडे भूलही स्वर्णमूढास कां न ?
मना सज्जना, घात रे घात यांत,
वनीं केतकीच्या **भुजङ्गप्रयात**. ( २३८ )
भिऊनी जनां अेक बाजूस व्हावें,
न होऊन कोणासही दूखवावें,
कुणी दुष्ट अङ्गास लावील हात
तरी दाखवावा **भुजङ्गप्रयात**. ( २३९ )

भास ( अभिषेक ६/१५ ) हें भुजङ्गप्रयाताचें अेक प्राचीन अुदाहरण आहे. मराठींत रामदासकृत 'मनाचे श्लोक', आणि रामायणांतील काहीं भाग, तसेंच कुण्टेकृत 'राजा शिवाजी' हीं भुजङ्गप्रयातवृत्तांत आहेत.

पुढील पद्यांत वियद्गङ्गा आणि भुजङ्गप्रयात यांचें मिश्रण आहे.

"तुझी मात्र ओजस्विनी स्फूर्ति दृष्टी,
विहङ्गा, तुझ्या गायनें गुङ्ग सृष्टी. ध्रु.
अुडोनी अुन्च अुत्साहें प्रभातीं प्रार्थिशी भानू,
रहस्यें राखिशी राजी किती ही थोरवी वानूं!
तुझ्यासारखा भक्त तू भूमिपृष्ठीं,
विहङ्गा, तुझ्या गायनें गुङ्ग सृष्टी." ( सुजी )

**कन्द** ( ७९६ ) [ ⏑ – – | ⏑ – – | ⏑ – – | ⏑ – – | ⏑ ]

कुणी भावनेच्या विलासांत तल्लीन
म्हणे हृज्ज तें हृद्य, त्याच्यांत आनन्द;
कुणी बुद्धिच्या क्लिष्ट लीलेपुढे दीन,
चमत्कार त्याला गमे की कलाकन्द. ( २४० )

"असे कूप अत्यन्त हा खोल संसार
जलें त्यांतलीं दुस्तर, क्लेशही फार
अशा कूपिं जे मग्न होतात त्यां हाच
असे रज्जु अुद्धारणा धर्म हो साच." ( भिअनि २१३ )

वि. वा. भिडे या पद्याच्या वृत्ताला सुमाल्या कोणत्या आधारें म्हणतात तें कळत नाही.

**सुधा** (८००)

[ ⏑ – ⏑ ⏑ | ⏑ – ⏑ ⏑ | ⏑ – ⏑ ⏑ | ⏑ – ⏑ ⏑ | ⏑ – ⏑ ⏑ | ⏑ – ⏑ ⏑ | ⏑ – ]

"हितावह असे जंव परिस्थिति तुम्हां तंव
हितास्तव झटा, हित लहा,
घडी गत पुन्हा नच तुम्हां मिळु शके बहु-
धनार्पण करूनिहि अहा!

यथाविधि करी कृति यथोचित धरी क्रम
तदायु न तया लघु असे,
स्वजीवित तया लघु गमे श्रम न जो कधि
करी परि सदालस बसे." ( भिजी २५४ वी )

**वागीश्वरी** ( ८०२ )
[ ᵕ – – | ᵕ – – | ᵕ – – | ᵕ – – | ᵕ – – | ᵕ – – | ᵕ – – | ᵕ – ]

यशोगीत गाती तुझ्या क्रीडितांचें
जिथे व्यासवाल्मीकि मोठे कवी
तिथे वाञ्छितें क्षुद्र पद्यांत माझीं
कथूनी वळें मी तुला अैकवीं;
प्रसादें तुझ्या भक्ति काही जनांची
जडे माझिया मुग्ध आर्ति-स्वरीं,
परी स्फूर्ति दे लोकदुक्खें वदाया
अता प्रार्थना हीच वागीश्वरी ! ( २४१ )

"भितों मी तुझ्या चुम्बनातें" ( माजूस्व ४२ ) ही मराठींतील या वृत्तांतील पहिली कविता होय. या वृत्तांत मन्दारमालेपेक्षां आरम्भींचा अेक लघूच काय तो अधिक असल्याने याला सुमन्दारमाला हें नाव देण्यांत आलें. पुढे वागीश्वरी हें नाव हिन्दी छन्दःप्रभाकरांत आढळलें पण या नांवाला आधार आढळत नाही. या वृत्तांत 'आमची मायबोली', ( माजूस्व ५८ ), 'मराठबाणा' ( माजूस्व ८४ ), 'माझा महाराष्ट्र' ( यध ५५ ), मायदेवकृत 'नको हें नको तें' ( माभा ३१ ), अित्यादि अनेक कविता आता झाल्या आहेत.

**मन्थान** ( ८१६ ) [ । – – ᵕ । – – ᵕ ]

"अुद्गीर्णतारुण्य
विस्तीर्णकारुण्य
गुञ्जालतापिञ्छ–
पुञ्जाढ्यतापिञ्छ" ( रूस्तमा ११९ )

**केतुमाला** ( ८१९ ) [ । – – ⏑ । – – ⏑ । – – ]

आलां लढायास येथे,
माघार घ्याया न येते;
कां कांपवीते तुम्हांला
ती शत्रुची **केतुमाला** ? ( २४२ )

" कोठूनि हा सूर येतो ?
तो कोण ही तान घेतो ?
सङ्गीत त्याचें सदाचें
पावूनि रूपा कदाचे
वाटे तरी त्वत्पदाचें
आश्चर्य साधी कसें तो ? " ( सुभा )

' **संनीत** ' ( ८२२ ) [ । – – ⏑ । – – ⏑ । – – ⏑ ]

**संनीत**दैतेयनिस्तार
कल्याणकारुण्यविस्तार
पुष्पेषुकोदण्डटङ्कार–
विस्फारमञ्जीरझङ्कार " ( रूस्तमा १४५ )

" यस्मै परिध्वस्तदुष्टाय
चक्रुः स्पृहां माल्यजुष्टाय
दिव्याः स्त्रियः केलितुष्टाय
कन्दर्परङ्गेण पुष्टाय " ( रूस्तमा १६१ )

" **तारामती** " ( ८२३ ) [ । – – ⏑ । – – ⏑ । – – ⏑ । – ]

रात्रींतुनी मेघ येती नभीं,
येवोत येणार ते, मी न भीं,
नाही परी जीविताराम ती
माझ्यासवें केवि **तारामती** ? ( २४३ )

" माझा दिसो हा रिकामा खिसा,
बोला मला मूर्ख वेडा पिसा,

याची न माझ्या मनाला क्षती,
माझ्यामधे गुङ्ग माझी मती." ( सुजी )

**लयग्राहि** ( ८२५ ) [ । – – ᴗ । – – ᴗ । – – ᴗ । – – ]

हीं भूषणें बन्धनें मात्र होती,
छन्दासही मुक्तता द्या अहो ती !
काव्यीं कवे, होय रे वञ्चना ही
जेथे **लयग्राहि** शब्दौघ नाही. ( २४४ )
" रम्भा पदन्यास जेथे करीना
नाचेल कुब्जा, तिला राहवेना." ( पु. मं. लाड )

भिडेकृत अलङ्कारनिरूपणांत ( पृ. १४४, १४९ ) लयाग्राहि वृत्ताची दोन अुदाहरणें आहेत.

**सारङ्ग** ( ८२६ ) [ – – ᴗ । – – ᴗ । – – ᴗ । – – ᴗ ]

कां मारिती व्याध जीवांस निष्पाप ?
हो दुर्बलानांच मोठा जगीं ताप.
देखा किती रम्य डोळे, कसा रङ्ग,
दावी कसें पादलालित्य **सारङ्ग** ! ( २४५ )

मोरोपन्ताचें रमणीय रामायण ( मोसग्र ७/३८३ ) हें या सारङ्गवृत्तांत आहे.

**अमृतध्वनि** ( ८२७ )

[ – – ᴗ । – ᴗ ᴗ ᴗ । – – ᴗ । – ᴗ ᴗ ᴗ । – – ᴗ । – ᴗ ᴗ ᴗ । – ]

दावी कुणी कवन, नावीन्य तें लव न,
ठावी न कल्पलतिका,
ध्वान्तास जें जमवि, पान्थास जें दमवि,
कान्तार त्यांत गति कां ?
वर्णाकृती सुबक, हा प्रास हें यमक
तो दाखवी अविनयें–

ना जें सुनीत, नित गाजे सुनें स्वनित
की **अमृतध्वनि** न ये. ( २४६ )

संस्कृतांत "चेटीभवन्निखिलखेटीकदम्बतरुवाटीषु नाकिपटली" हें शङ्कराचार्यकृत अम्बाष्टक स्तोत्र, ( बृस्तो १९७ ) आणि वेदान्तदेशिककृत यादवाभ्युदय ( ४/१२४ ) हा श्लोक हीं या अमृतध्वनिवृत्तांत आहेत. मराठींत मोरोपन्ताचें कविप्रिय रामायण ( मोसग्र ७/३७० ) आणि सद्रत्नरामायण ( मोसग्र ८/५१ ) हीं दोन रामायणें या वृत्तांत रचिलीं आहेत. आधुनिक मराठींत रणविहाराचा १६ वा सर्ग या वृत्तांत आहे. अमृतध्वनि हें नांव कोणी दिलें हें कळत नाही.

**मन्दारमाला** ( ८२९ )

[ – – ᴗ | – – ᴗ | – – ᴗ | – – ᴗ | – – ᴗ | – – ᴗ | – – ᴗ | – ]

जाया हरीच्या जरी ठेवित प्रीति
त्यांची परी रीति अत्याग्रही,
कोल्हाळ हो घोर, वेल्हाळ तो थोर,
त्याला न तो घोर बालाग्रही,
द्याया सुखाराम राहूनि निष्काम
देअी घनश्याम ती मागणी,
**मन्दारमाला** रमालाच लाभे,
अुभा वृक्ष तो सत्यभामाङ्गणीं ! ( २४७ )

'अश्वधाटी दृशन्त' ( मोस्फुका १/३६४ ) आणि 'गङ्गास्तव' ( मोस्फुका १/७१ ) हीं काव्यें मन्दारमालावृत्तांत आहेत. गुरुरामायणाचा ६४ वा श्लोकहि याच वृत्तांत आहे.

"**निर्झरध्वनि**" ( ८३० ) [ अमृतध्वनी | – ᴗ – ]

देहांमधील बळ खर्चोनिया सकळ
होअी अुदार मग जीवावरी,
ओढावयास बळ देअील तो प्रबळ,
पाअूल हें अढळ ठेवी वरी,
थोडा चळूनि जरि येशील भूमिवरि

कोणी दया न करि तुझ्यावरी–
ज्यां ओढितोस वर तेही तुझ्याचवर
येतील सर्व तर सर्पापरी." ( कुमा १२ )

**सर्वगामी** ( ८३१ ) [ ७ तगण । २ गुरु ]

" जो लोककल्याण साधावया जाण
घेअी करीं प्राण त्या सौख्य कैंचें ?
निंदाजनीं त्रास, अर्थी विपर्यास,
कारागृहीं वास, हे भोग ज्याचे. " ( देशा )

**आभार** ( ८३२ ) [ सारङ्गद्विरारुवृत्ता ]

" देवापरी मातृसेवा करी, अन्य चित्तान्तरी
जो धरीना कधीं ध्यास,
मानोनिया गाय ही आपुली माय देता तिच्चा
काय कैसा कसायास ? " ( विक १३० )

**'स्वानन्दसम्राट्'** ( ८३४ ) [ – – ᴗ । – – ! – – ᴗ । – – ]

" गाजो जगीं या जी लोकशाही
तीचेच आम्ही याजी शिपाअी,
जिज्ञासु भिक्षू, आजन्म चाकर,
**स्वानन्दसम्राट्** ! अल्लाहु अक्बर ! "

ही माजूग १०७ वी कविता या स्वानन्दसम्राट्वृत्तांत आहे.

**'वदनपद्म'** ( ८३९ ) [ ᴗ – ! ᴗ ᴗ ᴗ – । – ]

" अिदं **वदनपद्मं**
प्रिये तव विभाति
अिह व्रजति मुग्धे
मनोभ्रमरतां मे. " ( पि ८९ टीका )

**'भाविनी'** ( ८४० ) [ । – ᴗ – । – ᴗ ]

" कामिनीलक्ष
मोदने दक्ष

भाविनीपक्ष
मामसुं रक्ष. ” ( रूस्तमा १२४ )

‘ **नन्दकुलचन्द्र** ’ ( ८४१ ) [ । – ‿ ‿ ‿ । – ‿ ]

“ **नन्दकुलचन्द्र**
लुप्तभवतन्द्र
कुन्दजयिदन्त
दुष्टकुलहन्त ” ( रूस्तमा १४४ )

“ रिङ्गदुरुभृङ्ग–
तुङ्गगिरिशृङ्ग–
शृङ्गरुतभङ्ग–
सङ्गधृतरङ्ग ” ( रूस्तमा १४२ )

“ **करभीर** ” ( ८४२ ) [ । ‿ ‿ ‿ ‿ ‿ । – ‿ ]

“ पुलिनधृतरङ्ग–
युवतिकृतसङ्ग–
मदनरसभङ्ग–
गरिमलसदङ्ग. ” ( रूस्तमा १४७ )

**द्वियोधा** ( ८४७ ) [ । – ‿ – । – ‿ – ]

भिरा ( ११/३ ) आणि भिडेकृत अलङ्कार निरूपणांतील ‘ सर्व या भूवरी ’ हीं दोन पद्यें द्वियोधावृत्तांत आहेत.

**गजगती** ( ८५१ ) [ । ‿ ‿ ‿ – ! ‿ ‿ ‿ – ]

मन कुठे नच जडे,
तिजविणें तडफडे;
तरि करी अलग ती
मज कशी **गजगती**. ( २४८ )

‘ **वीरवर** ’ ( ८५३ ) [ । – ‿ ‿ ‿ । – ‿ ‿ ‿ ]

“ चारुतटरासनट
गोपभट पीतपट

पद्मकर दैत्यहर
कुञ्जचर **वीरवर**
नर्ममय कृष्ण जय" ( रूस्तमा १५६ )

**हंसमाला** ( ८५४ ) [ । – ᵕ – । – ᵕ – । – ]

त्याञ्चिया मानसांत
कल्पना क्रीडतात,
की सुवर्णी भ्रमाला
पाडिती **हंसमाला**. ( २४९ )

**वीरलक्ष्मी** ( ८६० ) [ । – ᵕ – । – ᵕ – । – ᵕ – ]

शत्रुची फोडुनीया फळी
घाव घालीत ये या स्थलीं
अग्निकाष्ठें करी भक्षण,
**वीरलक्ष्मीस** त्या वन्दन ! ( २५० )

संस्कृतांत "रङ्गतस्तोषितज्ञातिना" ( रूस्तमा २०० ) या पद्यांत वीरलक्ष्मीचे ५४ चरण आहेत; आणि मराठींत माजूरा १०६ वी कविता या वीरलक्ष्मी-वृत्तांत आहे.

**भामिनी** ( ८६१ ) [ । – ᵕ – । – ᵕ – । – ᵕ – । – ]

तारका अम्बरीं थोडक्या का ?
मारितों मी न कोणास हाका.
शुक्रताऱ्यापरी जी समाजीं
**भामिनी** स्वामिनी तीच माझी. ( २५१ )

भिजी ४२ वी कविता आणि तांबेकृत 'राजराजेश्वरा हो दयाळा' ( तासक १०९ ) ही कविता या भामिनीवृत्तांत आहेत.

**वरसुन्दरी** ( ८६५ ) [ । – ᵕ ᵕ ᵕ । – ᵕ ᵕ ᵕ । – ᵕ ᵕ ᵕ । – – ]

श्रान्त किति पान्थ बघ, शान्त कर याला,
कीव कर, जीवनच दे ग समयाला.

योग्य मज भोग्य मज हृज्ज मधु-धार,
'देख **वरसुन्दरि**, सरोवर अुदार!' (२५२)

"बन्धुरगुणे कृपणबन्धुमनपायं
सिन्धुतनये तव कटाक्षमकरन्दम्
अिन्दुकरवृन्दजडचन्दनमहीधृत्-
कन्दरमरुच्छिशिरसुन्दरमुपासे" (वेलस ५/१८)

(वेविद ४३१) हें हि वरसुन्दरीचेंच अुदाहरण आहे.

मराठींत निरञ्जनमाधवकृत 'साम्बशिवाष्टक' (निक १/१०), साधुदासकृत 'अेकच शब्द' (सानिस १/५६) आणि 'ज्ञानसम्पदा' (भिमम ७६) या कविता वरसुन्दरीवृत्तांत आहेत.

**वसुधारा** (८६८) [ । ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ । ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ । ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ । – – ]

जवळ सखि असुनि मज चिरविरह दाही,
वदनशशि असुनि कशि मजशि न सुधाही;
प्रणयघन नयन तव, वरस मधुधारा,
कृपणपण न कर, रण बनव **वसुधारा**. (२५३)

निरञ्जनमाधवाचें भवान्यष्टक (निक १/११) आणि साव (९/६१–६२) हे दोन श्लोक हीं वसुधारावृत्तांत आहेत. निरञ्जनमाधव या वृत्ताला स्तोत्राच्या शेवटीं कुसुमशर म्हणतो.

**स्रग्विणी** (८६९) [ । – ⏑ – । – ⏑ – । – ⏑ – । – ⏑ – ]

कोपतां लाडकी तीस तो श्रीधर
घेत अङ्कीं म्हणे, शान्ति चित्तीं धर.
बाहुपाशांत या माझिया रुक्मिणी,
शोभशी भूवरी तू खरी **स्रग्विणी**. (३५४)

संस्कृतांत शिशु (४/४२) हा श्लोक स्रग्विणीचा आहे. मराठींत मोरोपन्ताचें स्रग्विणी रामायण आणि राजकवि चन्द्रशेखर यांचें तारातरङ्ग हीं काव्यें स्रग्विणीवृत्तांत आहेत.

**अुर्वशी** ( ८७० ) [ ⏑ ⏑ ⏑ –।– ⏑ –।– ⏑ –।– ⏑ – ]

बघ तुझें रूप हें अप्सरेसारखें,
परि टिको या करीं भाग्यरेषा सखे.
धडधडे कां अुरीं भीति, साङ्गूं कशी ?
त्यजुनि अैलास गेलीचना **अुर्वशी** ? ( २५५ )

भिजी १४२ वी कविता या अुर्वशीवृत्तांत आहे.

‘ **जनकतनया** ’ ( ८७१ ) [।⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑।– ⏑ –।– ⏑ –।– ⏑ – ]

“ अिति विलपति प्रभौ दीनदीनाक्षरं
**जनकतनयां**विना वर्तमाने वने
निशिचरकुलक्षयं कर्तुकामोहन–
श्चिरमजनि लक्ष्मणश्चिन्तयानन्तया ” ( मरच ९/३५ )

‘ **नवमधु** ’ ( ८७५ ) [।⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑।– ⏑ –।⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑।– ⏑ – ]

“ **नवमधु**निषेवणादुपचितमनोरथा
मथितवनपादपा रभसजववायुना
परिहसतलोलुपा दधिमुखपराभवा
दनिभृतमदोदया विपिनभुविरेमिरे ” ( मरच १३/९३ )

“ जय जलदमण्डली– ” ( रूस्तमा १५१ ) या पद्यांत नवमधूचे चौदा चरण आहेत आणि “ निजमहिममण्डली– ” ( रूस्तमा १६९ ) या पद्यांत नवमधूचे बावीस चरण आहेत.

‘ **सरसिरुहलोचना** ’ ( ८७६ )

[।⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑।⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑।⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑।– ⏑ – ]

“ स्वसहचरनिकरहरदनुजकृतिवेदिनं
जगदभयवलदनयमयतनयभेदिनं
सकृदमलपदकमलविनतमयमोचनं
भज सदय मयि हृदय **सरसिरुहलोचनं** ” ( रूस्तमा २२३ )

“ वृषदनुजजनितरुज ”–( रूस्तमा २२२ ) या पद्यांत सरसिरुहलोचनाचे २६ चरण आहेत.

'**विलोलनयना**' ( ८७७ ) [ । – ⏑ – । ⏑ ⏑ ⏑ – । ⏑ ⏑ ⏑ – । ⏑ ⏑ ⏑ – ]

" चेतसापि विमुखेषुपरवारि रसने
चातकाननपुटेषु फलिताम्बुपतना
अेहि मैथिलि विलोकय **विलोलनयने**
कालिकापि कुरुते रतिमुपाश्रितजने " ( मरच ९/३१ )

'**वंशतिलक**' ( ८७८ ) [ । ⏑ ⏑ ⏑ – । ⏑ ⏑ ⏑ – । ⏑ ⏑ ⏑ – । ⏑ ⏑ ⏑ – ]

" अिति निशाचरकुलप्रमथनेन मुदितै–
र्मुनिगणैरुपहृतार्हणविशेष सुहिते
दिविषदां परिषदोऽथ रघु**वंशतिलके**
जयजयेति वचनानि पदवीं विदधिरे " ( मरच ५/६७ )

मरच १६/९२ हा श्लोकहि याच वृत्तांत आहे. मराठींत भिजी ( १८५ वी ) कविता या वंशतिलकवृत्तांत आहे; तेथे वृत्ताचें नाव कुमुदिनी असें दिलें आहे. परन्तु आधाराच्या अभावीं आणि त्या नावाचें दुसरें वृत्त असल्याने कुमुदिनी हें नाव 'सुललिता' नावाप्रमाणेच त्याज्य आहे.

( च २०७ ) या कवितेंत विषमचरण यमकबद्ध नसल्याने चतुष्पदीची द्विपदी करून ही कविता गजगतीवृत्ताची न म्हणतां वंशतिलकवृत्तांतील समजायला काही प्रत्यवाय नाही. अुदाहरणार्थ,

" जरठसा शिशिर तो ध्रुवपदीं विरतला
सुकुसुमाकर अिथे प्रियसखा परतला " ( च २०७ )

" **दया** "* ( ८८० ) [ हंसमालाद्विरावृत्ता ]

" कां **दया** ये न तूते दीननाथा दयाळा ?
का मला आडरानीं टाकिशी लोकपाळा ?
यौवनाच्या मदाने पाडिली भूल मागे
आणि मात्रासुखांचा जाय लागूनि चाळा. "

ही ( माजूग १०० वी ) कविता या दयावृत्तांत आहे.

**श्राद्धरान्ता** ( ८८१ ) [ । – ᴗ – । – ᴗ – । – ᴗ – । – ᴗ – । – ]

" यादवांचा दरारा नृपा लागलासे
वाद्यघोषीं महासैन्य तें जागतासे
देखती येर येरासि तो कृष्ण भासे
हाण हाणा म्हणों लागले कृष्णपीसे " ( डिरुस्व ६/२ )

" **कनकमयता** " ( ८८२ ) [ । ५ ल । ५ ल । ५ ल । ५ ल । – ]

" प्रथम जरि सुकृतसरणि कठिण सुखहर दिसते
तरिहि मग निरतिशय शमसुख अविरत मिळतें
म्हणुनिच विबुध सुकृतसरणि सतत अनुसरतो
क्षणिक सुखद दुरितसरणिस कधिहि नच भुलतो."

या भिजी २३५ व्या कवितेंत शब्द फार अुद्वेगजनक प्रकारें तुटतात.

**चञ्चलाक्षी** ( ८९७ ) [ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ । – ᴗ – । – ᴗ – ]

नियमित घडिला पहाया पथीं
प्रतिदिन अुभि राहि निष्पाप ती
मुखशशि वर त्या गवाक्षीं असे,
स्थिरमति कशि **चञ्चलाक्षी** हसे ! ( २५६ )

" **ऋजुगति** " ( ८९८ ) [ ᴗ ᴗ ᴗ ᴗ । – ᴗ – । – ᴗ – । – ᴗ – ]

" मुनिवर कोपतां कम्प पावे मही,
बहु भय लाधलें वज्रभृध्धामही,
क्षितिसुरमण्डली होअुनि व्याकुळा
' कुशल असो ' म्हणे, ' दिग्रथाच्या कुळा ' ( मोसारा १२/५ )

साररामायणाचा १७ वा सर्ग या " ऋजुगति " वृत्तांत आहे.

**निशा** ( ८९९ ) [ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ । स्रग्विणी ]

" मृदुल मधुर रस्य रक्ताधरीं साचली जी सुधा
जरि तुज नच देववे ती न दे, ती न माझी क्षुधा;
वळव वदन हें तुझें, हास गे आणि दाही दिशा
अुजळ अुजळ, जाचते फार दीनास पाही **निशा**. ( २५७ )

संस्कृतांत रघु ( १२/१०४, ) किरात ( ५/२१, १८/१६–१७, २०, २१, २६ ) आणि शिशु ( ११/६७ ) हीं निशावृत्ताचीं अुदाहरणें आहेत. मराठींत मोस्फुका ( ३/३२, ) मोसग्र ( ८/५१०, ) मोसारा ( १६/१९, ) साव ( ५/१५ ) हीं निशावृत्ताचीं अुदाहरणें आहेत.

'**हेमकाञ्ची**' ( ९०१ ) [ ॅ ॅ ॅ ॅ ॅ ॅ । ५ रगण ]

> "प्रवरगृहनिरोधखेदालसा यान्ति वातायनान्यङ्गना
> जलदसमयदोषगाढार्पणा **हेमकाञ्ची**पुनर्योज्यते
> अुपवनगमनाय सञ्चार्यते वारमुख्योजनःकामिभिः
> तरुणतृणसखेषु लाक्षारसः पात्यते पादपद्मेष्वनङ्गावहः" ( अीधू )

पण चौथ्याचरणांत अेक रगण अधिक आहे!

**मेघमाला** ( ९०२ ) [ २ नगण । ६ रगण ]

> पवनबलसमाहता तीव्रनादा बलाका-
> वलीमेखलाशोभिता
> क्षितिधरसदृशोच्चरूपा महानीलधूमा-
> यमानाम्बुगर्भोद्वहा
> सुरपतिधनुरुज्ज्वला बद्धकक्ष्या तडिद्-
> द्योतसन्नाहपट्टोज्वला
> गगनतलविसारिणी प्रावृषेण्योन्नता
> **मेघमाला**ऽधिकं शोभते. ( भ १६/२०५ )

भासाच्या प्रतिमानाटकांतील ३/३ हा श्लोक या मेघमालावृत्तांत आहे. या वर्गांतील दण्डकांची अुदाहरणें पुढें दिल्याप्रमाणें आहेत.

**चण्डवृष्टि** [ २ न । ७ र ] अविमारक ५/६, रह ४६/७४, तरासु ९८.
**अर्ण** [ २ न । ८ र ] वाअहृअुस्था ५/१९, मोस्फुका १/७१, २/१८८, २/२७९, आणि दण्डकरामायण ( मोसग्र ८/४४४ ).
**व्याल** [ २ न । १० र ] वाअहृअुस्था ५/२०.
**जीमूत** [ २ न । ११ र ] मोस्फुका २/२८३.

**लीलाकर** [ २ न । १२ र ] मोस्फुका ३/७१.
**सङ्ग्राम** [ २ न । १६ र ] भमामा ५ वा अङ्क.
**सुराम** [ २ न । १७ र ] वबृ १२/६.
**गोविन्द** [ २ न । ३१ र ] वबृ ८९/१.
**सानन्द** [ २ न । ३२ र ] वबृ १०४/६१.
**सौम्या** ( ९३१ ) [ विद्युन्माला ॥ अचलधृति ]

" वाद्यध्वान व्योमीं गाजे,
साके स्वर्गासें साजे,
नटति युवतिजन, करिति किति तनन
म्हणती अमरजन सरस नरजनन. " ( मोसाग २१/३ )

मोरोपन्ताचें सौम्यारामायण या सौम्या वृत्तांत आहे.

**आख्यानकी** ( ९२३ ) [ अिन्द्रवज्रा ॥ अुपेन्द्रवज्रा ]

" रामें टणत्कार वनांत केला
कळे धनुर्ज्याध्वनि ताटकेला;
तों धावली वासुनिया मुखा ती,
दिसे जणों सर्व जनांस खाती. " ( मोसारा १५/१६ )

हा १५ वा सर्ग आख्यानकी वृत्तांत आहे.

**विपरीताख्यानकी** ( ९३४ ) [ अुपेन्द्रवज्रा ॥ अिन्द्रवज्रा ]

" म्हणे प्रभू, ' सर्व भय त्यजावें
जावें सुखें, स्वस्थ मनें यजावें;
भवत्प्रसादेंचि पळांत अस्ता
पावेल हे दुष्ट चमू समस्ता.' " ( मोसारा १६/८ ).

हा १६ वा सर्ग विपरिताख्यानकीवृत्तांत आहे.

**शिशिरा** ( ९३५ ) [ अिन्द्रवंशा ॥ वंशस्थ ]

" अित्थं रथाश्वेभनिषादिनां प्रगे
गणो नृपाणामथ तोरणाद्बहिः

प्रस्थानकालक्षमवेषकल्पना-
कृतक्षणक्षेपमुदैक्षताच्युतम् " ( शिशु १२/१ )

हा सबन्ध सर्ग या शिशिरा नावाच्या अर्धसमवृत्तांत आहे.

**हरिणप्लुता** ( ९३६ ) [ विदुषी ॥ द्रुतविलम्बिता ]

रुचिभेद नरांत पहा कसा
जरि वसे रसिकांमधि बन्धुता,
रुचते करिणीच मदालसा
तर कुणा तरला **हरिणीप्लुता.** ( २५८ )

" प्रभु, केवि तरूं भवसागरा ?
फिरवितो विषयानिल गर्गरा,
भगवन् करुणाकर कोपला,
अभयदायक अन्य नसे मला. " ( पार )

' **तनुतमा** ' ( ९३८ ) [ द्रुतविलम्बित ॥ प्रमिताक्षरा ]

" हरमुपेत रसादमलं घनं
दमलङ्घनं तनुत मा कृतिनः
**तनुतमा**कृतिनः श्रयताद्दतं
श्रयताद्दतं भवत अित्युदितम् " ( जस्तु ३०/७१ )

' **मधुपिङ्गल** ' ( ९४३ ) [ तोटक ॥ मोटक ]

" **मधुपिङ्गल**दृक् चतुरस्रतनुः
पित्तप्रकृतिः सवितात्पकचः
तनुवृत्त तनुर्बहुवातकफ—
प्राज्ञश्च शशी मधुवाक् शुभदृक् ( वबृजा २/८ )

' **सुविनीता** ' ( ९४४ ) [ अभिरामा ॥ दोधक ]

" त्यानन्तर त्या जनकाने
भव्य दिनीं निगमोक्त विधानें
श्री राम-करीं **सुविनीता**
ते दिधली रुचिराकृति सीता. " ( मोसारा १९/३ )

'**क्षुत्क्षीण**' ( ९४७ ) [ " सुलोचना " ॥ शुद्धविराट् ]

" क्षुत्क्षीणशरीरसञ्चया
व्यक्तीभूतशिरास्थिपञ्जराः
कैशैः परुषैस्तवारयो
वैतालीयतनुं वितन्वते. " ( पि ४१ टीका )

**वियोगिनी** ( ९४८ ) [ " चारुलोचना " ॥ सीधु ]

शशि दूर असो निशा परी
बहुरत्नीं नटतेच भोगिनी,
अनलङ्कृत भावसुन्दरी
झुरते मात्र सती **वियोगिनी** ( २५९

संस्कृतांत अश्वघोषकृत सौन्दरनन्दाचा ८ वा सर्ग आणि मराठींत मोरोपन्ताच्या प्रिय रामायणाचे पहिले ७४ श्लोक ( मोसग्र ७/३७३–३८० ) या वियोगिनी-वृत्तांत आहेत.

**अपरवक्त्र** ( ९४९ ) [ प्रसभ ॥ मालती ]

" अभिजनमहतो मनस्वितः
प्रिययशसो बहुमानमिच्छतः
निधनमपि वरं स्थिरात्मन–
श्च्युतविनयस्य न चैव जीवितम्. " ( असौ ८/५७ )

अबुच ( ७/५८ ) अपरवक्त्राचेंच अुदाहरण आहे.

'**श्रुतकीर्ति**' ( ९५० ) [ " सुलोचना " ॥ रथोद्धता ]

कन्या **श्रुतकीर्ति** दूसरी
जीस या त्रिभुवनीं नसे सरी
शत्रुघ्नकरीं सती भली
ते मनांत सुख फार लाभली " ( मोसारा १९/६ )

'**सम्पदा**' ( ९५१ ) [ " चारुलोचना " ॥ रथोद्धता ]

" विपुलार्थसुवाचकाक्षराः
कस्य नाम न हरन्ति मानसम्

रसभावविशेषपेशलाः
प्राच्यवृत्तिकविकाव्यसम्पदः. ” ( पि ४४ टीका )

**‘माण्डवी’** ( ९५२ ) [ “ नृपात्मजा ” ॥ शुद्धविराट् ]

“ कुशध्वजें मैथिलानुजें
कैकेयीतनयास भूभुजें
दिली स्वयें **माडण्वी** सुता
ज्येष्ठा जी सुगुणा जनस्तुता. ” ( मोसारा १९/५ )

**‘अुर्मिळा’** ( ९५३ ) [ “ नृपात्मजा ” । “ चारुलक्षणा ” ]

“ निजौरसी अन्य दुर्मिळा
नृपें दिली विध्युक्त **अुर्मिळा.**
सुलक्षणा लक्ष्मणास ती
वरी प्रमोदें सुन्दरी सती. ” ( मोसारा १९/४ )

**‘विदाहिनी’** ( ९५४ ) [ “ नृपात्मजा ” ॥ रथोद्धता ]

“ अनेक रत्नें मनोहरें
जाववयास दिधलीं धराधरें,
रथाश्वपत्तीभवाहिनी
अर्पिली रिपुमनो**विदाहिनी** ” ( मोसारा १९/७ )

**‘शुभोदय’** ( ९५५ ) [ “ कटाक्षलीलता ” ॥ रथोद्धता ]

“ अिदं भरतवंशभूभृतां
श्रूयतां श्रुतिमनोरसायनम्
पवित्रमधिकं **शुभोदयं**
व्यासवक्त्रकथितं प्रवृत्तकम्” ( पि ४४ टीका )

**अुपचित्र** ( ९५६ ) [ विदुषी ॥ दोधक ]

“ करुनी विमला मुनिची सती
देवनदीप्रति सर्वेहि जाती
बहुतां दिवशीं भज भासती
भेटलि जन्मदपज्जलजा ती. ” ( मोसारा १७/३० )

**‘ विपुलकरा ’** ( ९५८ ) [ तामरस ॥ दोधक ॥

“ अुदगयने रविशीतमयूखौ
वक्रसमागमगाः परिशेषाः
**विपुलकरा**युधि चोत्तरसंस्था–
श्चेष्टितवीर्ययुताः परिकल्पाः ( वबृजा २/२१ )

**‘ वरमानिनी ’** ( ९६१ )

“ अुद्भवदम्बुजसंततिसंतत–
संचरदुच्चरथाङ्गविहङ्गकम्
सारसुधामधुराम्बुलसत्त्विह–
मध्वसरो **वरमानिनि** राजते.” ( ममच १/२२ )

**भद्रविराट्** ( ९६२ ) [ “ अिरा ” ॥ अेकरूप ]

“ रत्नानि विभूषयन्ति योषा
भूष्यन्ते वनिता न रत्नकान्त्या
चेतो वनिता हरन्त्यरत्ना
नो रत्नानि विनाङ्गनाङ्गसङ्गम् ” ( वबृ ७३/२ )

वबृ ५/३५ हें आणखी अेक अुदाहरण आहे. अभिनन्दविरचित रामचरिताचा १४ वा सर्ग या भद्रविराट्वृत्तांत आहे.

**मालभारिणी** ( ९६३ ) [ “ अमला ” ॥ बधिरा ]

“ प्रभुच्या चरणीं मयूर भावें
प्रिय रामायण हें नमूनि वाहे,
यश हेंचि सुखें सदैव गावें,
स्थिरता याचि रसीं मनास आहे. ” ( मोप्रिरा १०८ )

संस्कृतांत अश्वघोषकृत बुद्धचरिताचा ५ वा सर्ग मालभारिणीवृत्तांत आहे. मोरोपन्तकृत प्रियरामायणाचे ७५–१०९ अितकेच श्लोक मालभारिणीवृत्तांत आहे.

“ रभसा जलदार्क मानि शोभा
रजनी दिवसान्धकार शोभा

वनपैं वेश्म विमार्गमार्ग वाहे
प्रमदे कान्तविचार साङ्गताहे. " ( विरम ७७ )

या पद्यांत मालभारिणीचेच चरण आहेत; परन्तु क्रम निराळा आहे; म्हणून हें मालभारिणीचें अुदाहरण होअू शकत नाही.

**पुष्पिताग्रा** ( ९६४ ) [ काममत्ता ॥ सुवक्त्रा ]

प्रिय तुज सुकुमार शिल्प साचें
तर बघ जा यमुनातटास आग्रा–
अुपवन जणु मर्मरोपलाचें,
नव लतिका बहुरङ्गि **पुष्पिताग्रा**. " ( २६० )

" मुरडुनि नरडी करें दुज्याने
धरुनि असे धरिलेंच पुच्छ ज्याने
रगडुनि फणिकण्ठ कैटभारी
अुपरि चढे करि नाट्य नीट भारी. " ( वाहवि ३/१० )

" शरण रिघाति त्यांसि तारण्याचें
बिरुद तुझें करि दीनबन्धु साचें;
अगणितचि जरी मदीय पापें
तरि जळतील तुझ्या दयाप्रतापें. ( पारा )

संस्कृतांत अबुच ( १/८०–८९ ) हे श्लोक पुष्पिताग्रावृत्तांत आहे आणि मराठींत वामनकृत जटायुस्तुति ही बहुतेक याच वृत्तांत आहे.

**' अन्तर '** ( ९७० ) [ मदिरा ॥ रमणी ]

" **अन्तर** सुन्दर बाहिर सुन्दर तें पय सुन्दर पाहि मना,
सुख होय जना;
अन्तरिं अर्थ विशेष समर्थ, विरङ्ग किमर्थ पडेल जनीं
सुख होय मनीं " ( राकधास १५५ )

'अुत्तमवंशा' ( ९७१ )

" जअअि जअअि हर बलअिअ बिसहर तिलअिअ सुन्दर चन्दं
मुणि आणन्दं जणकंदं
बसहगमणकर तिसुलडमरुधर णअणहि डाहु अणंगं
सिरगंगं गोरि अधंगं
जअअि जअअि हरि भुअजुअ धरु गिरि दहमुहकंसविणासा
पिअवासा सुंदर हासा
बलि छलि महि हरु असुरविलअकरु मुणिजणमाणसहंसा
सुहभासा अुत्तमवंसा " ( प्रापै २/२१५ )

**शिखा** ( ९७२ )

" भृगुकुलपतिपरिभव करुनि मुदित
रघुवर करि निजपुरगमना
स्तवित सुखित सकळ जन म्हणाति, जय
अतुळबळजळधि! जय खळदमना " ( मोसारा २१/१ )

**खञ्जा** ( ९७३ )

"मृदु शिशिर सुरभि पवन सुखवि जन
पुनरपि धरि निज रुचिस दिनमणी,
रघुकुलवरदशरथनृपतिनगर
सुरपुरततिस तृणसम गणी "( मोसारा २१/२ )

या द्विपद्या आहेत पण स्वयम्भूच्छन्द २६-२९ पाहतां प्राकृतांत या वृत्तांच्या चतुष्पद्या असत असें दिसतें.

"**भ्रान्त**"* ( ९७४ ) [ देवप्रिया ॥ कादम्बरी ]

" हिन्दपुत्रांनो, स्वताला लेखितां कां बापडे?
**भ्रान्त** तुम्हां कां पडे?
वाघिणीचें दूध प्यालां वाघबच्चे फाकडे,
भ्रान्त तुम्हां कां पडे?" ( माजूग )

" पञ्जरींच्या पाखरानो, घ्या भरारी अम्बरीं
पङ्ख झाडा लौकरी !
पञ्जरींच्या श्वापदांनो, जा पळा जा जङ्गलीं,
काय झालं पाङ्गळीं ?
पल्वलींच्या मण्डुकांनो, वृत्ति ह्या ही सोडुनी
जा नदी गाठा झणी.
मण्डपींच्या वल्लरींनो, वाढ ना ह्या खुण्टुनी,
दूर जा फोफावुनी." (पारा ५३)

माजूग ४४ वी, आणि ४५ वी या कविता, यशवन्तकृत 'गाअुं त्यांना आरती,' 'तुरुङ्गाच्या दारांत' (यध ६९, यध ७२) या कविता या भ्रान्तवृत्तांत आहेत.

'**प्रदीप्त**' (९८५) [ "सु" कामिनी ॥ प्रमाणिका ]

" फेण्टकस्य वामत–
श्चिरिल्विरिल्विति स्वनः
शोभनो निगद्यते
**प्रदीप्त** अुच्यते परः." (वबृ ८८/३१)

" **मोदमयी** " (९८८) [ प्रियशिष्या ॥ अधिकारी ]

जव येतात नभीं मेघ मनीं खेद भरे
नच अुत्साह ठरे,
नकळे केवि तुझी वृत्ति अशाही समयीं
विलसे **मोदमयी**. (२५६)

'**रात्रिवितान**' (९८९) [ शुभकामी ॥ तनुमध्या ]

" कोठे तरि जाअूं बसुनी शीघ्र विमानीं
अज्ञात ठिकाणीं;
स्वातन्त्र्य जिथे शान्ति जिथे प्रेम अिमानी,
तेथे चल राणी.

कोठूनि गरीबी असतां रानफुलांहीं
शृङ्गारित राओी ?
बेमोल जवाहीर खुले रात्रिवितानीं,
तेथे चल राणी !" ( माजूग ६० वी कविता )

'हा प्रश्न कशाला' ( यध १४७ ), 'मृत्यूस' ( यध १५१ ) या कविता या रात्रिवितानवृत्तांत आहेत.

**'कल्पना'** ( ९९० ) [ स्रग्विणी ॥ वीरलक्ष्मी ]

"देव नाही जगीं धर्म नाही तसा
कल्पना या खुळ्या मानसा
पापपुण्यद्वयें आणि खोटें-खरें
यामधे ढोङ्ग सारें भरे." ( पाआ ४९ )

## पुरवणी

**'चक्रवर'** ( ४८७ ) [ ᴗ ᴗ । – ᴗ ᴗ – ᴗ ᴗ । – ᴗ ᴗ – ᴗ ᴗ । – ᴗ ᴗ – ]

"अिति मङ्गळ रुक्मिणि सैंवर सुन्दर कल्पनगे
कावि डिम्भ यदीन्द्रकृते चतुर प्रवरे सुभगे
हरि रुक्मिणि माळ समर्पित पल्लव नामफळं
भवसंसृति नाशक खण्डमिदं किल पृष्टमलं ( डिरुस्व ६/९७ )

**'सत्फल'** ( ५१४ अ )

[ । – ᴗ ᴗ – ᴗ ᴗ । – ᴗ ᴗ – ᴗ ᴗ । ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ – । – ]

"श्रीहरि सुन्दर वल्लभ लाहुनि परमसुख विदर्भें
पूर्वकृतामळ जोडि समागत हरिपद फळ लाभे
भीमकि शोभत कल्पनगामळ विरचित कावि डिम्भें
सत्फळ संज्ञक खण्डमुताष्टममतिकळतर शोभे." ( डिरुस्व ८/४२ )

हें वृत्त मोदकवृत्ताला रतिमालावृत्ताची वा मालिनीच्या पहिल्या गणाची जोड देअून साधिल्यासारखें वाटतें.

---

अध्याय ५ वा

# जाति-जीवन

आता ज्या पद्यप्रकाराचा विचार करावयाचा आहे तो थोडा गुन्तागुन्तीचा आहे. या प्रकारांत पद्याचें परिमाण जें कडवें म्हणून असतें त्यांत चरणांची सङ्ख्या निश्चित नसते. कित्येकदा तर, चरण कोणत्या पद्यविभागास म्हणावें हें सुद्धा विचार करून ठरवावें लागेल. जे चरण कानाला सारखे वाटतात ते डोळ्याला सारखे दिसत नाहीत; कारण, लगक्रमाने आणि अक्षरसङ्ख्येने ते सारखे असतातच असें नाही. तथापि लघूची अेक मात्रा आणि गुरूच्या दोन मात्रा या गणिताने ते सारखे असतात, आणि आवर्तनदृष्ट्या त्यांची मोडणी सारखी असते. पुन्हा, मात्रांची सङ्ख्या पाहतां दोन चरण सारखे असूनहि मोडणी भिन्न असल्यास त्यांना भिन्नभिन्नच गणावें लागतें. वरवर पाहतां या पद्यप्रकारांत अक्षरांची गणना न करितां मात्रांची गणना करण्यांत येते म्हणून याला मात्रावृत्त म्हणतात, पण ' जाति ' हें स्वतन्त्र नाव अधिक योग्य होअील.

## १ ध्रुवपद

जातिरचना ही बहुतांशी गेय असते. आरम्भींचे अेक वा दोन चरण हे काही ठराविक चरणांचा गट सम्पल्यावर पुनःपुन्हा म्हणावयाचे असतात. ठराविक चरणांच्या अन्तराने पुनःपुन्हा म्हणावयाच्या या काव्यारम्भींच्या भागाला **ध्रुवपद** वा पालुपद वा अक्कण कडवें म्हणतात. अितर भाग घोळून घोळून पुनःपुन्हा म्हणावयाचे नसतात. ते आपण सरळ तडक म्हणत जातों. त्यांच्या मानाने हा आरम्भींचा भाग ध्रुव म्हणजे स्थायी, अचल असतो. ध्रुवपदाव्यतिरिक्त भागाच्या मानाने ध्रुवपदाची रचना ही कित्येकदा गुन्तागुन्तीची असते. सरळ वाचीत जाण्याने त्याची मोडणी प्रतीत होत नाही. मध्येच काही काही ठिकाणीं प्लुत अक्षर असतें वा विराम असतो.

## २ कडवें

ध्रुवपद वगळून अुरलेल्या पद्याचे रचनादृष्ट्या जे सारखे भाग पडतात, आणि ज्यांच्या अन्तीं ध्रुवपद म्हणावयाचें असतें त्या भागांना **कडवीं** म्हणतात. कडवें हा शब्द प्राकृत 'कडवअ' पासून निघाला असावा. कडवें अेकचरणी वा अनेकचरणी असतें. कडव्याची घटना ध्यानांत यायला आता काही अुदाहरणें पाहिलीं पाहिजेत.

धीरसमीरे यमुनातीरे वसति वने वनमाली
गोपीपीनपयोधरमर्दनचञ्चलकरयुगशाली ध्रु.
रतिसुखसारे गतमभिसारे मदनमनोहरवेषम्
न कुरु नितम्बिनि गमनविलम्बनमनुसरतं हृदयेशम् १
नामसमेतं कृतसङ्केतं वादयते मृदुवेणुम्
बहु मनुते ननु ते तनुसङ्गतपवनचलितमपि रेणुम् २
पतति पतत्रे विचलति पत्रे शङ्कितभवदुपयानम्
रचयति शयनं सचकितनयनं पश्यति तव पन्थानम्." ३ (गीगो)

या पद्यांतील सारे चरण सारखे [ । प । प । प । – + ] या मोडणीचे आहेत. चरणारम्भींच आवर्तनाला आरम्भ होअून आठआठ मात्रांचीं तीन आवर्तनें झाल्यावर चौथ्या आवर्तनांत चारचारच मात्रा सशब्द आहेत. अर्थात् प्रत्येक चरणाच्या अन्तीं चार मात्रांचा विराम आहे. ज्या मात्रावलीच्या द्विपदीने कडवें सिद्ध होतें त्याच मात्रावलीच्या द्विपदीने ध्रुवपद सिद्ध होतें. या पद्याची रचना मुळीच गुन्तागुन्ताची नाहीं. समयक द्विपदीने कडवें सिद्ध होतें आणि चरण हा कडव्याचा अर्धभाग होतो. ज्या मात्रावलीच्या आवृत्तीनें कडवें सिद्ध होते त्या मात्रावलीअेवढा पद्यविभाग म्हणजे चरण होय. चरणान्तीं विराम असतो आणि बहुशः तेथे यमक जुळविण्यांत येतें. आता दुसरें अुदाहरण घेअूं.

" प्रातःकालीं अेके दिवशीं झिमझिम पाअुस पडे,
शोभती रानफुलांनी कडे.
सृष्टीमध्ये नूतन जीवन वाटतसे कीं भरे,
चहुकडे मोद तदा सञ्चरे.

गार वायुची झुळुक येअुनी हिरव्या शेतांवरी
लोळुनी नाना क्रीडा करी !
बालकवी तों अुठला, बसला अेकान्तीं जाअुनी,
रङ्गला नितान्त मधुगायनीं. " ( माक ५७ )

याहून अधिक मोठा अुतारा घेण्याचें कारण नाही. या पद्यांत कडव्यांचे अनुक्रमाङ्क नाहीत; आरम्भीं ध्रुवपदाहि नाही. यावरून जातिरचनेंत ध्रुवपद असलेंच पाहिजे असें नाही ही गोष्ट दिसते. या पद्यांत चार समयक द्विपद्या आहेत. द्विपदीचे दोन्ही चरण मात्र सारखे नाहीत. अेक लाम्ब असून अेक आखूड आहे. परन्तु सर्व द्विपद्या पाहतां असें दिसून येतें की सारे विषमचरण सारखे [ । प । प । प । ᵕ + ] या मोडणीचे असून सारे समचरण सारखे [ – ᵕ – । प । ᵕ + ] या मोडणीचे आहेत. म्हणजे येथे पद्य अेकाच मात्रावलीच्या आवृत्तीने सिद्ध झालेले नसून दोन भिन्न मात्रावली मिळून होणाऱ्या संयुक्त मात्रावलीच्या आवृत्तीने सिद्ध झालें आहे. हा अर्धसम प्रकार आहे. पहिला सम प्रकार होता.

## ३ ध्रुवपद हें जातिप्रकाराचें निर्णायक नाही.

अेखाद्या पद्याची चाल देतांना ती बहुशः आरम्भींच्या म्हणजे ध्रुवपदांतील चरणांची देण्यांत येते. परन्तु कित्येक पद्यांत ध्रुवपदच नसतें; तर कित्येकदा अेकाच जातीच्या पद्यप्रबन्धांना भिन्नभिन्न मात्रावलींचीं ध्रुवपदें आढळतात. मागे ३३५ व्या पृष्ठावर अुद्धृत केलेल्या गीतगोविन्दाच्या ११ व्या प्रबन्धांत ज्या मात्रावलीच्या द्विपदीचीं कडवीं आहेत त्याच मात्रावलीच्या द्विपदीचें ध्रुवपद आहे. गीतगोविन्दांतील ३, ४, ५, ६, ८, १७, २०, २२ आणि २३ हे प्रबन्ध पाहिलें असतां त्यांतील कडवीं [ । प । प । प । – + ] याच मात्रावलीच्या द्विपदीने सिद्ध झालेलीं आहेत; परन्तु या प्रबन्धांना ध्रुवपदें मात्र भिन्न भिन्न आहेत. अुलटपक्षीं अेका विशिष्ट मात्रावलीचें ध्रुवपद भिन्न भिन्न जातिप्रकारांच्या आरम्भीं आढळतें. तेव्हा ध्रुवपदावरून अेखाद्या जातीचा प्रकार ठरविणें चुकीचें होअील. जातिप्रकारनिर्णय हा पद्याच्या म्हणजे कडव्याच्या घटनेवरूनच केला पाहिजे.

येथे आणखीहि थोडा खोल विचार केला पाहिजे. पद्य म्हणतांना आपणांला आवडेल तो भाग आपण घोळून घोळून म्हणतों; परन्तु या घोळण्याचा,

तेच् तेच शब्द पुन्हापुन्हा म्हणण्याचा विचार आपण पद्यप्रकार ठरवितांना करीत नाही. त्याचप्रमाणे प्रत्येक कडव्याच्या अन्तीं ध्रुवपदाची जी पुनरुक्ति होते तिचाहि विचार करण्याचें प्रयोजन नाही. हा पुनरुक्त होणारा भाग कडव्यांत मुद्रित केलेला असला तरी तो कडव्याबाहेरीलच गणला पाहिजे.

“ सखे ग प्रशान्त किती यामिनी !
ही तशीच जलवाहिनी. ध्रु०
ही विशाळता कितितरी
तव अुदार हृदयापरी !
करुं विहार चल तीवरी. १ सखे ग० ” ( यध १४५ )

येथे “ सखे ग प्रशान्त किती यामिनी ” या ध्रुवपदांतील चरणाचा समावेश कडव्यांत केलेला नाही. तथापि तो म्हटल्याविना कडवें पूर्ण झालेसें वाटत नाही म्हणून

“ ही विशालता कितितरी
तव अुदार हृदयापरी !
करुं विहारचल तीवरी
सखे ग प्रशान्त किति यामिनी ! ” १

असें मुद्रण केलेलें असतें तरीहि ‘ करुं विहार चल तीवरी ’ या तिसऱ्या चरणाच्या अन्तींच कडवें पूर्ण होतें असें समजायला पाहिजे. असें समजलें की या पद्यांतील कडवें म्हणजे [ – । प । ∪ + ] या मात्रावलीची त्रिपदी ठरते.

आता याच चालीवर म्हणावयाची अशी पुढील कविता पहा.

“ ते हवेत माझे मला
सखे, परि भवति सदा गल्बला. ध्रु०
हे मधुप फुलांभोवती
डोलती जसे गुञ्जती,
लोभले तेवि सोबती
तयांचा ओघ न कधि आटला. ” १ ( यभा ४८ )

येथे कडव्यांतील चौथा चरण हा ध्रुवपदांतील अेखादा विभाग नाही. तो निराळ्या शब्दांचा झालेला आहे; अर्थात् येथे तो कडव्याचा घटक आहे. पण यामुळे पद्याची चाल तीच असली तरी जातीचा प्रकार मागील कवितेहून भिन्न होतो; कारण, कडव्याची घटना निराळी झाली आहे. येथे कडवें हें अेकाच मात्रावलीची त्रिपदी वा चतुष्पदी नसून [ – । प । ᵕ + ] या मात्रावलीची त्रिपदी आणि [ ᵕ – – । प । ᵕ + ] या मात्रावलीचा अेक चरण मिळून होतें. पहिला जातिप्रकार असम्मिश्र असून दुसरा सम्मिश्र आहे. या दृष्टीने पाहतां 'मम सुमन कुणा हें वाहूं कमलावरा!' (यध १६०) या पद्याची जाति 'मज चैन नसे ग, कशि मी रिझवूं मना?' (गिका ७५) या पद्याच्या जातीहून भिन्नच मानिली पाहिजे.

## ४ अन्तरा

" जिकडे तिकडे जगांत सारें प्रेम साचलें दिसे,
तयाविण कोठे काही नसे. ध्रु०
तुङ्ग महीधर गगनश्रीच्या वदनाला चुम्बिती,
शशिकर जललहरी कम्पिती.
दिनमणि येतां घरीं प्रेमला पूर्वदिशासुन्दरी
फुलते कदम्बकुसुमापरी.
हासत हासत प्रफुल्लवदनें तारागण खेळती,
अम्बरीं परस्परां ओढिती.

(चाल पालटून) रवि येतां अुघडी नेत्रांतें कमलिनी,
शशि दिसतां हासे आनन्दुनि कुमुदिनी,
वनलक्ष्मी नटते मधु आला पाहुनी;
(चाल पूर्वीची) चञ्चल चपला, परि मेघाला सोडुनि दूर न वसे,
बघशी अन्त किती राजसे?" १ (दक ४३)

ज्या संयुक्त मात्रावलीच्या आवृत्तीने ३३५ व्या पृष्ठावरील 'प्रातःकाळीं अेके दिवशीं' हें पद्य सिद्ध झालें आहे त्याच संयुक्त मात्रावलीची आवृत्ति

प्रस्तुत पद्याच्या कडव्यांत चारदा आहे. परन्तु येथे ती सारखी आवृत्ति कण्टाळवाणी वाटूं नये म्हणून तीन आवृत्त्यांनन्तर आणि चाथ्या आवृत्तीच्या पूर्वी म्हणजे कडव्याच्या पोटांत [ - । प । प । ‿ + ] या भिन्न मात्रावलींचे तीन चरण घालण्यांत आले आहेत. हे सयमक आहेत. कडव्याच्या पोटांतील या भिन्न पद्यविभागास **अन्तरा** म्हणतात. अन्तऱ्यापूर्वी 'चाल पालटून' अशी सूचना लिहून ठेवण्याची मागे पद्धत होती; आणि अन्तरा सम्पल्यावर पुढील चरणाच्या आधी 'चाल पूर्वीची' अशी सूचना असे. अन्तरा सम्पल्यावर कडवें पूर्ण होअीपर्यन्त पद्याचा जो अेक वा दोन चरणांचा विभाग पडतो त्याला **मेळ** म्हणतात. कडव्यांतील अन्त्यचरण हा बहुशः ध्रुवपदाशी सयमक असतो. तें यमक जणू काय ध्रुवपदाच्या पुनरुक्तीची सूचनाच देतें. कडव्याचा अन्त्यचरण आणि ध्रुवपद यांचा मेळ अर्थाच्या दृष्टीनेहि अुत्तम बसला म्हणजे ध्रुवपदाची पुनरुक्ति विशेष हृदयङ्गम होते. यासाठी अर्थ नि यमक यांच्या दृष्टीने सर्व कडव्यांशी जुळेल असेंच ध्रुवपद घ्यायला हवें.

अन्तऱ्याचे चरण बहुशः तीन वा दोन असतात, क्वचित् अधिक असतात. अन्तरा अमुकच अेका मात्रावलीचा असतो असें नाही. अन्तऱ्यासाठी बहुशः अेखाद्या ऱ्हस्व मात्रावलीची योजना करण्यांत येते. अेकाच जातीच्या पद्यांत ज्याप्रमाणे भिन्न भिन्न ध्रुवपदें आढळतात त्याचप्रमाणे अेकाच जातीच्या पद्यांत भिन्न भिन्न मात्रावलींचे अन्तरे आढळतात. यासाठी जातिनिर्णय करितांना ध्रुवपदाप्रमाणेच अन्तऱ्याचाहि विचार करावयाचा नसतो. "गोविन्दा मधुसूदना कमललोचना सख्या यदुविरा" या देवनाथाच्या जातिरूप पद्यांत अन्तरा मालिनी वृत्ताच्या चतुष्पदीचा आहे! "अबलामति प्रार्थिते हरीतें प्रेमयुक्त राधा" या पद्यांत पादाकुलकाचा अेक अन्तरा असून पुढे १ ल्या कडव्यांत मालिनीचा श्लोक आहे तर अितर कडव्यांत वसन्ततिलकावृत्ताचा अेक अेक श्लोक आहे! रामजोशीकृत 'झाली तरुणपणाची धूळ' या पद्यांतहि दोन अन्तरे आहेत. पण, अशीं दोन दोन अन्तऱ्यांचीं पद्यें अेकन्दरीने दुर्मिळच आहेत.

अन्तरा हा कडव्याच्या पोटांत, बहुशः अुत्तरार्धांत असतो आणि त्याचे चरण कडव्यांतील अितर चरणांपेक्षा सङ्ख्येने अुणे असतात. ही गोष्ट ध्यानांत

न राहिल्यामुळे, चालीचें आणि ध्रुवपदांचें साम्य पाहून कित्येकदा दिशाभूल होते. या परिच्छेदाच्या आरम्भीं दिलेल्या पद्याशी पुढील पद्यें ताडून पहाणें बोधप्रद होअील.

" चान्दरात पसरिते पाण्ढरी माया धरणीवरी,
लागली ओढ कशी अन्तरीं.
हा तालतरू गम्भीर शान्तता धरी
लेवुनी सुधेचें वल्कल अङ्गीं शिरीं,
कुणि शुचिर्भूत मुनि तपा जणू आचरी.
केस पिन्जुनी अुभी निश्चला कोणी वेडीपिशी
भासते छाया काळी तशी." (काचा ३०)

या पद्यांत ध्रुवपद नाही. येथे अन्तरा [ – । प । प । ᵕ + ] याच मात्रावलीचा आहे पण तो मागील पद्यांतील अन्तऱ्याप्रमाणे [ । प । प । प । ᵕ + ।। – ᵕ – । प । ᵕ + ] या संयुक्त मात्रावलीच्या तीन आवृत्त्या-नन्तर आणि चौथ्या आवृत्तीच्या पूर्वी असा नसून दोन आवृत्त्यांच्या मध्ये म्हणजे कडव्याच्या पोटांतच आहे. तेव्हा कडव्यांतील चरणांची सङ्ख्या अुणावली म्हणून जातीचा प्रकार निराळा झाला असें मानण्याचें काही कारण नाही.

" शैवालाने मला टाकिलें व्यापुनि पुरतेपणीं,
गुदमरे जीवहि त्या दडपणीं. ध्रु०
बाहेर वाहते वाऱ्याची झुळझुळ
लागतां तयाची पुसट कधी चाहुल
चलबिचल अन्तरीं करि मजला व्याकुल,
परी सुटेना मिठी तयाची बसली जी जखडुनी,
गुदमरे जीवहि त्या दडपणीं." १ (यग १०६)

या पद्यांत [ – । प । प । ᵕ + ] या मात्रावलीची त्रिपदी आहे पण ती कडव्याच्या पोटांत नाही. तसेंच कडव्यांतील अन्त्य चरण ' गुदमरे जीवहि त्या दडपणीं,' हा ध्रुवपदाच्यापैकी आहे. तेव्हा कडव्याच्या घटनेंत त्याचा विचार करितां

येत नाही. म्हणजे, या पद्यांतील कडवें हें [ – । प । प । ⏑ + ] या मात्रा-वलीच्या त्रिपदीला [ । प । प । प । ⏑ + ] या मात्रावलीचा अेक चरण जोडून झालेलें आहे असें दिसतें. अर्थात् कडव्याची घटना वेगळी झाल्यामुळे या पद्याची जाति वेगळीच मानिली पाहिजे. ध्रुवपद भिन्न असलें तरी कडव्याची घटना हीच असल्यामुळे, हीच जाति पुढील पद्याचीहि आहे.

" अहा ही दैववशें लाधली
विपिनीं फिरतां अवचित मजला कण्टककलिता कळी. ध्रु०
करिं धरितां देअी दिव्य गन्धपरिमळा,
अुघडितां नयन करि प्रेमदृष्टि सोहळा,
ओष्ठासि देतसे स्पर्शमोद आगळा,
स्नेहसागरा सञ्चित करिते वाटे प्रतिपाकळी." (केप ५४)

## ५ कडव्याचा अन्त्य चरण

कडव्याचा अन्त्य चरण हा जर अुपान्त्य चरणाला जोडून घेतां येत असेल तर तसा तो जोडून घेअून मग जातिनिर्णय करावा. अुदाहरणार्थ,

" जन पळभर म्हणतिल 'हाय हाय!'
मी जातां राहिल कार्य काय? ध्रु०
मेघ वर्षतिल, शेतें पिकतिल,
गर्वानें या नद्या वाहतिल,
कुणा काळजी की न अुमटतिल
पुन्हा तटावर हेच पाय?" १ (तासक १३४)

या पद्यांत [ । प । प ] पादाकुलकाच्या तीन चरणांना [ । प । – ⏑ – ⏑ ] या मात्रावलीचा अेक चरण जोडून कडवें सिद्ध झालें आहे. पहिले तीन चरण सय-मक असल्याने अेकाखाली अेक असे मुद्रित केले आहेत.

या पद्याची तुलना पुढील पद्याशी करून पहा.

" जरि करिन सकल खलकार्य विफल
मम जन्म विप्रकुलिं तरिच सफल! ध्रु०
जरि न घडे हें, नलगे भार्या,
स्वदेह वाहिन हा जनकार्या

स्मरुनि गुरुपदा शपथचि घेतों, कधि न टळे कोदण्ड अचल.'' (देशा २४)

या पद्यांत पादाकुलकाच्या दोन चरणांना [।प।प।प।– ⏑ – ⏑] या मात्रावलीचा अेक चरण जोडून कडवें सिद्ध केलेलें आहे. वरवर पाहतां कडव्याची घटना भिन्न दिसते म्हणून जाति भिन्न मानावयाची काय? हेंच कडवें

“ जरि न घडे हें नलगे भार्या,
स्वदेह वाहिन हा जनकार्या,
स्मरुनि गुरुपदा शपथचि घेतों
कधि न टळे कोदण्ड अचल.''

असें लिहिलें तर, वा मागील कडवें

“ मेघ वर्षतिल, शेतें पिकतिल,
गर्वानें या नद्या वाहतिल,
कुणा काळजी की न अुमटतिल पुन्हा तटावर हेच पाय ?''

असें लिहिलें तर दोन्ही पद्यांची जाति अेकच आहे असें स्पष्ट दिसून येतें. तेव्हा दोन जाति मानणें चुकीचें होअील. म्हणून जेथे जेथे कडव्याचा अन्त्य चरण हा अुपान्त्य चरणाला जोडून घेतां येऊन त्यांची रूढ अशी मात्रावली सिद्ध होत असेल तेथे तेथे तो जोडून घेअून नन्तरच कडव्याची होणारी घटना ध्यानांत घेअून जातिनिर्णय करावा. यमकाला चरणनिर्णयांत प्राधान्य देण्याचें कारण नाही. या पद्धतीने चालल्यास मागे ३३७ व्या पृष्ठावर दिलेल्या पद्याचें कडवें

“ हे मधुप फुलांभोंवती
डोलती जसे गुञ्जती
लोभले तेवि सोबती, तयांचा ओघ न कधि आटला. '' ( यभा ४८ )

असें होअून त्या पद्याची आणि

“ तारका चमकली नभीं
तेजाची पुतळी अुभी,
रिपु तिमिर तयाला न भी;
अुत्साह वाढता तिचा अहाहा परिसर अुज्ज्वल करी ! '' ( त ७७ )

या पद्याची जाति अेकच ठरून दोन्ही पद्यांची गणना, ज्या जातींत कडवें हें [ – । प । ᵕ + ] या मात्रावलीचे दोन वा अधिक चरण आणि [ – । प । प । प । ᵕ + ] या मात्रावलीचा अेक चरण मिळून होतें त्या जातींत होअील.

## ६ खण्डन

चरणांत सारख्या अन्तराने खटके घेअून खटक्याखटक्यांनी यमकें साधणें हा पदलालित्याचाच अेक प्रकार आहे. यालाच येथे खण्डन म्हटलें आहे. या खटक्याखटक्यांनी साधिलेल्या यमकांच्या अनुरोधाने चरणनिर्णय करणें चुकीचें होतें.

“ निर्जनीं
घोर या वनीं
कोण तू साङ्गें
गन्धर्वसुता, वनदेवि, मनुज वा कां गे ? ” ( तासक ६९ )

याप्रमाणे पद्य छापण्याची जरी पद्धत अलीकडे प्रचलित झालेली असली तरी वस्तुतः ही

“ निर्जनीं घोर या वनीं कोण तू साङ्गें,
गन्धर्वसुता, वनदेवि, मनुज वा कां गे ? ” ( तासक ६९ )

अशी [ – । प । प । – + ] या मात्रावलीची द्विपदी आहे आणि ती तशीच मुद्रित करायला पाहिजे. पद्य लिहिण्याच्या प्राचीन पद्धतींत चरण हे जसे अुभ्या रेघेने अलग अलग दाखवीत असत तसे हे खटक्याखटक्यांनी पडलेले तुकडे अलग अलग केले जात नसत. प्रस्तुत पद्यांत हे खटके आवर्तनाच्या तिसऱ्या मात्रेनन्तर पडले आहेत. परन्तु, “ अशि । मण्डित तनु केलि । खण्डित पति कुठ । धुण्डित बसला । रूसून् ” या रामजोशीच्या चरणांत खटके आवर्तनांच्या चौथ्या मात्रेनन्तर आहेत, तर

“ मिरिग् । लागला छान् गेलं । भिजून रान् देव – । किर्पेचं सुटलं । वारं पघा । चाडं कुरी कसा । ओटी पुरी काढा । राजा सुभान्याला । म्होर ” ( यध १२२ ) या कुणबाअू बोलींतील शिथिल पद्यांत खटके आवर्तनाच्या सहाव्या मात्रेनन्तर आहेत. या पद्याचें कडवें अेकचरणी असून तो चरण [ – । प । प । प

। – + ] या मात्रावलीचा आहे. हीच मात्रावली आवर्तनाच्या तिसऱ्या मात्रेनन्तर खण्डित केली की पुढील प्रमाणे रचना होते.

"जरि । वास नसे तिळ । यांस तरी तुम्- । ह्मांस अर्पिलीं । सुमनें
मधु । जरी नसे तिळ- । भरी अन्तरीं । तरी करीं ही । धरणें" (तासक १).

शास्त्रीय दृष्ट्या दोन्ही पद्यें अेकाच जातीचीं मानलीं पाहिजेत. अेकाच पद्याच्या निरनिराळ्या चरणांत खण्डन निरनिराळ्या रीतीने केलें असण्याचाहि सम्भव असतो; मध्येच अेखाद्या चरणांत खण्डन नसूंहि शकते. चरणनिर्णयाच्या दृष्टीने पदलालित्याला महत्त्व देतां कामा नये. प्रभाकराच्या पुढील पद्याची रचना शिथिल असली तरी त्यांतील खण्डन, पदलालित्य हृदयङ्गम आहे.

"गुल्जार नार शृङ्गार करुन खुप नटली
चाले छमक छमक, दावि धमक पाहुन मति खुटली. ध्रु०
टवटवित शरिर लवथवित, घवघवित मुखडा,
गोरे गाल, अधर दोन्ही लाल, माल माशुकडा.
भरपूर, नौतिमधे चूर, अूर बुन्दकडा
जग भुले डुले जेव्हा हाले नथेचा आकडा.
दिसे कसा बसा, पहा जसा जरीचा तुकडा.
अिश्काच्या हसुन खुप कसून मारी पकडा.
दोहों दण्डिं भळभळित भव्य मजेच्या वांकी,
गळिं चन्द्रहार तेजस्वि दाखवुन झाकी,
घूत्कार धुन्द फुन्दांत मिजाशित टाकी,
जरिकाठ कञ्चुकी ताठ, राठ गटगटली;
खुलि पाठ दिसे तसु आठ, गांठ तटतटली." (प्रक २३८)

## ७ चरण

चरण हा पद्याचा आवृत्त होणारा सोअीस्कर विभाग असल्या कारणाने आणि त्याच्या अन्तीं बहुशः विराम असल्याने कोणत्या भागाला चरण म्हणावें हें ठरवायला सहसा अडचण पडत नाही. परन्तु चरणान्तीं, केवळ खटका आणि यति नव्हे, तर विरामच असला पाहिजे असा आग्रह धरिल्यास पादा-

कुलक [।प।प] मात्रावलीच्या मालेंत चरणसमाप्तिच होणार नाही; कारण, पादाकुलकाच्या अन्तीं आवर्तन पूर्ण होत असल्यामुळे तेथे अेकाहि मात्रेचा विराम घ्यायला कूस नसते. अुलटपक्षीं विरामानुरोधानेच चरणनिर्णय केल्यास "निज नीज गडे नीज गडे लडिवाळा" [- ।- - + ऽऽ।प।- +] या चरणांत दुसऱ्या आवर्तनांत अन्तीं द्विमात्रक विराम असल्याने त्याचे

"निज नीज गडे
नीज गडे लडिवाळा"

असे दोन ऱ्हस्व चरण करावे लागतील. चरणांत अेखाद्या आवर्तनांत अन्तीं दोन मात्रांचा विराम असल्यास तेवढ्याकरितां अेका चरणाचे दोन चरण करण्याचें प्रयोजन नाही. चरणांतच जेथे एक वा अनेक मात्रांचा विराम असतो तेथे ( —० ) ही खूण करण्यांत येअील. तेव्हा चरणनिर्णय करितांना तारतम्य अवश्य पाळिलें पाहिजे. चरण हा अतिऱ्हस्वहि नसावा, आाणि अेका श्वासांत म्हणतांच येणार नाही असा अतिदीर्घहि नसावा. सध्या तरी मराठींत अडतीस मात्रांच्याहून अधिक दीर्घतेचा चरण अवलोकनांत नाही. तेव्हा चरण चाळीस मात्रांहून अधिक लाम्बीचा नसावा. क्वचित् कोठे याहूनहि दीर्घ चरण आढळल्यास यतीच्या अनुरोधाने चरण तोडून ते योग्य लाम्बीचे करावे लागतील.

अेका ओळींत अेकच चरण लिहावयाचा ही आधुनिक पद्धति चाङ्गली आहे. त्यामुळे पद्याचें श्रुतिगम्य स्वरूप दृग्गोचरहि होतें. अुद्धवजातीचे मात्र दोन दोन चरण अेका ओळींत देतात तें अिष्ट नाही. छापणावळ वाचविण्यासाठी अेका ओळींत जितकीं अक्षरें ठेचून बसवितां येतील तितकीं बसवायचीं हें जसें दिसायला सुन्दर दिसत नाही, त्याच प्रमाणे संहिता लहान असूनहि पुस्तक वपुश्रीमान् दिसावें यासाठी चरणतोड करून ओळी वाढवाव्यात हेंहि प्रामाणिकपणाचें नाही.

## ८ जातीचे मुख्य प्रकार

पद्य हें प्रायः कडव्याच्या आवर्तनाने सिद्ध होतें; परन्तु सम आणि अर्धसम प्रकारांत कडवें हें ज्याप्रमाणें कशाच्या तरी आवर्तनाने सिद्ध होतें तसें तें विषम प्रकारांत होत नाही. विषम प्रकारांत कडवें हाच लघुतम आवर्त घटक दिसतो.




**वर्ग १ ला** :—कडवें ऐकचरणी असो वा अनेकचरणी असो, सारे चरण ऐकाच मात्रावलीचे असतात. कडवें ऐकचरणी असल्यास तो चरण ध्रुवपदाशी समयक असतो. परन्तु कडव्यांत अनेक चरण असल्यास, त्या सर्वांचेंच यमक ध्रुवपदाशी जुळतें असें नाही. कडव्यांतील शेवटला चरण बहुशः ध्रुवपदाशी समयक असतो. त्याच्यापूर्वी ऐकच चरण असल्यास तो निर्यमकहि असतो; अधिक चरण असल्यास त्यांच्या अन्तीं निराळें यमक साधण्यांत येतें. ध्रुवपदच नसल्यास पद्यांत समयक द्विपद्यांची माला असते. अन्तरा असल्यास तो कडव्याच्या पोटांत असावा लागतो, आणि त्याला प्राधान्य नसतें.

**वर्ग २ रा** :—दोन भिन्न मात्रावली मिळून होणाऱ्या संयुक्त मात्रावलीच्या आवर्तनाने कडवें सिद्ध होत असल्यामुळे कडव्यांतील चरणांची सङ्ख्या सम असते आणि ते चरण विषम विषम सारखे आणि सम सम सारखे असतात. बहुशः विषमसमचरण सयमक असतात. अन्तरा असल्यास तो कडव्याच्या पोटांत असावा लागतो आणि त्याला प्राधान्य नसतें.

**वर्ग ३ रा** :—अेका मात्रावलीचे दोन वा अधिक चरण आणि भिन्न मात्रावलीचा ( प्रसङ्गाविशेषीं ती संयुक्ताहि असूं शकते ) अेक ( वा क्वचित् दोन ) चरण मिळून कडवें सिद्ध होतें.

**वर्ग ४ था** :—भिन्न भिन्न मात्रावलींचे चरण मिळून कडवें सिद्ध होतें; परन्तु घटनेंत काही सामान्य तत्त्व दिसत नाही. आज तरी मराठींत या वर्गांत पडतील अशीं फारच थोडीं पद्यें आहेत. ‘ झपूर्झा ’ ही कविता या वर्गांत पडेल.

९ बहुतेक जातिरचना पद्मावर्तनी आहे.

अग्न्यावर्तनी म्हणजे सप्तमात्रकावर्तनी आणि हरावर्तनी म्हणजे पञ्चमात्रकावर्तनी जातींचीं अुदाहरणें फारच थोडीं आहेत. त्यांच्या मानाने भृङ्गावर्तनी म्हणजे षण्मात्रकावर्तनी जातीचीं अुदाहरणें अधिक आढळतात. बहुतेक जातिरचना पद्मावर्तनी म्हणजे अष्टमात्रकावर्तनी आहे असें म्हणायला काही प्रत्यवाय नाही.

अष्टमात्रक गणाचे अन्तर्घटनादृष्ट्या भिन्न असे पाच प्रकार होतातः—( १ ) [ – – – – ], २ [ ‿ – ‿ – – ], ३ [ ‿ – – ‿ – ], ४ [ – ‿ – ‿ – ] आणि ( ५ ) [ – – ‿ – ‿ ]. पाचवा गणप्रकार वैरल्याने आणि तेथेहि पहिल्या वा तिसऱ्या आवर्तनांतच आढळतो, अुदाहरणार्थ

“ सन्त घराला सन्तत येती **तेथे अुसन्त** घे नृपती ” ( काशी कवि )

“ **केली सुवर्ण**-वर्णी पातकलोहमयी मुनिरमणी ” ( मोस्फुका ७२/२७ )

“ **घोड्यावरीच** हुरडा चोळुनि शत्रुशासना धावोनी ” ( केक १६२ )

या ठिकाणीं थोडी फिरवाफिरव करून

“ सन्त घराला सन्तत येती अुसन्त तेथे घे नृपती ”
“ सुवर्णवर्णी केली पातक-लोहमयी मुनिरमणी ”
“ हुरडा घोड्यावरीच चोळुनि शत्रुशासना धावोनी ”

अशी सुधारणा करून तो गण काढून टाकला तर रचना अधिक अुच्चार-सुलभ आणि श्रुतिमधुर होते यांत सन्देह नाही. 'प' ही खूण जेथे असेल तेथे पञ्चगणाचा कोणताहि प्रकार चालतो असे समजावें.

षण्मात्रक गणाचे (– – –), (– ᵕ – ᵕ) आणि (ᵕ – ᵕ –) असे तीन प्रकार होतात. पहिल्या दोन प्रकारांत टाळी आरम्भीं पडते त्यामुळे अेकाच्या ठिकाणीं दुसरा येअूं शकतो. (ᵕ – ᵕ –) या गणांत दुसऱ्या अक्षरावर स्वाभाविकपणें टाळी पडते. जेथे 'भृ' हें अक्षर असेल तेथे पहिले दोन गण चालतात म्हणून समजावें. सप्तमात्रक आणि पञ्चमात्रक गणांत गणाच्या अेका स्वरूपाच्या ठिकाणीं दुसऱ्या स्वरूपाचा गण क्वचितच चालतो.

## ९ आद्यतालकपूर्व गण

आवर्तनारम्भ बहुशः चरणारम्भीं असतो; परन्तु चरणारम्भील अेक वा अनेक अक्षरें झाल्यानन्तर कित्येकदा पहिली टाळी पडते. ही पहिली टाळी पडण्यापूर्वी हा जो चरणारम्भींचा भाग म्हटला जातो त्याला **आद्यतालकपूर्व गण** म्हणावें. आद्यतालकपूर्व गण हा द्विमात्रक, चतुर्मात्रक, पञ्चमात्रक वा क्वचित् षण्मात्रकहि असतो. अेक मात्रेचा असा आद्यतालकपूर्व गण मौक्तिकदामवृत्तांत [ᵕ। – ᵕ ᵕ – ᵕ ᵕ। – ᵕ ᵕ – ᵕ] आणि गीतगोविन्दांतील

।" हरिरिह मुग्धव –। धूनिकरे
वि–। लासिनि विलसति। केलिपरे "

या ध्रुवपदांतील दुसऱ्या चरणांत आढळतो. जेथे आद्यतालकपूर्व गण चार वा पाच मात्रांचा असतो तेथे तो (– –), (ᵕ – –), (– ᵕ –) या तीन गणांपैकी अेखादा असतो; तगण (– – ᵕ) नसतो. या चार वा पाच मात्रांच्या अुप-गणाला काही तरी चिन्ह पाहिजे तें 'अु' हें निश्चित केलें आहे.

आद्यतालकपूर्व गण किती मात्रांचा असावा हें, चरणाचा अन्त्य गण किती मात्रांचा आहे यावर अवलम्बून असतें. आद्यतालकपूर्ण गण आणि अन्त्य गण मिळून मात्रांची सङ्ख्या ही, आवर्तन जितक्या मात्रांचें असेल तितक्या मात्रांहून अधिक होतां कामा नये. तशी ती अधिक झाल्यास छन्दोभङ्ग होतो. कन्दवृत्तांत हा छन्दोभङ्ग होतो म्हणूनच तें वृत्त निषिद्ध ठरतें. "कञ्चनी। रसरङ्गाची। खाणी" या चरणांतहि छन्दोभङ्ग होतो; कारण

'खाणी-कञ्चनी' मिळून नअू मात्रा होतात. अशावेळीं आवर्तन पञ्चावर्तनी असल्याने म्हणतांना 'कञ्चनि' वा 'खाणि' असा अुच्चार करावा लागतो.

अन्त्य गण आणि आद्यतालकपूर्व गण ( असल्यास ) दोन्ही मिळून मात्रांची सङ्ख्या आवर्तनाअितकी भरल्यास चरणान्तीं केवळ खटका येतो, आणि ती अुणी भरल्यास जितक्या मात्रांची अुणीव असेल तितक्या मात्रांचा चरणान्तीं विराम घेतां येतो.

## १० चरणांची सान्धेजोड

चरण हे अेकापुढे अेक म्हणावयाचे असल्याकाणाने अेखाद्या चरणाचा अन्त्यगण आणि पुढील चरणांतील आद्यतालकपूर्व गण यांच्या मात्रांची बेरीज आवर्तनाच्या सङ्ख्येहून अधिक होतां कामा नये. तसें झाल्यास त्या ठिकाणीं छन्दोभङ्ग होतो. ती बेरीज अुणी भरल्यास चिन्ता नाही; तितक्या मात्रांचा विराम स्वाभाविकपणें चरणान्तीं घेण्यांत येअून ती अुणीव भरून निघते. सान्ध्याच्या ठिकाणीं छन्दोभङ्ग झाला नाही की सान्धा अुत्तम बसला म्हणून समजावें.

" ला –। गले मिटाया। डोळे
निजूं दे। स्वस्थपणें आ –। ता. ध्रु०
किति। शीण पहा मज। आला
सर्वही। पाङ्गुळली गा –। त्रें.
सम् –। पला दिवस जा –। अिल हा,
दिवाकर। अस्ता क्षणमा –। त्रें" ( रेक १/३८८ )

ही अर्धसम रचना आहे. परन्तु या पद्यांत विषमचरण आणि समचरण यांचा सान्धा नीट बसत नाही; कारण, 'डोळे – निजूं दे,' 'आला–सर्वही,' '–अिल हा–दिवाकर' मिळून मात्रांची बेरीज नअू नअू म्हणजे आवर्तनाच्या मात्रासङ्ख्येहून अेकाने अधिक होते. यामुळे प्रत्येक द्विपदींत छन्दोभङ्ग होतो. 'निजूं दे,' 'सर्वही' आणि 'दिवाकर' यांच्या ठिकाणीं अनुक्रमें 'निजुं दे, 'सर्वहि' आाणि 'भास्कर' अशी सुधारणा करून अेक अेक मात्रा अुतरविली की छन्दोभङ्ग टळतो.

द्विपदी–द्विपदीचा सान्धा मात्र नीट जुळतो. ‘ ता–किति ’ ‘ त्रें–सम् ’ यांच्या चारचारच मात्रा होतात आणि त्यामुळे ‘ ता ’ आणि ‘ त्रें ’ यांच्यानन्तर चारचार मात्रांचा विराम घेतां येतो.

कडव्याचा अन्त आणि ध्रुवपदाचा आरम्भ यांचाहि सान्धा जुळावा लागतो. चरणान्त्य लघु हा बहुशः गुरु होतो; परन्तु कडव्याच्या अन्तीं येणारें लघु अक्षर पुढे ध्रुवपदाशी जोडून घ्यावयाचें असतें म्हणून कित्येकदा लघुच अुच्चारावयाचें असतें.

“ प्रिया मी–।नाक्षी
निशि–। दिनीं सेवनीं। दक्ष, वचन मम । लक्षि ध्रु० प्रिया०
अिन्द्राचें सुख । तुच्छ मजपुढे । अमृत जरी तो । भक्षि ” १ प्रिया०
( किग्र ५१६ )

परन्तु ध्रुवपद अ–भङ्ग नसल्यास त्याचा अमुक अेकच भाग कडव्याला जोडून म्हटला पाहिजे असें नाही.

“ ही । अेक आस मनिं । अुरलि
कनय्या । बजाव् बजाव् मुर । ली ध्रु०
मी । अगदी भोळी । राधा
तू । माधवजी नच । साधा
मो–। हनी करी सुख–। बाधा
तुज । दासी विनवुनि । झुरलि—” १ ( गोवा ९९ )

येथे कडव्याच्या अन्तींची ‘लि’ ऱ्हस्व आहे कारण या चरणाला जोडून ‘ कनय्या । बजाव् बजाव् मुर–। ली ’ हा ध्रुवपदाचा भाग म्हणावयाचा आहे. परन्तु हाच भाग म्हटला पाहिजे, अथवा ध्रुवपदाहि प्रत्येक कडव्याच्या अन्तीं म्हटलेंच पाहिजे असें नाही. किम्बहुना मुरलीसारख्या प्रदीर्घ कवितेंत पालुपदाचा कण्टाळाच येतो. अशा वेळीं कडव्याच्या अन्तीं काही मात्रांचा विराम येअू शकल्याने ‘ ली ’ दीर्घ होते नि तशी आपोआप म्हटली जाते.

“ चान्–। दणें चहुकडे । खुललें
फत्–। तरहि सारे । फुलले

आ-। नन्दें विश्वहि। झुललें
स्फू-। र्तीच त्यांत तव। शिरली.
ही अेक आस मनिं अुरलि कनय्या बजाव् बजाव् मुरली."

अंसें म्हटल्यास अन्त्याक्षर 'ली' हें दीर्घ आहे असें धरून चालायला अडचण नाही.

११ पादाकुलकानन्तर आद्यतालकपूर्व गण निषिद्ध आहे.

चरणांच्या सान्धेजोडींत अेक चूक नकळत होअून जाते. पादाकुलकाच्या अन्तीं आवर्तन पूर्ण होत असल्याने त्या आवर्तनांत पुढील चरणाचा आद्य-तालकपूर्व गण बसायला कूसच नसते. म्हणून पादाकुलकानन्तर जो चरण यावयाचा त्यांत आद्यतालकपूर्व गण असतांच कामा नये.

" जर-। ठें न विवाह क-। रावा,
। कधिहि न जनकें। जरठ वरातें। तनुजादेह वि-। कावा. ध्रु०
। ही भवदाज्ञा। जो नच पाळी
। महा पातकी। स्वकुळा जाळी
। लोक नियमना-। स्तव तत्काळीं
। भूपें तो दण्-। डावा." (देशा ९५)

ध्रुवपदाच्या प्रथम चरणांत दोन मात्रांचा आद्यतालकपूर्व गण असूनहि, कडव्यांतील पादाकुलकाच्या त्रिपदीला जोडून 'भूपें तो दण्डावा' हा जो चरण घातला आहे त्यांत आद्यतालकपूर्व गण नाही हें ध्यानांत ठेविलें पाहिजे. ध्रुवपदांतील चरणासारखा चरण अन्धळेपणाने योजायचा म्हणून " भू-। पाळें तो दण-। डावा " असा जर तो चरण लिहिण्यांत आला असता तर 'स्तव तत्काळीं-भू' मिळून आवर्तनांत दहा मात्रा होअून छन्दोभङ्ग झाला असता.

तथापि हा विचार न केल्यामुळें पुढील दोन पद्यांत छन्दोभङ्ग झाला आहे.

(१) " मी। तुझ्या पदीं जुग-। णार,
तू। तार, मार, झिड-। कार ! ध्रु०
। विश्वपटावर। नरदा फिरती,
। अुरीं मृत्युची। धास्ती धरिती,

। मरती, अुठती, । फिरुनी मरती,
मी । कटिवर या । बसणार. ” ( यध १४९ )

अन्त्य चरण जर ‘। मी कटिवर बस-। णार ’ असा असता तर छन्दोभङ्ग टळला असता.

( २ ) “ मजशी । नकळे
मी । अथवा हे जन । चकले. ध्रु०
। प्रपञ्च मोठा । आप्पलपोटा
। परमार्थाचा । पथ वा खोटा
पड-। लें मज गूढ, न । अुकले.” ( विक ८२ )

तथापि युवतिभूषण आणि नववधू या दोन जातींत छन्दोभङ्ग होत असूनहि त्या रूढ झाल्या आहेत. शास्त्राद्रूढिर्बलीयसी असें म्हणण्याची पाळी येते ती अशा ठिकाणींच.

## १२ चरणमध्यावर स्वाभाविकपणें यति येतो.

ज्या ठिकाणीं शब्दसमाप्ति वा पदसमाप्ति न झाल्यास रचना कर्णकटु लागते तेथे यति आहे असें समजावें. जेथे जेथे अेक वा अनेक मात्रांचा विराम असतो तेथे तेथे यति हा अपरिहार्यपणें असतोच असें समजावें. पण जेथे अेका मात्रेचाहि विराम नसतो पण म्हणतांना स्वाभाविकपणेंच खटका पडतो अथवा जेथे कवीने सहेतुकपणें खटका ठेविलेला असतो तेथेहि यति मानायला पाहिजे. चरण दीर्घ असल्यास चरणमध्यावर म्हणजे बहुशः दुसऱ्या आवर्तनाच्या अन्तीं खटका पडतो तेथे यति मानायला हवा. हा यति अद्यापि कोणी साङ्गितलेला नाही त्यामुळें तो निरपवादपणें पाळला जातोच असें नाही.

“ अुन्मदमदनमनोरथपथिकव-। धूजनजनितविलापे
अलिकुलसङ्कुलकुसुमसमूहनि-। राकुलबकुलकलापे ” ( गीगो ३/२ )

असे यतिभङ्ग जरी केव्हा केव्हा जयदेवाच्या कृतींत आढळले तरी दुसऱ्या आवर्तनान्तीं यति तो बहुशः स्वाभाविकपणें पाळतोच.

“ ललितलवङ्गलता परिशीलन-। कोमलमलयसमीरे
मधुकरनिकरकरम्बितकोकिल-। कूजितकुञ्जकुटीरे ( गीगो ३/१ )

प्रत्येक गणान्तीं खटका घेतांच येणार नाही असें नाही. वाटेल तसे खटके घेतां येतात अितकेंच नव्हे तर खटक्याखटक्यांनी यमकेंहि साधितां येतात.

" मुखरमधीरं त्यज मञ्जीरं रिपुमिवकेलिसुलोलम्
चल सखि कुञ्जं सतिमिरपुञ्जं शीलय नीलनिचोलम्" ( गीगो ११/४ )

हें पदलालित्य मधुर असलें तरी ज्याप्रमाणे अवश्य नाही त्याचप्रमाणे प्रत्येक गणान्तीं यति पाळणे थोडें अधिक मधुर असलें तरी अवश्य नाही.

"। धीरसमीरे । यमुनातीरे । वसति वने वन- । माली
। गोपी पीनप- । योधर मर्दन- । चञ्चलकरयुग- । शाली"
( गीगो ११।ध्रु० )

येथे दुसऱ्या चरणांत प्रथमगणान्तीं यति पाळला नाही म्हणून तो चरण कटु अतअेव निषिद्ध आहे असें मुळीच होत नाही.

## १३ निषिद्ध पदविच्छेद कसे टाळावेत ?

भलत्याच ठिकाणीं शब्द तोडावा न लागतां जातिरचना करणें श्रुतिसिद्ध कवीला मुळीच कठिण जात नाही; त्यांतून जातिरचनेंत शब्दक्रम फिरवायला मोठा वाव असतो. तथापि मोरोपन्तासारख्या पद्यप्रभूच्या हातूनहि कितीतरी श्रवणोद्वेजक चुका होतात. म्हणून होतकरू कवींना मार्गदर्शक असे मला सापडलेले काही नियम साङ्गतों.

( १ ) गणान्तीं पदसमाप्ति झाली पाहिजे असें नाही; पण अक्षरसमाप्ति तरी व्हायलाच हवी. अेखाद्या आवर्तनाची अन्त्य मात्रा आणि पुढील आवर्तनाची आद्य मात्रा मिळून अेक द्विमात्रक गुरु अक्षर चालणार नाही. मोरोपन्ताच्या कल्याणरामायणांतील

" भरत-रिपुघ्न यांत बहुजोडी "
" तापसवृन्द हरूषलें पुरतें "

या चरणांत वा गोविन्दाग्रजाच्या

" अुगवे सूर्यकाल मावळतां" ( गोवा ३९ )
" जा जा नाच सर्व ही जगतीं" ( गोवा ५३ )
" ओढी वस्तुमात्र जग म्हणतें" ( गोवा ५९ )

या पादाकुलकाच्या चरणांत जाड ठशांनी मुद्रित केलेलीं अक्षरें हीं आठव्या आणि नवव्या मात्रांच्या संयोगस्थानीं असल्यामुळे चरण कर्णकटु होतात अितकेंच नव्हे तर त्यांची मोडणी निराळी वाटते. हे चरण [ । प । प ] असे पादाकुलक न वाटतां [ – – । प । – – ] असे होतात.

(२) शब्दांत लागोपाठ येणारे जे दोन लघु अेरव्ही अेकत्र अुच्चारिले जातात त्यांचा विग्रह करावा लागल्यास तो कर्णकटु होतो. अुदाहरणार्थ, 'दशरथें' हा शब्द अेरव्ही दश-रथें ( – ᵕ – ) असा अुच्चारिला जातो तो जर 'द-शरथें' ( ᵕ – – ) असा अुच्चारावा लागला तर तो कानाला कटु लागतो. मोरोपन्ताच्या पुढील चरणांत तसा कर्णकटु अुपयोग आहे,

"। पुत्र वियोगें । व्याकुल होअुनि । वरिला मृत्यु द–। शरथें"

याच प्रमाणे 'वचकोनि' शब्दाचा अुच्चार स्वाभाविकपणें वच-कोनि ( – – ᵕ ) असा होतो; पण पद्यासाठी जर त्याचा अुच्चार व-चकोनि ( ᵕ , ᵕ – ᵕ ) असा केला तर तो श्रवणोद्वेजक होतो.

"ते गतगौरव कौरव रौरव पौर व–चकोनि पळतात"

या मोरोपन्ती रचनेंतील आरम्भींचें पदलालित्य जितकें हृदयङ्गम आहे तितकाच पुढील पदविच्छेद अुद्वेगजनक वाटतो.

(३) अेखाद्या शब्दांतील अन्त्य फटिङ्ग लघु आणि पुढील शब्दांतील आद्य फटिङ्ग लघु यांचा योग आवर्तनाच्या पहिल्या नि दुसऱ्या मात्रांच्या ठिकाणीं, आणि पाचव्या नि सहाव्या मात्रांच्या ठिकाणीं युक्त वाटत नाही; तिसऱ्या नि चौथ्या वा सातव्या नि आठव्या मात्रांच्या ठिकाणीं तो योग चालतो. मोरोपन्ताच्या कल्याणरामायणांतील

"निघतां प्रभु हा- । **य वं**दे पुरतें"
"सौमित्रिस धा- । **व म्हं**णे सीता"

हे चरण कटु लागतात कारण 'धाव' शब्दांतील अन्त्य फटिङ्ग 'व' आणि 'म्हणे' मधील आद्य फटिङ्ग 'म्ह' यांचा योग आवर्तनाच्या पहिल्या नि दुसऱ्या मात्रांच्या ठिकाणीं होतो. शब्दक्रम

। "हाय वंदे प्रभु । निघतां पुरतें" (३ ४)
। "धाव म्हणे सौ- । मित्रिस सीता" (३ ४)

याप्रमाणे फिरवून हा योग तिसऱ्या नि चौथ्या मात्रांच्या ठिकाणीं आणला कीं चरण गोड लागतो. आणखीहि अेक मोरोपन्ती आर्या घेअू या.

"अर्जुनसम वीरे नैसे मागे आता पुढे न व्हायाचा
हा वीर-रसौघ नगहि न अुरेल अुरेल जो लवायाचा"

दुसऱ्या आर्यार्धीतील र—र हा संयोग पाचव्या नि सहाव्या मात्रांच्या ठिकाणीं आहे तो कटु लागतो. पुन्हा म्हणतांना नग या शब्दाचा न-ग असा जो विग्रह होतो तोहि कटु लागतो. शब्दांचा क्रम फिरवून जर ही ओळ

"वीर-रसौघच हा, नग नुरेल अुरणार जो लवायाचा"

अशी केली तर र-र यांचा योग तिसऱ्या नि चौथ्या मात्रांच्या ठिकाणीं येअून तो गोड लागतो. मोरोपन्ताच्याच

"नलगे नमतें लागे आठा अङ्गांत करुनि आठ वण
अुद्धरिशी दीनातें देवा, करितां मनांत आठवण" (मोम २/१२९)

या आर्येच्या पूर्वार्धांत 'ठ-व' यांचा योग ७ व्या नि ८ व्या मात्रांवर झाला असल्याने तो कर्णकटु लागत नाही.

(४) पञ्चगणाच्या [– –, ᵕ – ᵕ] या प्रकाराचा अुपयोग क्वचितच होतो; पण कोठे तो असल्यास त्या गणाच्या मध्यावर आणि गणान्तीं खटका येतो तेथे पदसमाप्ति अवश्य व्हायला हवी. "फिरता फकीर । तू तव चरणीं" (गोवा १६) हा चरण मुळीच कटु लागत नाही; पण 'छान्दिष्ट भिक्षु । तू, तव चरणीं' असा चरण कटु लागतो. '। फिरवी तुझ्या य—। शाची महती' (गोवा ५६) आणि '। तारे निळ्या न —। भीं लकलकती' (गोवा ५९) हे चरण कटु लागतात. शब्दक्रम थोडा फिरवून हे चरण 'तुझ्या यशाची फिरवी महती,' 'निळ्या नभीं लकलकती तारे' असे केले की सारी कटुता पार निघून जाते.

(५) चरणारम्भीं चार वा पाच मात्रांचा जो आद्यतालकपूर्व गण (– –), (ᵕ – –) वा (– ᵕ –) या स्वरूपाचा येतो त्याच्या अन्तीं पदसमाप्ति व्हायला हवी.

( ६ ) पण आद्यतालकपूर्व गण द्विमात्रक असल्यास त्याच्या अन्तीं यति मानिलाच पाहिजे असें नाही. त्या दोन मात्रांच्या गणाचा समावेश ज्या शब्दांत होतो तो शब्द आवर्तनाच्या तिसऱ्या वा चौथ्या मात्रेवर समाप्त व्हावा. तो आवर्तनाच्या दुसऱ्या मात्रेवर समाप्त झाल्यास कर्णकटु दोष अुत्पन्न होतो. लागोपाठ येणाऱ्या दोन लघूंचा विग्रह आवर्तनाच्या सान्ध्यावर ज्याप्रमाणे अुद्वेगजनक वाटतो त्याचप्रमाणें ( – – ) असा द्व्यक्षरी चतुर्मात्रक शब्दहि सान्ध्यावर तुटला तर तो पदविच्छेद अुद्वेगजनक होतो. [ – । प । – + ] या मात्रावलींत 'हाणा हाणा म्हणतांना' हा सङ्ग्रामगीतांतील चरण म्हणूं लागलों की 'हा–। णा हाणा म्हण–। ताना' याप्रमाणें पदविच्छेद होअून कटुता अुत्पन्न होते.

## १४ प्राचीन पद्यांचें अनुकरण चौकसपणें व्हायला हवें.

अेकनाथाचीं पुढील दोन पद्यें पहा.

( १ ) " बाअि गे । क्षुधित वनीं गो–। विन्दू. ध्रु०
। रवितनयातटिं । शिशुंसह हा व्रज । चारित गोधन–। वृन्दू. " १
( पस १ । २६ )

( २ ) " भजनबिन । धिग् चतुराअी । ग्यान्! ध्रु०
। लोक कहे हम् । आतमग्यानी । ग्यान नही, अभि–। मान्. " १
( पस १ । ६२ )

आता म्हणतांना गवअी ध्रुवपदांतील आद्यतालकपूर्व गणावर वाटेल तितक्या मात्रा व्ययित करितात. त्यामुळे गाण्याकडेच लक्ष देअून रचना केली की कशी शिथिल होते पहा

( १ ) " भजो रे भय्या । राम गोविन्द ह–। री. ध्रु०
। जप तप साधन । कछु नहि लागत । खरचत नहि गठ–। री."
( कबीर )

( २ ) " खचित बाअी । व्यर्थ अम्ही अब–। ला. ध्रु०
। वागविती नर । पशुसम आम्हां । मान नसे कस–। ला." १ (किग्र)

या अुदाहरणांवरून ध्रुवपदांतील चार-पाच मात्रांच्या आद्यतालकपूर्वगणाची कशी दुर्दशा झाली आहे हें स्पष्ट होईल. त्याचप्रमाणे अन्त्य गण द्विमात्रक असल्याने दिसायला तो जर ( – ᴗ ) असा असला तर अन्त्याक्षर पाय मोडूनच लिहिलें पाहिजे हेंहि दिसून येअील.

" विजयते रामदूत हनुमान् ध्रु०
योे रघुपतिनासह सुग्रीवं मैत्र्या योजितवान्" १ ( विदप ८ )

हें अुदाहरण शुद्ध आहे त्याप्रमाणेच

" पाखरा, येशिल कां परतून् ? ध्रु०
मत्प्रेमाने दिल्या खुणांतुन अेक तरी अठवून्"—१ (टिक १४१)

हेंहि शुद्ध आहे; परन्तु अन्त्य न् पाय मोडूनच लिहायला हवा.

## १५ तालसंयोग

अक्षरशः पाहतां दोन भिन्न आवर्तनांच्या पद्यविभागांचा संयोग कसा होअू शकतो याचें अेक अुदाहरण मागे २५ व्या पृष्ठावर दिलेंच आहे. वृत्तविहारांत भुजङ्गप्रयाताच्या अुदाहरणाखाली वियद्गङ्गा आणि भुजङ्गप्रयात यांच्या म्हणजे अग्न्यावर्तनी आणि हरावर्तनी वृत्तांच्या मिश्रणाचें अुदाहरण दिलें आहे. येथे जातिरचनेंतील दोन अुदाहरणें देतों.

( १ ) " मन–। मोहन वाजवु–। नी सारङ्गी । काढी मञ्जुळ । सूर्. ध्रु०
। विश्व निजलें । शान्त झालें
। अेक धरणी । मात्र डोले
गम्–। भीरपणाने । अन्धारांतुनि । छेडित जाअी । सूर्." ( गिका ३)

या प्रकाराचें अनुकरण किती तरी प्रसिद्ध आधुनिक कवींनी केलें आहे.

( २ ) " वद । प्रेमबोल । आता
हस–।ण्यांत मजा । नाही. ध्रु०
। भासवी जा–। दूगिरी तव । हासण्याची । माधुरी
। साङ्ग कैसा । भासवीते । घाव हा मा–।झ्या अुरी.
बस–।ला जरी जि–।व्हारीं
तुज–।ला हसेंच । येअी." १ ( सोका २५ )

## १६ काही विशेष गुन्तागुन्तीच्या मात्रावली

**१ली** मात्रावली अष्टमात्रक आवर्तनाची आहे. [–।––+ऽ–ᵕ।+ऽऽ+] या मात्रावलींत अष्टमात्रकाची दोन आवर्तनें आहेत. पहिल्या दोन मात्रा होतांच आवर्तनारम्भ होतो. आवर्तनाची तिसरी आणि चौथी मात्रा मिळून गुरुच अक्षर लागतें कारण प्रसंगविशेषीं तें प्लुतहि अुच्चारावें लागतें. पुढे (–ᵕ) हाच गण या आवर्तनांत येतो आणि अेक मात्रेची अुणीव अुपान्त्य वा त्यापूर्वील अक्षर प्लुत अुच्चारून भरून काढण्यांत येते. दुसऱ्या आवर्तनांत आरम्भी शुद्ध गुरुच लागतो; कारण त्याच्यावर चार मात्रांचा काळ व्ययित करायचा असतो; आणि पुढील गुरूला जोडूनच आद्यतालकपूर्व गण घ्यायचा असतो.

या मात्रावलीच्या द्विरावृत्तीने चरण साधितांना शेवटीं अेक अक्षर अुणें करून दोन मात्रांच्या विरामाची सोय करण्यांत येते; जसें

[–।––+ऽ–ᵕ।+ऽऽ+, –।––+ऽ–ᵕ।+ऽऽ]
"कधिं। करितीऽ लग्न। माऽऽझें, तुज। ठावेंऽ अीश्व–।राऽऽ"

या मात्रावलीच्या आवृत्तीनें रेवतीजाति सिद्ध होते.

**२री** मात्रावलीहि अष्टमात्रक आवर्तनाचीच आहे. ही मात्रावली म्हणजे 'काय पुरुष। चळले बाअी। ऽऽ"ची होय. ही मात्रावली म्हणण्याचा विशेष असा आहे की ज्या आवर्तनांत सहा मात्रांच्या आद्यतालकपूर्व गणाचा समावेश होतो त्याचा आरम्भ सशब्द मात्रेवर नाही; तर मागील आवर्तनांतील अन्त्याक्षराच्या लाम्बवलेल्या स्वरावर आहे अस म्हणतात. पद्यरचनेंत या म्हणण्याच्या वैशिष्ट्याला महत्त्व नसावें. सहा मात्रांच्या आद्यतालकपूर्व गणाची घडण ही म्हणण्याच्या विशिष्ट पद्धतीसाठी अशी लागते की त्याचे तीन तीन मात्रांचे दोन तुकडे पडावेत. म्हणून या ठिकाणीं (ᵕ–ᵕ–), (ᵕ––ᵕ), (–ᵕᵕ–), (–ᵕ–ᵕ) असे चार प्रकार चालतात पण (–––) असा त्र्यक्षरी गण चालत नाही. पहिल्या आवर्तनाच्या अष्टमात्रक गणाच्या ठिकाणीं सुद्धा (–––+) हा पद्याचा पहिलाच प्रकार चालतो; अितर अष्टमात्रक गण चालत नाहीत.

या मात्रावलीची आवृति करून शेवटीं काही मात्रांची अुणीव ठेवण्यांत येते. अशा रीतीने तीन मात्रावली सिद्ध होतात:—

"जरी कुणा । श्रीमन्ताची । ऽऽ सून होय । शाऽरदा ऽऽ । ऽऽ"
"महाराष्ट्र । लक्ष्मी मातें । ऽऽ जगीं धन्य । वा ऽऽ टे ऽऽ। ऽऽ"
"आकळे न । अघटित घटना । ऽऽ हे दयाघ–ना ऽऽऽऽऽऽ । ऽऽ"

३ री मात्रावली षण्मात्रकावर्तनी आहे. ती म्हणजे दिण्डीची होय.

"पहा । दिण्डी चा–लली पण्ढ–री ऽऽ ला । ऽऽऽ"

येथेंहि आद्यतालकपूर्व गण तीन मात्रांचा असल्यानें तो (⏑ –) वा (– ⏑) असाच असावा लागतो. पहिल्या आवर्तनांत षण्मात्रक गणाचा (– – –) हाच प्रकार चालतो, (– ⏑ – ⏑) वा (⏑ – – ⏑) वा (– ⏑ – ⏑) हे प्रकार चालत नाहीत. दुसऱ्या आवर्तनांत त्याचे तीन तीन मात्रांचे दोन तुकडे पडत असल्याने (⏑ – ⏑ –), (⏑ – – ⏑), (– ⏑ ⏑ –), (– ⏑ – ⏑) हेच प्रकार चालतात. (+++) हा गण चालत नाही. तिसऱ्या आवर्तनांत दोन्ही गुरु अक्षरेंच लागतात; कारण दोन्ही अक्षरांच्यावर अधिक मात्रांचा काल व्ययित करावयाचा असतो.

गाण्याच्या विशिष्ट चालीला महत्त्व आलें की आवर्तनांतील अन्तर्घटनाहि अधिकाधिक अलवचीक आणि दृढ होत जाते.

## १७ विषम जाति

निरनिराळ्या चार लगावली अेका निश्चित क्रमाने घेऊन होणाऱ्या अेका चतुष्पदीसारख्या जेव्हा अनेक चतुष्पद्या आढळतात तेव्हा तें अेक विषम वृत्त होतें. त्याचप्रमाणे भिन्न भिन्न मात्रावली अेका निश्चित अशा क्रमाने आणि यमक रचनेने बान्धून जें कडवें सिद्ध होअील त्याची अनेकदा आवृत्ति दिसल्यास ती विषम जाति समजावी. मराठींत विषमजातीचीं अुदाहरणें अद्यापि विरळ आहेत. केशवसुतकवीने 'झपूर्झा' या कवितेंत [।प।– –+] आणि [।प] या दोन मात्रावलींच्या मिश्रणानें अेका विशिष्ट सांच्याचें कडवें साधिलें आहे तें येणेप्रमाणे:—

“ हर्षखेद ते मावळले,
हास्य निवालें,
अश्रु पळाले,
कण्टकशल्यें बोथटलीं,
मखमालीची लव वठली,
काही न दिसे दृष्टीला,
प्रकाश गेला,
तिमिर हरपला,
काय म्हणावें या स्थितिला !
झपूऽर्झा गडे झपूऽर्झा ! ” ( केक १०७ )

## १८ जातीचें नामकरण

जातिरचना वृत्तरचनेहून सुकर आहे तशीच ती अधिक विविध आहे. या विस्तीर्ण जातिजालांत जे निश्चित जातिप्रकार आढळतात त्यांना आणि ते ज्या मात्रावलींनी सिद्ध होतात त्यांना नांवें द्यायलाच हवींत. पद्याच्या शिरोभागीं ‘चाल वा धाटी अमुक पदाची ’ अशी सूचना देण्याची जुनी पद्धत आहे. पण सारे कवि सर्वपरिचित नि सर्वसम्मत अशा अेकाच पदाची चाल देतात असें नाही. कित्येक कवी तर आपल्या स्वतःच्याच पण लोकांस अपरिचित अशा पद्याची चाल कवितेच्या शिरोभागीं देतात! पुन्हा, चालीवरून विशिष्ट स्वरावलीचा बोध होअील, पद्याच्या घटनेचा बोध होणार नाही. यशवन्तकृत

‘ कुणा तुझ्या वैभवाचा पडेल ना मोह ? ’ ( यग ६१ )

या कवितेच्या शिरोभागीं चाल ‘ प्रतिकूल होअिल कैसा० ’ या पदाची दिलेली आहे. परन्तु हें पद जातिस्वरूप आहे तर यशवन्तांची कविता छन्दः-स्वरूप आहे ! पूर्वी गाण्याच्या पदावर राग आणि ताल देण्याची पद्धत होती. खिस्तशके १९२० मध्ये ताम्बे यांच्या कवितेचा पहिला भाग प्रसिद्ध झाल्यापासून कवितेच्या शिरोभागीं रागाचें नांव देण्याची टूम निघाली आहे. बहुजनसमाजाला चाल कळायला या टुमीचा काही अुपयोग होत नाही; आणि रागाच्या नावावरून जातीची घटना कळण्याचा सम्भव तर सुतराम् नाही. अमुक अेका पद्याची जाति अमुक अेक म्हटल्याने वाचकास एका आदर्शभूत

कवितेची आठवण व्हावी, आणि कवींसाहि या ग्रन्थाच्या द्वारा त्या पद्याचें शास्त्रशुद्ध स्वरूप समजून घेअून त्याच्याशी आपली रचना ताडून पाहतां यावी यासाठी जातिनामकरण हें वृत्तनामकरणाप्रमाणेच अत्यवश्य आहे. गीति, आर्यागीति, दोहा अित्यादि नांवें जातींना प्राचीन काळापासून चालत आलेलीं आहेत, त्याप्रमाणे नवीन जातिप्रकारांना नवीन नावें देण्यांत अनुचित असें काहीच नाही. नावें होतां होअील तोंवर प्राचीन अुदाहरणांतून, आखूड, सुटसुटीत आणि श्रवणसुभग अशीं निवडून देण्यांत वृत्तनामकरणाच्या प्राचीन पद्धतीचाच अवलम्ब होत आहे. ध्रुवपदाचा जातिनिर्णयाशीं सम्बन्ध नसल्याने विषम जातींत निवडावयाचें नांव कडव्यांतून घेण्यांत यावें हेंच श्रेयस्कर आहे. आता जीं वृत्तनामें निश्चित करण्यांत आलीं आहेत त्यांच्याशी मात्र या जातिनामांचा घोटाळा होअूं देतां कामा नये. मञ्जरी हें नाव अेका वृत्ताचें असल्यानें तें आता [ – । प । प । ᵕ + ] या मात्रावलीला देतां येणार नाही. या मात्रावलीला लीलारति नवीन हें नांवच ठेविलें पाहिजे.

---

### अध्याय ६ वा

# जाति-जृम्भण

पुढे दिलेल्या अुदाहरणांत परिचयासाठी ध्रुवपद आणि अन्तरा हीं जेथे जेथे आहेत तेथे तेथे दिलेलीं आहेत; तथापि जातिनिर्णय हा कडव्याच्याच घटनेवरून होतो हें विसरतां कामा नये.

## वर्ग १ ला

### समजाति

#### १ पद्मावर्तनी

१ 'वररमणी' [।प।प।प।प।प।+] ४२ मात्रा (सशब्द)
२ 'जीवितविमुखी' [–।प।प।प।प।––+] ४० मात्रा
३ 'तुन्दिल' [।प।प।प।प।––+] ३८ मात्रा
४ 'मदनतलवार' [–।प।प।प।प।–+] ३८ मात्रा
५ 'कपिवीर' [।प।प।प।प।–+] ३६ मात्रा
६ 'वनहरिणी' [।प।प।प।प।] ३२ मात्रा
७ 'बम्भरी' [–।प।+ऽ॰+, –।+ऽ॰+, –।प] ३२ मात्रा.
८ 'विजया' [–।प।प।प।––+] ३२ मात्रा
९ 'हरिभगिनी,' "स्वर्गङ्गा" [।प।प।प।––+] ३० मात्रा
१० 'प्रियलोचना' [।प।प।प।+ऽ॰+] २९ मात्रा
११ 'भवानी' [–।प।प।प।–+] ३० मात्रा
१२ 'लवङ्गलता' [।प।प।प।–+] २८ मात्रा
१३ 'दयिता' [।प।––+ऽऽ।प।–+] २६ मात्रा
१४ 'शुक्रकला' [।प।–+, –+।प।–+] २८ मात्रा
१५ 'कमललोचना' [–।प।प।प।॰+] २९ मात्रा
१६ 'आदिसुन्दरी' [–।प।॰+, अु।प।॰+] २८ वा २९ मात्रा
१७ "सूर्यकान्त," 'समुदितमदना' [।प।प।प।॰+] २७ मात्रा

| | | |
|---|---|---|
| १८ | "सूर्यकला" | [।प।ᵕ+, अ।प।ᵕ+] २६ वा २७ मात्रा |
| १९ | 'महाराष्ट्र' | [−।प।प।प।+ᵕ] २९ मात्रा |
| २० | 'अरुणप्रभा' | [−।प।प।प।+] २८ मात्रा |
| २१ | "चन्द्रकान्त", 'पतितपावन' | [।प।प।प।+] २६ मात्रा |
| २२ | "चन्द्रकला" | [।प।+, अ।प।+] २४ वा २५ मात्रा |
| २३ | दोहा | [।प।−−+ऽऽ।प।+ᵕ] २५ मात्रा |
| २४ | सोरठा | [।प।+ऽᵕऽऽऽऽ।प।−−+] २५ मात्रा |
| २५ | 'अनलज्वाला' | [।प।प।प] २४ मात्रा |
| २६ | 'शुभगङ्गा' | [।प।प।−−+] २२ मात्रा |
| २७ | "वर्षा" | [।प।प।+ऽᵕ+] २१ मात्रा |
| २८ | 'सुस्वर' | [।प।−−+ऽऽ।−−+] २० मात्रा |
| २९ | 'कृतिमण्डित' | [।प।+ऽᵕ+, −।+ऽᵕ+] २० मात्रा |
| ३० | 'स्वैरगति' | [।−−+ऽऽ।प।−−+] २० मात्रा |
| ३१ | "गोपालन" | [−−।−−+ऽऽ।प।−+] २२ मात्रा |
| ३२ | 'भूपति' | [−।प।प।−+] २२ मात्रा |
| ३३ | 'जगदीश्वरबाला' | [−।−−+ऽऽ।प।−+] २० मात्रा |
| ३४ | 'वंशमणि' | [।प।प।−+] २० मात्रा |
| ३५ | 'नगराज' | [।−−+ऽऽ।प।−+] १८ मात्रा |
| ३६ | 'लीलारति' | [−।प।प।ᵕ+] २१ मात्रा |
| ३७ | 'सन्तति' | [−।प।प।+] २० मात्रा |
| ३८ | "मालिबाला" | [−।प।−+ऽ−ᵕ।+] १९ मात्रा |
| ३९ | पादाकुलक | [।प।प] १६ मात्रा |
| ४० | 'सुरजयी' | [।प।−−ᵕ+] १५ मात्रा |
| ४१ | "कर्णफुल" | [−।प।−−−] १६ मात्रा |
| ४२ | 'राजसा' | [−।प।+ऽᵕ+] १५ मात्रा |
| ४३ | "बालानन्द", 'अचलगति' | [।प।−−+] १४ मात्रा |
| ४४ | 'उद्धव' | [−।प।−+] १४ मात्रा |
| ४५ | 'आनन्दरस' | [−।+ऽᵕ−−।−+] १३ मात्रा |
| ४६ | 'शुद्धसती' | [।प।−+] १२ मात्रा |

४७ ‘ **पर्वती** ’ [अु । प । ᴗ +] १५ वा १६ मात्रा
४८ ‘ **भरतखण्ड** ’ [– । प । ᴗ +] १३ मात्रा
४९ ‘ **भुवनसुन्दर** ’ [अु । प । +] १४ वा १५ मात्रा
५० ‘ **सिंहनाद** ’ [– । प । +] १२ मात्रा
५१ “ **पिशाङ्ग** ” [। प । +] १० मात्रा
५२ ‘ **रेवती** ’ [– । – + ऽ – ᴗ । + ऽऽ +, – । – + ऽ – ᴗ । +] २४ मात्रा

१ ‘ **वररमणी** ’ [। प । प । प । प । प । +]

“ ललितविलासकलासुखखेलनललनालोभनशोभन–
यौवनमानितनववदने
अलिकुलकोकिलकुवलयकज्जलकालकलिन्दसुता–
विवलज्जलकालियकुलदमने
केशिकिशोरमहासुरमारणदारुणगोकुलदुरित–
विदारणगोवर्धनधरणे
कस्य न नयनयुगं रतिसज्जे मज्जति मनसिजतरल–
तरङ्गे **वररमणी**रमणे ” (क्षेद ८/१७३)

२ ‘**जीवितविमुखी**’ [– । प । प । प । प । – – +]

खालील अुदाहरणांत चौथ्या आवर्तनांत सहाव्या मात्रेनन्तर खण्डन आहे. (प्रापै १/२०७ हि पहा).

“ विरहानलतप्ता सीदति सुप्ता रचितनलिनदलतल्पतले
मरकतविमले
करकलितकपोलं गलितनिचोलं नयति सततरुदितेन
निशामनिमेषदृशा
न सखीमभिनन्दति रुजमनुविन्दति निन्दति हिमकरकर-
निकरं परितापकरं
मनुते हृदि भारं मुक्ताहारं दिवसनिशाकरदीनमुखी
**जीवितविमुखी** ” (वाभू १/१२४)

३ 'तुन्दिल' [।प।प।प।प।--+]

(१) " तुन्दिलमण्डित ताण्डवपण्डित धुण्डुनि दानव
दण्डित खण्डित त्रासुनि रे
मध्वमुनीश्वर कीर्तनिं तत्पर देखुनि सत्वर
धावत सङ्कटनाशन रे. " (ममुक ३)

(२) " लिहून झाली कधींच कविता छापावी ती कशी
परी अन् कुठे परी?
पहिल्या पानीं छापूं म्हटलें, वशिला लावूं कसा
परी अन् कुठे परी? (केकु-रमा ६/१)

४ 'मदनतल्वार' [-।प।प।प।प।-+]

(१) " सुन्दरा मनामधि भरलि जरा नहि ठरली हवेलिंत
शिरलि मोत्याचा भाङ्ग
रे गड्या, हौस नहि पुरलि म्हणोनी विरली पुन्हा नहि
फिरलि कुणाची साङ्ग ध्रु०
जशि कळी सोनचाफ्याचि न पडु दृष्टि पाण्याचि दृष्टि
सोप्याचि (अशी) ती नार
अतिनाजुक तनु देखणी, गुणाची खाणि अशी
नवखणी चढुन सुकुमार
जशि मन्मथरति धाकटी सिंहसम कटी, उभी
ओकटी गळ्यामधि हार
अङ्गि तारुण्याचा बहर, ज्वानिचा कहर, मारिते
लहर मदनतल्वार. " (राला ११३)

पुढील पद्यांत ध्रुवपदें भिन्न भिन्न असलीं तरी कडवें मदनतल्वारजातीचेंच ओकचरणी आहे.

(२) " कधि करिती लग्न माझें तुज ठावें ओश्वरा! ध्रु०
वाढली अुन्च ही किती हसुनि बोलती नाक
मुरडिती स्त्रिया परभारा. " १ (देशा २३)

( ३ ) " श्रीशङ्कर शिवराया तव पाया नत व्हाया
सुमती दे या. ध्रु०
संसारभार अनिवार फार अति मार देत तू तार
यांतुनी सदया !" १ ( गोवा १५९ )

( ४ ) " जगिं धन्य खरी तू मुरली, गे तुज बघुनि प्रतिभा स्फुरली. ध्रु०
अति हीन दीन जो वंश, असोनि तदंश, पाडिसी
भ्रंश, करिसि मति मुरली. " १ ( सुमौ ९५ )

५ ' कपिवीर ' [ । प । प । प । प । – + ]

तें रूप देखिलें न्यनीं ध्रु०
जो **कपिवीर** महाधिर गम्भिर जोडुनिया कर
तत्पर राघवचरणीं. १

विध्वंसुनि वन मारित नन्दन दचकत आपण
रावण अन्तःकरणीं. २

देवनाथप्रभु दीनदयाघन अञ्जनिनन्दन
अद्भुत ज्याची करणी. " ३ ( देक २५ )

६ ' वनहरिणी ' [ । प । प । प । प ]

( १ ) " धाव विभो करुणाकर माधव देव दयानिधि
देवकिनन्दन ! ध्रु०
काममदादिक गाञ्जिति हे अति, धाव रमापति
सेवकहितकर !
जननमरणभय हरण कर त्वरें चरणिं शरण दृढ
केशव किङ्कर." ( केस्वा–पस १/३९२ वें )

( २ ) " सुन्दर खाशी सुबक ठेङ्गणी स्थूल न, कृशहि
न, वय चौदाची;
नयनमनोहर **वनहरिणी**चे, नाक सरळ जशि
कळि चाफ्याची. " ( देशा ८ )

( ३ ) कळ्या–कळ्यांत विहार करिशि तू कळ्या–
कळ्यांत विहार् ध्रु०
दिसशी तू बन्सीधर गिरिधर, तुझ्या छबीस न
पार सख्या रे ! १
जादु बन्सिचा घुमतां तूझ्या येअि कळ्यांस
बहार फुगति या." २ ( तासक ६५ )

या पद्यांत चौथ्या आवर्तनांत तिसऱ्या मात्रेनन्तर खटका ठेवला असून सामान्य यमक चरणान्तीं नव्हे तर त्या ठिकाणीं जुळविलें आहे. कडवें वनहरिणी अेकचरणी असल्यास ध्रुवपद बहुशः पादाकुलकाचें असतें.

( ४ ) "ये गणराया मङ्गळमूर्ती ! ध्रु०
कीर्तनरङ्गीं नृत्य करी रे सङ्गीताची मिळवुनि पूर्ती." १
( ममुक १ )

'भक्ताची मनीषा' ( अुस २१० ), आणि ( तासक १३९, १६२, १७६, १७७ ) या पृष्ठांवरील कविता या जातीच्या आहेत.

७ '**बम्भरी**' [ । प । + ऽ ᵕ + , – । + ऽ ᵕ + , – । प ]

या मात्रावलींच्या दुसऱ्या आणि तिसऱ्या आवर्तनांत सहाव्या मात्रेनन्तर खण्डन असून आरम्भीं प्लुताक्षर आहे.

"हे वनभूमि मनोऽहरी सुमनोऽभरी शुककोकिळवृन्दें
करिती कलरव **बऽम्भरी** अुदरऽम्भरी अरविन्दमरन्दें
चिन्तित कान्त निरऽन्तरीं हरिदऽन्तरीं निरखोनि न मन्दें
भीम जया कुसुमाऽकरीं स–सुमा करी माळ घालु आनन्दें."(दस्व १३३)

तथापि अेकन्दरीने पहातां हें 'नळ नवरा मी नोवरी' पद्य फार शिथिल आहे.

८ '**विजया**' [ – । प । प । प । – – + ]

"चल अूठ मुशाफर ! तेज भरे, जग सर्व पहा गेलें विलया,
जो निद्रित त्यास अपेश सदा, जो जागृत तो मिळवी **विजया**.

बघ नेत्र अता अुघडून जरा, प्रभुचिन्तनिं तन्मय होअि क्षणी,
ही रीत असे का प्रीतीची? प्रभु जागृत, तू शयनीं अजुनी!" (गोत)

९ 'हरिभगिनी', "स्वर्गङ्गा" [।प।प।प।--+]

(१) "हरिची भगिनी म्हणे सुभद्रा, रुक्मिणि वहिनी दया करा;
दादांना तुम्हि कळवुनि वळवुनि अर्जुनजीचा शोध करा."
(काक–पस ३/१८ वें)

(२) "भीमकबाळा म्हणे नृपाळा, त्या शिशुपाळा मी न वरीं.
कमलनयन हरि विमलचरित तो नवरा, त्याची मी नवरी."
(काक–पस ३/१७ वें)

(३) "सत्यं ज्ञानमनन्तं नित्यमनाकाशं परमाकाशं
गोष्ठप्राङ्गणरिङ्खणलोलमनायासं परमायासम्
मायाकल्पितनानाकारमनाकारं भुवनाकारं
क्ष्मामानाथमनाथं प्रणमत गोविन्दं परमानन्दम्" (शगो)

'दोन बाजी' (केक १६१), 'गोदागौरव' (च २४३), गिरीशकृत 'कला' अित्यादि काव्यें या हरिभगिनी जातीचीं आहेत. कित्येकदा या जातींत (।प।--+) या मात्रावलीचा अन्तरा असतो. या जातीच्या सावेश अुपदेशपर कडकडीत पद्याला **फटका** म्हणण्याचा प्रघात आहे. 'स्फूर्ति' (केक ११८) 'थकलेल्या भटकणाराचें गाणें' (केक ११५) 'तारा' (विक ३४) हीं या प्रकारचीं अुदाहरणें आहेत.

कडवें अेकचरणी असल्यास ध्रुवपद बहुशः [-।प।---] या कर्णफुलमात्रावलीचें असतें.

(४) "जगजीवन दीनदयाळा रे! ध्रु०
नित्यनिरञ्जन सज्जनरञ्जन भक्तजनप्रतिपाळा रे! १
दीन तुका विनवी कर जोडुनि नाम तुझें जगपाळा रे!" २
(तुका–पस १/१४७ वें)

याला पुढील गाण्याची चाल अुत्तम लागते.

(५) "जमुनातट राम खिले होरी ध्रु०
दौर दौर पिचकारि चलावत अबिर गुलाल भरे होरी."

( ६ ) " कुणि काहि म्हणा, कुणि काहि म्हणा,
अनुसरलें अपुल्याच मना ध्रु०
रीत म्हणा, विपरीत म्हणा कुणि, दिलें झुगारुनि आवरणा !
जळल्या साऱ्या आशा मनिंच्या, पुसल्या उरल्या त्याहि खुणा"
( अुपो २१ )

( ७ ) " अैसाच रहा ऽऽ जाअुं नको ! ध्रु०
जाशि घरांतुनि, जाशि करांतुनि, हृदयांतुनि परि जाअुं नको."
( जअु–ओ १ )

१० '**प्रियलोचना**' [ । प । प । प । + ऽ ᵕ + ]

( १ ) " कुरु यदुनन्दन चन्दनशिशिरतरेण करेण पयोधरे
मृगमदपत्रकमत्र मनोभवमङ्गलकलशसहोदरे
अलिकुलगञ्जनमञ्जनकं रतिनायकसायकमोचने
त्वदधरचुम्बनलम्बितकज्जल अुज्ज्वलय **प्रियलोचने** "
( गीगो, प्र. २४ वा. )

( २ ) " आनन्दाचा कऽन्द हरि हा देवकिनन्दन पाऽहिला
भक्तासाठी तो जगजेठी भीमानिकटीं राऽहिला " ( ? )

सौभद्रांतील 'पावना वामना' ( किग्र ४६१ ) आणि शापसम्भ्रमांतील " तिलक कपालीं, अुटि सर्वाङ्गीं " हे पद हीं याच जातीचीं आहेत. कडवें अेकचरणी असल्यास ध्रुवपद [ – । प । + ऽ ᵕ + ] या मात्रावलीचें असतें.

( ३ ) " लम्बोदर गिरिजा–नऽन्दना
पूर्ण करीं मनकाऽमना ध्रु०
हे मनभावन तवपदसेवन विद्या द्यावि गजाऽनना." १
(अे–पस १/१०१ वें)

( ४ ) " नमितों तव पदसारसें
हो मृदु सखि करुणारसें ध्रु०
प्रिय तनया मम केकयनन्दिनि वास न दे सखि, काननीं
कुवलयपेशल तो शिशु, यो तव अल्पतरी करुणा मनीं.
( वि. वा. भिडे )

"भवताप विभो मम वारि रे" (खाक ७०) ही कविता याच जातीची आहे. निक (१/९६) ही कविता याच प्रकारची आहे. ध्रुवपद मात्र निराळें आहे.

१९ 'भवानी' [-।प।प।प।-+]

(१) "जसु सीसअि गंगा गोरि अधंगा गिव पहिरिअ फणिहारा
कंठट्ठिअ बीसा पिंधण दीसा संतारिअ संसारा
किरणावलि कंदा बंदिअ चंदा णअणहि अणल फुरंता
सो संपअ दिज्जअु बहु सुह किज्जअु तुम्ह **भवाणी** कंता"
(प्रापै १/९८)

(२) "जी मला जन्म दे आअि तीहि या काळिं पारखी झाली,
तू दुजी माय गे माझि म्हणुनि तुजजवळि तातडी केली.
सप्रेम सुता घे अुदरिं, फार ही भ्यालि ब्राह्मणीं छळिलीं.
समजली प्रीति वडिलांची काय ती,
अुमजली नीति शास्त्रांची काय ती,
ये वीट कुडीचा बाअि, नको ही मेलि अमङ्गल असली !"
(देशा ८८)

'अेकच क्षण' (कावि २९) ही कविता या भवानीजातीची आहे. भवानी-जातींत कडवें अेकचरणी वा द्विचरणी असल्यास ते चरण खण्डित असतात आणि ध्रुवपद अुद्धव [-।प।-+] वा भूपति [-।प।प।-+) मात्रा-वलीचें असतें.

(३) "कुस्करूं नका हीं सुमनें ! ध्रु०
जरि वास नसे तिळ यांस तरी तुम्हांस अर्पिलीं सु-मनें. १
घ्या करीं, क्षणाभीतरीं वाळतिल तरी तयांना जपणें." २
(तासक १)

(४) "बघ घटका भरली आता आयुष्याची ! ध्रु०
अुगवली बिजेची कोर, निराश चकोर करुनि मावळली." १
(अफु ३)

'ठावा न सुखाचा वारा !' ( तासक २९ ), 'छळ !' ( माभा ७० ), 'नन्दा घर्ली०' ( माभा ७१ ), 'घात' ( यध १२२ ), 'मावळ्यांचें गाणें' ( गिका ४६ ), आणि 'दारूची लावणी' ( गिआ ६८ ) या कविता याच जातीच्या आहेत. शेवटील पाच कवितांत खण्डन आवर्तनाच्या तिसऱ्या मात्रेनन्तर नसून सहाव्या मात्रेनन्तर आहे.

१२ **'लवङ्गलता', साकी** (?) [ । प । प । प । – + ]

( १ ) " ललित-**लवङ्गलता**-परिशीलनकोमलमलयसमीरे
मधुकरनिकरकरम्बितकोकिलकूजितकुञ्जकुटीरे " ( गीगो ३/१ )

दीर्घ काव्यास ही जाति अनुकूल आहे. 'मेघदूत' (चिप १), 'गणिकोद्धार' ( विक ५१ ), 'वनवासी फूल' ( टिक २६ ), गिरीशकृत 'अभागी कमल', 'आम्रराअी' अित्यादि काव्यें या लवङ्गलताजातींत आहेत. मोरोपन्ताने 'मन्त्रगर्भ साकीरामायण,' 'पञ्चशतीरामायण' आणि 'ध्रुवचरित्र' अित्यादि प्रकरणांत [ – – । प । + ] या मात्रावलीच्या द्विपदीचें ध्रुवपद घातलें आहे. गीतगोविन्दांत तर विविध मात्रावलींचीं ध्रुवपदें आहेत. 'नवा शिपाअी' ( केक १२७ ) या कवितेंत [ । प । – – + ] या मात्रावलीचा अन्तरा आहे.

या मात्रावलीला साकी हें नाव रूढ आहे; परन्तु नाटकांतून वा आख्यानांतून ज्या स्फुट साक्या आढळतात त्या पाहातां साकी ही विषम जाति ठरते. साकींत लवङ्गलतामात्रावलीच्या द्विपदीला [ । प । +, अु । प । + ] या चन्द्रकलामात्रावलीच्या अेका चरणाची जोड असते. तेव्हा समजातीला लवङ्गलता हेंच नाव योग्य आहे; साकी हे नाव वापरूं नये.

कडवें अेकचरणी वा द्विचरणी असल्यास ध्रुवपद बहुशः [ – – । प । – + ] या मात्रावलीचें असतें.

( २ ) " मजला झोप सदाची आली. ध्रु०
विचार अवघे, कार्यें अवघीं समाप्त येथे झालीं." १ (टिक १०५)

( ३ ) " गे तू कवणे मुलखा जाशी ? ध्रु०
भार शिरावर, अपार सागर, फुटकी नाव जराशी–" १
( तासक १५१ )

लवङ्गलतामात्रावलीचे [ । प । – +, – – । प । – + ) असे मधोमध जे दोन तुकडे पडूं शकतात त्यांची आलटापालट करून त्यांचें ध्रुवपद केलेलें प्राचीन कवितेंत आढळतें.

(४) "मर्जी । देवाची दे– । वाची !
। मिथ्या धाव म– । नाची ! ध्रु०
मनांत येतें हत्ती-घोडे–पालखींत बैसावें,
देवाजीच्या मनांत याला पायींच चालवावें." १
(बक–पस ३/२१३ वें )

(५) " होउनि गोसावी गोसावी
हरिकथाच परिसावी. ध्रु०
गमत नसे ज्या गावीं तेथिल वाट कशास पुसावी ? १
सुखें मिळो खम्बायत अथवा भगवीं हीं नेसावीं–" २
( अक १३१ )

या मात्रावलींत केव्हा केव्हा द्वितीय आवर्तनान्तीं आणि चरणान्तीं यमक साधितात.

" भजभज मनुज श्रीगोपालम्
मृगमदचन्दनचर्चित भालं धूसरितालकजालम्
कुण्डलमण्डितचारुकपोलं कर्षितराधाचोलम्" ( विदप ३७ )

१३ '**दयिता**' [ । प – – + ऽऽ । प । – + ]

लवङ्गलतामात्रावलीच्या द्वितीय आवर्तनांत शेवटीं द्विमात्रक विरामाची कूस ठेविल्याने ही मात्रावली सिद्ध होते. विरहाङ्क आणि हेमचन्द्र यांच्या व्याख्येप्रमाणे ( पुढे दोह्याचें विवेचन पहा. ) हा दोहाच होतो.

( १ ) " जानाम्या हृदयाद् **दयिता**ऽऽममृतमयूख निशां ते
प्रकटीकुरुते कुमुदमुखंऽऽया खरधामानि शांते" ( मश्री १२/७९)

( २ ) " शुक यत्तव पठनव्यसनंऽऽन गुणः स गुणाभासः
समजनि येन तवामरणंऽऽशरणं पञ्जरवासः " ( शाप ८७४ )

मश्री ( १२/७४–८६ ) आणि जगद्धराच्या स्तुतिकुसुमाञ्जलींतील २४ व्या स्तोत्रांतील बहुतेक ( म्हणजे पहिलीं २५ ) पद्यें याच दयिताजातीचीं आहेत.

मराठींत निशिगन्ध कृत 'ज्योत्स्नागीत,' आणि 'निशागीत' हीं काव्यें आणि 'सौन्दर्य म्हणजे–' ( कास्फू ३ ) आणि 'स्फूर्तिदेवतेस' ( कास्फू २५ ) हीं कवनें याच दयिताजातीचीं आहेत.

( ३ ) " प्रेम तुझें माझ्यावरती ऽऽ माझें तुझियावरती
असतें तर किति सुख अपणा ऽऽ झालें असतें जगतीं ! "
( निज्यो १ )

'k' कृत 'कसोटी' हें सुनीत ( ज्यो १७२ ) या दयिताजातींत आहे.

१४ "**शुक्रकला**" [ । प । – +, – – । प । – + ]

लवङ्गलता मात्रावली दुसऱ्या आवर्तनांत चौथ्या मात्रेनन्तर खण्डित करून होणाऱ्या दोन विभागांच्या अन्तीं यमक जुळविल्याने शुक्रकलाजाति सिद्ध होते. कडवें शुक्रकला अेकचरणी असल्यास शुक्रकलेचीच शकलें अुलटून [– – । प । – + ॥ प । – +] असें ध्रुवपद असतें. या ध्रुवपदाची मोडणी [– – । – – + ऽ ऽ । – – + ऽ ऽ ॥ प । – +] अशीहि करितां येअील.

( १ ) " अितुकें दे मजला दे मजला ॥ मागतसे हरि तुजला ध्रु०
येती सन्त घरासी भक्तीभावें पूजिन त्यांसी. १
भगवद्भजनीं लागो तुझिये स्वरुपीं मन हें वागो. २
अक्षय वैभव देअीं अखण्ड केशवसद्गुरुपायीं." ३
( केस्वा–पस १/४४७ वें ).

( २ ) " हर हर सापडलों सापडलों ॥ कैसा फांसां पडलों ! ध्रु०
अितर नदीजलटाकीं टाकुनि आलों याच तटाकीं. १
सोडुनि मानस-केली कापुनि घ्याया आलों शेली. २ (दस्व ५०)

'पापताप' ( अुस २०३ ) ही कविता या शुक्रकलाजातींत आहे.

१५ '**कमललोचना**' [ – । प । प । प । ᵕ + ]

( १ ) " गोविन्दा मधुसूदना **कमललोचना** सख्या यदुविरा,
हे दीनबन्धु माधवा, स्वामि केशवा, करुनि ये त्वरा. ध्रु०
भवजीवनाब्धिचा थाट, अुसळते लाट, प्राण घाबरा,
तुजविण स्मरावा कोण, ( कोण ) गणगोत ! आप्त तू खरा.

जय दाशरथी श्रीराम योगिविश्राम, आज रघुविरा,
तू पूर्ण परात्पर गडी, नेअिं परथडी, धरुनिया करा.
दिनकरकुलदीपा, आदिरूपा विभो रे !
जग-गुरु जगदीशा, प्रार्थितों श्रीप्रभो रे !
अकळहि गुणलीला वर्णितां वेदवाचा
शेषहि शिणतसे जी काय केवा जिवाचा ?
हा अरुष भक्तिचा भाव दयाळा धाव, घेअि धनुकरा,
षड्रिपू गाञ्जिती अशी वेळ ही भारि जानकीवरा." ( देक ४० )

' संसार नव्हे हा सार ' ( देक—पद ७२ वें ) हें पदाहि याच जातीचें आहे.

( २ ) " वासुनी चोंच जरि आशेची पाखडे पङ्ख किति तरी
परि फोल जाहले यत्न सकल आदळे पुन्हा भूवरी." ( कावि ३० )

ही अेकच द्विपदी निराळ्या मात्रावलीच्या द्विपदीमालेमध्ये अनवधानाने आली आहे.

१६ **' आदिसुन्दरी '** । – । प । ᵕ +, अु । प । ᵕ + ]

कमललोचना मात्रावली दुसऱ्या आवर्तनांत तिसऱ्या मात्रेनन्तर खण्डित केल्याने जी द्विधा मात्रावली होते तिला आदिसुन्दरी हें नाव दिलें आहे.

( १ ) " रुक्मिणी **आदिसुन्दरी** चकाके वीजचि निजमन्दिरीं. ध्रु०
पदिं नूपुर रुणझुण करी, अञ्जिरी पैठणि वर भरजरी. १
अुरिं कञ्चुकि तटतट करी, जरीचा पदर शोभतो शिरीं. " २
( किग्र १६ )

( २ ) " ही साङ्ग सखे सुन्दरी कुण्या ग सुभगाचि मदनमञ्जरी ".
( राला ११९ )

१७ **' समुदितमदना '**, " **सूर्यकान्त** " [ । प । प । प । ᵕ + ]

( १ ) " **समुदितमदने** रमणीवदने चुम्बनवलिताधरे
मृगमदतिलकं लिखति सपुलकं मृगमिव रजनीकरे
घनचयरुचिरे रचयति चिकुरे तरलिततरुणानने
कुरबककुसुमं चपलासुषमं रतिपतिमृगकानने" ( गीगो १५/२ )

(२) " सहज चालतां मार्गीं तुजला बघतां डोळे भरून्
धरिलें किति आवरून, गेलें मन माझें बावरून् !
हंसापरि चालणें, पदर तो दोन्ही गुच्छांवरून्
वरचेवर सावरून बघशी मान वाकडी करून्.
गालामधि हासशी साजणी, लाजुनि बघशी दुरून्–
प्रेमखुणा या करून नेशी हृदय आमुचें हरून्." (दक ५)

'बघुनि अुपवना विरहाग्नीची ज्वाला भडके अुरीं' (किग्र ४८९), ' सोङ्गटीचा खेळ' (विक ८५), राजकवि चन्द्रशेखरकृत 'अुगडं गुपित्' (सुगी १), 'पाखरास' (गोवा १६३), 'हिरवें तळकोंकण' (माक २१), 'मोन्यांची मोहना' (माक ६३) अित्यादि अनेक कवितांत समुदितमदना मात्रावलीच्या द्विपद्याच आहेत. 'दुर्गावती' (विक २७), 'सत्प्रीतिमार्ग' (तासक ३७), 'स्वारी कशी येअील' (तासक १४०) अित्यादि कवितांत [–।प।प।़+] या लीलारतिमात्रावलीचा अन्तरा आहे.

समुदितमदनामात्रावलीच्या दोन द्विपद्यांच्या मध्ये [–।प।प।़+] या लीलारतिमात्रावलीची त्रिपदी घालून जें कडवें सिद्ध होतें अशा १४३ कडव्यांच्या मालेमध्ये शशिमोहन हें प्रो. यादव मुकुन्द पाठक यांचें काव्य रचिलेलें आहे.

'गुराख्याचें गाणें' (तासक ३०), या कवितेंत अन्तरा (अु।प।+) या भुवनसुन्दरमात्रावलीचा आहे.

कडवें समुदितमदना अेकचरणी असलें तर ध्रुवपद बहुशः अकराव्या मात्रेनन्तर खण्डित केलेल्या त्याच मात्रावलीचें, सूर्यकलेचें असतें.

(३) " आम्रमञ्जरी तुला अर्पितें नमुनि मीनकेतुला. ध्रु०
निजधनु ओढुनि पहा कसा हा मन्मथ सरसावला"१(किग्र ४०३)

(४) " अगाध काही तरी अुमज हें अजरामर सुन्दरी. ध्रु०
व्योमधरेचा चुम्बनविधि हा न सरे कल्पान्तरीं. १
कोठे प्रस्तर कुठे कौमुदी, अन्योन्यीं रति परी." २ (टिक १०२)

'१८९७ या वर्षाला' (दक ५९) ही कविता याच जातीची आहे. 'कशि काळ नागिणी वैरिण झाली नदी !' (तासक १४१). या कवितेंत ध्रुवपद [–।प।प।़+] या लीलारतिमात्रावलीचें आहे.

१८ “**सूर्यकला**” [।प।৺+,अु।प।৺+]

समुदितमदनामात्रावली अकराव्या मात्रेनन्तर खण्डित केली कीं जी द्विधा मात्रावली होते तिला सूर्यकला म्हटलें आहे.

(१) “जीची आलोचना –० करितां नीरच ये लोचना.
धनिक करी वञ्चना –० नेदी तिळभरही काञ्चना.” (दस्व १८३).

तथापि हें पद्य शिथिल आहे.

(२) “सुन्दर नृपमन्दिर तयाच्या सुन्दर सौधावर
रमणी कोणी तरी अुभी ही चारुमूर्ति हांसरी
शुक्राची चान्दणी अुतरली जणु अस्मानांतुनी
सौधाच्या कोन्दणी जणू ही लखलखते हिरकणी.” (कास्फू ७८).

(३) “येअुनि माझ्याकडे अेकदा मृत्यु असें बडबडे,
‘सूर्य अवेळीं किती सारखे जाती अस्ताप्रती !
आकाशांतुनि गोल भराभर
तुटून खाली पडती भूवर
स्वाहा करितों मी अेकन्दर–’
तेव्हा त्याच्यावरी त्याजला मीही अुत्तर करीं.” १ (अुवा२/२७).

अुवा (२/४९) ही कविताहि याच जातीची आहे.

१९ **महाराष्ट्र** [–।प।प।प।+৺]

रणशूर शहाजीसूनु पहा जी कीर्तिप्रतिपच्चन्द्र
नृपनीतिविशारद, सदैवसावध, वैराग्याचा कन्द
शिव छत्रपति प्रभु **महाराष्ट्र**भूप्रिय जनहृदयानन्द—
बघ शैशवांतही त्यास अेक हिन्दवीस्वराज्यच्छन्द. (२५७)

या जातीला (प्रापै १/२०८) मरहट्टा छन्द म्हटलें आहे. हे नाव प्रथम कोणी आणि कां दिलें समजत नाही. या जातींतील अन्त्य अकार निभृत असेल असें वाटतें. तसा तो धरिल्यास या आणि पुढील अरुणप्रभाजातींत काही भेद रहात नाहीं.

२० 'अरुणप्रभा' [–।प।प।प।+]

(१) "या हृदयाकाशीं अुगवे **अरुणप्रभा** शरत्कालीं,
त्या विहगकूजनें भ्रमरगुञ्जनें जागृति मज आली.
मी पुसुनि अुघडिलें नयना
मृदु सोडुनि सरलों शयना,
प्रक्षाळुनि करपदवदना,
हें मस्तक चरणीं तिच्या ठेवितां हसली ती गालीं,
मज अठवुनि चुम्बुनि कवटाळी मग गुप्त कुठे झाली!" (सुभा)

(२) "परतन्त्रपणें जगतीं फिरणें ज्याहून बरें मरणें!
अतिदीनपणें अरितें नमणें त्याहून बरें मरणें!
न धराल जरी तरवार करीं, चिरडील अरी समरीं,
अधमाधमशा पावाल दशा, बकरीच बरी दुसरी". (विक १२४)

२१ "**चन्द्रकान्त**", '**पतितपावन**' [।प।प।प।+]

(१) "पतीतपावन नाम अैकुनी आलों मी दारा,
पतीतपावन न होशि म्हणुनी जातों माघारा." (नाम–पस २/४४)

(२) "**चन्द्रकान्त** राजाची कन्या तरुण रूपखाणी
पतिव्रता सद्गुणी शहाणी, पतिही वाखाणी." (देझु)

(३) "तीनी सान्जा सखे मिळाल्या, देअीं वचन तुला–
आजपासुनी जिवें अधिक तू माझ्या हृदयाला. ध्रु०
कनकगोल हा मरीचिमाली जोडी जो सुयशा,
चक्रवाल हें पवित्र, ये जी शान्त गभीर निशा,
त्रिलोकगामी मारुत, तैशा निर्मल दाहि दिशा—
साक्षी अैसे अमर करुनि हे तव कर करिं धरिला."१ (तासक ३९)

(४) गोपीचुम्बित रागकराम्बित मानविलोकनलीन
गुणवर्गोन्नतराधासङ्गतसौहृदसम्पदधीन
तद्वचनामृतपानमदाहृत वलयीकृतपरिवार
सुरतरुणीगणमतिविक्षोभण खेलनवल्गितहार

अम्बुविगाहननन्दितनिजजन मण्डितयमुनातीर
सुखसंविद्घन पूर्ण सनातन निर्मलनीलशरीर " ( रूस्तमा २७० )

या आणि पुढील पद्यांतील चरणान्त्य अकार निभृत आहे असें वाटतें.

( ५ ) " मळकट बण्डी, जुनापुराणा अङ्गामध्ये कोट्
टोपी डोईवरी फाटकी, कमरेला लङ्गोट्.
पहा अशा थाटांत चालला कुणी भिकारी पोर्
भिक्षा मागत, करीत गम्मत, हासत थट्टेखोर्. "( पारा ३२ )

या जातींत अगणित कविता आहेत. 'कृष्णाकुमारी' ( विक ३८ ), 'कमळा' ( फुओ ६० ), हिङ्गणेकरकृत 'पावनखिण्ड' अित्यादि काव्यें या चन्द्रकान्त जातीचीं आहेत. देवनाथकृत 'अेक दिनीं वृषभानुनन्दिनी जे हंसकचरणा' ( देक १०० ) या चन्द्रकान्त जातीच्या पद्यांत पादाकुलकाच्या त्रिपदीचा अेक आणि वसन्ततिलकाच्या चतुष्पदीचा अेक असे दोन अन्तरे आहेत.

कडवें चन्द्रकान्त अेकचरणी असलें तर ध्रुवपद, या मात्रावलींत दुसऱ्या आवर्तनांत दोन मात्रानन्तर खण्डन केल्यानें जी द्विधा मात्रावली [ । प । +, अु । प । + ] होते त्या मात्रावलीचें म्हणजे चन्द्रकला मात्रावलीचें अथवा बहुशः [ अु । प । + ] या भुवनसुन्दरमत्रावलीचें असतें.

( ६ ) " जाअूं कामाला ऽ चला गे दिवस किती आला ध्रु०
अुपवनतरुवेलींना जल मी घालाया जातें. " १ ( देशाप ६३ )

( ७ ) " सुन्दर मी होणार ऽ आता मरणाने जगणार् ! ध्रु०
वर्षत्रय मम देह मरतसे तो आता मरणार्. १
वर्षत्रय मम प्राण जातसे तो आता जाणार्. २
आनन्दी आनन्द जाहला, मरतां मी हसणार्. ३
हासत मरणें गोविन्दाचा प्रेमपन्थ ठरणार् !" ४ ( गोक ११४ )

( ८ ) तया वनिं खेळे भूपसुता. ध्रु०
खेळविता बहु मेळविला सखि मेळ तया सहिता. १
राजस ते द्विजराजमुखी गजराजगती ललिता " २ ( दस्व ९४ )

या पद्यांतील चरण वृत्तस्वरूप [ । – ⏑ ⏑ – ⏑ ⏑ । – ⏑ ⏑ – ⏑ ⏑ । – ⏑ ⏑ – ⏑ ⏑ । – ] या मात्रावलीचे आहेत.

(९) "सुलभ मनिं गणा न भूपसुता.
करुं बघतां कशि ती वनिता? ध्रु० मनिं०
राजकुमारी अुभि सामोरी त्यजा न किङ्करता. १ (कामू)

(१०) "पाखरा, येशिल कां परतून्? ध्रु०
मत्प्रेमाने दिल्या खुणांतुनि अेक तरी अठवून्—" (टिक १४१)

२२ "**चन्द्रकला**" [।प+, अु।प।+]

चन्द्रकान्तमात्रावलींत दुसऱ्या आवर्तनांत दोन मात्रांनन्तर खण्डन केलें की जी द्विधा मात्रावली होते तिला चन्द्रकला हें नाव दिलें आहे.

(१) "गोविन्दा रामाऽऽजयजय गोपाळा रामा!
याऽदवा रामाऽऽजयजय माऽधवा रामा!
अेऽक तू रामाऽऽजयजय अनेक तू रामा!" (अे–भमाप्र ३५)

(२) "घेअुनि हृदयासी–० सुतेला, स्थित मी दाराशीं–
म्हातारी आली–० तरङ्गत, मुलगीला दिसली." (केक १४८)

'अिन्दुकला' (यध २५) आणि 'सन्त तुकाराम' (माक ७५) हीं काव्यें या चन्द्रकलाजातींत आहेत.

२३ **दोहा** [।प।– –+ऽऽ।प+ ᵕ]

ही मराठींत परिणत झालेल्या दोह्याची मोडणी आहे. अन्त्याक्षर अकार-युक्तच असतें; आणि तो अकार दृग्गोचर असला तरी वस्तुतः अनुच्चारितच असतो.

(१) "स्वहृदय फाडुनि निजनखरीं ऽऽ चिवट तयाचे दोर्
काढुनि गोफण वळितों ही ऽऽ सत्त्वाचा मी चोर्." (केक १८९)

(२) "जोर मणगटांतला पुरा ऽऽ घाल घाल खर्चीं.
हाण टोमणा, चळ न जरा ऽऽ अचुक मार बर्चीं." (केक १८३)

मराठींत केव्हा केव्हा दुसरा गण (+ ᵕ +) असा येतो तेथे प्रथमाक्षर त्रिमात्रक होतें आणि तो (ᵕ ᵕ ᵕ +) असा असल्यास चौथे अक्षर त्रिमात्रक होतें.

(३) "महाराष्ट्रभाषेंऽत ही ऽऽ दोहा रीति नवीच्
रची मयूरेश्वर हिला ऽऽऽ मनीं धरील कवीच." (मोविस्तु ९)

१३ मात्रांचा अेक भाग आणि ११ मात्रांचा अेक भाग मिळून दोहा होतो असें मानण्याचा प्रघात आहे.

“ तेरह मत्ता पढम पअ पुणु अेआरह देह
पुणु तेरह अेआरहहि दोहा लक्खण अेह ” ( प्रापै १/७८ )

परन्तु दोह्याचें लक्षण देणाऱ्या छन्दःशास्त्रकारांतील प्राचीनतम असा विरहाङ्क दोह्याचें लक्षण निराळ्या रीतीने देतो.

“ तिण्णि तुरंगा णेअुरओ विप्पाअिक्का कण्णु
दुवहअपच्छद्धे वि तह वद लक्खणअु ण अण्णु” ( विवृ ४/२७ )

तुरङ्ग आणि पदाति म्हणजे चतुर्मात्रक गण, नूपुर म्हणजे अेक गुरु आणि कर्ण म्हणजे दोन गुरु ही परिभाषा ध्यानांत घेतली की दोह्याची मोडणी [ । – – – – – – – + । – – – – – + + ] अशी होते आणि मात्रांची सङ्ख्या १४ नि १२ अशी होते! अर्थात् विरहाङ्क हा लिखितापेक्षा अुच्चारिताला महत्त्व देतो हें अुघड आहे. कारण चरणान्त्य अक्षर हे दिसायला नेहमीच लघु असूनाहि तें गुरु आहे असें तो स्पष्ट म्हणतो. त्याचप्रमाणे बारा मात्रांनन्तर येणाऱ्या लघु अक्षरालाहि गुरु मानतो हेंहि अुघड आहे. त्याच्या लक्षणांतील ‘ ओ ’ हें अक्षर दिसायलाहि तो गुरु आहे. परन्तु खालच्या ओळींतील ‘ ह ’ हें दिसायला लघु असूनाहि अुच्चारतः गुरु आहे म्हणूनच तो गुरु मानीत असावा. जोअिन्दुकृत योगसारांतील पुढील अुदाहरणांत पहिले पाद दिसायलाहि चौदा चौदा मात्रांचे आहेत.

“ वअुतअुसंजमुसील जिया – ० अिय सव्वअि ववहारु
मोक्खह कारण अेक्क मुणी – ० जो ताअिलोयहु सारु ” ( जोयो ३३ )

हेमचन्द्र नेहमीच्या दोह्याप्रमाणेच अुदाहरणें

“ पिअहु पहारिण अिक्किणवि – ० सहि दो हया पडंति
संनद्धओ असवारभडु – ० अन्नु तुरंगु न भंति ” ( पृ ४१ )

हें देतो पण लक्षण “ समे द्वादश ओजे चतुर्दश दोहकः ” असें देतो. त्यानेच दिलेलें

“ मम तावन्मतमेतदिह – ० किमपि यदस्ति तदस्तु
रमणीभ्यो रमणीयतर – ० मन्यत्किमपि न वस्तु ”

हें संस्कृत अुदाहरणहि दिसायला १३ नि ११ मात्रांचेंच आहे. यावरून असें दिसतें की १२ आणि ११ मात्रांनन्तर येणारा पादान्त्य लघु हा विरामपूर्व असल्यामुळे अुच्चारतः वस्तुतः गुरु होतो. यांपैकी ११ मात्रांनन्तर येणाऱ्या पादान्त्य लघूविषयीं हेमचन्द्र स्पष्टच म्हणतो की

'अत्र समपादान्ते गुरुद्वयमित्याम्नायः'

या चार ठिकाणीं दिसायला लघु पण अुच्चारायला गुरु अशीं अक्षरें न घालतां दिसायलाहि गुरु अशीं अक्षरें घालून रचना केली तर ती ज्या जातीची होअील तिला ( मागे पृ. ३७२ पहा ) "दयिता" हें नाव दिलें आहे.

म्हणण्याच्या दृष्टीने पाहिलें तर विरहाङ्क–हेमचन्द्र यांचें म्हणणें योग्य वाटतें. अडचण अेवढीच राहते की जेथे विषम पादान्तीं दिसायला (–⏑–) वा (⏑⏑⏑–) हा गण येतो तेथे मात्रांची सङ्ख्या चौदा होत नाही, ती तेराच भरते! आधी अशीं स्थळें थोडींच आहेत. परमात्मप्रकाशाच्या ६७४ पादांपैकीं २७ च पादांच्या अन्तीं (–⏑–) हा गण येतो तेथे प्रथमाक्षर स्वाभाविकपणेंच प्लुत अुच्चारितां येतें; आणि ४ च पादान्तीं (⏑⏑⏑–) हा गण आल्याने अन्त्याक्षर प्लुत अुच्चारावें लागतें. योगसाराच्या २०८ पादांच्या पैकीं १२ पादांच्या अन्तीं (–⏑–) हा गण असून अेकाच (७१ अि) पादाच्या अन्तीं (⏑⏑⏑–) हा गण आहे.

आधुनिक मराठींत,

"मागे अैसे दोन वर–० कैकेयी विषरूप्  
समजूनि तिचा लोभभर–० भी सत्यव्रत भूप्". ( मोदोरा )

अशा अुदाहरणांत 'र' गुरूच अुच्चारिला जातो आणि अन्त्य पकार मात्र स्वरविहीन उच्चारिला जातो.

२४ **सोरठा** ही जाति दोह्याचे पाद अुलटविल्याने होते. जोअिन्दुकृत योगसारांतील ( ३८, ४६ ) हीं दोन सोरठाजातीचीं प्राचीन अुदाहरणें आहेत.

"जयजय जननी देवि! जयजय भगवति शारदे!  
नमूं तुला मी केवि? वानूं कवण्या वाणिने?" (तासक १७३ )

ही आणि हिच्या नन्तरच्या चार द्विपद्या सोरठा जातींत आहेत. यमकें विषम

पादान्तीं साधिलीं आहेत, समपादान्तीं नाहीत. अशा ठिकाणीं हीं शकलें अुलटवून सोरठाजातीची दोहाजाति कां करूं नये कळत नाही.

२५ '**अनलज्वाला**' [ । प । प । प ]

( १ ) " शशामृगाच्या कोशासम तनु निस्तुल गोरी,
केश सुगन्धित काळे काळे जशि कस्तूरी,
चुनडि केशरी खुले, केशरी तशीच चोळी,
यज्ञवेदितें **अनलज्वाला** की लपेटली. " ( देवाना )

( २ ) " जागृत ठेवा लग्नाचीही स्मृति सारी. ध्रु०
व्हालचि माता दुहितांच्या कधि तरि संसारीं. १
होअुं न द्यावा तुम्हि त्यांचा विक्रय बाजारीं. " २ ( देशा १९ )

प्राकृतांतील 'रोला' (प्रापै १/९१) या पद्यप्रकाराचा अन्तर्भाव या अनलज्वालाजातींत होतो.

२६ '**शुभगङ्गा**' [ । प । प । - - + ]

( १ ) " अिन्द्राणी हे जेथे वाहे **शुभगङ्गा**,
स्नानें पानें कर्ती पातक-गिरिभङ्गा;
तारी पाहा केवळ जे दीन अनाथा,
चित्तीं चिन्ता ज्ञानेश्वरसद्गुरुनाथा'. ( निक १/९३ )

( २ ) " आणा ध्याना विठ्ठल पण्ढरिचा राणा. ध्रु०
याच स्वरुपीं येथे असणें विज्ञप्ती
दर्शनमात्रें सर्वजनां मोक्षप्राप्ति
स्वभक्तवचना मानुनी अिटेसमचरणा. " १ ( विप ६७ वें )

वासुदेव वामनशास्त्री खरे यांच्या समुद्रकाव्यांतील ८३ वी चतुष्पदी या शुभगङ्गाजातीची आहे.

२७ " **वर्षा** " [ । प । प । + ऽ ᵕ + ]

" णच्चअि चंचल बिज्जुलिआ सहि जाणअे
मम्मह खग्ग किणीसअि जलहर साणअे
फुल्ल कअंबअ अंबर डंबर दीसअे
पाअुस पाअु घणाघण सुमुहि बरीसअे ( प्रापै १/१८८ )

प्राकृतपैङ्गलांतील प्लवङ्गम नामक मात्रावृत्ताचा अन्तर्भाव या वर्षाजातींत होतो.

२८ ‘ सुस्वर ’ [।प।--+ऽऽ।--+]

“ अुगवुनि आला पुनवेचा - ० चान्दोबा
सुस्वर गर्जे यमुनेचा - ० धबधऽबा
धवलित झालीं वाळूचीं - ० मैदानें
सारविलीं जणु शाडूच्या - ० रङ्गाने
शीतळ वारा वाहे हा - ० झुळूझुळू
डुललीं रानें आनन्दें - ० हळूहळू ”. ( काविश-वाश्रीप ९३ )

२९ ‘ कृतिमण्डित ’ [।प।+ऽ᳘+,+।+ऽ᳘+]

“ हंस धराया लाऽगली हे भाऽगली ध्रु०
मृदुल तनू कोमेऽजली घामेऽजली १
चाली करुनि न साऽवलींत विसाऽवली २
स्तविली रघुपतिपऽण्डितें कृतिमऽण्डितें. ” ३ ( दस्व १०६ )

३० ‘ स्वैरगति ’ [।--+ऽऽ।प।--+]

“ फुललिं फुलें - ० त्यायोगें अुपवन खुललें.
दरवळला - ० परिमल सुखवाया सकला.
स्वैरगती - ० अलिगण अुडती बागडती.
मधुनादें - ० गाती प्रभुगुण आनन्दें ” ( विक ९९ )

माधवानुजकृत ‘ विसरलेलें गाणें ’ ( मानुक १४४ ), गोविन्दाग्रजकृत ‘ कळ्यांचीं फुलें कशीं झालीं ? ’ ( गोवा १५५ ), बालकविकृत ‘ फुलपाखरू-फुलवेली ’ ( बाक ३ ), आणि ‘ पाअूस ’ ( बाक ६ ) या कविता या स्वैरगतिजातींत आहेत.

~~३१~~ “ गोपालन ” [--।--+ऽऽ।प।-+]

“ कुत्ना थमाल ले - ० थमाल अपुल्या गाअी
आम्ही दातो ले - ० घलास दातों भाअी
येथे यायाता - ० अमुता अिलाद नाअी
तूदी थङ्गत ले - ० थङ्गत कलली भाअी. ” (नाम-पस २/५२)

हें मधुर, बोबडें, दीर्घ पद्य सबन्ध या गोपालनजातींतच आहे.

१२ 'भूपति' [ – । प । प । – + ]

या जातीला नाव 'भूपती खरे ते वैभवसुख सेवीती" (देमृ २५) या देवलांच्या पद्यावरून पडलें असलें तरी ही जाति प्राचीनच आहे. गोविन्दवणी-करकृत पुढील पद्य पहा.

(१) "किती अन्त पाहशिल माझा रे गुणवन्ता ?
तुजविण पळ युग समजतों पण्ढरीनाथा." (पस २/३२५ वें)

(३) "येथेच गाअिलीं असतीं आपण गाणीं
अूर्जस्वल भरुनी स्फूर्ती रानोरानीं. ध्रु०
लाभली जिवाला येथे प्रेमळ जोड,
लागले निघाया संवादी स्वर गोड,
तरळली पुढे मधुसृष्टि लावुनी ओढ,
परि कशी निमाली मोहनसुन्दर वाणी!" १ (गिफ २१)

'मुग्धकलिका' (दक २२), ताम्बेकृत 'ते कान्त यापुढे'— (तासक १६५) आणि 'स्त्रीहृदयरहस्य' (तासक १७०) या कविता भूपतिजातींत आहेत. पुष्कळा भूपतिजातीच्या द्विपदीमालेमध्ये विषमचरण खण्डित असतो आणि तो तुकडे तुकडे करून लिहिण्याच्या पद्धतीमुळेच जाति वेगळी वाटते.

(४) "जन सकल जादुने विकल ठिकाणीं खिळले;
वदवे न, न हलवे, जणुं चित्रें ते बनले." (तासक २४)

'पाडवा' (तासक ६८), 'वियोगिनी' (तासक ६९), 'आअीकडे न्या!' (तासक ८२) आणि 'शिशुवञ्चन' (तासक ८४) या कवितांत हा प्रकार आढळतो. 'पद्मिनी' (विक २३), 'हालत्या पिम्पळपानास' (गोवा १३१) अित्यादि कवितांत अन्तरा [ – । प । – + ऽ – ⏑ । + ] या मालिबालामात्रावलीचा आहे.

'द्राक्षकन्या' या भाषान्तरित काव्यांत भूपतिमात्रावलीच्या विशिष्ट यमकबान्धणीच्या चतुष्पद्या आहेत.

(५) "या अिथे तरुतळीं अेक वही कवितेची,
भाकरी अेक, अन् सुरअी अेक सुधेची,
आणखी अेक तू जवळ गात या विजनीं,
अन् हें न रान मग, नन्दनवन तें हेंची !" ( माजूद्रा ११ )

'कणिका' या काव्यप्रकारासाठी ( पुढे पृ ३८७ पहा ) लीलारतिजातीची ाजना करण्यांत येते तशी भूपतिजातीचीहि होअू शकेल.

पाठीस लागुनी पोट छळी मनुजाला
प्रच्छन्न जगावर अुपकारच हा झाला.
पोटाची चिन्ता ज्यांस असे किति थोडे !
स्वास्थ्यांत परन्तु न त्यांचा जाअी वेळ,
मग लावुनि जगतीं आग पाहती खेळ ! ( २५८ )

३३ '**जगदीश्वरबाला**' [ –। – – + ऽऽ। प। – + ]

भूपतिमात्रावलीच्या पहिल्या आवर्तनांत शेवटीं द्विमात्रक विराम ठेविल्याने ी द्विधा मात्रावली होते तिला जगदीश्वरबाला हें नांव दिलें आहे.

"हे सुन्दरते – ० तू **जगदीश्वरबाला**,
त्या दर्शविशी – ० गूढ दिव्य रूपाला. ध्रु०
अधिकार तुझा – ० थोर खरोखर आहे,
रमणीयपणा – ० तुजलागी हा लाहे,
पावित्र्य खरें – ० त्या ठायीं दृढ राहे,
सम्मोह पडे – ० म्हणुनि अखिल जगताला." १ ( सुभा )

३४ '**वंशमणि**' [ । प । प । – + ]

"त्रिभुवनपालक मानीं मम राम धणी. ध्रु०
अेक अयोध्यावासी रघु**वंशमणी**
दशरथ, चार तयाला सुत फार गुणी.
राम ज्येष्ठ तयांमाधि जो बाळपणीं
वधुनि ताटिका राहे मुनिवर्यजनीं." १ ( विप ४९ )

'गांवीं गेलेल्या मित्राची खोली लागलेली पाहून' ( केक १९ ) आणि स्वप्नामध्ये स्वप्न' ( केक ९९ ) या कविता या जातीच्या आहेत. अुमरखय्या-

मकृत रुबाया हें प्रस्तुत लेखकाचें मूळ फार्सीवरून भाषान्तर आणि त्या भाषान्तराची अर्पण पत्रिका '?' हीं याच जातींत आहेत.

"म्हणति, हुर्रीसह अुद्या महोत्सव गोड,
मी म्हणतों, अजि हा द्राक्षासव गोड !
घे ही रोकड, अुधार ती सोडुनि दे,
गमे दुरूनिच की दुन्दुभिरव गोड." ( अुखरु ३५९ )
"स्वप्नहीन ती रात्रीं निद्रा गाढ,
दिनीं कष्ट अन् पाणी, भाकर जाड,
सन्धाकाळीं विजन, स्नेही, कविता—
काय यापुढे साम्राज्याचा पाड !" (अुखरु अर्पणपत्रिका २०)

३५ '**नगराज**' [।−−+ऽऽ।प।−+]

(१) "सोडुनिया−० तुज जातों **नगराजा**,
लीनाचा−० प्रणाम घेअीं माझा.
आताचा−० सरला ऋणानुबन्ध,
तोडावे−० म्हणुनि लागती बन्ध." ( कावि ८२ )

(२) "आलों शरण तुला. ध्रु०
श्रीरङ्गा−० दे मजला सत्सङ्गा. १
रघुनाथा−० अवडो तव गुणगाथा. २
भगवन्ता−० तारीं विठ्ठलपन्ता." ३ ( विदप ६ )

अनन्त काणेकरकृत 'अेकाचें गाणें' ( काचा ५१ ) ही कविता या नगराजजातींत आहे.

३६ '**लीलारति**' [−।प।प।⌣+]

(१) "अुद्धवा, अैक कृष्णाची **लीलारती**,
अुबगोनि कसा मज गेला मथुरेप्रती." ध्रु०
रक्षीलें बहु वणव्यांत (चि) रविजाथडीं,
गोवर्धन धरिला अिन्द्र वर्षतां झडी,
यमुनेंत मिळाले नन्द, मिळेना कुडी,
काढियले निजपुरुषार्थें घालुनि अुडी,

यात्रेंत भुजङ्गें गिळितां प्राणेश्वरा,
धावोनि बळें सोडविलें त्या अवसरा,
अहिदेहांतुनि अुद्धरिलें विद्याधरा,

आठवूं किती अुपकारा नाही मिती—
सद्गदित विलापे माय यशोदा सती.” १ (राघव—पस ३/२१०)

‘चोखयाच्या महारीची विनन्ति’ ( पोबा २७ ), ‘नव्या युगाचा काव’ ( पारा १ ), ‘रोहिणी’ ( पारा १० ), ‘हिङ्गणी’ ( पारा ४६ ), ‘वाटसरू’ ( पारा ६४ ), ‘दूर कोठे तरी’ ( पारा ७१ ), ‘बालकवि’ ( पारा ९१ ), ‘तिथे’ ( पारा ९६ ), ‘माझ्या खेडेगांवीं’ ( पारा १०७ ), ‘मञ्जुळा’ ( कास्फू ४६ ), ‘सन्ध्याकाळीं’ ( कास्फू ६३ ), ‘खेड्यांतील देखावा’ ( कास्फू ११० ) अित्यादि कविता या लीलारतिजातींत आहेत. मञ्जरी हें एका वृत्ताचें नाव असल्याने या जातीला मञ्जरी म्हणून जें नाव पूर्वी देण्यांत आलें होतें त्याचा त्याग करणें अपरिहार्य झालें आहे.

भूपतिजातीप्रमाणेच या जातीच्याहि द्विपदीमालेंत केव्हा केव्हा विषमचरण खण्डित असतात.

( २ ) “ तो भासच सगळा, जरी स्वप्न तें तरी
हुरहूर जाणवे मनांत कां ही परी !
मावळली मोहक निशा, धवळल्या दिशा,
या अजून नयनीं खुपति तारका कशा !” ( केगी ५० )

ही कविता या प्रकारची आहे.

“जपानी भाषेंत ‘टांका’ म्हणून अेक काव्यप्रकार आहे. यांत पांच चरण असून पहिले दोन नि शेवटले दोन सयमक असतात. अेक भावना, कल्पना अथवा अेक विचार या पञ्चपदींत ग्रथित केलेला असतो. मात्र काव्यार्थ रूपकात्मक भाषेनें बहुशः सुचविला जातो. कविवर्य रवीन्द्रनाथ यांनी अशा प्रकारची पुष्कळ रचना केली आहे.” अशी प्रस्तावना करणारे रा. गोपीनाथ तळवळकर यांनी ‘कणिका’ हा प्रकार मराठींत आणून त्याच्यासाठीं या लीलारतिजातीची योजना केली आहे. ते म्हणतात,

(३) " काळाच्या पुलिनीं ठेवा निज पाउुलें
हें थोर जनांनी सदैव अुपदेशिलें;
परि दिनरात्रीच्या तुफान लाटांमधे
हें धुवूनि निघतें वाळवण्ट नेहमी,
नच पदचिन्हांच्या शाश्वततेची हमी. " (विविमा १९३०)

(४) " ही मोट भरे भरभरा, चढे करकरा,
विहिरींत बघा वाकुनी जरा धाकुनी,
पाण्यांत लअी भोवरे, फेस गरगरे,
हें काम राहिलें, करा, कसा कम्बरा. " (देनाघ–सुगी ७८)

या गीतांतील मात्रावलींत दुसऱ्या आवर्तनांतील तिसऱ्या मात्रेनन्तर खण्डन आहे. 'शेत्याची शीळ' (सुरेश–कभा ४०) या पद्यांतहि याच ठिकाणीं खण्डन आहे.

पुढील कवितांत ध्रुवपदें भिन्न भिन्न असलीं तरी कडवीं [–।प।प।ᴗ+] या मात्रावलीच्याच चतुष्पदीचीं असल्याने त्यांची जाति लीलारति हीच ठरेल.

(५) " मज विफल गमे गे जीवित माझें सखे !
सुख किती जरी ऽऽ अुणिव ही परी मिळति न शिशुचे मुके. ध्रु०
मी शिवत बसूं गे कुश्ची झबलें कुणा ?
मी माझ्या मुखिंचा घास भरवुं गे कुणा ?
मुख बघुनि कोणतें स्वर्गाहि मानूं अुणा ?
हो स्वर्गसौख्यही मातृपदाविण फिकें !" १ (यध १४३)

(६) " ही प्रभातकालीं राहुनि धावेवरी
हाकते मोट कुणी सुन्दरी. ध्रु०
खोविला निरीवर पदर कसुनि कटितटीं,
झळकते कान्ति किति नील आरुणी पटीं !
ही मराठमोळा सुरत रम्य गोमटी,
आसूड अुडवुनी मजेंत वाऱ्यावरी !" (राजस–सुगी ४४)

(७) "हासरीं नाचरीं मुलें अशीं हीं गुणी,
धावती भटकती साऽऽरीं हीं अशींच गगनाङ्गणीं. ध्रु०
हीं अुल्हासाने भुरुभुरु येअुनि किती
बघ जमलीं शेजारचीं मुलें भोवती,
हीं गळ्यांत घालुनि गळा असें खेळती,
झळकती डोअिचा तुरा मधे राहुनी." १ (कोदभि-बाबोमा ५१/८)

३७ '**सन्तति**' [–।प।प।+]

(१) " जो भेद विधीने स्त्रीपुरुषीं केला
देहींच मात्र तो **सन्तति**–कार्याला." (देशा ११)

(२) " अव्यक्त मूर्ति मी रचितों जगतातें
मृत्तिका घटिं, नगीं सोनें जैसें तें.
हीं माझ्या ठायीं जाण सर्व भूतें,
परि त्यांत नसें मी, पाहीं शुद्ध मतें." (गबा)

'त्यज मना कामना विषयाची आता' (खाक ६७) ही कविता या सन्तति-जातींत आहे.

३८ "**मालि–बाला**" [–।प।––+ऽ–ᐯ।+]

अुद्धवमात्रावलीला अेक रगणाची जोड दिल्यानें ही मात्रावली सिद्ध होते. छन्दःप्रभाकराच्या ५६ व्या पृष्ठावर साङ्गितलेली नरहरिजाति अशीच आहे. पण नरहरिजातींत अन्तीं रगण चालत नाहीं, नगण आणि अेक गुरु अशीं चार अक्षरें लागतात. या जातींत असें बन्धन नाही. या मात्रावलीचा अन्तरा पुष्कळदा भूपतिजातींत असतो. पुढील दोन पद्यें मात्र या मालिबालाजातींत आहेत. अन्तरें भिन्नभिन्न आहेत.

(१) " कुणि घ्या हो ताजीं ताजीं हीं फुलें.
घरिं वाट पहाती भाअू तान्हुले.
घ्या गुलाबजाअीचाफा- मोगरा.
कल्याण करिल देवाजी घ्या तुरा.
ही स्वस्त लाविली वेणी,
अेकेक कळी अश्रूंनी

आभारयुक्त भिजवूनी
देअीन तुम्हांलागोनी, घ्या फुलें." ( दक ७४ )
( २ ) " कोठुनी बोल रे येशी मारुता !
धरिशि कां अशा शान्तीशी मारुता ?
टाकिलें कुठे गन्धाशी मारुता ?
ही तुझी खिन्न वाणी
जणु शुष्क झऱ्यावाणी
मन्नयनिं येअि दिसुनी,
जाहलें काय चित्ताशी मारुता ?" ( टेआ ३/७९ )

३९ पादाकुलक [ । प । प ]

( १ ) भामिनि, तुझिया या मधु रागें
वल्लभ होअिल दूर कसा गे ?
अशोक तुजला दिसोनि येतो
होतां **पादाकुलक** फुले तो. ( २५९ )
( २ ) " त्रिदशपतिमुकुटतटगतमणिगण–
करनिकरसलिलधाराधौत–
क्रमकमलयुगलजिनपतिरुचिर–
प्रतिबिम्बविलयविरहितनिलयात्. " ( पून १ )
( ३ ) " मणिगणमुकुटीं दिनकरमेळा
अुशनासुरगुरु सुघटित वेळा
कौस्तुभपदकीं तेज विराजे
मण्डित भाळीं मृग मद साजे." ( मुराअु ६४५ )
( ४ ) " बघुनि तया मज होय कसेसें,
झुरशि मना, कां भरुनि तुज पिसें ? ध्रु०
हीन दीन मी ब्राह्मण विधवा,
तृणसम जन मज टाकि जणु शवा;
वासना–भुतें भिवविति जीवा,
शरीर जीवा हें थडगेसें. " १ ( तासक ११२ ).

(५) " अशी तुतारी द्या मज आणुनि
फुङ्किन जी मी स्वप्राणाने,
भेदुनि टाकिन सगळीं गगनें
दीर्घ तिच्या त्या किङ्काळीने
अशी तुतारी द्या मज आणुनि. " ( केक १०३ )

या पञ्चपदीचा अुपयोग ' दसरा ' ( गोवा ७० ) या कवितेंत केला आहे; आणि ' सुधारक ' काव्य सबन्ध याच प्रकारचें आहे.

( ६ ) " मज गमे अैसा जनक तो माझ साचा ! ध्रु०
मुख सुरकुतले, मस्तक पिकलें,
शरीर रोगांनी पोखरिलें,
श्मशान ज्याने सन्निध केलें
त्या प्रेताला दुहिता विकितो. " १ ( देशा ३७ )

या पद्यांत ध्रुवपद निराळ्या मात्रावलीचें आहे; पण कडव्यांत पादाकुलकाचीच चतुष्पदी असल्याने या पद्याची आणि यासारख्या ' कोणता मानूं चन्द्रमा ?' (देगुह) या कवितेचीहि जाति पादाकुलकच मानिली पाहिजे. गिरीशकृत ' भलरी ' ( गिफ ४६ ) हें कुणबाअु बोलींतील शिथिल पद्य पादाकुलकजातींतच आहे. काही चरण मात्र [ प । – – ᵕ + ] असें मुरजयी आहेत.

मोरोपन्ताचें कल्याणरामायण ज्या पज्झटिकानामक पद्यप्रकारांत आहे त्याचा समावेश पादाकुलकजातींत होतो. पज्झटिकेंत पञ्चाचा पहिलाच प्रकार असतो आणि दुसऱ्या आवर्तनाच्या आरम्भीं गुरु अक्षर असावें लागतें असें छन्दोमञ्जरीकार गङ्गादासाच्या मतें ( गछ ६/१५ ) म्हणतां येअील. पण मोरोपन्त ही दुसरी अट पाळीत नाही.

कटाव वा कटिबन्ध म्हणून जो पद्यप्रबन्ध आहे त्यांत अुद्धव द्विपदीचें ध्रुवपद असून पुढे पादाकुलकाच्या काही अेका यमकाने जोडलेल्या चरणांचे

---

१ " अमृतेश्वर कटिबन्ध जनाच्या रसनेने वदवी " हा अमृतरायाचा स्वतःच्या कटिबन्धरचनेविषयीचा अुल्लेख मात्र अेका ' चन्द्रकान्तजातीय पद्याच्या अन्तीं केलेला आहे.

गट असतात आणि अेका गटावरून दुसऱ्या गटावर जायला मध्यें जो पद्माचा अष्टमात्रक अन्तरा असतो त्याच्याशी पुढील गटाचें यमक साधिलेलें असतें. कडव्याच्या अन्ताचा सम्बन्ध यमकाने ध्रुवपदाशी जोडलेला असतो. गटांतील चरणांची सङ्ख्या निश्चित नसते. धावती रचना करायला हा अेक सोयीचा पद्यप्रबन्ध आहे. अमृतराय कवीचे कटाव जितके सुप्रसिद्ध तितकेच ते शिथिल आहेत.

४० '**मुरजयी**' [।प।--ᵕ+ऽ]

"मण्डितहल्लीशकमण्डलाम्
नटयन्राधां चलकुण्डलाम्
निखिलकलासम्पदि परिचयी
प्रियसखि पश्य नटति **मुरजयी** ध्रु०
मुहुरान्दोलितरत्नवलयम्
सलयं चलयन्करकिसलयम्
गतिभङ्गिभिरवशी कृतशशी
स्थगितसनातनशङ्करवशी" (रूस्तमा २६८)

४१ "**कर्णफुल्ल**" [-।प।---]

या मात्रावलींत अन्तीं विराम नाही पण खटका येतो त्यामुळे अन्तीं लघु अक्षर येअू शकतें. प्राकृतपैङ्गलांतील सिंहावलोकन आणि पज्झटिका हे पद्यप्रकार या कर्णफुल्लजातींतच बसतात. यांचीं अुदाहरणें

(१) "हणु अुज्जर गुज्जर राअदलं
दल दालिअ चालिअ मरहट्ठबलं
बल मोलिअ मालब राअकुला
कुल अुज्जल कलचुलि **कण्णफुला**" (प्रापै १/१८५)

(२) "जे गंजिअ गोला हिबअि राअु
अुद्दंड ओड्डु जसु भअ पलाअु
गुरुविक्कम विक्कम जिणिअ जुज्झ
ताकण्ण परक्कम कोअि बुज्झ (प्रापै १/१२६)

(३) " मुनि नारद नारायणवाणी
अैकूनी हासे पिटि पाणी. ध्रु०
किति अुत्सुक होशी गोपाला,
मनुजापरि करिशी या लीला
तव अन्त न लागे निगमाला,
आनन्दें नयनीं ये पाणी." १ ( किग्र १६ )

(४) " सरदारि तुझी ती नको अम्हां !
लखलाभ आमुचा गरिबपणा.
या जगीं आमुचे अम्ही असूं,
अितरांना तैसे अितर दिसूं." ( टेआ ३/१०३ )

'वीजपाअूस' ( सुमौ २५ ) आणि 'मोत्या' ( माशि १५ ) या कविता या कर्णफुल्लजातींत आहेत.

४२ '**राजसा**' [ –। प। + ऽ ᵕ + )

" मन्मानस–हंसा **राजसा**,
कां विषयीं टपशी काकसा ? ध्रु०
जे विषयजनित बघ भोगही
व्यापूनि राहती ही मही
ते प्राप्त कराया धर्मही
सोडूनि बसशि रे भ्याडसा." १ ( पस्वै २९ )

४३ '**अचलगति**', "**बालानन्द**" [। प। – – + ]

( १ ) " दीनजनावन दाशरथी
चरित सरस दे **अचलगती**." ( निक १/३ )

( २ ) " तारकदीक्षा देअुनिया
भजनीं कर्णें लेअुनिया" ( केस्वा–पस १/३५६ )

( ३ ) " दिवस बोलतो, 'अुठा म्हणी'
रात्र, 'विसावा घ्या' म्हणते,
या दों वचनीं दिनरजनी
बहुत सुचविती मज गमतें." ( केक १६२ )

(४) " अजि पुनवेची शारदि रात्
झिङ्गत आला तारानाथ्
आल्या मुखरिणि या बाहेर्
चन्द्राभोवति धरिती फेर्." ( तासक १५० )

केशवस्वामीची या जातीची रचना विपुल आहे. निरञ्जनमाधवकृत 'निर्वोष्ट राघवचरित,' नि निरञ्जनमाधवाच्या श्रीज्ञानेश्वरविजयाच्या ८ व्या अध्यायाचा अुत्तरार्ध हीं या जातींत आहेत. 'भृङ्ग' ( केक ६३ ), 'निर्झरास' ( बाक १४ ), 'कारन्जें' ( च १०३ ) अित्यादि कवितांत अन्तरा नाही. 'हरपलें श्रेय' ( केक १९६ ) या आणि अनेक सुप्रसिद्ध कवितेंत पद्मगणाचा अन्तरा असतो. 'आवाहन मन्त्र' ( तासक २० ) या कवितेंत मात्र अन्तरा [ ।−−+ ] या मात्रावलीचा आहे.

४४ 'अुद्धव' [ −।प।−+ ]

हें नाव मध्वमुनीश्वराच्या 'अुद्धवा शान्तवन कर जा' ( ममुक ६३ ) या सुपरिचित पदावरून घेतलें आहे.

( १ ) " अुद्धवा सुखी आहे की
तो मनमोहन हरि माझा ? ध्रु०

अुद्धवा, जन्मला येथे
हरि, पाहीं त्याची न्हाणी.
या स्थळीं घातलें पायीं
कृष्णास अुष्ण मी पाणी.
अैकुनि त्या हरिशी छळिलें
गोपींचीं बहु गाऱ्हाणीं.
पाठविला धेनूपाठी,
त्याची ही घोङ्गाडि—काठी.
घालितां जेवुं या ताटीं
वदला मज पान्हा पाजा
तो मनमोहन हरि माझा. " १ ( राप्रा-पस ३/२८२ )

( २ ) " दुन्दुभी दुमदुमे भारी,
बिजली जशि चमके स्वारी ! ध्रु०

दुन्दुभी दुमदुमे भारी,
नभमण्डल भरिती भेरी,
किती धुन्द दिशा या चारी !
रणकन्दन माजे भारी ! " १ ( तासक ४७ )

या जातींत अगणित कविता आहेत. ' राजहंस माझा निजला ' ( गोवा ६५ ) आणि तिवारीकृत ' मर्दानी झांशीवाली ' या दोन कविता विशेष प्रसिद्ध आहेत. जळगांवचे कवि द्वा. आ. तिवारी यांची सुप्रसिद्ध सङ्ग्रामगीतें याच अुद्धव जातींत आहेत. ' मुरली ' ( गोवा ९९ ) या कवितेंत, पुढील ध्रुवपद जोडून म्हणतां यावें म्हणून कडव्याच्या अन्तींचा ओकार ऱ्हस्व केला असला तरी तो दीर्घ घ्यायला अडचण नाही. तसें केलें म्हणजे गोविन्दाग्रजांची ' मुरली ' ही सुप्रसिद्ध कविता अुद्धवजातीचीच ठरते.

( ३ ) " हे प्रभो विभो ऽऽ अगाध किति तव करणी ! ध्रु०

चान्दवा नभाचा केला,
रविचन्द्र लटकती त्याला
जणु झुम्बर सुबक छताला,
मग अन्थरिली ही धरणी. " १ ( कोमू )

आणि मग या चालीवरील ' प्रीतीचें गाणें ' ( गिआ १०६ ) हेंहि अुद्धव जातीचेंच ठरतें. आर्षरचनेंत अन्त्य गण केव्हा केव्हा ( ‿ + ) असा आढळतो.

( ४ ) " नग पळून जाअुं तु नारी,
जरा थाम्ब फीर माघारी ! ध्रु०

त्यो मोऽर तू मोरिन
का जातिस त्येला टाकुन
मागं लागून माझा धनी
आला धावत कुत्र्यावानी. " १ ( देमृ ८ )

यशवन्तकृत 'न्याहारीचें गाणें' ( यध १२१ ) ही कुणबाऊ बोलींतील कविता याच प्रकारची आहे.

४५ 'आनन्दरस' [ –।+ऽ ᵕ ––।–+ ]

( १ ) " आनऽन्दरस हा प्याला
भवताऽप शान्तचि झाला. " (?)

( २ ) " कमलांऽत मधुकर आला,
आकऽण्ठ तो मधु प्याला,
तरिहीऽ न तृप्त जहाला,
अुठवेऽ न तेथुनि त्याला. ( बेश्रीगो–यमा ४७–४८/९० )

४६ 'शुद्धसती' [ ।प।–+ ]

( १ ) " शुद्धसतीव्रतवित्ता
अहमतिनिर्मलचित्ता
प्रथयासि सुजनविमुक्तम्
नर्मेदं किमयुक्तम् " ( रूस्तमा २७१ )

( २ ) " नारायण नारायण जय गोविन्द हरे
नारायण नारायण जय गोपाल हरे ध्रु०
करुणा पारावारा
वरुणालय गम्भीरा १
घननीरदसङ्काशा
कृतकलिकल्मषनाशा " २ ( बृस्तो ५१ )

( ३ ) भावें भज त्यासी भज त्यासी. ध्रु०
दाखवि सर्वनिवासी
चिन्मय भाग्यविलासी
केवळ निजसुखराशी
भजनें भवभय नाशी. ( केस्वा–पस १/६९४ )

( ४ ) " विवेक जागा केला म्हणुनी सुख झालें, सुख झालें. ध्रु०
अनुभवतरुवरि चढलों
समाधिडोहीं बुडलों

अद्वयरामीं जडलों
स्वयम्प्रकाशें घडलों." ( केस्वा–पस १।३३२ )

४७ '**पर्वती**' [ नि। प। ◡ + ]

( १ ) " हीच का नानांची **पर्वती** ?
खाली हत्ती झुलती किती !
वाजे सनाअि गोड मञ्जुळ
वाटे गातो की कोकिळ." ( अना १२ )

( २ ) " मी झुरत सदा अन्तरीं, नाथ कधि येतिल गे मन्दिरीं ? ध्रु०
वाजतें हळुच कुठे पाअुल
तीच हो श्रवणांची चाहुल
पडे का अशी मनाला भुल
झालि गत चुकल्या हरिणीपरी." १ ( सोका २८ )

'माझ्या सोपीचा मृत्यु' ( सुमौ ७४ ) ही कविता या पर्वतीजातींतच आहे.

४८ '**भरतखण्ड**' [ –। प। ◡ + ]

( १ ) " हा भरतखण्ड आमुचा ! ध्रु०
त्याच्याचसाठि कीं जगूं
त्याच्याचसाठि की मरूं
जो देव साच आमुचा,
हा **भरतखण्ड** आमुचा." ( टेआ ३/१७६ )

( २ ) " जणु नील मण्यांच्या द्रवीं
पाचूचा पडला खडा,
तेंच हें जुवें जरि खरें,
या खड्यास गेला तडा.
मेघांच्या अजुनी अिथे
स्वागता सज्ज जरि कुडे,
नच दिसती आता परी
हासरीं अिथे स्रावडें."
(माधव–नजी दिवाळी अङ्क १९३५ )

'शोफर' (माअ १९) ही कविता या भरतखण्डजातीची आहे.

पुष्कळदा या जातीच्या पद्यांत त्रिपद्यांची माला असते आणि ध्रुवपदच तेवढें सूर्यकलेचें [।प।‿+,नि।प।‿+] असतें (पृ ३३७ पहा).

(३) "सुरेख सङ्गम किती ऽ कृष्णा भेटलि कोयूनेप्रती. ध्रु०
कििति विशाल तट हें अहा!
प्रिय सखे, अुभी तू रहा,
क्षण येथिल शोभा पहा." १ (मानुक ११९)

पुढील पद्यांत प्राचीन बायकी पद्यांतील शैथिल्याचें अनुकरण आहे.

(४) "गेलें तुझ्यावर जडून् रामा, मन गेलें तुझ्यावर जडून्! ध्रु०
किति नटून् सजून मी आलें!
किति अलङ्कार हे ल्यालें!
किति नाजूक गेलें बाअि होअून्!" १ (गिका ८६)

(५) "सखे गे प्रशान्त किति यामिनी ॥ ही तशीच जलवाहिनी. ध्रु०
ही विशालता कितितरी
तव अुदार हृदयापरी!
करुं विहार चल तीवरी." १ (यध १४५)

१९ 'भुवनसुन्दर' [अु।प।+]

(१) "आरती **भुवनसुन्दराची**
अिन्दिरावरा मुकुन्दाची"

या सुप्रसिद्ध प्राचीन पद्यावरून या जातीचें नांव ठेवण्यांत आलें आहे.

(२) "गड्यांनो, घ्या हरिच्या नामा!
लिहितां कशास ओनामा?" (विप ४९)

(३) "सुकालीं भूमी पेरियली,
फलाशा महा मनीं धरिली." (किग्र ४१९)

या जातीच्या काही पद्यांत (अु।–‿) या मात्रावलीचा अन्तरा असतो. पण
"सन्तत धरि तू सन्मतिला
मनुजा, भज भज यदुपतिला"

आणि " हातीं धरूनि नरा माला
        का रे स्मरशि न रामाला " ? ( खाक ७४ )

या नारायण धोंडदेव खाण्डेकरांच्या दोन कवितांत अन्तरा नाही.

( ४ ) " सुरवर–मधुकरसत्कमला,
        शेजारती करूं तुजला.        ध्रु०
            रञ्जितजटाजूटगङ्गा
            अुमावदनाब्जदृष्टिभृङ्गा
            गुणगणमण्डितभस्माङ्गा
        कोटिरविदीप्ति वदनिं झळके
        फणामणि सर्वाङ्गीं झळके
            जेंवि धगधगित
            वीज झगझगित
            गौरि चकचकित,
        चकवी विधि–हरि–नेत्रांला. १ " ( किग्र ८२ )

" न हे दिन सौख्यविलासाचे " ( विक १२० ) आणि ' नटेश्वराची आरती ' ( तासक १२५ ) या कविता या भुवनसुन्दरजातींत आहेत.

५० **' सिंहनाद '**   [ –।प।+ ]

( १ ) " गोविन्दा रामा हो,
            गोपाळा रामा जी.   ध्रु०
        जय भीमातिरवासा
            भवभऽयहारका जी
        गोकूळगोपवेषा
            रुक्मिणीनायका जी
        दिनबन्धु दीननाथा
            भवतापहारका जी
        पावना विश्वपाळा
            चित्सौख्यदायका जी." ( देक २८ )

(२) " स्वातन्त्र्यदेवतेचा
गाअुं या धन्यवाद;
पर्वणी थोर आली
गर्जवूं **सिंहनाद** !" ध्रु०
सौभाग्यतिलक लावी
हिन्दभू आज भाळीं.
स्वातन्त्र्यमन्दिराची
स्वामिनी पूर्ण झाली
हिमधवल यशोध्वज तो
फडकवी अन्तराळीं,
आजचा दिव्य महिमा
वर्णितां थकति वेद." १ (अुपो ७१)

देवनाथाचें ' सद्गुरू मायबापा । ये त्वरें नाथराया ' हें पद्यहि याच सिंहनाद जातींत आहे.

सङ्गीं निस्सङ्ग महाराष्ट्ररङ्ग हा अेक **पिशङ्ग** ( २६०:)

५१ " **पिशङ्ग** " [ । प । + ]

" भगव्या बाण्याचे
असङ्ख्य रणगाजी
कलिजा रायाचा
परन्तु तानाजी
काटक अुमराठी
मराठि अुमराव
मालुसरा मर्द
रण–रुस्तुमराव
रण–रुस्तुमराव
चौं मुलुखीं नाव." (माधव, सुवर्ण-सप्टेंबर १९३४)

५२ 'रेवती' [ −।−+ऽ−⏑।+ऽऽ+, −।−+ऽ−⏑।+ ]

(१) " रुचती कां तीर्थयात्रा या समयीं त्यास ती ?
मजवरची प्रेमबुद्धी कां हरिची लोपती ?
दादांना अन्धजांची भक्ती कां लागती ?
या कृत्या साह्य होती कां वहिनी रेवती ?" (किग्र ४८७)

(२) " शैवालें युक्त जैसें पङ्कज तें शोभतें,
शशिमाजी लाञ्छनाची बहु शोभा दीसते,
तैशी ही वल्कलाने किति नामी वाटते !
जातीच्या सुन्दरांना काहीही चालतें." (किग्र ३२९)

विनायककृत 'पन्ना' (विक १९) हें काव्य या रेवतीवृत्तांत आहे.

५३ 'धात्री' [⏓⏒।⏓⏒।−−−+।ऽऽ]
५४ 'शारदा' [⏓⏒।⏓⏒।−−−+।ऽऽ⏓⏒।⏓⏒।−⏑+]
५५ 'मोहिनी' वा 'महाराष्ट्रलक्ष्मी' } [⏓⏒।⏓⏒।−−−+।ऽऽ⏓⏒।⏓⏒।++]

५३ धात्री [।⏓⏒।⏓⏒।−−−+।ऽऽ]

" माय–बाप रूपें धरिशी,
योग्य समय पाहुनि देवा,
पूर्ण बालकाशा करिशी. ध्रु०
झोप मुला लागे रात्रीं,
सुखें निजे तें तव गात्रीं,
पाजिशी स्वरस तू धात्री
तृषा त्या नकळतां हरिशी." १ (सुभाल)

५४ 'शारदा' [।⏓⏒।⏓⏒।−−−+।ऽऽ⏓⏒।⏒⏒।−⏑+]

शारदा हें नांव देवलकृत 'जरी कुणा श्रीमन्ताची सून होय शारदा' या चरणावरून दिलें आहे. त्या पद्याच्या कडव्याची घटना निराळीच आहे.

(१) " प्रिया काय घेतां निद्रा मृत्युची भयङ्करा ?
अुठा अहो धीरा वीरा शूरसिंह सुन्दरा ! ध्रु०

सोडुनिया पाठीवरची रक्तमिश्र भाकरी
दोन प्रहर भरले कान्ता, करा चला न्याहरी,
तुम्हांवीण सेना सारी लेश अन्न ना वरी,
अुठा चला येतिल आता शिवप्रभू गम्भिरा !" १ (गोक ४०)

याच कवितेंतलि अितर कडवीं पुढील म्हणजे मोहिनीजातींतील आहेत.

५५ '**मोहिनी**' वा '**महाराष्ट्रलक्ष्मी**' } [ | ⏓ ⏑ | ⏓ ⏑ | — — — + | ऽ ऽ ⏓ ⏑ | ⏓ ⏑ | — + ]

(१) "**महाराष्ट्रलक्ष्मी** मातें जगीं धन्य वाटे,
यशोगीत तीचें गातां मनीं हर्ष दाटे. ध्रु०
पूर्व दिव्य ज्यांचें त्यांना रम्य भाविकाळ,
बोध हाच अितिहासाचा सदासर्वकाळ,
कासया वहावी चिन्ता मनीं मग जहाल ?
रात्र सरे तेव्हा अुगवे दिनहि पूर्ववाटे." १ (विक ६)

(२) "सोड सोड आता अपुल्या गोड **मोहिनी**ला !
मधुर गान अैकायाला जीव हा भुकेला. ध्रु०
जोड नको सारङ्गीची साथ द्यावयाला,
नको गडे वीणेवरती फिरवुं अङ्गुलीला,
सूर नको, ठेवी खाली ठेव सतारीला,
अेक तार ही बोलेना अैकुनी सुराला !" १ (गिका १४३)

'खरें क्षत्रियब्रीद' (विक ११५), आणि 'मनमोहिनी' (यध १०८) अित्यादि कविता या जातींत आहेत.

मोहिनीचें कडवें अेकचरणी असल्यास ध्रुवपद 'परवशता पाश दैवें ज्याच्या गळा लागला' या चरणाप्रमाणे लिहिण्यांत येतें. परन्तु 'ज्याच्या' या शब्दांतील दुसरें अक्षर उच्चारतः लघु आहे. तें तसें लघु रचिल्यास ध्रुवपद जातिदृष्ट्या रेवती या पद्मावर्तनी मात्रावलीचें होतें; अथवा तें [ | — ⏑ ⏑ — | — ⏑ — ⏑ — ⏑ ⏑ — | — ⏑ — ] या भृङ्गावर्तनी मात्रावलीसारखेंहि असेल.

" मज म्हणशी ' भूर जाअूं ' आअी कुठे साङ्ग तें. ध्रु०
थवा पाखरांचा जातो अुडुनि काय तेथे ?" १ (पारा ७०)

" जगताच्या सूत्रधारा लीला तुझी निष्ठुरा ! ध्रु०
विसंवाद निर्मुनि सारा हासशी कठोरा." १ (यग ११०)

## २ अग्न्यावर्तनी

५६ **'जीवकलिका'** [ ᵕ – – – । ᵕ – – – । ᵕ – – – । ᵕ – – + ] २८ मात्रा
५७ **'वल्लभा'** [ – – ᵕ – । – – ᵕ – । – – ᵕ – । – – ᵕ + ] २८ मात्रा
५८ **'मध्यरजनी'** [ । – ᵕ – – । – ᵕ – – । – ᵕ – – । – ᵕ – + ] २८ मात्रा
५९ **'कालगङ्गा'** [ । – ᵕ – – । – ᵕ – – । – ᵕ – – । – ᵕ + ] २६ मात्रा

५६ **'जीवकलिका'** [ ᵕ – – – । ᵕ – – – । ᵕ – – – । ᵕ – – + ]

" जरी तू गोड वाणीने मला अुपदेश करितास
विमल मी जाहलें असतें सकल जाअूनिया दोष;
परी मग **जीवकलिका** ही अकालीं फुलुनि येअील,
तिचा हो गन्ध मग अपुरा, खुरटती पाकळ्या लोल." (दे-निमा १३)

निर्माल्यमाला या पुस्तकांतील पूर्वार्ध ' माला ' म्हणजे सौ. विमलाबाअी देशपाण्डे यांचीं २२ पद्यें या जीवकलिकाजातींत आहेत.

५७ **'वल्लभा'** [ – – ᵕ – । – – ᵕ – । – – ᵕ – । – – ᵕ + ]

(१) "चल वाकुनी बघतेस का ? चल **वल्लभे** बघुं वाकुनी ! ध्रु०
वरती सभोती हें धुकें लाटांवरी लाटा किती
तव कुन्तलीं वस्त्रावरी कणिका हिऱ्यांच्या फेकिती !
वेणींतल्या पुष्पांवरी जलमौक्तिकें झालीं जमा,
मुख रङ्गलें श्रमविव्हले, धरि सिक्तचम्पकविभ्रमा.
—कां हासशी टक लावुनी अधरोष्ठ दांतें रोकुनी—" (गोदल—अुषा ४९)

प्राकृतपैङ्गलांतील हरिगीतिकेचें अुदाहरण याच जातींत बसेल.

(२) " गअ गअअि ढुक्किअ तरणि लुक्किअ
तुरअ तुरअहि जुज्झिआ

रह रहहि मीलिअ धरणि पीलिअ
अप्पपर णहि बुज्झिआ
बल मिलिअ आअिअ पत्ति जाअिअु
कंप गिरिवर सीहरा
अुच्छलअि साअर दीण काअर
बअिर बड्डिअ दीहरा " ( प्रापै १/१९३ )

( ३ ) " सीतावरं गुणसागरं भज सादरं अनुवासरम्
कनकाम्बरं रविभास्करं दमितासुरं करुणाकरम् " (विदप ३६)

गज्जलाञ्जलींतील 'मूक मागणी,' 'तू आणि मी,' 'निर्माल्यसमर्पण,' 'तेथेच,' 'येथेच' आणि 'प्रेमाचा अुदय' (पृ. २५–३०) या कवितांत प्रत्येक गणाच्या पहिल्याच गुरूच्या ठिकाणीं विकल्पाने दोन लघू येत असले तरी त्या कविता या वल्लभाजातींत आहेत असें म्हणायला प्रत्यवाय नाही.

५८ '**मध्यरजनी**' [ – ᴗ – – | – ᴗ – – | – ᴗ – – | – ᴗ – + ]

" जाहली मम **मध्यरजनी**, झोपतों मी गाढ शयनीं. ध्रु०
जाग तू भरदिवस तव ये, तीव्र तापें ताप सखये,
मित्र–मैत्री जोड समयें, विसर मज दे ठाव न मनीं," १ ( सुजी )

" काय घेअुनि करिशि छाया ? ज्योतिवाचुनि दीप वाया ! ध्रु०
सोड सुहृदा तू तृषा ही, हो न अन्तरिं खिन्न काही,
प्रेम देतों घे सदाही, स्नेह जडला सुदृढ व्हाया !" ( सुभा )

५९ '**कालगङ्गा**' [ – ᴗ – – | – ᴗ – – | – ᴗ – – | – ᴗ + ]

" अेकला हा जीव जोंवर फिरत होता या जगीं
अन्धतेने काळ नेअी, जात तिकडे सहजची.
**कालगङ्गा** ओढि सृष्टी काष्ठवत् शून्याप्रती,
प्रीतिमय तव दृष्टिने मज विलग केलें त्यांतुनी." १ ( देनिमा ३७ )

निर्माल्यमाला या ग्रन्थाचा 'निर्माल्य'नामक अुत्तरार्ध म्हणजे रा. पु. य. देशपाण्डे यांचीं २६ पदें हीं या कालगङ्गाजातींत आहेत. 'निशागीत' (माजूग ५१) हेंहि याच कालगङ्गाजातींत आहे.

## ३ भृङ्गावर्तनी

| | | |
|---|---|---|
| ६० | ‘सुखराशि’ | [।भृ।भृ।भृ।भृ।–+] २८ मात्रा |
| ६१ | ‘दासी’ | [।भृ।भृ।भृ।भृ] २४ मात्रा |
| ६२ | ‘मदनरङ्ग’ | [।भृ।भृ।भृ।–⏑+] २३ मात्रा |
| ६३ | ‘परिलीना’ | [।भृ।भृ।भृ।–+] २२ मात्रा |
| ६४ | ‘रुचिरवदना’ | [–।भृ।भृ।भृ।+] २२ मात्रा |
| ६५ | ‘धवलचन्द्रिका’ | [।भृ।भृ।भृ।+] २० मात्रा |
| ६६ | ‘जीवनलहरी’ | [।भृ।भृ] १२ मात्रा |
| ६७ | ‘विनोद’ | [–।–⏑–⏑।–+] १२ मात्रा |
| ६८ | ‘रसना’ | [विनोद द्विरावृत्ता] |
| ६९ | ‘कामदा’ | [।–⏑–⏑।+॥–⏑–⏑।+] |
| ७० | दिण्डी | [⏓⏑।–––।⏓⏑।⏓⏑।–+] |

६० ‘सुखराशि’ [।भृ।भृ।भृ।भ।–+]

थाम्ब जराशी
चपलचरण सखि, जाशी? ध्रु०
मुरड परत, अशी त्वारति, बधिन खचित पळ या दिव्याशी. १
भरुं दे मन, करित मनन मग रेखिन सखि या चित्राशी. २
पुसतिल जन, रमणि कवण? मी म्हणेन केवळ **सुखराशी**.” ३

(तासक १६९)

६१ ‘दासी’ [।भृ।भृ।भृ।भृ]

या जातीचें नाव “दासि असें मानुनिया कार्य मला साङ्गतसे’ (देमृ १९) या पदावरून घेतलें आहे.

(१) “गगनाच्या पोकळींत भिरभिर वारा वाहे,
आनन्दुनि मुक्त मनें पक्षीगण अुडताहे;
वाऱ्यावरि सुटलेले दोन सुबकसे पतङ्ग
विहरोनी भूषविती गगनाचें अन्तरङ्ग.” (कास्फू १२१)

(२) " डोळे हे जुलमि गडे रोखुनि मज पाहुं नका.
जादुगिरी त्यांत पुरी, येथ उभे राहुं नका.
घालुं कशी कशिदा मी ? होती किति साङ्गुं चुका !
बोचे सुअि फिरफिरुनी, वेळ सख्या, जाय फुका.
खळबळ किति होय मनीं !
हसातिल मज सर्वजणी.
येतिल त्या सन्धि बघुनि आग अुगा लावुं नका ! " ( तासक ५ )

६२ 'मदनरङ्ग' [ । भृ । भृ । भृ । - ᵕ + ]

(१) " वदन **मदनरङ्ग**सदन हें त्वदीय सुन्दरी,
नयन रङ्गभूमि तिथे नटत तो नटापरी.
विविध तो करी विलास भूत्रवोनि त्या करीं;
कधि चपलेसम चमके; स्थिर कधी ध्रुवापरी. " ( तासक ३८ )

(२) " गान पुरे हास्य पुरे दूर फेक बासरी;
होवो तिमिरांत लीन ही अुषाहि हासरी. " ( रेक १/१७३ )

'महाराष्ट्र—यशोगीत' ( कुयशो ८१ ) हें याच मदनरङ्ग जातींत आहे.

६३ 'परिलीना' [ । भृ । भृ । भृ । - + ]

(१) " राधे निजकुण्डपयसि तुङ्गीकुरु रङ्गम्
किं च सिञ्च पिञ्छमुकुटमङ्गीकृत भङ्गम्
अस्य पश्य फुल्लकुसुमरचितोज्ज्वलचूडा
भीतिभिरतिनीलनिबिडकुन्तलमनुगूढा
धातुरचितचित्रवीथिरम्भसि **परिलीना**
मालाप्यतिशिथिलवृत्तिरजनि भृङ्गहीना " ( रूस्तमा २८४ )

(२) " घडिघडिघडि चरण तुझे आठवती रामा !
हीन दीन आस तुझी पूर्णकाम आम्हां." ( केशवस्वामी )

(३) " अजुनि चालतोंचि वाट माळ हा सरेना,
विश्रान्तिस्थळ केंव्हा यायचें कळेना.
कुठुनि निघालों, कोठे जायचें न ठावें,

मार्गांतच काय सकळ आयु सरुनि जावें ?
पुरे पुरे ही असली मुशाफरी आता !
या धूळिंत दगडावर टेकिलाच माथा." ( रेक १/४०० )

केशवसुतकृत 'आओीकरिता शोक' ( केक १५९ ) आणि यशवन्तकृत 'झाल्या तिनि सान्जा' ( यग ३६ ) या कविता या परिलीनाजातींत आहेत.

६४ '**रुचिरवद्ना**' [ – । भृ । भृ । भृ । + ]

"तेथेच गड्या, राहि अुभा क्षणभरी तरी
जन नयन मधुर **रुचिर वद्न** पाहुं दे हरी. ध्रु०
बघ टाकुं नको अेकहि रे पुढति पाअुला,
नच घेअि तिळहि पाठीशी तेंवि त्या जला,
मुळि अिकडे ना तिकडे ना वळविं दृष्टिला;
रे स्थिरनयनें स्थिरचरणें स्थिरपणा धरीं." १ (टेआ ३/१३६)

'वेशाखमासिं' ( किग्र ४५२ ), आणि 'प्रीतीस पात्र०' ( किग्र ४६५ ) या पद्यांत कडव्यांतील अन्त्य चरण निराळ्या म्हणजे धवलचन्द्रिका मात्रावलीचा असल्याने त्यांची जाति वेगळी होअून ती विषमजातींत पडते (पुढे कामना पहा).

६५ '**धवलचन्द्रिका**' [ । भृ । भृ । भृ । + ]

( १ ) " धन्य दिवस आज साधुसङ्ग लाधला !
सर्वहि शुभयोग पर्वकाळ साधला. " ( गोव–पस २/३०३ )

( २ ) " **धवलचन्द्रिका**च काय पूर्ण साचली,
सत्पुष्पें अथवा जलरूप पावलीं ?
स्फटिक शिलामन्दिर हें काय भूमिचें,
कीं द्रवलें विमल हास्य चन्द्रमौलिचें,
विरघळले शुभ्र मेघ काय शरदिंचे,
कीं निर्मळ साधुमनें सकळ वितळलीं ? " ( देशाप ४/२ )

गोव-पस ( २/३०५ ), श्रीपाद कृष्ण कोल्हटकरकृत 'महाराष्ट्रगीत,' गोविन्दाग्रजकृत 'निद्रागीत' ( गोवा ३८ ), आणि अुपाध्येकृत 'बाळ' ( अुपो २३ ) अित्यादि कविता या धवलचन्द्रिकाजातींत आहेत. आपल्या 'गोमान्तक'

काव्यांत धावत्या दीर्घ रचनेसाठी या जातीचा अुपयोग महाराष्ट्रभाट विनायकराव सावरकर यांनी करून दाखवून तीस नवें महत्त्व प्राप्त करून दिलें आहे. तथापि ही जाति नवीन आणि स्वकृत आहे अशा समजुतीने त्यांनी तिला वैनायक असें जें नाव दिलें आहे तें योग्य नाही. 'नोहे हा जवन पवन' (देमृ ५५) या पद्याच्या कडव्याची घटना वेगळी असल्याने तें या धवलचन्द्रिकाजातींत बसूं शकत नाही.

६६ '**जीवनलहरी**' [।भृ।भृ]

(१) "अदय हृदय समज नरा
शमन शमन शमन शमन. ध्रु०
अुतराया भवजलधी
वासना समूळ वधीं,
भणभरही विषयिं कधी
रम न, रम न, रम न, रम न." १ (स्वाक ६५)

(२) "एक करीं मधुगीतें
हात तुझा अन्य करीं
शीळ निशा वाजवितें
चन्द्रकला डोअिवरी,
पर्णावर अर्धफुल
वाऱ्यांतुनि गन्ध हले,
स्वर्ग कुठे? स्वर्ग कुठे?" (कुजी)

कुसुमाग्रजकृत जीवनलहरी हें काव्य समग्र आणि 'अन्तरङ्ग अुघडतांना' (पपि १) हीं या जातींत आहेत.

**कडाका** हा अेका कटिबन्धासारखाच धावता पद्यप्रकार आहे. कटाव पद्मावर्तनी असतो तर कडाका हा भृङ्गावर्तनी दिसतो. यमकें चरणान्तच असतात असें नव्हे. तीं चरणादिकहि असतात.

"कृष्णगीत गात गात समाधिस्थ अुभा राहि, शुभाचरणसहित सर्व सुभाषणें आवरोनि नभामधे अुभारिला" अित्यादि (अक ९) पहा.

६७ 'विनोद' [ – | – ᴗ – ᴗ | + ]

" जातां अता कशाला ?
आलांत मग कशाला ?
ही जाळपोळ करुनी
जातां कसे पळोनी ?
हृदयांतल्या हिऱ्याला
जा ठेवुनी हवाला.
कां लागलात जाया ?
केला **विनोद** राया !
मीतूपणा निमाला,
रागावतां कुणाला ? "( घा–मधुमा २३ )

६८ '**रसना**' [ – | – ᴗ – ᴗ | – +, – | – ᴗ – ᴗ | – + ]

" **रसने** न राघवाच्या थोडी यशात गोडी. ध्रु०
निन्दास्तुती जनांच्या, वार्ता वधूधनांच्या,
खोट्या व्यथा मनाच्या, काही न यांत जोडी. "

( मोरुफुका ४/२०६ )

पृ. २९९ वर अनुराग या वृत्ताखाली दिलेलीं अुदाहरणें पहावीत.

६९ **कामदा** [ | – ᴗ – ᴗ | + || – ᴗ – ᴗ | + ]

" कृष्णवस्त्र हें भयद घेअुनी
अखिल विश्वही त्यांत झाकुनी
रमणिसङ्गमा हृदयिं अुत्सुक
जाय अष्टमी-कुमुदनायक. " ( तासक ८ )

ही 'मार्गप्रतीक्षा' नामक कविता सबन्ध या कामदाजातींत आहे. ज्या वृत्ताला कामदा हें नाव केव्हा केव्हा देतात त्याला मन्दारमरन्दचम्पूकाराने दिलेलें मरालिका हें नाव निश्चित केलेलें आहे.

७० **दिण्डी** दोन क्रीडा ( ᴗ –|– – ) वा पुष्प ( –|ᴗ – – )

या गणांच्या मध्ये अेक रगण वा तगण घातल्याने दिण्डीचा चरण सिद्ध होतो.

अन्त्य आणि अुपान्त्य हीं अक्षरें गुरु हवींत; अितरत्र अेका गुरूच्या ठिकाणीं दोन लघू चालतात.

(१) घोष अैका 'ग्यानबा तुकाराम !'
राअुळाची ही वाट सुखाराम !
गूढ भक्तीची दाखवीत लीला
पहा **दिण्डी** चालली पण्ढरीला. (२६१)

(२) "मणी पडिला दाढेसि मकरतोण्डीं
सुखें हस्तेंची काढवेल प्रौढीं;
परी मूर्खांचें चित्त बोधवेना
दुधीं कूर्मीच्या पाळवेल सेना." (तुकाराम पृ. २/५८८)

हें ४२८० वें पद्य द्वादशपदी आहे. वणीकर गोविन्दकवीचें 'काय साङ्गूं सौन्दर्य मानवींचें' (पस २/२९२) आणि आनन्दतनयकृत पूतनावधांतील 'कथा अैके कल्याण कौरवेशा' आणि 'देव जाणे हा भाव सखे माझा' आणि पुढील पद्यहि हीं सारीं दिण्डी जातीचीं आहेत. ध्रुवाख्यानांतील दिण्ड्यांची रचना शिथिल आहे परन्तु अेरव्ही अितकें बान्धेसूद लिहिणाऱ्या रघुनाथपण्डिताच्या दमयन्तीस्वयंवरांतील दिण्ड्यांची रचना शिथिल असावी याचें मात्र आश्चर्य वाटतें.

(३) "रामनामाची गती कोण जाणे ?
जाणताती कैलासपती राणे. ध्रु०
किटकपक्ष्यादी मोक्षपदा जाती
तेथ अितरांची कोण कथा गा ती ?

* * *

मन्त्र माझ्या शिकविला मायबापें,
म्हणे गेलीं आनन्दतनय पापें."

सर्वसङ्ग्रह मासिकांतील पदसङ्ग्रह (१/४)

## ४ हरावर्तनी

७१ ‘ **किङ्किणी** ’ [।— — ᴗ।— — ᴗ।— — ᴗ।— — ᴗ]
७२ ‘ **अविनाशी** ’ [।— — ᴗ।— — ᴗ।— — ᴗ।— —]
७३ ‘**दन्तरुचि**’ [।— ᴗ —।— ᴗ —।— ᴗ —।— ᴗ —।— ᴗ —।— ᴗ —।—+]
७४ ‘ **वरमङ्गला** ’ [।— ᴗ —।— ᴗ —।— ᴗ —।— ᴗ —]
७५ ‘ **सुरमन्दिर** ’ [।— ᴗ —।— ᴗ —]
७६ ‘ **वीणावती** ’ [।ᴗ — —।ᴗ — —।ᴗ — —।ᴗ —]

७१ ‘ **किङ्किणी** ’ [।— — ᴗ।— — ᴗ।— — ᴗ।— — ᴗ]

( १ ) “ णवजलहरेहिं व जललव मुअंतेहिं
दढकढिणपविवलय परिबद्धदन्तेहिं
रणझणिय मणि**किङ्किणी**सोहमाणेहि
अणवरयपरियलिय करडयलदाणेहिं ” ( पुणा ७/१३/१ )

णायकुमारचरिउ या प्राकृत काव्यांत ७ वा सन्धि, १३ वें कडवें, ९ वा सन्धि, २० वें कडवें हीं या जातींत आहेत.

( २ ) “ अुरला दिवस अल्प, घोडें थकुनि चूर
पथ रानिं चढणींत, घर राहिलें दूर. ध्रु०
असशील घरिं आज, तू गे बघत वाट,
प्राण स्वनयनांत, पोटांत काहूर ” ! १ ( तासक २०४ )

७२ ‘ **अविनाशि** ’ [।— — ᴗ।— — ᴗ।— — ᴗ।— —]

“ **अविनाशि** सुख तें ऽ मज पामराला
प्रभु दीअ तर शोक करुं मी कशाला ?
स्वर्गीं नसे दुक्ख, मरणाचि वार्ता
परि प्रीति सुखशान्ति प्रभुची मनाला.” ( अुस ६३५ )

७३ ‘**दन्तरुचि**’ } [।— ᴗ —।— ᴗ —।— ᴗ —।— ᴗ —।— ᴗ —।— ᴗ —।— —]

“ वदसि यदि किञ्चिदपि **दन्तरुचि**कौमुदी हरति दरतिमिरमतिघोरम्
स्फुरदधरसीधवे तववदनचन्द्रमा रोचयति लोचनचकोरम्

सत्यमेवासि यदि सुदति मयि कोपिनी देहि खरनखरशरघातम्
घटय भुजबन्धनं जनय रदखण्डनं यने वा भवति सुखजातम् "

हा ( गीगो १९ वा ) सबन्ध प्रबन्ध या दन्तरुचिजातींत आहे.

७४ '**वरमङ्गला**' [ – ⏑ – । – ⏑ – । – ⏑ – । – ⏑ – ]

वरमङ्गला हें नांव ज्या प्राचीन प्राकृत पद्यावरून दिलें आहे तें पद्य मागे ( पृ. २१-२२ वर ) दिलेंच आहे. येथे काही अेकीकडेला पडलेलीं अुदाहरणें देतों.

( १ ) " विकचकर्णोत्पलस्पर्धितरलेक्षणाः
केलितालक्कणत्कनकमयकङ्कणाः
सरसनखराजिविच्छुरितभुजमण्डलाः
काञ्चिकोल्लासवशदर्शितोरुस्थलाः " * ( सोय १/१५-१६ )

( २ ) " या भविष्याचिया दिव्य कारागिरा
कोण रोधील ? दे कोण कर सागरा ? ध्रु०
शूल राजा, तुझा रक्त त्यांचें पिवो,
गृध्रगण भक्षण्या पुण्यगात्रां शिवो,
दुर्गी त्यांचीं शिरें अधम कुणि लोम्बवो,
अन्त समजूं नको हा नृपा पामरा ! " १ ( तासक १५८ )

गीतगोविन्दांतील १३ वा प्रबन्ध, 'हिन्दभू वाञ्छिते०' ( गोक २४ ), रेन्दाळकरकृत 'अमृतसरिता जिथे गर्जती अुसळती' हें पद्य, 'पूर्णाहुति' ( तासक २०३ ) आणि 'रोहिणीस' ( पारा १०३ ) हीं या वरमङ्गलाजातींत आहेत.

७५ '**सुरमन्दिर**' [ । – ⏑ – । – ⏑ – ]

" अतुल तव कृति अति भ्रमावि मति अीश्वरा ! ध्रु०
वर्षती मेघजल

---

* हें पद्य गद्य समजून गद्यासारखें छापलेलें आहे. परन्तु हें अेक नवीन प्रकारचें पण पद्यच आहे हें Dr. A. Venkatasubbiya यांनी प्रकाशित केलें. वस्तुतः हा पद्यप्रकार नवीन नाही.

शान्तविति भूमितल
सलिल मग त्यजुनि मल
जात **सुरमन्दिरा** ” ( गोवा १ )

‘ वधूवरयोः शुभं भवतु ! ’ ( तासक १८९ ) ही कविता याच जातींत आहे.

७६ ‘ **वीणावती** ’ [ । ᵕ – – । ᵕ – – । ᵕ – – । ᵕ – ]

“ घुमे नाद तो सुन्दरीच्या करीं
मनीं अन्तरींही विराल्या परी
तशा हृदयिंच्या सर्व तारा त्वरें
म्हणूं लागल्या गान अेकस्वरें–
म्हणोनी करीं शान्त झाली गती
विचारान्तरीं लीन **वीणावती**,
तिने अुधळितां नादरत्नाकरा
मनोवृत्ति साऱ्याहि आल्या भरा.” ( गोवा १९६ )

कोल्हटकरांचें ‘ कपोला कपोलाचि अीच्या सरी ’ हें पद्य या वीणावती-जातीचेंच आहे.

## वर्ग २ रा

### अर्धसम जाति

### १ पद्मावर्तनी

७७ ‘ **तामसी** ’ { [ – । प । प । प । प । – + ]
[ – । प । प । – + ]

७८ ‘ **विजयिनी** ’ { [ – । प । प । प । प । – + ]
[ – । – + + ऽ ᵕ । + ]

७९ ‘ **मणिहार** ’ { [ – । प । प । प । प । ᵕ + ]
[ – । प । प । प । ᵕ + ]

८० “ **कुसुमवल्ली** ” { [ । प । प । – + ]
[ । प । प । प । प । – + ]

८१ ‘ **मन्मथसुन्दर** ’ { [ । प । प । प । – – + ]
[ । प । प । प । प ]

८२ 'सदामण्डिता' { [ । प । प ]
[ । प । प । प । — — + ] }

८३ 'सीमारेषा' { [ । प । प । प । — — + ]
[ । प । — — + ] }

८४ 'हरिपद' { [ । प । प । प । + ऽ ᵕ + ]
[ । प । — + ] }

८५ 'विहङ्गमाला' { [ । — — + ऽ ᵕ । + ]
[ । प । प । प । + ऽ ᵕ + ] }

८६ 'श्रीरङ्ग' { [ — । प । प । प । — + ]
[ — । प । प । — + ] }

८७ "विषचषक" { [ — । प । प । — + ]
[ — । प । प । — + , — + । — + ] }

८८ 'मदनमञ्जरी' { [ — । प । प । प । — + ]
[ — । प । — + ] }

८९ 'रत्नमाला' { [ । प । प । प । + ]
[ । प । प । प । — + ] }

९० 'माया' { [ — — । प । — + ]
[ । प । प । प । — + ] }

९१ "रक्षा" { [ । प । प । प । — + ]
[ । प । — + ] }

९२ "गगनचपला" { [ । प । — + ]
[ । प । प । प । — + ] }

९३ 'जन्मभू' { [ — । प । प । प । ᵕ + ]
[ — । प । — + ऽऽ — । प । ᵕ + ] }

९४ 'मुद्रिका' { [ — । प । प । ᵕ + ]
[ — । प । — + ऽऽ — । प । ᵕ + ] }

९५ 'तर्कयुक्ति' { [ — । प । प । प । ᵕ + ]
[ । प । प । प । ᵕ + ] }

९६ 'स्वर्गदारिका' { [ । प । ᵕ + , अ । प । ᵕ + ]
[ — । प । प । प । ᵕ + ] }

९७ 'सवत्सा' { [अु । प । ◡ +]
[– । प । प । प । ◡ +] }

९८ 'राजेश्वरी' { [प । ◡ +, अु । प । ◡ +]
[। प । प । प । ◡ +] }

९९ "रणरङ्ग" { [। प । प । ]
[। प । प । प । ◡ +] }

१०० 'केशवकरणी' { [। प । प । प । ◡ +]
[अु । प । ◡ +] }

१०१ 'जीवनध्वनि' { [अु । प । ◡ +]
[। प । प । प । ◡ +] }

१०२ 'जानकी' { [। प । प । प । ◡ +]
[– । प । ◡ +] }

१०३ 'यदु' { [– । प । ◡ +]
[। प । प । प । ◡ +] }

१०४ 'सत्कीर्ति' { [। प । प । प । ◡ +]
[। प । ◡ +] }

१०५ 'नन्दनन्दन' { [। प । ◡ +]
[। प । प । प । ◡ +] }

१०६ 'नवतरुणी' { [। प । +, अु । प । +]
[– । प । प । प । +] }

१०७ 'शरण' { [– । प । प । प । +]
[– । प । +] }

१०८ 'वल्लिका' { [– – । + ऽ ◡ + ऽ ऽ । +]
[– । प । प । + ऽ ◡ + ऽ ऽ । +] }

१०९ 'सुन्दरयादव' { [प । +, अु । प । +]
[। प । प । प । +] }

११० 'स्वतन्त्र' { [। प । प । प । +]
[। प । +, अु । प । +] }

१११ 'बन्धु' { [। प । प]
[। प । प । प । +] }

| | |
|---|---|
| ११२ 'माधवकरणी' | { [ ।प।प।प।+ ]<br>[ अु।प।+ ] |
| ११३ 'गाधिज' | { [ अु।प।+ ]<br>[ ।प।प।प।+ ] |
| ११४ "मूढा" | { [ ।प।+ ]<br>[ ।प।प।प।+ ] |
| ११५ 'अभिमन्यु' | { [ अु।−+ ]<br>[ ।प।+, अु।प।+ ] |
| ११६ "श्रामती" | { [ ।प।प ]<br>[ ।प।प।प ] |
| ११७ 'आर्योद्धरिणी' | { [ ।प।−−+ ]<br>[ ।प।प।−−+ ] |
| ११८ 'चरणरज' | { [ ।प।प ]<br>[ ।प।−−+ऽ.ऽ।−−+ ] |
| ११९ 'कोमलगात्री' | { [ ।−।−−+ऽऽ।प।−+ ]<br>[ −।प।प।−+ ] |
| १२० 'सर्वगामिनी' | { [ ।−−+ऽऽ।प।−+ ]<br>[ −।प।प।−+ ] |
| १२१ 'सुखकन्द' | { [ −।प।प।−+ ]<br>[ −।प।प।+ ] |
| १२२ 'बालमनीषा' | { [ −−।प।−+ ]<br>[ −।प।प।−+ ] |
| १२३ 'यशोदा' | { [ −।प।प।−+ ]<br>[ −।प।−+ ] |
| १२४ 'मदनशर' | { [ −।प।−+ ]<br>[ −।प।प।−+ ] |
| १२५ 'अक्रूर' | { [ −।−−+ऽऽ।प।−+ ]<br>[ −।प।−+ ] |
| १२६ 'चन्द्रभागा' | { [ ।−−+ऽऽ।प।−+ ]<br>[ −−।−−+ ] |

| | | |
|---|---|---|
| १२७ | ‘श्रीकान्त’ | [− । प । ◡ +]<br>[अु । प । ◡ +] |
| १२८ | ‘विजयश्री’ | [− । − − + ऽ ऽ । प । ◡ +]<br>[− । प । प । ◡ +] |
| १२९ | ‘चिद्घन’ | [− । प । ◡ +]<br>[− । − − + ऽ ऽ । प । ◡ +] |
| १३० | ‘सुमकलिका’ | [। प । +]<br>[− । प । प । +] |
| १३१ | ‘नृपममता’ | [− । प । − +]<br>[− । प । − + , ऽ − ◡ । +] |
| १३२ | ‘मृगपङ्क्ति’ | [− − । − − + ऽऽ । − − + ऽऽ]<br>। प । − +] |
| १३३ | ‘शशिकान्ति’ | [। प । − +]<br>[− । प । प ।] |
| १३४ | ‘शशिचारुमुखी’ | [। प । + ऽ ◡ +]<br>[− । प । + ऽ ◡ +] |
| १३५ | ‘नवरङ्ग’ | [। − − + ऽ ऽ । − − +]<br>[। प । − − +] |
| १३६ | “मुक्ताफलमाला” | [प । − +]<br>[। प । +] |
| १७७ | ‘तामसी’ | [− । प । प । प । प । − +] मदनतल्वार<br>[− । प । प । − +] भूपति |

“ पाहुनी आर्त गणगोत पेटला पोत तयाची
ज्योत तरल जी अुठली
हृदयांत अेकदा तीच कृतीमधि वठली;
**तामसी** शक्तिला लाथ मारुनी मात अैन
जोमांत करीं दर वेळीं
बन्धांत कोण कल्लोळ तिचे कवटाळी ?” ( सा—स्फूमा २।१ )

७८ ‘**विजयिनी**’ { [−।प।प।प।प।−+] खण्डित
[−।−+ऽ−ᵕ।+]

“ तळहातीं टेकुनी ही स्वशिरातें बैसली ! ध्रु०
मस्तकीं केश विखुरले, श्वास चालले, अश्रु
लोटले, गळे जळ खालीं,
चिन्तेने पोळली.
होती ती सिंहासनीं भाग्यशालिनी धनी
**विजयिनी** परी तिज खाली
दुर्दैवें ओढिली.” ( विक ८ )

‘विरही’ ( विक १०५ ) आणि ‘प्रभुराया धाव’ ( अुस ४०६ ) या कविता याच विजयिनीजातींत आहेत.

७९ ‘**मणिहार**’ { [−।प।प।प।प।ᵕ+]
[−।प।प।प।ᵕ+] कमललोचना

“ चट अुठावल्या घनघटा, पडति पटपटा बिन्दु,
कटितटासि बळकट धरा.
आता पूर नद्यासि भरपूर येअिल मग शूर
कसा येतो घरा ?
हा पवन भयङ्कर, भुवनसख्याविण अवन
कोण करि, पवनघनाहुनि बरा
ही शङ्का मज भयकम्पा देति, कुणि सम्पा–
दणि तरि करा.
किति सञ्चित हिनमति वञ्चित मज गडे
किञ्चित् सुख नये दिसून्
अतिसुन्दर तनु, कुच मन्दरगिरिसम, कुन्द–
रदन काय असून्
अशि मण्डित तनु केली खण्डित पति कुठ
धुण्डित बसला रुसून् ?

अकलङ्कित कुल, मन शङ्कित, केलि तनु
अङ्कित मन्मथ घुसून्.
'**मणिहार**' सकल तनुभार, विकल संसार, करिल कोण
पार? कठिण साकडें!
किति चिन्ता करुं भगवन्ता मनामधि? सन्तापुनि
येतें रडें!" (राला ५६)

८० "**कुसुमवल्ली**" { [।प।प।−+] वंशमणि
[।प।प।प।प।−+] कपिवीर

"या वेलीवर फुललें मोहक फूल,
कुणि साङ्गावें प्रभुमस्तकिं हें जाअिल, अथवा
होय तिथेच मलूल?
हा पडलेला दिसतो फत्तर काळा,
कुणि साङ्गावें पडतिल कण्ठीं माळा, किंवा
लाथा नित्य कपाळा?" (फागकु–ज्ञाप्र २३/२/३४)

८१ '**मन्मथसुन्दर**' { [प।प।प।−−+] हरिभगिनी
[।प।प।प।प] वनहरिणी

"**मन्मथसुन्दर** चिन्मय माधव सन्मतिमोहन नीलतनू
ती रतिसन्निभ, कीरगिरा, नवनीरजनेत्र युगाकृति केली
सत्य सनातन नित्यनिरञ्जन कौस्तुभकन्धर लोकमती
पीनकुचा, लघुमीनसुचञ्चल मानवती अभिधान नव्हाळी,
तो स्मर, हे रति, तो घन हे विज, तो तरुनायक हीच लता,
मानवरूप, धरानत होअुनि अनन्दनन्दन वन्दित भाळीं." (आपस ८२ वें)

कवीला आपलें नांव ग्रथित करायचें असल्याने अन्त्यचरणांत भेद पडला आहे. नाहीतर हें मदिरा आणि हेमकला मिळून होणाऱ्या अर्धसमवृत्ताचेंच अुदाहरण झालें असतें.

८२ 'सदामण्डिता' { [ । प । प ] पादाकुलक
[ । प । प । प । – – + ] हरिभगिनी

" ब्रिटॅनिये जय ब्रिटॅनिये ! ध्रु०
जगदीशाची तू प्रिय भारी
तोच दयाघन तव कैवारी, तूहि तयाला वश विनयें. १
किती सङ्कटें आलीं गेलीं,
सोपानासम तीं तुज झालीं, **सदामण्डिता** तू विजयें. २" (टिक २२२)

वा. रा. बोकिल यांची 'प्रेमा नलगे मुळि कारण तें' (माल ५२) ही कविता या सदामण्डिताजातींतच आहे.

८३ 'सीमारेषा' { [ । प । प । प । – – + ] हरिभगिनी
[ । प । – – + ] अचलगति

(१) " चित्रपटावर रम्याकृतिच्या **सीमारेषा** परोपरी
रङ्ग कधी वठतील परी ?" (गोवा ७८)

(२) " वसन्तांतली फुलली वेली पल्लवपाशीं वृक्ष धरी
वठुनी झाला दीन जरी.
सहस्रकर रवि नको, कुमुदिनी हासे बघुनी चन्द्राला
अुरली अेक कला ज्याला." (कुमार–रमा सप्टें० १९२६)

'काही अिङ्ग्रजी कविता वाचून' (गोवा ७६) आणि 'कां?' (गोवा २२९), 'परक्या देशांतील गृहस्था' (अशाक १३२) या कविता या सीमारेषाजातींत आहेत.

८४ 'हरिपद' { [ । प । प । प । + ऽ ॅ + ] प्रियलोचना
[ । प । – + ] शुद्धसती

" **हरिपद**कमलीं निवास बा ऽऽ करिं मम सतत मना रे ! ध्रु०
धन मिळवाया झिजवुनि काया शेवटिं वदशी 'हाय !' रे
सेवुनि धनिकजना रे. १
परवनितेशी लम्पट होशी, ढङ्ग तुझे हे काय रे ?
जाशिल यमसदना रे." २ (खाक ६५)

८५ ‘ **विहङ्गमाला** ’ { [ । — — + ऽ ᵕ । + ]
[ । प । प । प । + ऽ ᵕ + ] प्रियलोचना

“ सुमना डोल रे
**विहङ्गमाला** चित्तविनोदा काढिल मग मधु बोल रे.” (टेआ ३/७१)

८६ ‘ **श्रीरङ्ग** ’ { [ — । प । प । प । — + ] भवानी खण्डित
[ — । प । प । — + ] भूपति

( १ ) “ **श्रीरङ्ग** गोपिकोत्सङ्ग धरुनि करि रङ्ग
हरी हा बाअी !
कुञ्जांत मातला वसन्त साङ्गूं काअी ?” ( राला ८४ )

( २ ) “ कामिनी हंसगामिनी कि सौदामिनी
चमकती व्योमीं,
सखिवृन्द जाति वारुळा गात आरामीं.
लाअुनी अुटण, न्हाअुनी, केस अुदवुनी
गुम्फुनी वेणी
मुद, चन्द्रकोर, केवडा, फुलांची श्रेणी.
सावरुन् मस्तकावरुन् पदर करिं धरुन्
चालतां झोकें
स्मरध्वजा गोल नारळी पाठिवर फडके.
**श्रीरङ्ग**पदाब्जीं दङ्ग पन्त कविभृङ्ग
गुञ्जतो रामीं—
सखिवृन्द जाति वारुळा गात आरामीं.”

( वि. सो. सरवटे वाग्विहार १२९ )

‘ हे मना सोड कल्पना ’ (किग्र ३३६), ‘ सुकुमार असुनि तू फार ’ (किग्र ५७३), माधवानुजकृत ‘ पर्वती ’ ( मानुक ३९ ) अित्यादि कविता या **श्रीरङ्ग** जातींत आहेत, ‘ मला काय मिळालें आहे !’ ( टिक १०३ ) या पद्यांत समचरण केव्हा केव्हा [ — । प । प । + ] असे आहेत.

८७ "**विषचषक**" { [ – । प । प । – + ] भूपति
[ – । प । प । – +, – – । – + ] भवानी

श्रीरङ्गजातीच्या व्यत्ययाने ही विषचषकजाति सिद्ध होते. समचरणांत तिसऱ्या आवर्तनाच्या मध्यावरच तेवढें खण्डन असतें.

"टाकिला पिअुनि अेकदा विषाचा प्याला
प्रीतिचा, तुझ्या हातचा; मीपणा गेला, त्वन्मय झाला.
आन्धळा दाण्डगा बाअी ! मम विश्वास
चढविलें तुला वर देवच तू मम खासऽया समयास."
( घा–मधुमा १० )

या लावणींतील अितर द्विपद्यांतील समचरणांत दोन दोन मात्रा अुण्या आहेत.

८८ '**मदनमञ्जरी**' { [ – । प । प । प । – + ] भवानी
[ – । प । – + ] अुद्धव

( १ ) "ही कामाची तल्वार करिल ज्या वार ठार तो समजा
नव **मदनमञ्जरी** अुमजा." ( देमृ ५४ )

( २ ) "चहुकडे ढगांच्या माळा,
अुभि दरडीवर ती बाला. ध्रु०
वायुची बसे थाप ती, चिरगुटें अुडति, केस भुरभुरती,
कां चढली दरडीवरती !" १ ( तासक १५५ )

ताम्बेकृत 'जगाहून भिन्न' ( तासक ५ ) आणि कुमारयशोदकृत 'आवाहन' 'गोड वेड' ( कुयशो ४, ५९ ) या कविता मदनमञ्जरीजातींत आहेत.

८९ '**रत्नमाला**' { [ । प । प । प । + ] चन्द्रकान्त
[ । प । प । प । – + ] लवङ्गलता

( १ ) "येअी कविबाला भेटाया रसिकाला. ध्रु०
अिन्दु वितरि तिज रुचिर कान्ति निज, अुदधि **रत्नमाला**,
सुगन्ध अर्पी फुलें सुगन्धित, मारुत दावि पथाला."
( टे–आमा जुलै १९२८ )

(२) " ब्रह्माण्ड व्यापुनि उरला, तो हा धर्मसखा अपुला. ध्रु०
ज्या वृक्षाचें मूळ रोविलें शेषशिरावरती
शेवट जाओी भेदुनि गगना, शेषभाग या जगतीं." १(टेआ ३/९२)

९० 'माया' { [– – । प । – +]
[। प । प । प । – +] लवङ्गलता

" **माया** मला भ्रमविते वाया
दया करा, तुजवीण कोण मज अन्य क्षम ताराया?
छाया स्वकृपेची गणराया,
दीन लीन या दासावर कर, पोटीं घे अन्याया.
पायां अर्पण केली काया
ध्यान तुझें मानसा लागलें, अन्य सुचे न जना या." (विक १२८)

गोविन्दकविकृत "कोठे जाशी राष्ट्रप्राणा?" (गोक ३०), आणि 'अवमानिता' (तासक १९०) या कविता या मायाजातींत आहेत.

९१ "रक्षा" { [। प । प । प । – +] लवङ्गलता
[। प । – +] शुद्धसती

" येशि कशाला दारीं
असा अैन दुपारीं? ध्रु०
भीक हवी जरि झोळि रिती परि दिसते कां तरि सारी?
रीत दिसे तव न्यारी!
हुकलें खल्बत, नेओी गल्बत परमुलुखा व्यापारी,
श्रमशी व्यर्थ किनारीं.
राखेचे थर बसुनि जिच्यावर ठिणगी जी पिचणारी,
फुङ्कर तिजसि न मारी." (यग ७०)

९२ "गगनचपला" { [। प । – +] शुद्धसती
[। प । प । प । – +] लवङ्गलता

रक्षाजातीच्या व्यत्ययाने गगनचपलाजाति सिद्ध होते.

(१) चपला गगनीं तुटली
तनमन लागुनि प्राण वेधले चन्द्रज्योत जशि सुटली." (प्रक १९५)

'ध्यान तुझें दिनरजनी' या चरणाने आरम्भित होणारी ही लावणी गगन-चपलाजातींत आहे.

(२) "सा विरहे तव दीना
माधव मनसिजविशिखभयादिव भावनया त्वयि लीना"

हें गीतगोविन्दांतील ८ व्या प्रबन्धाचें ध्रुवपद तेवढें या संयुक्तमात्रावलीचें आहे.

९३ 'जन्मभू' { [–।प।प।प।᳘+] कमललोचना
[–।प।++ऽऽ–।प।᳘+] }

या द्विपदींतील दुसरा चरण मुख्यत्वें पुढील म्हणजे मुद्रिकाजातींत आढळतो. तो [–।प।–+] आणि [–।प।᳘+] अशा दोन मात्रा-वली मिळून होतो. मधला दोन मात्रांचा काल १४ व्या मात्रेवर न घेतां बहुशः १२व्या मात्रेवर घेण्यांत येतो. तसें करावयाचें असेल तरच ११ वी नि १२ वी मात्रा मिळून गुरु अक्षर असावें लागतें.

"मा सान्जफेरि अुरकुनी डोङ्गरावरी निमुट बैसलों,
जन्मभूकडे पाहूनी –० अस्वस्थ क्षणिं जाहलों.
मातींत रोखिले नयन तरल होअून आर्द्र जाहले,
चिमटींत ढिपळ घेवोनी –० वर नभाकडे फेकिले !'

(आ–किमा, जा १९३३)

९४ 'मुद्रिका' { [–।प।प।᳘+] लीलारति
[–।प।++ऽऽ–।प।᳘+] }

या जातिला नाव 'मुद्रिके राम टाकूनि अलिस तू कशी?' या अत्यन्त शिथिल अशा स्त्रीगीतावरून पडलें आहे. हें पद्य जिज्ञासूंस, खण्डेराव विनायक पुरंदरे यांनी प्रकाशित केलेलें 'स्त्रियांचीं गाणीं' या पुस्तकांत २४ व्या पृष्ठावर सापडेल. आधुनिक मराठी कवितेंत या जातींत गाणीं रचायला आरम्भ ताम्बे यांच्या 'तू हुबेहूब साअुली त्याच मूर्तिची' या सरस कवितेच्या प्रसिद्धी-पासून झाला.

(१) "तू हुबेहूब साअुली त्याच मूर्तिची—
हरपली दिवङ्गत झाली –० जी मूर्ति साअुली तिची." (तासक ८९)

या कवितेंत अन्तरा नाही; पण [ –।प।ᵕ+ ] या मात्रावलीचा अन्तरा घातल्याने रमणीयता वाढते.

(२) तू लावण्याची सखे, पुष्पवाटिका—
"ही स्तुति समजूं का टीका–० ही प्रेमचाटुनीति का ?"
कोकिळाच गमशी, गळा तुझा चाङ्गला—
"का सूचवितां मग माझा–० हासुनी वर्ण सावळा ?
निर्दोष अहां का स्वता
मम दोष म्हणुन सुचवितां ?"—
मी बरें कलङ्कित चन्द्र नि तू चन्द्रिका.
ही प्रेमखूण पटली का ?–० घालुं दे स्वर्ण–**मुद्रिका** !" (२६२)

'वियोगिनीचें पुण्यस्मरण' (गिका ७६) ही कविता अशी अन्तऱ्यासह आहे.

९५ '**तर्कयुक्ति**' { [ –।प।प।प।ᵕ+ ] कमललोचना
[ ।प।प।प।ᵕ+ ] समुदितमदना }

"हा जरठकुमारीविवाह शास्त्रें अधमाधम मानिती
नरकपात निश्चयें घडावि तो, **तर्कयुक्ति** शिकविती." (देशा १२).

९६ '**स्वर्गदारिका**' { [ ।प।ᵕ+, अु।प।ᵕ+ ] सूर्यकला
[ –।प।प।प।ᵕ+ ] कमललोचना }

"अहा अुषासुन्दरी पातली, अहा अुषासुन्दरी
ही **स्वर्गदारिका** मुखासि दावित आली अवनीवरी.
दूरी तिमिरावली दवडुनी दूरी तिमिरावली
ही अङ्गिरसांची राणी दावित मार्गो सरसावली.
अयि अुषे देवते नयीं अम्हां जागवीं,
दे साह्य सम्पदा जिङ्कायाला नवी.
अुदार दे वैभवा मनुजसखि, अुदार दे वैभवा,
जें वैभव अमुचें होअिल देवी नवल सदा मानवां"
(भाद–सद्दै १४/६)

पण या पद्यांत शिथिलता आहे. काही द्विपद्या नवतरुणीच्या आहेत.

९७ " सवत्सा " { [ अु । प । ᴗ + ] पर्वती
[ – । प । प । प । ᴗ + ] कमललोचना

" बघा ती पवळी मज हिणविते,
माझ्याच देखतां वत्साला ती रोज रोज पाजिते;
काढिल्या राङ्गोळ्या अङ्गणीं
बाहेरुनि येतां प्रियकर हासे आनन्दाने मनीं." ( सोचौ )

९८ ' राजेश्वरी ' { [ । प । ᴗ +, अु । प । ᴗ + ] सूर्यकला
[ । प । प । प । ᴗ + ] समुदितमदना

( १ ) " रामकृष्ण नरहरी, विठोबा रामकृष्ण नरहरी !
कधि रे कधि रे कधि रे डोळां दाखविशिल पण्ढरी !
( माधव–पस ३/४७३ )

( २ ) " दाविं मला श्रीहरी सखये, दाविं मला श्रीहरी
ललिते नमितें तव पदपङ्कज, दया करी मजवरी. ध्रु०
पातळ हें चन्दिरी सखये, पातळ हें चन्दिरी
गाडे न लागे बाअि, मला गे कञ्चुकि ही भरजरी.
न रुचे कण्ठीं सरी सखये, न रुचे कण्ठीं सरी,
मुदराखडिचा भार होतसे, साजणि माझ्या शिरीं. "( खाक ८२ )

( ३ ) " दूर दिसे टेकडी जेथुनी सूर्य घेतसे अुडी;
राङ्ग पऱ्यांची तेथे राही सदासर्वदा खडी.
बाग तिथे मोहरे, हिण्डती रङ्गित फुलपाखरें;
परागांत रङ्गल्या पऱ्यांचें रूप किती साजिरें !
महाल मोठा भला पऱ्यांनी रमणीस्तव बान्धिला,
शोभा त्याची पाहुनि चित्तीं चन्द्रहि वेडावला.
फूलपाकळ्यावरी दवाच्या चकचकती झालरी,
आणि झोपली मधे पऱ्यांची सुन्दर **राजेश्वरी**. " ( गोत )

'विपस' ( ६ ) आणि अुदासकृत 'काव्याच्या पञ्जरीं' ( दाम ३२ ) या कविताहि या राजेश्वरीजातींत आहेत.

९९ "रणरङ्गा" { [ । प । प ] पादाकुलक
[ । प । प । प । ‿ + ] समुदितमदना

" चल, निशाण धर हें करीं, पुढे चल नेटाने वरिवरी. ध्रु०
युद्ध माजलें चहुंबाजूला
वीराला प्रतिवीरहि भिडला, अुठली दङ्गल खरी. १
सम्शेरींची खणखण चाले,
तुटती भाल्यावरती भाले, चमकुनि बिजलीपरी. " २
(गिका ४५)

१०० 'केशवकरणी' { [ । प । प । प । ‿ + ] समुदितमदना
[ अु । प । ‿ + ] पर्वती

या जातीचें नाव रामजोशीकृत 'केशवकरणी अद्भुत लीला नारायण तो कसा' ( राला १३ ) या पद्यावरून दिलें आहे.

( १ ) " भक्तासाठी तो जगजेठी बसून माळ्यावर
पाखरें अुडवी सारङ्धर " ( तुका-पस १/१३७ )

हें पद्य अधिक जुनें आहे. 'सख्या वसन्तवाता' ( दक १९ ) 'आलिङ्गन' ( रेक १/४७ ), 'बालकवींचें गायन' ( माक ५७ ), 'पाटिल' ( पारा ८ ), 'जिवलगेच्या हृदयासाठी' ( पारा ४५ ) अित्यादि कवितांत अन्तरा नाही. बहुशः [ – । प । प । ‿ + ] या लीलारतिमात्रावलीचा अन्तरा असतो. याचें अुदाहरण मागे ३३८ व्या पृष्ठावर दिलेंच आहे.

१०१ 'जीवनध्वनि' { [ अु । प । ‿ + ] पर्वती
[ । प । प । प । ‿ + ] समुदितमदना

केशवकरणीच्या व्यत्ययाने जीवनध्वनिजाति सिद्ध होते.

" खळखळे प्रीतीची वाहिनी
चहूंकडे मधुमञ्जुळ निघतो कसा **जीवनध्वनी** !
रडशि कां तूच गान भङ्गुनी !
घे धुवुनी गङ्गेंत वाहत्या हात तूहि रङ्गुनी. " (तासक १२९)

'दास्यविमोचन' ( अुस २१९ ), 'हृदयपरीक्षा' ( पपि १०४ ), आणि

'कळी खुडणारास'—( पपि १०६ ) या कविता जीवनध्वनिजातीच्याच आहेत. मात्र विषम चरणांतील आद्यतालकपूर्व गण अुलटून पुढे ढकलिला आहे.

" बापा करुणाकरा अीश्वरा
हा माझा तू म्हणशि जयाला धन्य मनुज तो खरा."

ही द्विपदी वस्तुतः

" अीश्वरा बापा करुणाकरा
हा माझा तू म्हणशि जयाला धन्य मनुज तो खरा "

अशीच आहे.

१०२ 'जानकी' { [ । प । प । प । ᵕ + ] समुदितमदना
[ – । प । ᵕ + ] भरतखण्ड

( १ ) " स्वहित पाहिजे तरि तुज सखया अैक साङ्गतों मती,
स्मर राम **जानकी**–पती." (विपस ६४ वें )

( २ ) " बाळपणींचा काळ सुखाचा आठवतो घडिघडी,
अशि न ये फिरुनि कधि घडी.
किति हौसेने टाकिलि असती त्यांत मागुती अुडी,
परि दुबळी मानवकुडी." ( देशा २२ )

( ३ ) " स्वयंवराच्या समयीं पाहुनि राममूर्ति सावळी
किति लाज मला वाटली !" ( मामाह-कस २/११७ )

१०३ 'यदु' { [ – । प । ᵕ + ] भरतखण्ड
[ । प । प । प । ᵕ + ] समुदितमदना

जानकी जातीचा व्यत्यय पुढील अेकुलत्या अेक पद्यांत पहायला मिळतो :—

" यदु घालुनिया धनुवरी
सरसर ररर बाण सोडितां गिळिले रजनीचरीं." ( पाग )

१०४ 'सत्कीर्ति' { [ । प । प । प । ᵕ + ] समुदितमदना
[ । प । ᵕ + ]

" अकपट होअुनि थोरलहाना समदृष्टीने भजा,
अन्यायपथें न जा.

सदसद्विचार करुनी लोकीं सत्कीर्तीनें सजा,
द्या कोणा नच अिजा.
सत्यवचन राखण्यास न टळा, कथितों या हितगुजा,
व्हा सावध, नच निजा." (अनन्त फन्दी.)

या जातीचा व्यत्यय म्हणजे पुढील पद्याची नन्दनन्दनजाति होय.

१०५ '**नन्दनन्दन**' { [ । प । ⌣ + ]
{ [ । प । प । प । ⌣ + ] समुदितमदना

(१) "नन्दाच्या नन्दना
नवनीरदतनु कोमलगात्रा दानवकुलकन्दना." (देक २९)

(२) "हृदयसागरामधी
कुणी लोटिली आशानौका समजणार हें कधी?
नभांत घनदाट या
कुठुनि बरें हा किरण धावतो? कोण धाडितें तया?"
(मस—रमा ७/११)

ना. धों. ताम्हनकर यांची 'वञ्चना' (स्त्रीमा ७७ वा) ही कविता या नन्द-नन्दनजातींत आहे.

१०६ '**नवतरुणी**' { [ । प । + , अु । प । + ] चन्द्रकला
{ [ – । प । प । प । + ] अरुणप्रभा

या जातीचें नाव 'माळिण नवतरुणी' या पद्यावरून ठेविलें आहे. 'तरुण कुलिन गोरा' हें शारदेंतील पद, 'सृष्टीची करमणुकीची घटका' (टिक ५४) 'प्रियकर हिन्दीस्तान' (टिक २२१), 'देअिं असें वरदान' (अुस २६१ वें) 'वसन्तकाल' (सुमौ ९९) अित्यादि पद्यें याच जातीचीं आहेत. अन्तरा बहुशः [ – । प । प । ⌣ + ] या मात्रावलीचा असतो; पण पुढील पद्यांत तो भूपतिमात्रावलीचा आहे.

"अजुनि किती निजशी—सुन्दरा, अजुनि किती निजशी?
ही प्रभात झाली तरी पुरेशी होय न झोप कशी?

हा प्रभातवायू मन्द सुशीतल वाहे,
चहुंकडे अुषेचें हास्य भरुनिया राहे,
अूठ नेत्र अुघडीं–सुन्दरा, अूठ नेत्र अुघडी,
शुभ शान्तिरसाची चिरमङ्गलमय आहे हीच घडी." (रेक १/२९३)

१०७ '**शरण**' { [ – । प । प । प । + ] अरुणप्रभा
[ – । प । + ] सिंहनाद

" वद जाअुं कुणाला **शरण** करी जो हरण सङ्कटाचें,
मी धरिन चरण त्याचे.
बहु आप्तबन्धु बान्धवां प्रार्थिलें कथुनि दुक्ख मनिंचें,
तें होय विफल साचें. " ( किग्र ४८५ )

१०८ '**वल्लिका**' { [ – – । + ऽ ॅ + ऽऽ । + ]
[ – । प । प । + ऽ ॅ + ऽऽ । + ]

( १ ) तुजविण शान्ति नाही
जीवनज्योति गे स्नेहाविण तव राहिना ही.
भलती केलि कां ही ?
आलिङ्गुनि तरुला सखि बघ खेळे **वल्लिका** ही ! ( २६३ )

( २ ) " अम्हि होअुं । घाऽगऱ्याऽऽाग
अम्हि । वाजूं छुम्छुम् । येतां तुम्ही । नाऽचण्या ऽऽाग
अम्हि होअुं । वऽल्लिकाऽऽाग
अम्हि । हासूं खुदकन् । या तुम्हि कलिका । तोऽडण्याऽऽाग."
( माअ २२ )

१०९ '**सुन्दरयादव**' { [ । प । + , अु । प । + ] चन्द्रकला
[ । प । प । प । + ] चन्द्रकान्त

( १ ) " झडकरि आणा हो–०**सुन्दरयादव** राणा हो,
पञ्चप्राण व्याकुळ झाले हरिविण जाणा हो." (केस्वा–पस १।४८६)

( २ ) " माया जळली का ?–० तिळही ममता नाही का ?
आली पोटीं पोर अेकटी तीही विकतां का ?" ( देशा ६५ )

( ३ ) " गौऽळणी होअूं—० सयांनो, गौऽळणी होअूं
घागरि घेअुनि पाण्यालागी यमुनेला जाअूं." ( माशि २१ )

' जगन्नाथाचा रथोत्सव ' ( सारा १४९ ) हें काव्य या जातींत आहे.

११० '**स्वतन्त्र**' { [ । प । प । प । + ] चन्द्रकान्त
[ । प । +, अु । प । + ] चन्द्रकला }

सुन्दरयादवजातीच्या व्यत्ययाने पुढील पद्याची जाति सिद्ध होते.

" **स्वतन्त्र** होतां देश अुद्या हा शिलेदार होणार्
शिलेदार होणार्—० पगडी शिरावरी चढणार्. " ( टेआ ३/१४९ )

१११ '**बन्धु**' { [ । प । प ] पादाकुलक
[ । प । प । प । + ] चन्द्रकान्त }

" श्रान्ताला या भ्रान्ताला
द्या हो आश्रय तुम्हि मजला. ध्रु०
पापदुक्खमय पन्थीं फिरलों,
सर्व जगाला पाहुनि आलों, ठाव न शान्तीला. १
प्रिय भक्तांनो, न्या हो मजला,
पायीं देवाजीच्या घाला, लावा सेवेला. २
अेकाकी मी नाही आता,
झालों तुमचा **बन्धू** पुरता, मजला साम्भाळा. ३ (अुस ४६२)

' आवाहन ' ( अुस ४५५ ) हें पद्यहि याच जातीचें आहे.

११२ "**माधवकरणी**", '**प्राणसखी**' { [ । प । प । प । + ] चन्द्रकान्त
[ अु । प । + ] भुवनसुन्दर }

( १ ) " **प्राणसखे** राजसे जिवाला लाविलीस झुरणी,
करीं तळमळ अन्तःकरणीं. " ( प्रक २०१ )

( २ ) " रत्न निपजलें तें भूगर्भी पडे अन्धकारीं,
येअी वरी गारगोटी;
रविकिरणें चुम्बिती तिशी, कुतुकती मुलें भारी;
प्रतिष्ठा परि ती का मोठी ?

साधी वाङ्मोहिनी सहज जो असा रसाळ कवी
स्वस्थळीं राही अज्ञात;
चन्द्रशेखरा, तव 'कविता-रति' परी मला झुकवी
फुलाला जसा अुषावात.
रसिक नसेना कुणी ! जन्म ये मला गुलाबाचा,
स्वतःला कां लेखूं तुच्छ ?
ख्रिस्तशिरीं बैसला म्हणुनि का कण्टकमुकुटाचा
होअिल कधी सुमनगुच्छ ?
विहङ्गम होअुनि गाअीन
साद जरि दे वनराअी न;
अिन्द्रधनूस न बघे अभागी कुणी दृष्टिहीन,
म्हणुनि का वैभव तें दीन !" ( माजूस्व २६ )

'अविवेकी हृदयास' ( सुमौ ४४ ), 'वनवासी लोकवीर' ( गोदू २१ ), 'प्रेमळ हृदयास' ( गोदू २३ ), 'अुपासक' ( यध १५५ ) 'वनविहार' ( यज ३६ ) अित्यादि कविता या माधवकरणीजातींत आहेत.

११३ 'गाधिज' { [ अु । प । + ] भुवनसुन्दर
[ । प प । प । + ] चन्द्रकान्त }

माधवकरणीच्या व्यत्ययाने ही गाधिजजाति होते. गाधिज हें नाव 'वसन्तीं बघुनि मेनकेला। गाधिजमुनिने निज सुतपावर अुदकाञ्जलि दिधला'(किग्र ५०१) या पद्यावरून दिलें आहे. मेनका नावाचें स्वतन्त्र वृत्त असल्याने तें नाव या जातीला देतां येणार नाही. पुढील जुनें पद्य थोडें शिथिल आहे.

"चान्दणें काय सुन्दर पडलें ?
त्यांत तुम्हासारखें पाखरूं अवचित सांपडलें. ध्रु०
स्वरुपलावण्य हृदयिं ठसलें,
पदकमलापासून मुखापर्यन्त जिवीं वसलें.
मुलायम चित्र कुठे असलें ?
लिम्बापरि तारुण्य विसाबाविसांत मुसमुसलें." ( प्रक २०२ )

या पद्यांत [ – । प । प । ᵕ + ] या मात्रावलीचा अन्तरा आहे. ‘ बाओी लतिके ! ’ ( दक १६ ) आणि ‘ दयाघन, ज्याचा प्रभु झाला ’ ( रेक १/१८९ ) अित्यादि अनेक कविता या गाधिजजातींत आहेत.

११४ “ मूढा ” { [ । प । + ] पिशङ्ग
[ । प । प । प । + ] चन्द्रकान्त }

“ अगदिच तू वेडी,
वयांत या अविचारमदादिक पुरुषां बहु खोडी.
बघशि न दूरवरी,
स्वयंमन्य ते व्यसनी चञ्चल, बोधाचे वैरी. ” ( देशा २८ )

११५ ‘ अभिमन्यु ” { [ अु । – + ]
[ । प । + , अु । प । + ] चन्द्रकला }

या जातीस नाव ‘ सकाळीं अुठुनी । धर्मानी काय केलें–अभिमन्यूस बोलवीलें’ या पद्यावरून देण्यांत आलें आहे; पण हें पद्य फारच शिथिल आहे.

( १ ) “ मिळाले सन्त
सन्तांचा भार – ० हर्षलें मन माझें फार. ” ( तुका–पस १/१३८ )

( २ ) “ लागला तोबा
तोबा मज बाओी – ० हरिहरविठ्ठलरखुमाओी ! ”
( माधवकवि–पस ३/४६६ )

हीं पद्यें हि फार शिथिल आहेत.

‘ तस्करा हातीं० ’ ( किग्र ४७२ ), ‘ मुशाफिर आम्ही ’ ( तासक ४९ ), ‘ चौघडा झडतो ’ ( तासक ६१ ) आणि गोविंद कवींचें ‘ मुरली ’ हें दीर्घकाव्य ( गोक १०६ ) हीं या अभिमन्युजातींतील पद्यें शुद्ध आहेत.

११६ ‘ श्रीमती ’ { [ । प । प ] पादाकुलक
[ । प । प । प ] अनलज्वाला }

( १ ) “ तू श्रीमन्तिण खरी शोभशिल,
डौल किती येओील तुला ! मग अम्हा विसरशिल.
कधी पालखिंत मिरवत जाशिल,
कधि अम्बारी मेणा कधितरि रथांत बसाशिल ’ ( देशा ५८ )

( २ ) "सङ्गीतार्णवि लीना हो मम गायनलहरी ! ध्रु०
अवचित अुसळे, पुनरपि मिसळे,
मोदफेन का विखरुनि जिरली गायनलहरी !" ( विम १०२ )

( ३ ) " तू नटरङ्गी खरा शोभशी,
नित्यनवीं बहुरूपें अम्बरिं धारण करिशी. "
विष्णुसुत अुम्ब्रजकर ( आमा, जू १९३१ )

' नवयुवती ' ( नाच १९ ) ही कविताहि या श्रीमती जातींतच आहे.

११७ ' **आर्योद्धरिणी** ' { [ । प । – – + ] अचलगति
[ । प । प । – – + ] शुभगङ्गा }

" **आर्योद्धरिणी** श्रीभूजननी ही प्रणती
तुझिया चरणीं. ध्रु०
राष्ट्रामाजी धन्यतमा
अध्यात्माची, सकल कलांची तू जननी. १
तव सेवेशी देह दिला
स्मरुनी आधी शिवरायादी वीर-मणी. २
अुत्कर्षास्तव तव माते,
क्लेशा साहूं, प्राणचि वाहूं तव चरणीं. ३
कुवलयानन्द ( लोशिमा )

११८ ' **चरणरज** ' { [ । प । प ] पादाकुलक
[ । प । – – + ऽ ऽ । – – + ] सुस्वर }

" चरणिं तुझ्या मज देईं रे–० वास हरी ! ध्रु०
चरणतळीं तव कमल विराजे
तेंच करि मज देवा रे–० कल्पवरी. १
मी घालीं ना सङ्कट तुजवरि,
केवळ मज **चरणाचे** रे –० **रजच** करीं. " २ (तासक १७७)

११९ ' **कोमलगात्री** ' { [ – । – – + ऽऽ । प । – + ] जगदीश्वरबाला
[ – । प । प । – + ] भूपति }

( १ ) " या प्रियपात्रा –० सुचिन्ह **कोमलगात्रा**
अजि कुणीकडे तरि दिवस अुगवला चित्रा ?
प्रतिपाळ करा –० राजहंस सुकुमारा,
चालवा स्नेह शेवटवर परम अुदारा. " ( प्रक २०७ )

( २ ) " दम धरूं किती –० राहुनि लहरा येती,
हा मदन, विखारी सर्प छळी अेकान्तीं.
रे मजवाणी –० नसेल दुक्खी कोणी,
किती शहरपुण्यामधि सुखांत निजती प्राणी !" ( प्रक १८३ )

या पद्यांत [ – । प । ᵕ + ] या मात्रावलीचा अन्तरा आहे.

१२० '**सर्वगामिनी**' { [ । – – + ऽऽ । प । – + ] नगराज
[ – । प । प । – + ] भूपति }

" हे काला – ० अगम्य तव ही करणी;
चिन्तिती परन्तु न अन्त काढिती ज्ञानी.
अमित तुझी – ० **सर्वगामिनी** शक्ती,
जो गर्व धरी त्या क्षणांत खर्व करी ती." ( कोगु )

१२१ '**सुखकन्द**' { [ – । प । प । – + ] भूपति
[ – । प । प । + ] सन्तति }

( १ ) " मी दीन जाहलें लीन तुझ्या चरणीं रे
तू आश्रय माझा, समाधान सारें. १
दे मला लाभ आपुला प्रभो, दुक्खाशी
हा लाभ लोपवा सकळ अनिष्टांशी. २
तव छन्द खरा **सुखकन्द** ! तूच मम माय,
तू बाप, सखा तू, तूच बन्धुराय !" ३ ( अुस ३९३ )

( २ ) " नर्तना हर्षवर्तना करीना प्राणी,
नच दुजा अभागी त्यासम जगिं कोणी. ध्रु०
ही धरा दिसे सुस्थिरा तरी ही नाचे
रविभवती चालूं रङ्गण हें हीचें.

हा शशी पहा दिननिशीं पृथ्विच्या भोंती
करि नृत्य, नाचवी तया हिची प्रीती.
हे खगोल वेडे पिसे —० भासती
हे सदा नाचती कसे —० हासती
क्षण विश्रान्तीची नसे —० यां स्मृती.
बघ गडे या ढगाकडे नाचती सारे,
ही नाचे चपला, नाचतात वारे. " ( टिक ९३ )

'नववर्षगीत' ( अुस ६०९ ) हेंहि याच सुखकन्द जातींत आहे.

१२२ "**बालमनीषा**" { [ — — । प । — + ]
[ — । प । प । — + ] भूपति

( १ ) प्रार्थुनि बसतों स्वस्थ न आम्ही,
किति यत्न करुनिही विफलताच परिणामीं !
आणिक, साङ्ग तरी जगदीशा,
पुरविशी काय तू अनुक्त **बालमनीषा** ? ( २६४ )

( २ ) " मजला काय वाटतें व्हावें
कुणि कुणी मला पुसतात, काय साङ्गावें ?
कधि मज गाढव वाटे व्हावें,
अभ्यास सर्व टाकून खूप खेळावें." ( माअ २९ )

१२३ '**यशोदा**' { [ — । प । प । — + ] भूपति
[ — । प । — + ] अुद्धव

( १ ) " कारटा तुझा हा द्वाड **यशोदा** बाअी !
कां पडला अमुचे डाअीं ?
बैसुनिया यमुनेकाठीं डोळे मोडी,
भलतीची घागर फोडी.
सोसावी कुठवर तस्ती ?
कशि टिकल अशाने वस्ती ?
कर याची बन्दोबस्ती, ठायिं ग ठायीं !
हा द्वाड **यशोदा** बाअी !" ( राला ७३ )

(२) " अडकाठि तुला जिवलगा र केली कोणी ?
ये दिवसा नवऱ्यावाणी.
या शहरपुण्यामधि वाजुनि चुकला डङ्का,
न हि मुळीच धरिली शङ्का.
घडुं नये गोष्ट ती सहज अेकान्तीं घडली !
कशि काय तव्हा ते तुझि मज मुर्वत पडली ?
जिवघेणि कठिण ही ममता कुणिकुन नडली ?
पहा प्रभाकराचे छन्द चुनन्दावाणी
रस भरून अक्षर छाणी." (प्रक १७६)

'पहाट' या पुस्तकांतील कान्तकृत 'वञ्चिता' (पृ. ३३) आणि 'गाऱ्हाणें' (पृ. ४८) या कविता यशोदाजातीच्या आहेत.

'ये धावत कृष्णाबाअी' या पद्याच्या चालीवर म्हणून ज्या कविता रचण्यांत येतात त्या यशोदाजातीच्याच असतात, ह्यांत विषमचरणांत दुसऱ्या आवर्तनांतील तिसऱ्या मात्रेनन्तर अेकदा खण्डन असतें.

(३) " हा दीन तुला वनमालि शरण या कालीं,
तुजविणें कोण या वाली" ? (टेआ १/३४)

परन्तु विषमचरण सगळाच खण्डित करायला काय अडचण आहे ?

(४) " नाचते क्षणीं हासते, लोपते, येते,
नववधू मला ती गमते;
आडुनी क्षणीं पाहुनी पळे चपला ती,
लागते कशाला हातीं ?" (नाभा ६)

यशोदाजातीच्या व्यत्ययाने 'मदनशर' जाति सिद्ध होते.

१२४ '**मदनशर**' { [ - । प । - + ] अुद्धव
[ - । प । प । - + ] भूपति }

(१) " हा वसन्त ऋतु अनिवार
करि **मदनशरां**चा मार बहुत बेजार.
आता काय करुं मि संसार ?
सर्पापरि गमती गडे गळ्यामाधि हार." (राला ५९)

(२) "मी साङ्गुनि चुकतें कान्हा
कर सोड, मला दाण्डगेपणा सोसेना." (राला ५४)

१२५ 'अक्रूर' { [ – । – – + ऽ ऽ । प । – + ] जगदीश्वरबाला
{ [ – । प । – + ] अुद्धव

(१) "अजि अक्रुर हा –० नेतो श्रीकृष्णाला
सखे काऽळ वाअिट आला." (अेक जुनें पद्य).

(२) "बा नीज गडे –० नीज गडे लडिवाळा!
निज नीऽज माझ्या बाळा. ध्रु०
बहु दिवसांच्या –० जुन्या कुडाच्या भिन्ती
कुजुनी त्यां भोकें पडती.
त्यांमधुनी त्या –० दाखविती जगताला
दारिद्य आपुलें बाळा.
हें कळकीचें –० जीर्ण मोडकें दार
कर कर कर वाजे फार;
हें दुक्खाने –० कण्हुनी कथी लोकांला
दारिद्य आपुलें बाळा.
वाहतो फटींतुनि वारा,
सुकवी तो अश्रूधारा;
तुज नीज म्हणे सुकुमारा!
हा सूर धरी –० माझ्या या गीताला,
निज नीऽज माझ्या बाळा!" (दक ४६)

या जातींत अनेक सुन्दर कविता आहेत; परन्तु मनोरञ्जनाच्या दुसऱ्या दिवाळीअङ्कांत प्रसिद्ध झालेल्या बालकवीच्या कवितेची आठवण थोड्यांनाच असेल :—

"सुखशयनीं मी –० निजलें होतें बाअी,
स्वप्नें मज पडलीं काही.
त्या स्वप्नांच्या –० मनोमयी लीलांहीं
मन माझें गुङ्गुन जाअी."

१२६ ‘**चन्द्रभागा**’ { [ । – – + ऽ ऽ । प । – + ] नगराज
[ – – । – – + ]

( १ ) “ विठूऽचा –० गजर हरिनामाचा
झेण्डा. रोविला.
वाळ्वण्टीं –० **चन्द्रभागेचे** काठीं
डाऽव माण्डीला. ” ( प्राचीन पद्य )

( २ ) “ निज माझ्या –० छकुल्या चिमण्या राजा !
निज रे लडिवाळा !
बाळ गुणी –० झोप नेलि रे कोणी ?
जो जो जो बाळा ” ! ( तासक १५६ )

१२७ ‘**श्रीकान्त**’ { [ – । प । प । ‿ + ] लीलारति
[ अु । प । ‿ + ] पर्वती

“ दुडदुडा हरी कानडा रिघे मन्दिरीं,
माझी सासु गेलि बाहिरीं.
अेकान्त वेळ **श्रीकान्त** न्याहळुनि बरी,
धावत जवळी आला हरी.
घाली हात गळ्याभीतरीं,
दोहीं करीं कुचांतें धरी,
माझी तोंडियली गरसोळी
निज बळें मला ओढिलें भुरळ घालुन
मोहिलें चित्त कान्ह्यानं ” ( देक १०३ )

अन्त्य चरण मात्र अुद्भव दिसतो !

१२८ ‘**विजयश्री**’ { [ – । – – + ऽऽ । प । ‿ + ]
[ – । प । प । ‿ + ] लीलारति

“ किति अधिर पहा – ० अब्लख घोडा गुणी
मम वाट बघतसे स्वार व्हावया झणी.
ती **विजयश्री** – ० आणिन मी खेचुनी
अम्हि वीर मराठे सदा यशाचे धनी. ” ( सोका ७७ )

१२९ ‘ **चिद्‌घन** ’ { [ – । प । ᵕ + ] भरतखण्ड
[ – । – – + ऽ ऽ । प । ᵕ + ]

“ गुरु मुखेंशि अुमजुनि खुण,
मम आत्मा हा—० देवचि की आपण.
आढळे द्वैत मीपण,
अुप्पर तोरे—० स्वयंसिद्ध स्वरुप **चिद्‌घन.**
असं असतां भ्रमलें पण
हें वृथाच रे—० भुललें चञ्चळ मन.
घे विवेक-अङ्कुश करीं,
मग चहडुनि माथ्यावरी
त्वरें मन-गज हा आवरी
पेलावा सत्ता-करीं
करिं राज्य नको विठ्ठल
मग काळाच्या—० मुखिं माखीं काजळ.” ( देक ८० )

१३० ‘ **सुमकलिका** ’ { [ । प । + ] पिशङ्ग
[ – । प । प । + ] सन्तति

“ गगनांतुनि गळतो
तो बाष्पबिंदु **सुमकलिके**स्तव असतो.
रुचिकर बहु राहे
तो पुष्पांतिल रस मधुपास्तव आहे.
मण्डप लतिकांचा
तो वन्य खगास्तव असे पहा साचा.
प्रीति तशी युवती,
ती तुजमजसाठी अुद्भवली जगतीं.” ( सुमौ ५७ )

१३१ ‘ **नृपममता** ’ { [ – । प । – + ] अुद्धव
[ – । प । – + , – ऽ ᵕ । + ] मालिबाला

या जातीचें नांव ‘ नृपममता रामावरती ’ ( किग्र ५२१ ) या पद्यावरून ठेविलें आहे.

(१) " सुटलासी दीन अनाथा,
धरिलेंसी मृत्यूपन्था शेवटीं. " (दक ५३)

(२) " तव ठाव कळे न विराटा
वर्षे या तुझिया लाटा सागरा.
हें गहन शोकजल सारें
अश्रूंच्या लवणें खारें सागरा. " (च ११४)

या दोन कविता, 'बालानन्दास' (सुमौ २८) आणि 'कवितेंतुनि' (पाशा–माल १११) अित्यादि कविता अशा सरळ आहेत. पण बहुशः कडव्यांतील अुपान्त्य चरण तेवढा [–।प।प।प।–+] भवानी खण्डित असतो. 'यापुढे' (विक ९), 'पहिलें चुम्बन' (गोवा १२५), 'प्रेम आणि मरण' (गोवा ८७) या प्रसिद्ध कविता या प्रकारच्या नृपममताजातींत आहेत. रा. त्र्यम्बक गङ्गाधर घारपुरे यांचें 'लीलेचा संसार' हें दीर्घकाव्य याच प्रकारच्या नृपममताजातींत आहे.

१४२ **'मृगपाङ्क्ति'** { [––।––+ऽऽ।––+ऽऽ।] [प।–+] }

(१) " फुगडी खेऽळ गे –० तू पिङ्गा
आलिस माझ्या सङ्गा.
फुगडी खेऽळ रे –० श्रीरङ्गा
सोडुनि धाङ्गडधिङ्गा. " (तुकाराम–पस १/१६१)

(२) " चारा सोडुनिया –० गोकुळ हें
तरुतलिं बसलें आहे;
तृषितचि **मृगपङ्क्ती** –० बघ पीती
रविकरतप्त जलें ती. " (देमृ ७०)

'बाळा वत्सरा'० (दक ९), 'पाळणा' (बाक ४१), 'रजनीस आव्हान (बाक ८०), 'जादुगारीण (बाक ८५), 'घुङ्गुरवाळा' (गोवा १५१), अित्यादि कविता या मृगपाङ्क्तिजातींत आहेत. मृगपङ्क्तीच्या प्रथमचरणाच्या अुत्तरार्धाला दुसरा चरण जोडून घेअून पूर्वार्धाचा दुसरा चरण केला की चन्द्रभागाजाति होते; वा मृगपाङ्क्तिजाति म्हणजे चन्द्रभागाजातीचा व्यत्यय मानावा.

१३३ ‘**शशिकान्ति**’ { [ । प । – + ] शुद्धसती<br>[ । – प । प ]

भवानी मात्रावली [ – । प । प ॥ प । – + ] दुसऱ्या आवर्तनाच्या अन्तीं तोडून जीं दोन शकलें होतात तीं अुलटवून जोडल्याने ही शशिकान्तिजाति होते.

( १ ) “ अवचित या मेघांनी
**शशिकान्ति** चोरिली सन्धी साधुनि. ” ( देमृ ५५ )

( २ ) “ अरसिक किति हा शेला
त्या सुन्दर तनुला सोडुनि आला ! ” ( किग्र ४८९ )

( ३ ) “ ही का देवी वनिंची,
की लक्ष्मी विचरे मधुमासाची ? ” ( देशाप १ )

‘ ओझरतें दर्शन ’ ( टिक ९९ ) ही कविता या शशिकान्ति जातींत आहे.

१३४ ‘**शशिचारुमुखी**’ { [ । प । + ऽ ᵕ + ]<br>[ – । प । + ऽ ᵕ + ] राजसा

“ नीज न ये नळराजया
तजवीज दिवारजनी जया.

रूप लिहूनि तिचें करीं
अनुरूप म्हणोनि अुरीं धरी.

चार जरी भलता दिसे
**शशिचारुमुखी** ( हि ? ) तया पुसे. ” ( दस्व २९ )

१३५ ‘ **नवरङ्ग** ’ { [ । – – + ऽ ऽ । – – + ]<br>[ । प । – – + ] अचलगति

अूठ मुला –० अूठ मुला !
बघ हा अरुणोदय झाला.

**नवरङ्गी** –० किरणांनी
भूषविली बघ ही अवनी. ” ( बाक ४४ )

टिळककृत ‘ भावधरा –० प्रेमकरा ’ ( बाबोमा ५१/८ ) आणि ‘ सोनावळ ’ ( माक ५ ) या कविता या नवरङ्गजातींत आहेत.

१३७ 'मुक्ताफलमाला' { [ । प । – + ] शुद्धसती<br>[ । प । + ] पिशङ्ग

साहस अेकाचें
तत्फल दुसऱ्याला
कुठली नृपकण्ठीं
मुक्ताफलमाला ? (२६५)

भृङ्गावर्तनी

१३८ 'महालोल' { [ । भृ । भृ । भृ । – + ]<br>[ । भृ । भृ । भृ । भृ ]

१३९ 'प्रफुल्ल' { [ । भृ । भृ । भृ । – ᴗ + ]<br>[ । भृ । – ᴗ + ]

१४० 'हृदयमोहना' { [ । भृ । + ]<br>[ । भृ । भृ । भृ । + ]

१३८ 'महालोल' { [ । भृ । भृ । भृ । – + ] परिलाना<br>[ । भृ । भृ । भृ । भृ ] दासी

"सकलकलाऽऽभिराम कान्त न ये काय करूं ?
विकल हृदय होय सये, साङ्ग किती धीर धरूं ! ध्रु०
सर्व सखा सदय शान्त म्हणाति सन्त ज्याशीं
तोचि आज कठिण, कासयासि ? कसा पार तरूं ?
म्हणाति **महालोल** तशी फोल मात झाली,
डौल कसा नेणवेचि जाण मनस्ताप हरूं." (आपस ९१ वें)

१३९ 'प्रफुल्ल' { [ । भृ । भृ । भृ । – ᴗ + ] मदनरङ्गा<br>[ । भृ । – ᴗ + ]

"(नि) तान्त शान्त चान्दरात पसरली जगावरी,
अुमलली धरा खरी.
रातराणिचा सुमन्ध दरवळे चराचरीं,
ओढ लावि अन्तरीं.

वाटतें प्रफुल्ल काय अन्तरांत जाहलें,
देहभान हरपलें." ( रजनी–सपा ४–१०–३४ )

१४० 'हृदयमोहना' { [ । भृ । + ]
[ । भृ । भृ । भृ । + ] धवलचन्द्रिका

( १ ) "हृदयमोहना !
अजुनि किती अन्त बघशि, देशि यातना ?
दृष्टि आतुरा,
अेकवार दाविं तुझी मूर्ति सुन्दरा !' ( अुपो ४ )

'समर्पण' ( अुपो ६ ) 'गायकास नजराणा' ( यध १३२ ), 'क्षणिक चान्दणें' ( यग ७३ ) अित्यादि कविता या हृदयमोहनाजातींत आहेत. पहिल्या चरणासारखाच आणखी अेक चरण मध्ये घातला तर तो जातिप्रकार विषम होअून तिसऱ्या वर्गात मोडेल ( पुढे जीवितेश्वरी जाति पहा ).

( २ ) 'चन्द्र चवथिचा
रामाच्या ग बागेमध्ये चाफा नवतिचा'.

हें अुदाहरण फार शिथिल आहे.

हरावर्तनी

१४१ 'मोहमाया' { [ । – ᴗ – । – ᴗ – । – ᴗ – । – ᴗ – ]
[ । – ᴗ – । – ᴗ – । – ᴗ – । – ]

( १ ) "अता रामपायीं मना, लाग वेगें
सोशिले बहुत अन्याय मागे. ध्रु०
साधुदर्शन पहा, सतत भजनीं रहा
लाविशी देह जरि कामकाजीं;
रङ्गशी निजपदीं, **मोहमाया**–नदी
आटली जाण घे भाष माझी." ( रङ्गनाथ, पस ३/९८ )

( २ ) "अूठ गोपाळजी जाअिं धेनूकडे
पाहती संवगडे वाट तूझी." ( कृके–पस ३/पृ. १९२ )

( ३ ) " सावळा वर बरा गौर वधुला !
नियम देवादिकीं हाचि परिपाळिला—ध्रु०
गौरतनु जानकी राम घननीळ तो;
रुक्मिणी गोरटी कृष्ण काळा;
शुभ्र गङ्गानदी सागराला वरी,
वीजा मेघास ती घालि माळा." ( देशा ३३ )

( ४ ) " अता शान्त होऔं सख्या, मानसा रे !
विषय विषतुल्य हे मान सारे ! ध्रु०
केलि केलीस तू शैशवीं यौवनीं,
स्त्रीस तू निशिदिनीं मोहलासी;
वागुराबन्धनीं हरिण गुन्ते जसा
गुन्तलासी तसा तद्विलासीं.
वित्तमदमत्तजनचित्तसन्तोषणीं
आप्तजनपोषणीं कावलासी,
ग्रीष्म–भीष्मातपीं सहुनि बहुयातना
पावलोपावलीं पावलासी." ( खाक ६४ )

'शेवटचें प्रेमगीत' ( गोवा २२५ ), 'हृदयेश्वरीस' ( कावि ७० ) 'आराध्य देवतेस' ( माक १ ), वि. ह. आपटेकृत 'घे अुडी' ( आमाला ६ ) अित्यादि कविता या मोहमायाजातींत आहेत.

**वर्ग ३ रा.**

विषमजाति

**प्रकार १ ला**

अेका मात्रावलीचे दोन वा अधिक चरण ( असंयुक्त वा क्वचित् संयुक्त ) आणि दुसऱ्या अेखाद्या मात्रावलीचा अेक ( क्वचित् दोन ) चरण मिळून या प्रकारांत कडवें सिद्ध होतें.

पद्मावर्तनी

पुढील तीन जातींच्या कडव्यांत लवङ्गलता मात्रावलीचें अग्रेसरत्व आहे.

१४२ **'साकी'** { [ ।प।प।प।–+ ] दोन
{ [ ।प।+,अु।प+ ] अेक

१४३ ‘मुनिरमणी’ { [ ।प।प।प।-+ ] दोन
[ ।अु।प।+ ] दोन

१४४ ‘गौतमजाया’ { [ ।प।प।प।-+ ] दोन
[ ।प।-+ ] दोन

१४५ ‘नीलमणि’ { [ -।प।प।प।+ ] दोन वा अधिक
[ -।प।प।प।--+ ] अेक

१४२ साकी { [ ।प।प।प।-+ ] लवङ्गलता दोन
[ ।प।+, अु।प।+ ] चन्द्रकला अेक

भोवतील हें तिमिर करूनी कर्मशून्य मज टाकी
काय करू मी शरण ध्येया, तुज तनुवाङ्मनसा की !
दावी पूर्ण शशी —० अथवा चन्द्रकला मजशी. ( २६६ )

अशा स्फुट साक्या नाटकांतून आढळतात. परन्तु अशा साक्यांची माला क्वचितच कोठें आढळते. ‘सन्ध्याकाळची प्रार्थना’ ( अुस ४२२ ), ‘वेषभूषाकारास सादरार्पित पद्यभूषा’ ( गोवा १२ ) आणि ‘दैन्य न गेलें काही’ ( कोका २/२६६ ) या तीन कवितांत मात्र अशा साक्यांची माला आहे.

“असो क्षण, असो घटिका किंवा दिवस असो तो तूझा
अुसना मजला दिलास देवा, नाही नाही माझा,
परत तुला देतों —० दिन हा वापरिला तव तो. १

विचार केले आज दयाळा, अुचारहि जे केले,
जगीं आज आचार जेवढे माझ्या हातुन झाले
त्यांसह दिवस तुला —० अर्पी, स्वीकारीं याला.” २ (अुस ४२२)

१४३ ‘मुनिरमणी’ { [ ।प।प।प।-+ ] लवङ्गलता दोन
[ अु।प।+ ] भुवनसुन्दर दोन

अेकन्दर ११ कडव्यांच्या मोरोपन्तकृत अहल्योद्धार काव्यांतील ५ वें, ६ वें आणि १० वें हीं कडवीं निराळ्या घटनेचीं आहेत.

( १ ) “राम म्हणे, ‘गुरुराया, हे की साध्वी, मुनिची भार्या.
पाय कसा लावावा ? माझी माता तैशी आर्या.

वाटे सङ्कट हे प्राज्ञा,
कैशी लङ्घावी आज्ञा ?' १

विश्वामित्र म्हणे, 'बा रामा, अीतें म्हणशी माय.
माय न सुख लोकीं पुत्राचा जरि ही लागे पाय.

वत्सा, मातेला नेटें
धावुनि धन्य करीं, भेटें. २

श्रीरामाच्या पदपद्माचा रज साचा स्पर्श-मणी
केली सुवर्णवर्णी पातकलोहमयी **मुनिरमणी**.

स्तविती सुरवरमुनि रामा
शुद्धा अतुला सुखधामा." ३ ( मोस्फुका २/२६-२७)

( २ ) " धेनुमुखी हा व्याघ्रचि किंवा मधुमुख विषघट समजा.
अनुभव येतां रडाल मग की आता यातें अुमजा

पोशिल भरतचि तुम्हांला
जरि तो राज्यपदीं बसला." १ ( किग्र ५५३ )

१४४ '**गौतमजाया**' { [ । प । प । प । - + ] लवङ्गलता दोन
{ [ । प । - + ] शुद्धसती दोन

मोरोपन्तकृत अहिल्योद्धार ( द्वितीय ) ( मोस्फुका २/२५ ) या प्रकरणांतील बहुतेक कडवीं या घटनेचीं आहेत. ही जाति साकीहून भिन्न आहे हें अुघड आहे.

" विश्वामित्रें प्रावृट्काळें करुणामेघश्याम
**गौतमजाया**मरुभूमीप्रति आणियला अभिराम

दीनोद्धारसमर्था
भजकां देशि पुमर्था. १

अिन्द्रें छळिली सती, पतीने कोपें दिधला शाप,
झाली शिळा सुशीळा, आता वारावे सन्ताप.

रामा परमपवित्रा
त्रिभुवनगीतचरित्रा !" २ ( मोस्फुका १/२५ )

१४५ **नीलमणि** { [ – । प । प । प । + ] अरुणप्रभा दोन वा अधिक
[ – । प । प । प । – – + ] विजया अेक

रघुराज जिवीं वरिला –० सये कृतनिश्चय हा धरिला ध्रु०
मज मानवला नवरा नवनीरद**नीलमणी**सरसा,
घनराजित राजसभेंत सभाजनवीक्षणिं केसरिसा,
अुडुमाजि सुधाकर देवि, पुरन्दरकाननिं कल्पगसा,
सखि त्याविण भूपगणीं न गणीं मनिं साङ्ग विकल्प कसा सहसा.” १
( आपस ६५ वें )

‘नळराज हिरा वरिला०’ ( दस्व २३४ ) हे पद्यहि याच जातीचें आहे. आनन्दतनयाच्या पद्यांत पद्माचा ( – ᵕ ᵕ – ᵕ ᵕ ) हाच प्रकार योजिलेला दिसतो. त्यामुळे त्याची रचना वृत्तस्वरूप दिसते. परन्तु जातींत अितर प्रकार चालत नाहीत असें नाही.

पुढील दोन जातींच्या कडव्यांत चन्द्रकान्त मात्रावलीचें अग्रेसरत्व आहे.

१४६ ‘**परेश-श्वसन**’ { [ । प । प । प । + ] दोन वा अधिक
[ । प । +, अु । प । + ] अेक

१४७ ‘**मधुघोष**’ { [ । प । प । प । + ] दोन वा अधिक
[ । प । प । + ] अेक

१४६ ‘**परेश-श्वसन**’ { [ । प । प । प । + ] चन्द्रकान्त तीन
[ । प । +, अु । प । + ] चन्द्रकला अेक

“ श्वसन परेशाचें – ० प्रार्थना **श्वसन परेशाचें** ध्रु०
भक्तांच्या हृदयांत सञ्चरे, परतोनी जाअी,
अन्तःकरणीं प्रेमाग्नीला अुत्तेजन देअी,
ज्वाला त्याची सुरम्य, निर्मल, दिव्य अुभी राही,
ह्या हो ज्वालेचें – ० प्रार्थना नाम असे साचें.” १ ( अुस ३०९ )

ही नारायण वामन टिळकांची सुन्दर कविता तीन कडव्यांची आहे.

१४७ '**मधुघोष**' { [ । प । प । प । + ] चन्द्रकान्त दोन वा अधिक
{ [ । प । प । + ] सन्तति अेक

" चला चला जाअूं — ० जगाचा अुद्धारक पाहूं. ध्रु०
प्रीती आली देह धरोनी आम्हां ताराया,
हस्त धरोनी मृतांस आम्हां पुनरपि अुठवाया,
'जय जय येशू !' ह्या **मधुघोषें** भुवना व्यापाया,
प्रभुला हृदयीं साठवुनी घेअूं. " १ ( अुस ७६ )

हें पद्यहि नारायण वामन टिळकांचेंच आहे.

पुढील दोन जातींच्या कडव्यांत चन्द्रकला मात्रावलीचें अग्रेसरत्व असतें.

१४८ '**सुराभरण**' { [ । प । + , अु । प । + ] दोन वा अधिक
{ [ । प । प । प । प ] अेक

१४९ '**विवशा**' { [ । प । + , अु । प । + ] दोन वा अधिक
{ [ । प । प । प । + ] अेक

१४८ '**सुराभरण**' { [ । प । + , अु । प । + ] चन्द्रकला दोन
{ [ । प । प । प । प ] वनहरिणी अेक

" साम्ब **सुराभरणा** —० आधी नमितों तव चरणां.
विघ्नतमा जो दिनमणि केवळ, करितों मग गणपतिच्या स्मरणा. ध्रु०
रामकथापाकीं —० जडले बहु कवि परि तिस की
आणी या लोकीं —० पहिला कविवर वाल्मीकी;
तत्पद सेवुनि बलवत्कवि या सङ्गीताची करितो रचना. "१ ( किग्र ५४७ )

१४९ '**विवशा**' { [ । प । + , अु । प । + ] चन्द्रकला दोन वा अधिक
{ [ । प । प । प । + ] चन्द्रकान्त अेक

( १ ) " आली दिपवाळी —० गड्यांनो, आली दिपवाळी. ध्रु०
रोज रोज शाळा —० पुरे ती, आला कण्टाळा.
चार दिवस आता —० मनाला कसली ना चिन्ता.
अुडूं बागडूं जशीं पाखरें स्वैर अन्तराळीं. " १ ( मानुक १८६ )

( २ ) " बाल्यींच्या आशा —० भयङ्कर चेटकिणी **विवशा**
मोहाचें जाळें —० पसरुनी करिती वाटोळें.
मोहित होअुनि फसतो मानव करितो दुक्खाला."१ (मानुक २५४)

पुढील चार जातींच्या कडव्यांत भूपतिमात्रावलीचें अग्रेसरत्व असतें.

१५० 'सत्ताधारी' { [ –।प।प।–+ ] दोन वा अधिक
[ –।प।प।प।–+ ] एक }

१५१ 'वनराजी' { [ –।प।प।–+ ] दोन वा अधिक
[ ।प।प।प।᳚+ ] एक }

१५२ 'सृष्टिकवि' { [ –।प।प।–+ ] दोन वा अधिक
[ ।प।प।प।+ ] एक }

१५३ 'महात्मवती' { [ –।प।प।–+ ] दोन वा अधिक
[ –।प।–+ ] एक }

१५४ 'विश्राम' { [ ।–प।–+,ऽऽ–।–+ ] दोन वा अधिक
[ –।प।प।प।+ ] एक }

१५५ 'महती' { [ ।प।प।–+ ] दोन वा अधिक
[ ।प।–+,––।प।–+ ] एक }

१५६ 'ग्रहमाला' { [ ।––+ऽऽ।प।–+ ] दोन वा अधिक
[ ।––+ऽऽ।प।प।–+ ] एक }

१५० 'सत्ताधारी' { [–।प।प।–+] भूपति दोन वा अधिक
[–।प।प।प।–+] भवानी एक }

"लोळती वैभवीं तयां सुखी मानावें
हें तत्त्व जगीं या जरी मान्यता पावे,
परि सत्य आंतलें ज्यांचें त्यांना ठावें—
शान्ती न मनाला म्हणुनी रडती कितीक **सत्ताधारी**." (कास्फू ९९)

काव्यविहारीकृत 'याचना' (कास्फू ९९) ही कविता या सत्ताधारीजातींत आहे.

१५१ 'वनराजी' { [–।प।प।–+] भूपति दोन वा अधिक
[।प।प।प।᳚+] समुदितमदना एक }

"ही अजुनि घोरते किर्रकिर्र **वनराआी**,
वेताळ गस्त नुकताच घालुनी जाआी,
जाळींत वाघ कानोसा घेअुन पाही,
गजर करूं देवाच्या नावें 'जय मल्हारी बळी." ! (पारा ८६

ग. ह. पाटीलकृत 'लुटारूंनी म्हटलेलें गाणें' (पारा ८५) आणि काव्यविहारीकृत 'मान्यांच्या मुलास' (कास्फू ६०) या कविता या वनराजीजातींत आहेत.

१५२ **'सृष्टिकावि'** { [ – । प । प । – + ] भूपति दोन वा अधिक
[ । प । प । प । + ] चन्द्रकान्त अेक वा दोन

(१) "बघ **सृष्टीचे कवि** कसे भरारति गगनीं,
गातात कोणत्या स्वैर सुरांचीं गाणीं,
चल अेकजीव हो लौकर त्यांच्या गानीं
स्वर्गांत साङ्ग मग तेंच आमुच्या कानीं,
सौन्दर्याची द्वाहि फिरविण्या बा तव अवतार,
(मग) अूठ निजशि कां असा ? गड्या रे झोप झालि फार."(गोवा १८७)

गोविन्दाग्रजकृत 'निजलेल्या बालकास' या शिथिल रचनेच्या कवितेंतील हें अेकच (२ रें) कडवें या जातीचें म्हणतां येअील.

(२) "वेळ न कां गुणिबाळा झाला ? झोप किती घेशी ?
सूर्य चालला माध्यान्हासी, अजुनि न कां अुठशी ? ध्रु०
तव चहा निवुनि बघ केव्हाचा हा गेला !
मण्डअीहि आली केव्हाची सदनाला,
नअु वाजुनि गेले, पिता कचेरिंत गेला,
अूठ, रान मोकळें पडे, हो काळ सकळिकांशी." १ (आमो १५)

पां. गो. लोहोकरे यांची ही समग्र कविता पाचवें कडवें वगळल्यास, या सृष्टिकविजातीची आहे.

१५३ **"महात्मवती"** { [ – । प । प । – + ] भूपति दोन वा अधिक
[ – । प । – + ] अुद्धव अेक (क्वचित् दोन)

(१) "वाटलें नाथ हो, तुम्ही अुतरतां खाली
दे असहकारिता हाक तुम्हां ज्या कालीं. ध्रु०
हम्बरडा फोडी आर्त महात्मा जेव्हा
आघात झेलिले घोर अुरावर तेव्हा
त्या यज्ञें द्रवुनी गमे धावलां देवा,
अैकिली आर्त किङ्काळी." १ (तासक १६७)

'लाविलें निराञ्जन तुझ्या पदीं हें भावें' ( गोत–यमा ४०/४२, ) 'मनोगत' ( यज २७ ), 'अभिनयपटूस' ( यग ३८ ) 'शोभतो तुझा संसार'० ( यग- १३३ ) अित्यादि कविता या महात्मवतीजातींत आहेत.

( २ ) " मारिली ग मञ्जुळ मैना
अुडविली कशी ग दैना ! ध्रु०
किति अनन्त फिरती गोल जगाचे ज्यांत,
किति असङ्ख्य तारा, दिनमणि, रजनीकान्त,
जडविलें जवाहिर, चमचम करि दिनरात.
ती अशा प्रदेशीं ताना
घेतसे स्वैर फिरतांना. " १ ( फागक्र–वामा ५/१ )

१५४ 'विश्राम' { [ – । प । – +, ऽऽ – । – + ] दोन वा अधिक
[ – । प । प । प । + ] अरुणप्रभा अेक

" हे घनश्याम श्रीराम वदात्माराम
स्वातन्त्र्य सकलसुखनिधी समर्पुनि कधी पुरविशिल काम् ? ध्रु०
हे पक्षी तरुवरि गाती–० स्वच्छन्दें
काननीं त्यापरी रमती —० मृगवृन्दें,
स्वातन्त्र्यसौख्य सेवीती —० आनन्दें,
मग अम्हालाच कां पारतन्त्र्यपञ्जरीं कोण्डिलें राम् ? १
दण्डुनी दशानन तेव्हा —० कोदण्डें
सुरवृन्द रक्षिला देवा —० आनन्दें,
पाण्डवां राज्य दिधलें त्वां —० गोविन्दें,
मग अम्हांवरिच कां दया न करिशी मुनीन्द्रजन**विश्राम्** ?" २ ( गोक १३ )

'महाराष्ट्रमहिमा' ( सहु २ ) ही कविता या विश्रामजातींत आहे.

१५५ 'महती' { [ । प । प । – + ] वंशमणि दोन वा अधिक
[ । प । – –, – – । प । – – ] शुक्रकला अेक

" महत्त्व भारी आहे या पृथ्वीचें,
त्याहुनि अतिशय या सगळ्या विश्वाचें;

परि तुजमध्ये **महतीचें** जें बीज
त्याहुनि काही मोठी नाही चीज;—
ठसव मनीं हें साचें; बापा, हें वच बहु मोलाचें." (केक १८४)

१५६ '**ग्रहमाला**' { [ । – – + ऽ ऽ । प । – + ] नगराज दोन वा अधिक
[ । – – + ऽ ऽ । प । प । – + ]

" जगदीशा – ० तात असशि कलिकाला;
तटवासी – ० निरखिशि अखिल शिशूंच्या बालिश लीला. ध्रु०
राहु करें – ० झांकि सूर्यनयनांला,
विधु तिमिरीं – ० माण्डि लपण्डावाला,
ही पिङ्गा – ० घालितसे **ग्रहमाला**,
स्वर्गङ्गा – ० तटिं अुडु फुगड्या खेळाति जणि बहु बाला." १ (कोगु)

पुढील सात जातींच्या कडव्यांत लीलारतिमात्रावलीचें अग्रेसरत्व असतें.

१५७ '**जलवाहिनी**' { [ – । प । प । ᴗ + ] दोन वा अधिक
[ । प । प । प । ᴗ + ।। अु । प । ᴗ + ] अेक

१५८ "**चकितहरिणी**" { [ – । प । प । ᴗ + ] दोन वा अधिक
[ – । प । प । ᴗ + ।। अु । प । ᴗ + ] अेक

१५९ '**अुल्लास**' { [ – । प । प । ᴗ + ] दोन वा अधिक
[ । प । प । प । – + ] अेक

१६० '**वरदायिनी**' { [ – । प । प । ᴗ + ] दोन वा अधिक
[ – । प । प । प । ᴗ + ] अेक

१६१ '**बालमुकुन्द**' { [ – । प । प । ᴗ + ] दोन वा अधिक
[ – । ᴗ – ᴗ +, – । ᴗ – ᴗ + ऽ ऽ । प । ᴗ + ] अेक

१६२ '**स्नेहसागर**' { [ – । प । प । ᴗ + ] दोन वा अधिक
[ । प । प । प । ᴗ + ] अेक

१६३ '**जगद्वायक**' { [ – । प । प । ᴗ + ] दोन वा अधिक
[ । प । प । प । + ] अेक

१६४ '**प्रीतिखेल**' { [ – । प । – + ऽ – ᴗ । + ] दोन वा अधिक
[ – । प । प । प । – + ] } संयुक्त चरण
[ – । प । प । – + ] }

१६५ "दैव-ग्रन्थि" { [ ।प।+ऽऽ−−।+ ] दोन वा अधिक
[ ।प।−+ ] एक

१५७ 'जलवाहिनी' { [ −।प।प।⌣+ ] लीलारति दोन वा अधिक
[।प।प।प।⌣+।।अ।प।⌣+ ] एक संयुक्त

"रजनीचें अवगुण्ठन पडलें साऱ्या विश्वावरी,
दाटले मेघहि गगनोदरीं. ध्रु०
सोडूनि गाव ही अुद्ध्व अिमारत जुनी,
किति किर्र रान हें माजे चौबाजुंनी !
खळखळा वाहते मधेच **जलवाहिनी**,
पिसाट वारा तरुपर्णांतुनि फिरुनी भय दाखवी,
माजली भेसुर कोल्हेकुअी" ( गोत )

श्री. ग. दाढे यांची 'गिरणी मालकास' ( भाले १२ ) ही कविता या जलवाहिनी जातींत आहे.

१५८ "चकितहरिणी" { [ −।प।प।⌣+ ] लीलारति दोन वा अधिक
[−।प।प।⌣+।।अ।प।⌣+] एक संयुक्त चरण

"ही पाण्यालागी हण्डा घेअुनि शिरीं
चालते विहिरिकडे सुन्दरी. ध्रु०
हा विहिरीवरती आम्रवृक्ष डोलतो,
कोकीळ ओतुनी कण्ठ बाग भारतो,
कुअि कुअि मोटेचा शब्द मधुनि चालतो,
आसूड सप्पदिशि अैकुनि बैलावरी
सुन्दरी बिचके हरिणीपरी." ( माभा ७६ )

'गोफणवाली' ( माभा ६२ ) आणि 'सुन्दरी' ( माभा ७६ ) या कविता या चकितहरिणीजातींत आहेत.

१५९ 'अुल्लास' { [ −।प।प।⌣+ ] लीलारति दोन वा अधिक
[ ।प।प।प।−+ ] लवङ्गलता एक वा दोन

"हा तुझा अरुण बघ अुगवे पूर्वेकडे,
वद कोण तयाचें गाणें गाअिल गडे ?

हा देवद्वारीं चौघडाहि धडधडे,
करि कोण तुझ्याविण बोल तयाचे खडे ?
तव कवनाची वाट पाहती पहा अुगवलीं किरणें,
गाअुनि गाणीं प्रेमळ त्यां **अुल्लास** तूंच रे देणें." ( गोवा १८६ )

या पद्याचीं अितर कडवीं अशीं नाहीत.

१६० '**वरदायिनी**' { [ – । प । प । ᵕ + ] लीलारति दोन वा अधिक
[ – । प । प । प । ᵕ + ] कमललोचना अेक

" कां अशी अचानक तुझ्या लोचनीं तुडुम्ब भरलीं जळें ? ध्रु०
नुकताच देवते, कौल मला देअुनी
केलेंस मला स्वर्गीय सुखाचा धनी;
ते घुमती मङ्गल अजुनी कानीं ध्वनी
तों व्हावी **वरदायिनी**च कम्पाकुला कशी नाकळे ! " (यज ५६)

'मैना' ( कास्फू ८४ ) ही कविता याच वरदायिनीजातींत आहे. ध्रुवपद मात्र निराळें आहे:–

" पिञ्जऱ्यांत झुरते मैना,
कुणि सोडीना, मन राहीना." ( कास्फू ८४ )

१६१ '**बालमुकुन्द**' { [ – । प । प । ᵕ + ] लीलारति दोन वा अधिक
[ – । ᵕ – ᵕ +, – । ᵕ – ᵕ + ऽऽ । प । ᵕ + ] अेक

या जातीचें नाव 'तुझ्या बालमुकुन्दें अजि बाअी दैना केली' या प्राचीन पद्यावरून घेतलें आहे.

" मज चैन नसे गे कशि मी रिझवूं मना ?
घडि घडी मनीं स्मरण होअुनी – ० सखये दिन जाअिना. ध्रु०
किति लोचन भरले जातांना येथुनी,
किति आंतुन आलें हृदय सखे, दाटुनी,
परि आवरिलें मन होतें किति आंतुनी !
ओतिलें क्षणीं हृदय घेअुनी – ० बाळाच्या चुम्बना." १ (गिका ७५)

द. ग. कुळकर्णी यांची 'अर्पणपत्रिका' ( भाले ३५ ) ही कविता या बालमुकुन्दजातींत आहे. यशवन्तकृत "मज विफल गमे ग जीवित माझें

सखे" या कवितेंत कडव्याची बान्धणी वरीलप्रमाणे नसल्याने त्या कवितेची जाति मात्र बालमुकुन्द होअूं शकत नाही.

१६२ '**स्नेहसागर**' { [ –। प। प। ᵕ + ] लीलारति दोन वा अधिक चरण
[ । प। प। प। ᵕ + ] समुदितमदना अेक

(१) " अहा ही दैववशें लाधली
विपिनीं फिरतां अवचित मजला कण्टककलिता कळी! ध्रु०

करिं धरितां देअी दिव्यगन्धपरिमळा,
अुघडितां नयन करि प्रेमदृष्टिसोहळा,
ओष्ठासि देतसे स्पर्शमोद आगळा,
**स्नेहसागरा** सञ्चित करिते वाटे प्रतिपाकळी." १ (केपगु ५४)

यशवन्तकृत 'प्रतिमालेखन' (यग ८३) आाणि 'शैवालाने आच्छादिलेल्या विहिरीचें गाणें' (२) (यग १०६) हीं या स्नेहसागरजातींतील आहेत. ध्रुवपद मात्र निराळें आहे.

(२) " शैवालानें मला टाकिलें व्यापुनि पुरतेपणीं
गुदमरे जीवहि त्या दडपणीं. ध्रु०

बाहेर वाहते वाऱ्याची झुळझुळ,
लागतां तयाची पुसट कधी चाहुल,
चल-बिचल अन्तरीं करि मजला व्याकुळ,
परी सुटेना मिठी तयाची बसलि जी जखडुनी." १ (यग १०६)

१६३ '**जगद्वायक**' { [ –। प। प। ᵕ + ] लीलारति दोन वा अधिक
[ । प। प। प। + ] चन्द्रकान्त अेक वा दोन

" **जगद्वायका** बालकवे, चल अूठ अूठ आता!
तूच निजशि तरि कोण साङ्ग मग जागवील जगता! ध्रु०

भ्रमभरें विश्व हें सर्व जयामधि बुडे
चल फोडुनि टाकूं ते फसवे बुडबुडे,
मग बसूं जाअुनी कालाच्याही पुढे,
तव सुराबरोबर कोण न यापरि अुडे!

गोविन्दाग्रज कविशि तुजसवें ने देऊनि हाता,
जगद्रायका बालकवे, चल अूठ अूठ आता." १ (गोवा १८६)

१६४ "प्रीतिखेल" { [−।प।−+ऽ−⌣।+] मालिबाला
[−।प।प।प।−+] } दोन वा अधिक
[−।प।प।−+] } अेक संयुक्त चरण

" तुज खेळ वाटली प्रीति मना रे वेड्या,
हो अता तरी खातरी ! जाशिं वाटे त्या ? ध्रु०

हो झुन्जुमुन्जु ती कोठे−० जैं अुषा,
ताऱ्यांस दावि मी बोटें−० दशदिशा,
मिळतील, न वाटे खोटें−० किति नशा !

कुणिकडे दडाले पुढे हिऱ्याचे खडे नभांतुनि साऱ्या ?
हो अुषा प्रखर मध्यान्ह, कुठुनि समजाया ?" १ (तासक ७२)

१६५ "दैव-ग्रन्थि" { [।प।+ऽऽ−−।+] दोन वा अधिक
[।प।−+] अेक

" दैवें गाठ तुझी −० मग पडली,
विवाह हो अपुला −० ते कालीं;
प्रणय नसे पहिला −० तरि अपुलीं
अेकरूप हृदयें −० तीं झालीं,
दिव्यप्रेमें न्हालीं." (सपाजि−माध ५४)

पुढील सतरा जातींच्या कडव्यांत पादाकुलकाचें अग्रेसरत्व आहे.

१६६ 'प्रेमतारका' { [।प।प] दोन वा अधिक
[।प।प।प।−−+॥प।−−+] अेक

१६७ 'आयुर्नौका' { [।प।प] दोन वा अधिक
[।प।प।प।−−+,−।−−+] अेक

१६८ 'कलकल' { [।प।प] दोन वा अधिक
[।प।प।प।+,अु।प।+] अेक

१६९ 'श्यामाराणी' { [।प।प] दोन वा अधिक
[।प।प।प।−−+] अेक

| | |
|---|---|
| १७० 'हृदयेश्वरी' | { [ ।प।प ] दोन वा अधिक<br>[ ।प।प।प।+ऽ᠁+ ] एक |
| १७१ 'स्मर' | { [ ।प।प ] दोन वा अधिक<br>[ ।प।प।प।–+ ] एक |
| १७२ 'सृष्टिलता' | { [ ।प।प ] दोन वा अधिक<br>[ ।प।प।प।᠁+ ] एक |
| १७३ अञ्जनी | { [ ।प।प ] दोन वा अधिक<br>[ ।प।प।प।+ ] एक |
| १७४ 'रतिकेलि' | { [ ।प।प ] दोन वा अधिक<br>[ ।प।+,अु।प।+ ] एक |
| १७५ 'चित्तरञ्जन' | { [ ।प।प ] दोन वा अधिक<br>[ ।प।प।+ऽ᠁+ऽऽ।+ ] एक |
| १७६ 'नयनचकोर' | { [ ।प।प ] दोन वा अधिक<br>[ ।प।प।प ] एक |
| १७७ 'प्रसन्ननयना' | { [ ।प।प ] दोन वा आधिक<br>[ ।प।प।––+ ] एक |
| १७८ 'लतिका' | { [ ।प।प ] दोन वा अधिक<br>[ ।प।प।–+ ] एक |
| १७९ 'युवतिभूषण' | { [ ।प।प ] दोन वा आधिक<br>[ अु।–+ऽऽ–।प।–+ ] एक |
| १८० 'नववधू' | { [ ।प।प ] दोन वा आधिक<br>[ –।प।––+ ] एक |
| १८१ 'वत्सलता' | { [ ।प।प ] दोन<br>[ ।प।––+ ] दोन |
| १८२ 'नागी' | { [ ।प।प ] दोन वा अधिक<br>[ –।प।–+ ] |
| १८३ 'मेघराज' | { [ ।प।प ] दोन<br>[ –।–+ऽ–᠁।+ ] दोन |
| १८४ 'शिवराज' | { [ ।प।प ] दोन वा अधिक<br>[ ।अु।–+ ] एक |

१६६ 'प्रेमतारका' { [ । प । प ] पादाकुलक दोन वा अधिक चरण
{ [ । प । प । प । – – + ऽ ऽ । । प । – – + ]
एक संयुक्त चरण

( १ ) " आयुष्याच्या घनान्धकारीं
हास्यरसें मज रङ्गविणारी
प्रेमतारका अेक मिळे जरि, अुदासवाणा जीव पिसा
हसेल कायमचा अैसा." ( कुक ८५ )

( २ ) " आकाशींचा गुलाब फुलला,
माणिकमोत्यांचा रस भरला,
रङ्गदेवता बनवि तयाला, वास दरवळे चोहिकडे,
देठ दिसेना कुणीकडे." ( दसु–यमा ५/५९ )

१६७ 'आयुनौका' { [ । प । प ] दोन वा अधिक
{ [ । प । प । प । – – +, – । – – + ] अेक

" अकस्मात अुभविशी राजसे अुन्मादक प्रीतिच्या खुणा,
भ्रमविशी मना. ध्रु०
सुकल्या माळावरी अुसळला
पर्जन्याचा झोत अवेळां,
धुन्द काजळ्या रात्रीं दिसला
दीपक चुकल्या वाटसराला,
कालौघामधि परी बहकली आयुनौका पिशापरी,
कशि धरूं तरी ? ( टिविसि–रमा ६/१ )

१६८ 'कलकल' { [ । प । प ] पादाकुलक दोन वा अधिक
{ [ । प । प । प +, अु । प । + ] अेक संयुक्त

" अुशास पर्वत घेअुनि सागर
निद्रा करिती भूशय्येवर
कलकल तालांतून वाहला शान्त रसाचा नाद्
तयाचा स्वप्नामधि पडसाद् ?
सुखशय्येंतिल सागर असला
अथाङ्ग शान्तीने भरलेला

त्यास हलवुनी फुङ्क मारितों दर्याच्या नस्तांत्
नाचती तुफान झन्झावात्." २ ( आ–कगु ४९ )

१६९ 'श्यामाराणी' { [ । प । प ] पादाकुलक दोन वा अधिक
[ । प । प । प । – – + ] अेक (क्वचित् दोन)

'श्यामा राणी गभीर रजनी' ( केक १५२ ) या केशवसुतकृत कवितेवरून या जातीचें नाव घेतलें आहे.

( १ ) "जेव्हा जेव्हा वाढायातें
येअि सुभद्रा ती त्या यतितें
भुलुनि पाहुनी तद्रूपातें तैसे नाना ढङ्ग करी." (किग्र ४९७)

( २ ) "गरिब बिचारा माधुकरी !
दुक्ख तयाला जन्मभरी. ध्रु०
कडक अुन्हाने जीव घाबरे,
कपोल सुकले, घर्मे भिजले
पायीं चटके, तापे डोकें धापा टाकित पळे जरी."१ (राश्री–कि १८)

( ३ ) "नवलाख दिवे हे तुझ्या घरीं,
कां जातिस दुसऱ्याच्या दारीं ? ध्रु०
हा अनन्त पसरला नीलिमा
शान्त गभीर जयाची सुषमा
विभूति ही प्रभुची निस्सीमा नान्दतसे तव शिरावरी." १ (घा–मधुमा १)

( ३ ) शशिवदना म्हणुं कसें तिला मी ?
अुसऱ्या तेजें वदन खुलावि तो निज तेजें सखिमुख विलसे. ध्रु०
शशिच्या अुदरीं जड दगड कसे,
सखिच्या अुदरीं हिरा विलासे,
त्यांतुनि सोज्ज्वल भविष्य हासे, सखि तारकगणसदन कसें !"
( कुमा ५० )

ताम्बे यांची 'प्रणयप्रभा' नावाची जी कविता ( तासक १०६ ) आहे ती वस्तुतः या श्यामाराणीजातीची आहे.

१७० 'हृदयेश्वरी' { [ । प । प ] पादाकुलक दोन वा अधिक
[ । प । प । प । + ऽ ᴗ + ] प्रियलोचना अेक

( १ ) " कां आड सखे तू येऽशि गे ? ध्रु०
दिन बहु झाले तिकडे येअुनि
अन्तःपुरिंचें सुख तें सेवुनि,
असेल त्यांची अुत्कण्ठा मनिं जाअुंदे परतुनि त्यांऽसिगे !" १
( किग्र ३६१ )

पण हें किर्लोस्करांच्या नाटकांतील पद्य देवलांचें आहे.

( २ ) " पाहिलि का सुन्दरी
जनककुमारी कुणि तरी ? ध्रु०
बा अुटजा, तव प्रसन्नतेला
जिचा समागम कारण झाला,
साङ्ग कुठे रे विदेहबाला ती माझी हृदयेश्वरी ?" १ (अुपो ३७)

या जयकृष्ण अुपाध्ये यांच्या कवितेंतील पहिलीं नअू कडवीं शुद्ध रचनेचीं आहेत. अुरलेल्या दोन कडव्यांत थोडें शैथिल्य आहे.

१७१ 'स्मर' { [ । प । प ] पादाकुलक दोन वा अधिक
[ । प । प । प । – + ] लवङ्गलता अेक

( १ ) " साध्य नसे मुनिकन्या मज ही,
परि वेडें मन अैकत नाही. ध्रु०
पाहुनि सखिच्या विविध विलासा
मन घेअी हें बहु विश्वासा,
स्मर जरि तुष्ट न होअी, मी परि बहुसुख यांतचि घेअीं." ( किग्र ३४१ )

( २ ) " कुठुनि सखे वद येशी प्रतिमे ? ध्रु०
अज्ञेयाच्या अन्ध तमांतुनि
की तेजोमय खंब्रह्मांतुनि,
चैतन्याच्या कीं हृदयांतुनि सम्भवुनी स्फुरतेसी ?" ( च–कभा २ )

'मधमाशी' ( मानुक १९२ ), 'प्रभूचा सहवास' ( अुस २९० ), 'धुब-डास' ( गोवा १३ ), 'बन्दिवान् गरुड' ( यध ६५ ), 'केशवसुतास'

(कावि ५१), 'केशवसुतांची कविता वाचून' (कावि ५३), 'हाक' (तासक १८६), 'भैरव' (तासक १८७), 'खटारा' (कास्फू ६९) अित्यादि कविता या स्मरजातींत आहेत.

(३) "आज फिरुनि कां दारिं अुगवला ?
शपथ घेअुनी गेलां त्या दिनिं केलि न कां दुजि नारि ?
(अुगवलां आज फिरुनि कां दारिं ?) ध्रु०
खचित वाटलें याल कधीहि न,
भाजुनि पोळुनि गेलें हें मन,
ओस जाहलें सारें त्रिभुवन, जिती मरें संसारिं." १ (तासक १९८)

येथे 'अुगवलां आज फिरुनि कां दारिं' हा ध्रुवपदाचा भाग कडव्याला जोडून म्हणावयाचा आहे म्हणून कडव्याच्या अन्तींची 'रिं' ऱ्हस्व आहे; पण अमुकच भाग जोडून म्हटला पाहिजे असें नाही. तेव्हा ही 'रीं' दीर्घ समजून पद्याची जाति स्मर ठरवायला काही प्रत्यवाय नाही.

१७२ **सृष्टिलता** { [ ।प।प ] पादाकुलक दोन वा अधिक
[ ।प।प।प।⏑ + ] समुदितमदना एक

(१) "तीच मनोहारिणी
जी ठसलीसे मन्मनीं. ध्रु०
**सृष्टिलते**ची कलिका फुलली,
अनुपम माधुर्यांने भरली,
जिच्या दर्शनीं तटस्थ वृत्ती
भान सर्वही विसरुनि जाती ती युवती पद्मिनी." (केक १९१)

(२) "अूठ गडे सत्वरी–० सेवा शेवटची ही करी. ध्रु०
डाग नको हा वैधव्याचा,
मज सोसेना विरह पतीचा,
केला निश्चय सहगमनाचा अग्नि पेटवीं तरी." (देशाप)

'अुदार चन्द्रा !' (तासक १३७), 'निजल्या तान्ह्यावरी' (तासक १४२), 'फेरीवाला' (तासक १४४), 'पक्षी पिन्जऱ्यांतून अुडाला' (तासक १४४), 'दृष्ट हिला लागली' (तासक १४५), 'विरहांतील चित्तरञ्जन' (तासक

१४६ ), 'डोळ्यांतील जादू' ( तासक १४७ ), 'दे पूर्ण हृदय सुन्दरी' ( तासक १५३ ), 'समर्थांच्या पायाशीं' ( यध ५७ ), 'अनन्ताची आरती' ( सारा १५२ ), 'अुम्बरांतले किडे' ( कास्फू ३८ ) अित्यादि कविता या सृष्टिलताजातींत आहेत. पद्मिनी हें अेका वृत्ताचें नाव असल्याने तें या जातीस देतां येणार नाही.

१७३ '**अञ्जनी**' { [ । प । प ] पादाकुलक दोन वा अधिक
[ । प । प । प । + ] चन्द्रकान्त अेक }

( १ ) " लङ्केहूनि अयोध्ये येतां
रामऽ लक्षूमऽणऽ सीता
हऽनूमन्तें अञ्जनि माता दाखविली रामा "

हें मूळ अञ्जनीचें गीत बसवलिङ्गाने रचिलेलें आहे असें श्री. जगन्नाथ रघुनाथ अजगांवकर म्हणतात; कारण, या गीतांत शेवटीं "मातापुत्रां आलिङ्गन। बसवलिङ्गा समाधान" असे दोन चरण आहेत. या अञ्जनीच्या गीतावरून या जातीला अञ्जनी हें नाव मिळालें आहे.

( २ ) " कपी घेअुनी बसला वीणा,
घूक लागला घेअूं ताना,
रसिक न कोणी जनीं म्हणोनी श्मशान गानागार." १ (टिक १४८)

'पुष्पाप्रत' ( केक ९० ), 'फुलपांखरू' ( केक १५५ ), 'गाण्याचें गाणें' (विक ८६ ), 'दसऱ्याचें सोनें' (विक ९० ), 'सेवा' ( टिक १९१ ) 'लोकमित्र' (टिक १९२) 'बोम्बाबोम्ब' ( टिक २१८ ), 'श्मशानांतलें गाणें' ( गोवा २३), 'अवेळीं ओरडणाऱ्या कोकिळेस' ( गोवा ५० ), 'बागेंत बागडणाऱ्या लहानग्यास' (गोवा ९१ ), 'आशा-निराशा' ( कावि १० ), 'अेकच शान्तिस्थान' ( गिका २८ ), 'अिरलेवाली' ( माभा ५४ ) अित्यादि कविता या अञ्जनीजातींत आहेत.

१७४ '**रतिकेलि**' { [ । प । प ] पादाकुलक दोन वा अधिक
[ । प । +, अु । प । + ] चन्द्रकला अेक }

( १ ) " बघुनि सुभद्रेला —० कसा यति वेडावुनि गेला ! ध्रु०
हस्तांतिल ती गोमुखि गळली,

आशीर्वचनीं जिव्हा चळली,
नासिकाग्र दृष्टीही वळली
निर्लज्जचि झाला —०टकमक मुख तें बघण्याला." (किग्र ४९६)

( २ ) " कपटानृतभूमी —० मायादम्भगेह नामी. ध्रु०
केवळ रतिकेलीचें मन्दिर
सुरतोत्सव सौख्याचें आगर
अैशी गणिकातनु ही सुन्दर
म्हणुनि कामहोमीं —० चतुरे, तोषवि तो कामीं." ( देमृ ५७ )

'हरिमुरलीचा मधुर गीतरव०' ( टेआ ३/८६ ) ही कविता या रतिकेलि-जातींत आहे.

१७५ '**चित्तरञ्जन**' { [ । प । प ] पादाकुलक दोन वा अधिक / [ । प । प । + ऽ ᵕ + ऽ ऽ । + ] अेक }

( १ ) " मारी नाड तमारे हाते प्रभु सम्भाळजो – ० रे
मुजने पोतानो जाणीने प्रभुपद पाळजो – ० रे ध्रु०
पथ्यापथ्य नथी समजातूं
दुक्ख सदैव रहे अुभरातूं
मने हशे शूं थातूं ? नाथ, निहाळ जो – ० रे ( केशव–आभ १९३)

( २ ) " जाअूं याहो खेळायाला चित्ता रञ्जवाया. ध्रु०
कुञ्जवनांमधि गोपस्त्रिया त्या
रञ्जविती हो परमात्म्या त्या
फेर धरूनी छाऽन चित्ता रञ्जवाया." ( अनामक )

१७५ अ '**मुक्ता**' { [ । प । प ] पादाकुलक दोन वा अधिक / [ । प । – – + ऽऽ । प । + ] अेक }

" नका करूं अविचार् !
भार्या नूतन वृद्धपणीं ती व्याधिच देते ताप अपार्. ध्रु०
शक्ति नसोनी मुक्ता हातीं
धरितां प्रबळ हिरावुनि नेती
जरठ पतीची तीच गती –० घ्या मनिं यांतिल सार्" १ (देशा ४७)

नरहर शङ्कर रहाळकर यांच्या 'धिक्कार्'! आणि 'क्षिप्रातीरावर' (रपु १७, १७१) या कविता या मुक्ताजातींत आहेत.

१७६ 'नयनचकोर' { [ । प । प ] पादाकुलक दोन वा अधिक
{ [ । प । प । प ] अनलज्वाला अेक

(१) " जो मम **नयनचकोरा** अिन्दू,
नाही ज्याला मत्सरबिन्दू,
दुर्भाग्ये, तू त्या नच निन्दूं माझ्या रामा. १

रामापरता भेदचि नाही,
दोन्ही मूर्ती अेकचि पाही,
ही मी आण नृपाची वाहीं, नटळे नेमा." २ (किग्र ५७६)

(२) " विनति अेक अजि करित पदाला,
परिस भगिनिच्या प्रेमवचाला या समयाला. ध्रु०
अन्धाराची रजनी सरली,
हसत हसत ही अुषा पातली,
अरुणमीलनीं रङ्गुनि गेली,
विहग काढिती मधुर रवाला या समयाला."

(मस–आमा ऑग १९३१)

१७७ 'प्रसन्ननयना' { [ । प । प ] पादाकुलक दोन वा अधिक
{ [ । प । प । – – + ] शुभगङ्गा अेक

" अेक दरीच्या तोण्डापाशी
बसलों होतों अेके दिवशीं
गाळित दुक्खें मी अश्रूंसी टपाटपा ! १

रम्य चन्द्रिका होती पडली
**प्रसन्ननयना** सृष्टी दिसली
परि मच्चिन्ता वाढत गेली क्षणोक्षणीं." २ (मानुक ६२)

१७८ 'लतिका' { [ । प । प ] पादाकुलक दोन वा अधिक
{ [ । प । प । – + ] वंशमणि अेक

पादाकुलकाचा दुवा [ ।प।प।−+] या मात्रावलीशी जुळतो, [−।प।प।−+] या मात्रावलीशी जुळत नाही. अर्थात् पुढील पद्यांत अन्त्य चरणाच्या आरंभीं छन्दोभङ्ग आहे.

( १ ) "अभिवादन करित निसर्गा सुन्दर शोभा. ध्रु०
प्रभा रवीची करि अर्धाङ्गी,
ज्योत्स्ना ठेवी विधुच्या सङ्गीं,
लतिकेशी तरुच्या अुत्सङ्गीं,
( जो ) वसुन्धरेशी योजी अम्बरभागा." ( कोप्रे )

( २ ) "कां असा साजणी, साङ्ग धडधडे अूर ? ध्रु०
पवन वाहतां तरुशिखरावर
जेवि थरारे ताम्बुस मोहर,
कम्पित होअी त्यापरि अधरऽ
( पा− ) हिलें कोणतें चित्र असें भेसूर ?" ( काकि−यमा ३३ )

१७९ "**युवतिभूषण**" { [ ।प।प। ] पादाकुलक दोन वा अधिक
[ अु।−+, ऽऽ−।प।−+ ]

( १ ) "फुलें वेलीचीं−०भूषणें तशीं युवतीचीं. ध्रु०
नाही कधि गे मी चोरीलीं,
द्विजयज्ञधनें नच मी हरिलीं,
बाळें वित्तार्थ न कधि नेलीं,
रीति चौर्याची−०धरिली ही सुविचाराची." ( देमृ ४१ )

कडव्याच्या तिसऱ्या चरणाच्या अन्तीं आवर्तन पूर्ण असल्याने पुढील चरणांत आद्यतालकपूर्वगण असतां कामा नये पण तो तर येथे पाच मात्रांचा आहे ! येथे छन्दोभङ्ग होतो. पण 'शास्त्रद्रूढिर्बलीयसी !' 'घटोत्कच माया' ( तासक ६४ ) 'आवड आणि प्रेम' ( टिक १०९ ), 'पळाचा भरवसा' ( टिक २०६ ) 'घरांत बसलेल्या काजव्यास' ( गोवा ६ ) अित्यादि कविता या युवतिभूषणजातींत आहेत. आधीचे चरण सोळा मात्रांचे हवे असल्यास ते [ अु।प।ᵕ+ ] या मात्रावलीचे घ्यावेत म्हणजे मग मात्र छन्दोभङ्ग होणार नाही. ( पुढे वधूवल्ली आणि स्वरसुधा पहा. )

युवतिभूषणजातीसारख्या रचनेंत कित्येकदा चौथ्या चरणाचा पूर्वार्धच असतो आणि अुत्तरार्धाच्या ठिकाणीं ध्रुवपदांतील तेवढा भाग आवृत्त करण्यांत येतो. परन्तु तो कडव्याच्या घटनेंत धरितां येत नसल्याने ती जाति वेगळी मानिली पाहिजे. ( खाली १८४ शिवराजजाति पहा ).

१८० '**नववधू**' { [ । प । प । ] पादाकुलक दोन वा अधिक; [ – । प । – – + ] कर्णफुल्ल अेक }

येथे छन्दोभङ्ग होतो; परन्तु ताम्बे यांच्या पुष्कळच लोकप्रिय कविता या जातीच्या असल्याने ती युवतिभूषणजातीप्रमाणेच रूढ झाली आहे.

( १ ) "**नववधू** प्रिया, मी बावरतें;
लाजतें, पुढे सरतें, फिरतें. ध्रु.
मला येथला लागला लळा
सासरिं निघतां दाटला गळा,
बागबगीचा येथला मळा
सोडितां कसें मन चरचरतें !" १ ( तासक ११५ )

ताम्बे यांची 'प्रणयप्रभा' ( तासक १०६ ) ही कविता मात्र या जातीची नसून श्यामाराणीजातीची आहे हें ध्यानांत ठेविलें पाहिजे. अर्थात् नववधू जातीला प्रणयप्रभा म्हणणें चुकीचें होअील.

( २ ) "भिअुं नये मुळींही मना,
संशयी सोड कल्पना. ध्रु०
काल चान्दणें सुन्दर फुललें,
आज गगन मेघांनी भरलें,
निर्दाळोनी ढग हे काळे
झळकेल अुद्या नभिं चन्द्र पुन्हा." ( कास्फू ९७ )

१८१ '**वत्सलता**' { [ । प । प ] पादाकुलक दोन वा अधिक; [ । प । – – + ] अचलगति दोन }

"या हो या हो प्रियजन या हो
जाअुं चला परमेश्वर सदनीं

भक्ती शान्ती धरुनि मनीं
सुन्दर गायन गा वदनीं. १
देवाजीच्या **वत्सलतेला**
अुपमा न जगीं अुपकारांला,
स्मरुनी चित्तीं ते सगळे
प्रेमाश्रूंचीं वाहुं फुलें." २ ( अुस ४५७ )

१८२ "**नागी**" { [ । प । प ] पादाकुलक दोन वा अधिक
[ – । प । – + ] अुद्धव अेक }

( १ ) " नागिणी चपल खलजिव्हा
दुःस्वभावा धरि दावा,
चावेल सन्धि ये जेव्हा. ध्रु०
सुन्दरदाराकरलोभाने
विघ्न विवाहीं केलें त्याने
म्हणातिल, लाञ्छन तें नांवा." १ ( देशा १०७ )

( २ ) " ही आग भडकली खाली !
तज्ज्वाला गगनाला
पोचली आज या कालीं. ध्रु०
किती पोकळ्या कळ्या कोवळ्या,
किती गळाल्या फूलपाकळ्या,
वनता अुद्याना आली." १ ( रपु ७९ )

( ३ ) " मजशी नकळे – ० मी अथवा जन हे चकले. ध्रु०
प्रपञ्च मोठा आप्पलपोटा
परमार्थाचा पथ वा खोटा
पडलें मज गूढ न अुकले." ( विक ८२ )

१८३ '**मेघराज**' { [ । प । प ] पादाकुलक दोन वा अधिक
[ – । – + ऽ – ⏑ । + ] दोन }

" मज ओलावा हवा
सुकलेल्या या जिवा. ध्रु०

कुणा तरी हृदया बिलगावें,
भ्याड मुलापरि झोपीं जावें,
स्वप्न गोड मग बघत रहावें,
आस असे ही जिवा,
कोणि तरी तोषवा. १

या अुतरा **मेघराज** माझे
चाखूं द्या रस ताजे ताजे
तप्त मना करितील गार जे,
प्रेमरवा अैकवा
या मोरा नाचवा." २ ( घा–मधुमा ८ )

१८४ '**शिवराज**' { [ । प । प ] पादाकुलक दोन वा अधिक
[ अु । – + ] }

( १ ) गडावर जाअूं–० **शिवराज**दर्शना लाहूं. ध्रु०
आमचा गुरु श्रीशिवराणा
पुनरुज्जीवन हेतु पुराणा,
महाराष्ट्र वीर्याचा बाणा
सङ्कटीं बाहूं." ( विक ६ )

'शिवराजदर्शन' ( विक ५ ), 'चाललेली घटिका' ( टिक २०७ ), 'मुरली' ( टिक २१४ ), 'आन्धळ्यांची माळ' ( गोवा ३८ ), 'पुनर्जात प्रेमास' ( गोवा ५५ ), 'कवि आणि कैदी' ( गोवा ९४ ), 'मनांतली पाल' ( गोवा १२८ ), 'लाण्डोर' ( गोवा १७२ ) आणि 'जागेपणचें स्वप्न' ( गिका ६३ ) या कविता या प्रकारच्या आहेत.

१८५ '**नगरभूषण**' { [ । प । – – ᵕ + ]
[ । प । + ] }

"जो या **नगरा भूषण** खरा
जैसा भाळीं शोभे हिरा
ज्याच्या सद्गुणगानीं गिरा
रङ्गलि सुजनांची. १

निर्धन असतां धनदापरी
औदार्यानें अङ्गीं धरी,
दुर्दैवानें छळिलें तरी
शील न सोडी जो." २ ( देमृ २६ )

यांतील पहिले तीन चरण [ - - । प । ‿ + ] या मात्रावलीचे आहेत असेंहि म्हणतां येअील.

पुढील चार जातींच्या कडव्यांत अचलगतिमात्रावलीचें अग्रेसरत्व आहे.

१८६ '**अलकभार**' { [ । प । - - + ] दोन वा अधिक
[ । प । प । प । प । - - + ] अेक }

१८७ '**रामरसायन**' { [ । प । - - + ] दोन वा अधिक
[ । प । प । प । - - + ] अेक }

१८८ '**श्रद्धा**' { [ । प । - - + ] दोन वा अधिक
[ । प । प । प । - + ] अेक }

१८९ '**परात्परकरुणा**' { [ । प । - - + ] दोन वा अधिक
[ । प । प । प । + ] अेक }

१८६ '**अलकभार**' { [ । प । - - + ] अचलगति दोन वा अधिक
[ । प । प । प । प । - - + ] अेक }

( १ ) " भलतयाहि जीवा राऽमनामचि तारी. ध्रु०
योगयागहिमपर्वत रे
त्यांत साधक न सर्व तरे
सर्व गमे गुरु गर्व होय अघ पर्व त्यांत कवि सर्वेहि
म्हणती रामनाम." १ ( मोप्र १।९९ )

( २ ) " चान्द बिजेचा नभावरी
पाहुनि अुमले विभावरी,
कवळुनि बसली दारापाशी पाय घेअिना पुढे मुळी, ही
नाव खुळी. " १ (आ-कगु ५९)

(३) “ सख्या साजणा, बघा गडे
कोर चालली कुणी कडे;
दिलांत धडधड तरी लोटते सखी चान्दणी तिला पुढे ही
प्रियाकडे.” १ (वव्यश–पिंपा ३८)

(४) “ आकाशींची वीजच की
अवतरली या भूलोकीं
**अलकभार** मृदु मन्द वायुच्या झुळुकीं सरशी अुडे पहा जणु
षट्पद हा.” (श–मा ६१)

१८७ ‘**रामरसायन**’ { [ । प । – – + ] अचलगति दोन वा अधिक
{ [ । प । प । प । – – + ] हरिभगिनी अेक

(१) “ जागा जागा झटका रे
गुरुपदिं जाअुनि हटका रे
**रामरसायन** घ्या तुम्हि घुटका तरीच होअिल सुटका रे.” १
(रामदास, पस १/२८४)

(२) “ नीलनील नभसरोवरीं
चन्द्रकलेसह केलि करी
नक्षत्रांची गोड सहचरी दावा मजला कोणि तरी.” (कावि २५)

(३) “ तिमिराने बघ झाकियलें
हृदयाचें दर्पण अपुलें,
प्रीतिभाव दिसती कुठले ?
प्रतिबिम्ब नको नयनामधलें, हृदय पाहुं दे हृदयातें.”
(देवि–विवी १४६)

(४) “ माळाच्या पायालगती
गावाच्या शेजेभवती
अफाट दुनिया वास न करिते, चुकूनि पाहीना जेथे
आनन्दाची फुगडी धरुनी करितों आम्ही खेळ तिथे.”(पाआ ११)

'मनस्ताप' (कावि ९), 'बॅक्बेच्या वाळवण्टांत' (कावि ६८) 'असो स्थिर तुझा दक्सन्देश्' (माजूत्व ३९) ह्या कविता या रामरसायन जातींत आहेत.

१८८ 'श्रद्धा' { [ ।प।--+ ] अचलगति दोन वा अधिक
[ ।प।प।प।-+ ] लवङ्गलता अेक

"प्रीत हाच मज पतङ्ग ग्या
स्वैर मनाने अुडाविन त्या;
झणी नभा चढवीत खुल्या
अुडत जाअुं ग्या स्वैर भरारी गिरक्या घेअुनि अुन्चऽ?
धागा श्रद्धेचाच खुला
सहज सोडुनी लाम्ब भला
मिळुनि जाअुं ग्या गगनाला;
तुटेल अैशी भीती त्याची वाटुं न ग्या मनिं व्यर्थऽ." (फकीर-पारि२३)

१८९ 'परात्परकरुणा' { [ ।प।--+ ] अचलगति दोन वा अधिक
[ ।प।प।प।प+ ] चन्द्रकान्त अेक

"अीश्वर पङ्कज जोवि मतङ्गज सङ्कट अुद्धारितो,
मनिं भाव मनुज धरितोऽ सुलभ त्या तो. ध्रु०
सङ्कटिं धीर न सोडिं कधी
हृदयिं अविश्वासास वधीं;
अकलुष ठेविं सदा निज धी,
अीश **परात्पर करुणा** तुजवर अविलम्बें करितो." १ (कोगु)

'निजजनजीवन' (अुपो ४०), आणि 'मलाच मी हसलों (कोका १/८०) या कविता या परात्परकरुणाजातींत आहेत.

पुढील चार जातींच्या कडव्यांत [--।प।-+] या मात्रावलीचें अग्रेसरत्व आहे.

१९० 'मदनहुताशन' { [--।प।-+] दोन वा अधिक
[।प।प।प।+] अेक वा दोन

१९१ "वधूवल्ली" {[― ―।प।― +] दोन वा अधिक
[― ―।― + ऽऽ ―।प।― +] अेक}

१९२ 'पञ्चकल्याणी' {[― ―।प।― +] दोन वा अधिक
[―।प।प।― +] भूपति अेक वा दोन}

१९३ 'दीप' {[― ―।प।― +] दोन वा अधिक
[+ ऽ ᵕ ― ―।+] अेक}

१९० 'मदनहुताशन' {[― ―।प।― +] दोन वा अधिक
[।प।प।प।+] चन्द्रकान्त अेक वा दोन}

"लवही धीर नसे गे मजशी,
आता अन्त जरी तू बघशी,
न जरी पूर्ण काम मज करिशी,
**मदनहुताशन** दग्ध करिल मज तू पाहत असतां,
झाला जरि अनुताप तुला मग रक्षा ये हाता." (देशाप ६/३)

१९१ "वधूवल्ली" {[― ―।प।― +] दोन वा अधिक
[अु।― + ऽऽ, ―।प।― +]}

"**वधू** ही **वल्ली**–० मज दिसे सङ्कटीं पडली. ध्रु०
वर हा आम्रवृक्ष मनिं भरला
परि तो स्वीकारिल का मजला?
अुपजे शङ्का याची तिजला
अशा या काळीं–० पाहिजे सखी कुणि जवळी." १ (देशाप)

येथे अन्त्य चरणारम्भीं अेक मात्रा अधिक झाल्याने छन्दोभङ्ग होतो. पहिले तीन चरण जर [― ―।प।― +] या मात्रावलीचे आहेत तर अन्त्य चरणारम्भीं आद्यतालकपूर्वगण पाच मात्रांचा चालणार नाही; तो चारच मात्रांचा पाहिजे; 'अशा या काळीं'च्या ठिकाणीं 'अैशा काळीं' पाहिजे. परन्तु या चालीवरील कित्येक कवितांत कडव्याचे पहिले तीन चरण [।प।प] असतात तेथे तर चौथ्या चरणाच्या आरम्भीं तर ४–५ मात्रा अधिक होअून छन्दोभङ्ग होतो! मागे युवतिभूषणजाति आणि पुढे स्वरसुधा पहा.

१९२ "**पञ्चकल्याणी**" { [ – – । प । – + ] दोन वा अधिक
[ – । प । प । – + ] भूपति अेक वा दोन }

या जातीला नांव 'पञ्चकल्याणी घोडा अब्लख' या लावणीवरून दिलें आहे. लावणीची रचना मात्र तशी शुद्ध रेखीव नाही.

(१) दारावरुन कोण मध्यान्हीं
गेला दौडत वाऱ्यावाणी ?
शोभिवन्त वारू काय **पञ्चकल्याणी** ! ( २६७ )

(२) "सुटला पितृदिशेचा वारा
झाकी मेघ नभःपथ सारा
घन गर्जति तोफेपरी, वर्षती गारा,
कडकडाट करिती विजा, येति जलधारा." ( किग्र ५४९ )

या पद्यांतील अितर कडवीं शिथिल आहेत; परन्तु 'शान्तीस'–( सोक ३/१५ ), गं. के. शिराळकरकृत 'विजयी वीर' ( सुहा २५ ), आणि वि. ह. आपटेकृत 'आह्वन' ( आ–माला ४४ ) या कविता सर्वथा या पञ्चकल्याणी-जातींत आहेत. 'सञ्जिवा, शोधुं कुठे तुज आतां' ( यब ७० ) या पद्यांतील चौथें कडवें वगळलें तर अुरलेलीं बारा कडवीं पञ्चकल्याणीजातीचींच आहेत.

"कञ्चनी रसरङ्गाची खाणी
शेकडों हृदयांची ही राणी
लागली गावया सहज पाखरावाणी" ( माजूस्व ७२ )

या कवितेंत पहिल्या दोन चरणांत आद्यतालकपूर्वगण पञ्चमात्रक असल्याने अेक मात्रा अधिक होअून छन्दोभङ्ग होतो. पुन्हा या कवितेंत दोन जातींचें मिश्रण आहे.

१९३ '**दीप**' { [ – – । प । – + ] दोन वा अधिक
[ + ऽ ᵕ – – । + ] अेक }

"प्रकाश पाडीना तिमिरा झाडीना
काही केल्या **दीप** वरी हा डोकें काढीना. ध्रु०
वाहे चोहींकडून वारा
**दीपा** देअीना तो थारा

करितो वरचेवर बहु मारा
शाऽन्त होओीना." ( सुमौ ११९ )

पुढील पांच जातींच्या कडव्यांत अुद्धवमात्रावलीचें अग्रेसरत्व आहे.

१९४ '**वनराज**' [ – । प । – + ] दोन वा अधिक
[ – । प । प । प । + ] अेक

१९५ '**महाकाली**' [ – । प । – + ] दोन वा अधिक
[ – । प । प । प । + ] अेक

१९६ '**पुष्पिता**' [ – । प । – + ] दोन वा अधिक
[ – । प । – + ऽऽ – । – + + ऽ ᵕ । + ]

१९७ '**मेधा**' [ – । प । – + ] दोन
[ – । प । प । – + ] अेक

१९८ '**मुरलीमोहन**' [ – । प । – + ] दोन वा अधिक
[ – । प । – – – ] अेक

१९४ '**वनराज**' [ – । प । – + ] अुद्धव दोन वा अधिक
[ – । प । प । प । – + ] भवानी अेक

( १ ) " हा न्याय असे जगताचा ! ध्रु०
मेण्ढरें वासरें गाअी
त्राता कुणि ज्यांना नाही
कापिती अशांस कसाअी,
जङ्गलांत घुसुनी कुणि अुतरिना नक्षा **वनराजा**चा " १ ( कास्फू ५२ )

परन्तु पुढील कवितेंतील कडव्यांत शेवटीं [ – । प । – + ] या मात्रावलीचा आणखी अेक चरण आहे.

" तो महाराष्ट्र शिवबाचा
लोपला सर्वथा साचा,
लेशही मुळि न अजि त्याचा,
आजला जरी राहता, जगा साङ्गता कोण शिवराणा
हाय तो हरपला दाणा !" ( टेआ ३/१२१ )

१९५ 'महाकाली' { [ – । प । – + ] अुद्धव दोन वा अधिक
[ – । प । प । प । + ] अरुणप्रभा अेक }

( १ ) "रे हिन्दबान्धवा, थाम्ब या स्थळीं अश्रु दोन ढाळीं !
ती पराक्रमाची ज्योत मावळे अिथे झांशिवाली ! ध्रु०
ताम्बेकुलवीरश्री ती
नेवाळकरांची कीर्ती
हिन्दभूध्वजा जणु जळती,
मर्दानी राणी लक्ष्मीबाअी मूर्त **महाकाली** !" १ (तासक १८४)

( २ ) "तो प्रेमयोगि झाला. ध्रु०
जो नाचे लतिकासङ्गें,
जो तारांमध्ये रङ्गे,
जो शून्यामध्ये गुङ्गे
जो कृत्रिमतेला विसरुनि जाणें दीक्षा ही पढला." १ ( सा-निसा १५४)

'तू टाक चिरुनि ही मान' ( देशा ६७ ), 'भग्न हृदयाचे अुद्गार!' ( सुमौ ११३ ), 'कल्पलतेस' ( यभा ५३ ), 'चल सोड !' ( माभा ७८ ), 'मोगरा स्वयेंच पुसे' ( कुमा १९ ) आणि 'पाळींव पोपटास' ( कास्फू ४३ ) हीं पद्यें या महाकालीजातीचीं आहेत.

१९६ 'पुष्पिता' { [ – । प । – + ] अुद्धव दोन वा अधिक
[ – । प । – +, ऽ ऽ – । – + ऽ – ᵕ । + ] }

( १ ) "मशि बोलुं नको गोविन्दा – ० मज आला तुझाऽराग् ध्रु०
तू दहिदुध चोरुनि खाशी,
घट अवघे फोडुनि जाशी,
पदराला धरिशि कशाला ?– ० मज आला तुझा ऽ राग्." १

या प्राचीन पद्याच्या कडव्याच्या अन्त्य चरणांतील अुत्तरार्ध हा वस्तुतः ध्रुवपदाचाच भाग असल्याने कडव्याचें स्वरूप निश्चित करितांना तो गणतींत धरितां कामा नये. वस्तुतः हें कडवें म्हणजे अुद्धव [ – । प । – + ] मात्रावलीचीच त्रिपदी ठरते. छन्दोरचनेच्या पहिल्या आवृत्तींत मी लिहिलेल्या कवितेंत हा अुत्तरार्ध भिन्न शब्दांचा आहे :—

( २ ) " चल वाजव सखि, सारङ्गी, – ० घे हरुनी देहभान्. ध्रु०
त्या कम्पित होतां तांती
स्वरभाव मिळूनी जाती,
मुरकीची काय मजा ती ! – ० कर मज तू भाग्यवान्. " (२६८)

यानन्तर 'मुरली' ( गिका १०४ ), 'आशीर्वाद' ( यभा ३९ ), 'भास' ( गिका ८४ ) आणि अितर कविता या पुष्पिता जातींत रचण्यांत आल्या.

( ३ ) " तुज द्याया आशीर्वादा – ० मी अुचलूं केंवि हात्. ध्रु०
**पुष्पिता**लता अुद्यानीं
घालितां तिला मी पाणी
तेथल्या तेथ ती होअी – ० अविलम्बें भस्मसात्." १ (यभा ३९)

१९७ **'मेधा'** { [ – । प । – + ] अुद्धव दोन वा अधिक
[ – । प । प । – + ] भूपति अेक वा दोन

( १ ) " त्या अुजाड माळावरती
बुरुजाच्या पडल्या भिन्ती
ओसाड देवळापुढति वडाचा पार,
अन्धार दाटला तेथ भरे भरपूर." ( बाक ५९ )

( २ ) " देशाचा पालनवाला
तो शिवाजि राजा झाला.
धर्माचा पालनवाला
तो शिवाजि राजा झाला. ध्रु०
गर्जते भवानी **मेधा**,
चमकते भवानी खाण्डा,
चाललाच भगवा झेण्डा, रणनाचाला. " १ ( गोक ३७)

गोविन्दकवीची 'शिवाजी' ही ओजस्वी कविता या मेधाजातींत आहे. या जातीच्या कडव्यांचें आणि गङ्गा जातींच्या कडव्यांचें श्री. आनन्दराव टेकाडे हे पुष्कळदा मिश्रण करितात.

१९८ 'मुरलीमोहन' { [–।प।–+] अुद्धव दोन वा अधिक
[।–।प।– – –] कर्णफुल्ल अेक

" भारता तार या कालिं–कालिं हरि वाजिव गीता मुरली
नाचून कालियामौलिं–मौलि हरि वाजिव गीता मुरली.
हरि वाजिव गीता मुरली ! ध्रु०
धाव रे धाव वनमाली !
तुजवीण नाहि कुणि वाली,
आम्हांस तार या कालीं
तुझि आशा केवळ अुरलि अुरलि. १

तव **मुरलीमोहन**गीत
निर्जिवा करी जीवन्त
षण्ढास समरपण्डीत,
रणधीररिपुसि भयभीत,
अबलास करिल बलशालि–शालि. " १ (गोक २७)

पुढील तीन जातींच्या कडव्यांत शुद्धसतीमात्रावलीचें अग्रेसरत्व आहे.

१९९ 'गया' { [।प।–+] दोन वा अधिक
[।प।प।प।–+] अेक

२०० 'नारी' { [।प।–+] दोन वा अधिक
[।प।प।प।+] अेक

२०१ 'शशिकुल' { [।प।–+] दोन
[।प।प।–+] अेक

१९९ 'गया' { [।प।–+] शुद्धसती दोन वा अधिक
[।प।प।प।–+] लवङ्गलता अेक वा दोन

(१) " या रे सज्जन जनहो या रे
मनीं धरुनि विनया रे ! ध्रु०
होतो नाश तया रे
यमास नाहि दया रे
हरिगुणकीर्तन श्रवणमनन करुं काशी हेचि **गया** रे." (अपस ५१ वें)

(२) “ मङ्गल नाम तुझें की
मज अुच्चारूं दे की
तार कसें या लोकीं
दास अनन्त कृपाघन अिच्छित रङ्गणिं येअुनि दे की.” ( अपस ११ वें)

‘अन्तर माझें साधें’ ( जोसवि—यमा ५९/१ ) हें पद्य या गयाजातीचें आहे.

२०० ‘ **नारी** ’ { [ । प । — + ] शुद्धसती दोन वा अधिक
[ । प । प । प । + ] चन्द्रकान्त अेक

“ अपराधाविण पतिला
छळितां आनन्दाला
मानुनि निष्कारण कोपाला वाढविती **नारी**.” १ ( किग्र ६०० )

हें पद्य समग्र या प्रकारचें आहे.

२०१ ‘ **शशिकुल** ’ { [ । प । — + ] शुद्धसती दोन वा अधिक
[ । प । प । — + ] वंशमणि अेक

“ **शशिकुल**भूषण सदया
मत्प्राणेश्वर विजया
विनवी ही तवजाया मान्य कराया.” ( किग्र ४७० )

या पद्याच्या चार कडव्यांपैकी दुसरें तेवढें शिथिल आहे.

खालील सात जातींच्या कडव्यांत [ अु । प । ᴗ + ] या पर्वतीमात्रावलीचें अग्रेसरत्व आहे.

२०२ ‘ **धरणी** ’ { [ अु । प । ᴗ + ] दोन वा अधिक
[ अु । — + , ऽऽ — । प । प । प । ᴗ + ] अेक

२०३ ‘ **कण्टकदरी** ’ { [ अु । प । ᴗ + ] दोन वा अधिक
[ — । प । प । प । ᴗ + ] अेक

२०४ “ **स्वर्गसौन्दर्य** ” { [ अु । प । ᴗ + ] दोन वा अधिक
[ । प । प । प । ᴗ + ] अेक

२०५ ‘ **निस्सार** ’ { [ अु । प । ᴗ + ] दोन वा अधिक
[ । प । + , अु । प । + ] अेक

२०६ ‘स्वर्गसुख’ { [अु । प । ᴗ +] दोन वा अधिक
[– । प । प । – +] अेक वा दोन

२०७ ‘स्वरसुधा’ { [अु । प । ᴗ +] दोन वा अधिक
[अु । – +, ऽऽ – । प । – +] अेक

२०८ ‘कालचक्र’, { [अु । प । ᴗ +] दोन वा अधिक
[– । प । प । ᴗ +] अेक वा दोन

२०९ ‘सुरमणि’ { [अु । प । ᴗ +] दोन वा अधिक
[– – । ᴗ + ऽ – – । +] अेक

२१० “विविधरसा” { [– । प । प । ᴗ +] अेक
[अु । प । ᴗ +]

२११ “सुभद्रावर” { [– – । प । + ऽ ᴗ] दोन वा अधिक
[– – । + ऽ ᴗ – – । +] अेक

२०२ धरणी { [अु । प । ᴗ +] पर्वती दोन वा अधिक
[अु । – +, ऽऽ – । प । प । प । ᴗ +] अेक

“ पाह्यलं ग दारीं–० का हसूनि खुदकन् तरी ? ध्रु०
काल दुपारीं विहिरीवरी
होति अेकटी तू सामुरी
पाणी प्याया आलों परी
तोंच सुकुमारी–० पाण्याची चरवी तुझिया करवी
पडली **धरणी**वरी” (सोचौ–सुगी ९१

येथें कडव्यांतील पहिले तीन चरण [अु । प । ᴗ +] असें न वाट
[ । प । – – ᴗ +] असें दिसतात; पण तसे ते घेतल्यास आणि म्हटल्या
पुढील चरणाच्या आरम्भी अेकच मात्रेच्या आद्यतालकपूर्व गणाची कू
राहते; आणि तो गण तर पाच मात्रांचा आहे. मग छन्दोभङ्ग होतो.
टाळायचा असला तर कडव्याचे पहिले चरण [अु । प । ᴗ +] असेच पाहिजे

२०३ ‘कण्टकदरी’ { [अु । प । ᴗ +] पर्वती दोन वा अधिक
[– । प । प । प । ᴗ +] कमललोचना अेक

“ हां हां जाऊं नको बा वरी,
असती जाण सर्वही अरी,
करितिल कुदशा तव सत्वरी,
मन्दिर नोहे, ‘ **कण्टकदरी** !’
कुणि म्हणे मित्र, ‘ ये खाली, ये तू सुटशिल येथुनि तरी !” ( सुमौ १०८)

येथे पहिले चरण [ अु । प । ० + ] या मात्रावलीचे घेतां येत असल्याने छन्दोभङ्ग होत नाही. पण

“ पडलों बन्दीच्या मी घरीं
भुयार खाली, माडी वरी,
वाटा दोनचि जर यापरी
काय करूं त्या ठायीं तरी ?
वर जाअूं अथवा खाली अुतरूं, संशय हा अन्तरीं.” १ (सुमौ १०७)

येथे कडव्याचे आरम्भीचे चरण [ । प । – – ० + ] असे आहेत आणि अन्त्य चरणाच्या आरम्भीं दोन मात्रांचा आद्यतालकपूर्व गण आहे. तेव्हा सान्ध्यावर अेक मात्रा अधिक होअून छन्दोभङ्ग होतो.

केशवसुतकृत ‘ कोणीकडून !–कोणीकडे ?’ ( केक १४३ ) या कवितेलाहि ही चर्चा लागूं आहे. मात्र त्या कवितेंत कडव्याचा अन्त्य चरण आखूड म्हणजे [ – । प । प । ० + ] या मात्रावलीचा असल्याने त्याची जाति निराळी होते. ( खाली २०८ कालचक्रजाति पहा. )

२०४ “**स्वर्गसौन्दर्य**” { [ अु । प । ० + ] पर्वती दोन वा अधिक; [ । प । प । प । ० + ] समुदितमदना अेक }

“ नवलाख झुले लश्कर – ० तळपे भाला वरच्यावर. ध्रु०
दिसतें अेकच वर अम्बर,
खाली सैन्याचा सागर,
नाही नजर ठरत त्यावर,
जरिपटका डौलांत डोलतो भरजरि हत्तीवर.
हौदा सोन्याचा सुन्दर,

वरती मोत्यांची झालर;
भाअू - दक्षिणचा भास्कर,
स्वर्गाचें सौन्दर्य लोटलें ह्या तर सैन्यावर." ( अज्ञा ६८ )

२०५ '**निस्सार**' { [अु । प । ‿ +] पर्वती दोन वा अधिक; [ । प । +, अु । प । +] चन्द्रकला अेक }

"**निस्सार** असे संसार् सखे, पण अम्हां कधी कळणार्. ? ध्रु०
पहा या श्रावणमासांतले
रवीचे किरण कसे कोवळे
ढगांतुन खुले, क्षणीं मावळे—
तसा असे संसार् मनीं पण केव्हा हें ठसणार् ?" ( घाली ३३ )

२०६ '**स्वर्गसुख**' { [अु । प । ‿ +] पर्वती दोन वा अधिक; [— । प । प । — +] भूपति अेक वा दोन }

"कोणी बालक अङ्कावरी
घेअी जो जो जो त्या करी;
आलापी मञ्जुळ रवें गायना हर्षे,
ती गानमिषें त्यावरी सुधेतें वर्षे. १
कोणी बालक घेअी कडे
जावळ ज्याचें भुरु भुरु अुडे,
बोबडें बोबडें वदे, अकारण हासे,
पाहतां त्यापुढे तुच्छ **स्वर्गसुख** भासे." २ ( विक ११९ )

२०७ '**स्वरसुधा**' { [अु । प । ‿ +] पर्वती दोन वा अधिक; [अु । — + ऽऽ — । प । ‿ +] अेक }

गळ्यांतुनि काढिशि जी **स्वरसुधा**
हरी ती मनिंच्या साऱ्या क्षुधा,
आणखी चिन्ता — ० लोपती क्षण न लागतां. १
रेशमी रङ्गवल्लिका भरी
चतुरा कुणी मखमलीवरी
त्यापरी गाणें — ० मज वाटे तव शोभने. २ ( २६९ )

२०८ 'कालचक्र' { [अु । प । ⌣ +] पर्वती दोन वा अधिक
[– । प । प । ⌣ +] लीलारति अेक वा दोन }

(१) "फिरतें **कालचक्र** भूवरी,
दसरा ये प्रतिसंवत्सरीं,
पूर्वजस्मरण आम्हांस देतसे परी
सोडवे न धामग्राम राहिलें दुरी." (विक ८५)

'दसरा' (विक ८४) ही कविता १ लें कडवें वगळल्यास शेवटपर्यन्त याच कालचक्रजातींत आहे. 'निन्दिलें आजवर वैरि गणियलें तुला' ही सोपानदेव चौधरीकृत कविता (सपा १/३६) या कालचक्रजातींतच आहे. के. नारखेडे यांच्या 'न्याहारी' आणि 'जीवनमूर्ति' (नाच १५, २५) आणि विश्वनाथ वामन पत्की यांची 'प्रतीक्षा' या कविता समग्र या कालचक्रजातींत आहेत.

(२) "कोणीकडून ? कोणीकडे ?
अिकडुनि तिकडे, म्हणती गडे;
येथुनि तेथे, मागुनि पुढे,
हें तर नित्यच कानीं पडे;
पण समाधान का कधी तयाने घडे ! (केक १४३)

(३) "नवतिच्या बहरामधि बालिका
करूनी साज तऱ्हेचा निका
चालली लगबगा कोठें अभिसारिका ?
कोणता राजहंस मानसीं,
हुरहुरे ज्यास बघाया अशी ?
किति डौलदार चापल्य हें हिच्या नसीं !" (माजूस्व ९५)

'माझा अभिसार' (घा–मधुमा ५) 'कञ्चनी' (माजूस्व ७२) नि 'अभिसारिका' (माजूस्व ९५) या कवितांत पञ्चकल्याणी आणि कालचक्र या दोन जातींचें मिश्रण आहे.

२०९ '**सुरमणि**' { [– – । प । ⌣ +] दोन वा अधिक
[– – । ⌣ + ऽ, – – । +] अेक }

गेली जननी वर घेअून
गगनांतून वीज जशी." (दक ३२)

(१८५) 'नगरभूषण' { [अु । प । ᵕ +] दोन वा अधिक
[ । प । +]

अुदाहरण मागे पृ. ४६९–४७० यांवर दिलेंच आहे.

खालील सहा जातींच्या कडव्यांत [– । प । ᵕ +] या भरतखण्डमात्रावलीचें अग्रेसत्वर असतें.

२१२ 'घनराजी' { [– । प । ᵕ +] अनेक
[– । प । प । प । ᵕ +] अेक

२१३ "राज्ञी" { [– । प । ᵕ +] अनेक
[– । प । – + ऽऽ – । प । ᵕ +] अेक

२१४ 'श्रीपति { [– । प । ᵕ +] अनेक
[ । प । प । प । ᵕ +] अेक

२१५ 'सम्पन्न' { [– । प । ᵕ +] अनेक
[– । प । प । प । +] अेक

२१६ 'सुवासिनी' { [– । प । ᵕ +] अनेक
[– । प । प । – +] अेक

२१७ 'गङ्गा' { [– । प । ᵕ +] अनेक
[– । प । प । ᵕ +] अेक

२१८ 'माधुरी' { [ । प । ᵕ +] अनेक
[ । प । प । प । ᵕ +] अेक

२१२ 'घनराजी' { [– । प । ᵕ +] भरतखण्ड दोन वा अधिक
[–प । प । प । ᵕ +] कमललोचना अेक वा दोन

(१) "यापरी असे जीवनऽसखे गे, चञ्चल अमुचे क्षण ! ध्रु०
घनराअिमधे कवडसा
तरु हलतां डुलतो कसा,
परि जाअि कुणिकडे साङ्ग सखे, रवि कलतां स्थानांतुन ?
यापरी असे जीवनऽसखे, अम्हि हलतों डुलतों पण."१ (तासक २८)

(२) "तारका चमकली नभीं,
तेजाची पुतळी अुभी,
रिपुतिमिर तयाला न भीं,
अुत्साह वाढता तिचा अहाहा परिसर अुज्ज्वल करी." (ववि—त ७७)

(३) "ते हवेत माझे मला, सखे परि भवति सदा गल्बला. ध्रु०
हे मधुप फुलांभोवती
डोलती जसे गुञ्जती
लोभले तेवि सोबती, तयांचा ओघ न कधि आटला." (यभा ४८)

'भिङ्गरी' (देनाघ—सुगी ९३), 'तुज म्हणूं कुणासारखी' (कावा ६०), 'वत्सलभीति' (कान ४२), 'विनयवती प्रियेस' (रमा-कभा ४८) आणि 'आला खुशींत समिन्दर' हें 'कोळ्याचें गाणें' (काचा ५५) या कविता या घनराजीजातींत आहेत. गिरीशकृत शूर्पणखा ही सुप्रसिद्ध कविता या चालीवर म्हणतां येत असली तरी ती या जातीची नाही. ती कविता कडव्याची घटना पाहतां भरतखण्डजातीची ठरते.

२१३ **'राज्ञी'** { [ – । प । ᵕ + ] भरतखण्ड दोन वा अधिक
[ – । प । – +, ऽऽ – । प । ᵕ + ]

"भर अुन्हामधी चालुनी
आलीस कारभारणी
येअील कवा ही राणी –० होतोंच वाट पाहुनी." (ठो—स्फूमा ३७)

२१४ **'श्रीपति'** { [ – । प । ᵕ + ] भरतखण्ड दोन वा अधिक
[ । प । प । प । ᵕ + ] समुदितमदना अेक

(१) "पतिव्रता द्रौपदी सती
ती सभेमाजि गुणवती
दुःशासन दुर्जनें गाञ्जितां आळविते **श्रीपती**." (भिद्रौ—लकामा १/१११)

(२) "या रानचमेलीवरी
दडलेलीं पर्णान्तरीं
शोधुनी फुलें हासरीं
हार तयांचा कुणासाठि तू गुम्फिशि तीरावरी?" (जोव ३९)

'सवाअी माधवरावांचा मृत्यु' (माक १६३), 'पर्वती' (अज्ञा ७९), 'सिंहगडास पाहून' (बासा–अकामा ४/१२०), 'स्वप्नांत काय पाहिलें' (पाआ २४) अित्यादि कविता या श्रीपतिजातींत आहेत.

२१५ '**सम्पन्न**' { [–।प।⏑+] भरतखण्ड दोन वा अधिक
[–।प।प।प।+] अरुणप्रभा अेक

"अुमलत्या फुला, साङ्गतों तुला धरुं नको वृथा अभिमान्. ध्रु०
**सम्पन्न** बगीचा खुला
हा तुजभवती पसरला,
कमतरता नाही जला,
सौन्दर्य खुलावें तुझें म्हणोनी प्रयत्न सगळे जाण्." (कास्फू ८९)

२१६ '**सुवासिनी**' { [–।प।⏑+] भरतखण्ड दोन वा अधिक
[–।प।प।–+] भूपति अेक

(१) "घेअि हरिनाम–० मनवाजिस घाल लगाम. ध्रु०
त्यज पुत्रमित्रराग तो,
तुज गुज मी हें साङ्गतों,
श्रीकान्तभजनिं लागतो अल्पहि न दाम." (खाक ७०)

(२) "या मूर्तदेवता पहा भरतभूवरती. ध्रु०
पति जिवन्त असतां स्त्रिया
वरि **सुवासिनी** पद जयां
वैधव्यें पुशितां तयां चढविलें वरती." (पापना–माअक २७)

काव्यविहारींची 'कृष्णेच्या पुलावरून' (कास्फू ५७) ही कविता या सुवासिनीजातींत आहे.

२१७ '**गङ्गा**' { [–।प।⏑+] भरतखण्ड दोन वा अधिक
[–।प।प।⏑+] लीलारति अेक वा दोन

(१) "तू मर्द कोठला गडी ?
हे तुझेच का सवगडी ?

चल टाक हिच्यामधि हिमतीने तू अुडी
जरि अथाङ्ग भरली गङ्गा ही दोथडी."
(टे–आमा सप्टे १९२३)

परन्तु या कवितेंत आणि 'हा कोण' (टे–विवी ४४) या कवितेंत मेधा जातीच्या कडव्यांचें मिश्रण आहे.

(२) "राबलों वृथा संसारसौख्यविभ्रमीं
ने प्रभो आपुल्या धामीं–० जाहलों सर्वथा श्रमी. ध्रु०
चाललों जरी सत्पथें
तरी तुफान अुलटें सुटे,
सैराट तारुं भडकतें, विफल रुस्तुमी." (यध १५६)

'विनवणी' (अज्ञा ६३) आणि शेखरकृत 'सृष्टिप्रेम' (कभा ५५) या कविता या जातीच्या आहेत. ध्रुवपद मुद्रिकाजातीचें असलें तरी कडव्यांची घटना भिन्न असल्याने या पद्यांची जाति मुद्रिका होअू शकत नाही.

२१८ **'माधुरी'** { [।प।ᵕ+] दोन वा अधिक
[।प।प।प।ᵕ+] समुदितमदना अेक }

(१) "गोड जाअिच्या फुला, सदा मी जीव तुला वाहिला. ध्रु०
जरी अुकिरड्यावरी
घाण पडे चौथरी
तया सन्निधीं परी
वेल जाअिचा चढे तयावरि जन्म तुझा जाहला. १

अुपवनांत किति तरी
जाअि–फुलें गोजिरीं
सदैव बघतों तरी
तुझ्या गुणांची गोड **माधुरी** लळा लाविते मला." २ (कास्फू १५)

खालील तीन जातींच्या कडव्यांत [अु।प।+] या भुवनसुन्दर मात्रावलीचें अग्रेसरत्व आहे.

२१९ **'कल्पद्रुम'** { [अु।प।+] अनेक
[।प।प।प।+, अु।प।+] अेक }

२२० ‘**चेतना**’ { [ अु । प । + ] अनेक
[ – । प । प । प । + ] अेक }

२२१ ‘**विकल्प**’ { [ अु । प । + ] अनेक
[ । प । प । प । + ] अेक }

२२२ ‘**भृङ्गराजी**’ { [ । प । प । प । + ] अेक
[ अु । प । + ] अनेक }

२१९ ‘**कल्पद्रुम**’ { [ अु । प । + ] भुवनसुन्दर दोन वा अधिक
[ । प । प । प । +, अु । प + ] अेक संयुक्त }

“ वन्दुनि पुष्पकिं शङ्कर हा,
जन हो भविं निःशङ्क रहा. ध्रु०
कारण पुष्पचि सृष्टीला
बघतां दिसतें दृष्टीला
पुष्पाविण फल वृक्षाला
नाही भासे हें सकलां.
निःसार्थकता पूजेला
पुष्पाविण कीं प्रिय त्याला
म्हणुनि बसवुनी प्रथम पुष्पकीं करिति महोत्सव हा,
भक्ता कल्पद्रुमसम हा.” ( किग्र ७७ )

‘शशिकुलभूषण गुणवन्ता’ ( किग्र ३६५ ), ‘माझी ताअी’ ( टिक १२० ), ‘दिधलें जनन तुला असलें’ ( रेक १/३५७ ), ‘अुत्राही दंवबाष्पा टाळी’ ( नाव १२ ) अित्यादि कविता या कल्पद्रुमजातींत आहेत.

२२० ‘**चेतना**’ { [ अु । प । + ] भुवनसुन्दर दोन वा अधिक
[ – । प । प । प । + ] अरुणप्रभा अेक }

“ माझिया शूर सैनिकांनो,
धुरन्धर मर्द मराठ्यांनो,
शत्रुच्या कर्दनकाळांनो,
साण्डुनी प्रसङ्गीं प्राणहि भगवा झेण्डा राखावा !

निशाणा बघुनि अघाडीला
स्फुरण ये अवघ्या सेनेला
शत्रुशी झुन्ज करायाला
**चेतना** मूर्त ही सङ्ग्रामाची वाऱ्यावरि झुलवा." ( कास्फू १०१ )

२२१ '**विकल्प**' { [ अु । प । + ] भुवनसुन्दर दोन वा अधिक
{ [ । प । प । प । + ] चन्द्रकान्त अेक वा दोन

( १ ) " मम सुत भरत जरी असला
प्रिय नच रामाहुनि मजला;
मिळतें राज्य जरी त्याला
अत्यानन्दचि मज झाला.
खचित मन्थरे, वृद्धपणीं भ्रम ये तव बुद्धीला
म्हणुनि असा हा **विकल्प** वाटे देहिं तुझ्या शिरला." ( किग्र ५७५ )

( २ ) " हे घन चूर्ण पहा होती,
बारिक रेणूपरि दिसती,
रथाच्या मागे ते अुडती,
अरांत दुसरी पङ्क्ति अरांची दिसत चक्रवेगें." ( देविक्र )

'रुतला दर्भाङ्कुर चरणीं' ( किग्र ३४७ ) हें पद्य आणि परशुराम नारायण पाटणकर यांची 'विश्वनाटक' ( सुहा १५२ ) ही कविता हीं या विकल्पजातींत आहेत.

२२२ '**भृङ्गराजी**' { [ । प । प । प । + ] चन्द्रकान्त अेक
{ [ अु । प । + ] भुवनसुन्दर दोन वा अधिक

विकल्पजातीच्या व्यत्ययाने ही जाति सिद्ध होते.

" प्रभातकालीं मोटवणावर कोण गीत गाअी,
साथही कोण त्यास देअी,
चला ती बघुं या नवलाअी ! १

अनुपम शोभा दावितसे ही आम्रवृक्षराजी
फुलांची नवाळ ती ताजी,
लुटुनि ती अुडति **भृङ्गराजी**." २ ( कास्फू ७६ )

खालील तीन जातींच्या कडव्यांत या [ । प । + ] पिशङ्गमात्रावलीचें अग्रेसरत्व आहे.

२२३ 'चिरसुन्दरी' { [ । प । + ] अनेक<br>[ । प । प । प । ‿ + ] एक

२२४ 'कालावेग' { [ । प । + ] अनेक<br>[ । प । प । प । + ] एक

२२५ 'कण्हेरी' { [ । प । + ] अनेक<br>[ । प । – – + ] एक वा दोन

२२३ 'चिरसुन्दरी' { [ । प । + ] पिशङ्ग दोन वा अधिक<br>[ । प । प । प । ‿ + ] समुदितमदना एक वा दोन

" सृष्टीचें छकुलें
सुमन जरी सुकलें
दरवळलेला परिमळ झुलवित ते हृदया वरिवरी.
दुर्दैवें अपुला
वियोग जरि घडला,
तुजविषयींचे तरङ्ग हृदयीं वसातिल **चिरसुन्दरी**." ( कावि २३ )

'सान्त्वन' ( कावि २३ ) या कवितेच्या पहिल्या कडव्यांत तेवढा थोडा भेद आहे.

२२४ 'कालावेग' { [ । प । + ] पिशङ्ग दोन वा अधिक<br>[ । प । प । प । + ] चन्द्रकान्त एक

" प्रीतीची फुलली
हृदयाशी धारिली
कलिका, परि ती **कालावेगें** जाअिल का सुकुनी ?" ( अफु ७ )

'भवितव्य ( अफु ७ ) या कवितेच्या पहिल्या कडव्यांत मात्र थोडा भेद आहे.

२२५ 'कण्हेरी' { [ । प । + ] पिशङ्ग दोन वा अधिक<br>[ । प । – – + ] अचलगति एक वा दोन

“ कळ्या कण्हेरीच्या
अन्तीं निधनाच्या
अुपयोगीं तुज पडतील,
शोभा तुज त्या देतील. ” ( आगका–रमा ३/४ )

खालील दोन जातींच्या कडव्यांत पञ्चमात्रावलीचें अग्रेसरत्व आहे.

२२६ ‘ गानतुषार ’ { [ । प ] अनेक
[ । प । प । प । + ] एक

२२७ “ नभोरङ्ग ” { [ । प ] अनेक
[ । प । – – + ] एक वा दोन

२२८ “ मुक्तामाला ” { [ । – – + ] अनेक
[ । प । – – + ] एक वा दोन

२२६ ‘ गानतुषार ’ { [ । प ] दोन वा अधिक
[ । प । प । प । + ] चन्द्रकान्त एक

अरुण तेज तव
लाजनसे नव
कपोल वैभव
प्रखर होअुनी जगता दिपविल रविरूपाने तें !
फेक भोवती
तेजोमय ती
काव्यस्फूर्ती
कविच्या हृदया अुसळवि, अुधळीं गान तुषारांतें ” ( देवि–विवी १४० )

२२७ “ नभोरङ्ग ” { [ । प ] दोन वा अधिक
[ । प । – – + ] अचलगति एक वा दोन

“ चला गड्यांनो खेळूं या
आनन्दाने नाचूं या. ध्रु०
आभाळाचे
तऱ्हे तऱ्हेचे
रङ्ग मजेचे

चला चला रे पाहूं या
आनन्दाने नाचूं या." ( नावा ९ )

२२८ " मुक्तामाला " { [ – – + ऽऽ ] दोन वा अधिक
[ । प । – – + ] अचलगति तीन

( १ ) " तुझ्या गळां
माझ्या गळां
गुम्फूं मोत्याच्या माळा "
" ताअी, आणखि कोणाला ? "
" चल रे, दादा चहाटला ! "
" कशी कशी
आज अशी
गम्मत ताअीची खाशी ! "
" आता गांडि फू दादाशी ? "
" तर मग गट्टी कोणाशी ? " २ ( तासक ८३ )

पण या पद्याची रचना बरीच शिथिल आहे.

खालील तीन जातींच्या कडव्यांत [ । – ᵕ – + । – ᵕ – + ] या मात्रावलीचें अग्रेसरत्व आहे.

२२९ ' घोररजनी ' { [ । – ᵕ – + । – ᵕ – + ] अनेक
[ – । प । प । प । – + ] अेक

२३० ' मनमोहन ' { [ । – ᵕ – + । – ᵕ – + ] अनेक
[ – । प । प । प । + ] अेक

२३१ ' सन्देश ' { [ । – ᵕ – + । – ᵕ – + ] अनेक
[ – । प । – +, ऽऽ – । – + ऽ – ᵕ । + ] अेक

२२९ ' घोररजनी ' { [ । – ᵕ – + । – ᵕ – + ] दोन वा अधिक
[ – । प । प । प । – + ] भवानी अेक

" सारङ्गि सारखी तव वाजवुनी टाकी मन गुङ्गवुनी. ध्रु०
घोर रजनी विकट हासे,
वस्तुठायीं भूत भासे,
परि सूर अैकतां दूर जातसे काहुर मनिंचें पळुनी." ( यध १३३ )

'साल्गिरा' (कुयशो १८), मञ्जुमाधवकृत 'गा गडे गोड गोड गीतांना' (पद ४५) आणि सोपानदेव चौधरी यांची 'वाजवूं नको माधवा०' (गोगु ७५) ही कविता या घोररजनीजातींत आहेत.

२३० 'मनमोहन' { [ ।– ᵕ –+।– ᵕ –+ ] दोन वा अधिक
[ –।प।प।प।+ ] अरुणप्रभा अेक

"मनमोहन वाजवुनी सारङ्गी काढी मञ्जुळ सूर्. ध्रु०
विश्व निजलें, शान्त झालें,
अेक धरणी मात्र डोले,
गम्भीरपणाने अन्धारांतुनि छेडित जाअी सूर्" १ (गिका ३)

'चान्दण्यांतील हुरहूर' (माजूस्व ७०), 'खचतो माझा धीर' (माभा ५०), 'ध्यास व भास' (माभा ५६), 'अेका बाळकास' (गोदू ४), 'चिमुकल्यास' (काचा ३६), कृष्णाकुमारकृत 'हुतात्मा' (फ २२) अित्यादि अनेक कविता या मनमोहन जातींत आहेत.

२३१ 'सन्देश' { [ – ᵕ –+।– ᵕ –+ ] दोन वा अधिक
[ –।प।–+ऽऽ–।––+ऽ ᵕ।+ ] अेक

"हें स्वागत तुमचें सारें – ० मज आता लाभतें. ध्रु०
हाय तो सन्देश माझा
नित्य हृदयीं वागवा जा!
जाअुं द्या बन्दिशाला ती – ० विरहाने कष्टते." (अ–मे ११)

२३२ 'रूपवती' { [ मोहिनी ] अनेक
[ शारदा ] अेक

"जरी कुणा श्रीमन्ताची सून होय शारदा
तरी त्यास साजे अैशी तिची रूपसम्पदा. ध्रु०
बघुनि तसि आकाशींची चान्दणी दिपावी,
नाहि रूपवन्ती दुसरी हजारांत ठावी,
हसत थोर सर्दारांनी मागणी करावी,
परी मला मनचे माण्डे खुरुनि काय फायदा?" १ (देशा ३१)

खालील चार जातींच्या कडव्यांत धात्रीमात्रावलीचें अग्रेसरत्व आहे.

२३३ **‘सदयशान्त’** { [ ⏓ ⏒ | ⏓ ⏒ | – – – + ] दोन वा अधिक
[ ⏓ ⏒ | ⏓ ⏒ – – – + | ⏓ ⏒ | ⏓ ⏒ | – – + ]

( १ ) “**सदयशान्त** असशी मरणा, भीति तुझी वाटे ना. ध्रु०
हीन दीन दुक्खी दुबळी
ज्यांस ओस दुनिया सगळी,
येति त्यांस घेशी जवळी प्रेम तुझें आटेना.” ( देशा ८७ )

( २ ) “ रुदन हेंचि आयुध अमुचें सर्वदा विजयी असे,
पाहतें तयाच्या पुढती मातृहृदय टिकतें कसें. ध्रु०
कोण अैसि जाडी चिन्ता
स्पर्शी मम न जी करि शान्ता
शल्य तें तिच्या हृत्प्रान्ता कोणतें सलतें असे.” ( कोगु )

२३४ **‘कृष्णनाथ’** { [ ⏓ ⏒ | ⏓ ⏒ | – – – + ] दोन वा अधिक
[ ⏓ ⏒ | ⏓ ⏒ | – – – + | ⏓ ⏓ | ⏓ ⏒ | + ⏑ + ]

“ गोकुळिंचा कान्हा कोणी पाहिला कि काय ग ?
गोकुळिंचा राणा माझा देखिला कि काय ग ? ध्रु०
प्रभू सावळा हा कृष्ण,
रङ्ग तुझा झाला कृष्ण,
**कृष्णनाथ** लपवुनि पोटीं ठेविला कि काय ग ?” ( सोका २१ )

२३५ **‘प्रेमरञ्जिता’** { [ ⏓ ⏒ | ⏓ ⏒ | – – – + ] दोन वा अधिक
[ ⏓ ⏒ | ⏓ ⏒ | – – – + | ⏓ ⏒ | ⏓ ⏒ | + + ]

( १ ) “ काय पुरुष चळले बाअी,
ताल मुळी अुरला नाही,
धर्मनीतिशास्त्रें पायीं तुडविती कसे हो ?” ( देशा २ )

( २ ) “ किती वेळ साङ्गू तुजला सोड हा अबोला ?
**प्रेमरञ्जितांच्या** साठी कायदा कशाला ? ध्रु०

अपाङ्गास आली लाली
राग रङ्गलेला गालीं,
परी रागवोनी होओी फायदा कुणाला ?" (जोअह-फत्रै २४/४)

रा. यशवन्त खण्डेराव कुळकर्णी यांची 'कोण ना भिकारी ?' (माल १८) ही कविता या प्रेमरञ्जिताजातींत आहे.

२३६ 'आत्मवञ्चना' { [ ⏓ ⏑ । ⏓ ⏑ । – – – + ] दोन वा अधिक
[ ⏓ ⏑ । ⏓ ⏑ । – – – + । ⏓ ⏑ । ⏓ ⏑ । + ] }

(१) "आकळे न अघटित घटना तव दयाघना,
कां रुचे अधोगति अैशी या विभूतिंना ? ध्रु०
सिद्ध पुरुष सद्गुरु असुनीं
मग्न होति मायाव्यसनीं
केवि करिति तप नाशोनी आत्मवञ्चना" ? (गोटे—मामबो)

(२) "हे दिनेश, अुघडीं नयना तमनिवारणा,
तुजविना न अन्यचि कोणी क्षम जनावना. ध्रु०
कृष्ण घनचि अम्बरिं जमले,
लोकपतिस ग्रासूं सजले,
अुघड तरी द्वादशनयना लोकतारणा." १ (किरा—नजीमा २/९-१०)

अग्न्यावर्तनी

२३७ 'जलवाह' { [ । – ⏑ – – । – ⏑ – – ] दोन चरण
[ । – ⏑ – – । – ⏑ – – । – ⏑ – – । – ⏑ – ] एक }

"हासतें जग हें विनोदें परि कुठे तू हे प्रभो ?
नाचतें जग हें प्रमोदें परि कुठे तू हे प्रभो ? ध्रु०
तारकांसह चन्द्र चमके
फुल्लकुमुदीं वायु ठमके,
वाहती जलवाह गमकें, परि कुठे तू हे प्रभो ?" १ (सुजी)

२३८ 'अमररमणी' { [ । – ⏑ – – । – ⏑ – ] दोन
[ । – ⏑ – – । – ⏑ – – । – ⏑ – – । – ⏑ – ] एक }

(१) " गमत सुखकर समय हा
तेजराशी कुमुदबान्धव येत सदनाङ्गणिं पहा. ध्रु०
विबुधललना क्रीडती
रत्नकन्दुक फेकिती,
**अमररमणी**पादतलहत म्हणुनि विहरे गगनिं हा." ( कावि ३ )

(२) " यामिनी जणु कामिनी
यौवनीं मृदुहासिनी
मञ्जुमञ्जु सलील पाउलिं पातली जनमोहिनी." ( काराअ—माल ६७ )

भृङ्गावर्तनी

२३९ '**विजितमदन**' { [ । भृ । भृ । भृ । − + ] परिलीना तीन
[ । भृ । भृ । भृ । भृ ] दासी अेक }

" श्रीराम माझा हो राजाधिराज ध्रु०
वीरासन पीतवसन सजलजलदकान्ती,
वामजानुनिहितवामहस्त मूर्त शान्ती,
ज्ञानमुद्रिका विराजमान दक्षिण हस्तीं,
अिन्दुवदन, सुगुणसदन, **विजितमदन**, विलसतसे ". ( विदप १२ )

२४० '**कामना**' { [ − । भृ । भृ । भृ । + ] रुचिरवदना दोन वा अधिक
[ । भृ । भृ । भृ । + ] धवलचान्द्रिका अेक }

" कां दिवसां तू करिशि विधो म्लान आनना ?
खुलवी तुज रात्रीचा समय, आन ना. ध्रु०
स्थिति माझीही तुजसमान होय या दिनीं,
मज बहु अुदास भयद खास गमत मेदिनी,
ग्रहतारायुत लोपे मम सुखद यामिनी,
लाभो तो, त्वरित घडो पूर्ण **कामना**." ( सुमौ ५८ )

'त्रस्त मानसास' ( सुमौ २२ ) ही कविताहि या कामनाजातींतच आहे. 'वैशाखमासिं०' ( किग्र ४५२ ) या पद्याची हीच जाति आहे पण रचना थोडी शिथिल आहे.

"या जाअिजुअी मोगरिला बहर तो अला,
गुञ्जारव करण्यांत गुङ्ग मधुप जाह्ला,
नव पल्लव ते फुटतिं सकळ वृक्षगणांला,
कुसुमगन्धयुक्त मन्द वात सूटला." ( किग्र ४५२ )

२४१ 'हृदयहारी' { [ । भृ । भृ । भृ । + ] धवलचन्द्रिका अनेक
{ [ । भृ । भृ । भृ । – + ] परिलीना अेक

"लपत छपत येअुनिया मारिशि पिचकारी,
भिजविशि का तनुलतिका कुटिला, मम सारी ? ध्रु०
केसांतुनि रङ्गाचे थेम्ब निथळतां
पदर चिम्ब भिजुनि अुरीं तोवि बिलगतां,
चिडलेली नजर तुझी मजशि विन्धतां
या परतें साङ्ग कुठे चित्र हृदयहारी." १ ( यग ५९ )

खालील सात जातींच्या कडव्यांत [ । भृ । भृ ] या जीवन लहरी मात्रावलीचें अग्रेसरत्व आहे.

२४२ 'रमावर' { [ । भृ । भृ ] अनेक
{ [ । भृ । भृ । भृ । भृ । भृ । + ] अेक

२४३ 'अुन्मनी' { [ । भृ । भृ ] अनेक
{ [ । भृ । भृ । भृ । + ऽऽ – । भृ । + ] संयुक्त अेक

२४४ 'हृदयवरद' { [ । भृ । भृ ] अनेक
{ [ । भृ । भृ । भृ । भृ । + ] अेक

२४५ 'मधुमधुरा' { [ । भृ । भृ ] अनेक
{ [ । भृ । भृ । भृ । भृ ] अेक

२४६ 'अरुण' { [ । भृ । भृ ] अनेक
{ [ । भृ । भृ । भृ । – ᵕ + ] अेक

२४७ 'शुभवदना' { [ । भृ । भृ ] अनेक
{ [ । भृ । भृ । भृ । – + ] अेक

२४८ 'पुण्डरीक' { [ । भृ । भृ ] अनेक
{ [ । भृ । भृ । भृ । + ] अेक

२४२ ‘ **रमावर** ’ { [ । भृ । भृ ] जीवनलहरी अनेक
[ । भृ । भृ । भृ । भृ । भृ । + ] अेक

करि अति त्वरा
घडिघडिघडि पलपल जप अमृतधाम रामनाम धरुनि आदरा. ध्रु०
जो अिन्द्रियसङ्घ दक्ष
तो निजकल्याणदक्ष
त्यज वटवट खटपट अुगि, झटपट करि कपटरहित
भज **रमावरा.** ” ( विदप ३७ )

२४३ ‘**अुन्मनी**’ { [ । भृ । भृ ] जीवनलहरी अनेक
[ । भृ । भृ । भृ । + ऽ ऽ – । भृ । + ] अेक संयुक्त

( १ ) “ बान्धावरि झुडुप अेक,
पुष्प तयावरि सुरेख
पाहुनि मी निज हृदयीं मुदित जाहलों
त्याजवळि चाललों. १
जाअुनिया त्या सुमनीं
काय असे, हें स्वमनीं
मनन करित **अुन्मन** मी तेथ ठाकलों,
या पङ्क्ति बोललों. ” २ ( केक ११० )

‘ सत्य, दिव्य आणि शान्त ’ ( विक ४ ) आणि ‘ अर्धस्फुट पुष्पाप्रत ’ ( नाव १८ ) या कविता या अुन्मनीजातींत आहेत.

२४४ ‘ **हृदयवरद** ’ { [ । भृ । भृ ] जीवनलहरी अनेक
[ । भृ । भृ । भृ । भृ + ] अेक

( १ ) “ धणी – ० सकल तरणि–कुलज नृपति मुकुटमणीरे. ध्रु०
परम सदय **हृदयवरद**
दुरितजलधिपतितकरद
शतमुखमखविजयवरद खचर निकट पवनफणी रे. १

असुर दनुज नमन मात्र
करुनि होय भव्य पात्र,
शरण आलियासि जो न पूर्वकर्म किमपि गणीरे." २
(मोस्फुका १/३७०)

(२) " अर्थहीन गाशी तू काहिही मुली !
होशीही तल्लिन किति सहज आपुली ! ध्रु०
लाख जिभा चालवून
जें न अुकलि पण्डितगण
तें येथे ये समजुन ज्यास बालबोलि अुमगली." (अज्ञा १२४)

२४५ 'मधुमधुरा' { [ ।भृ।भृ ] जीवनलहरी अनेक
[ ।भृ।भृ।भृ।भृ ] दासी अेक

(१) " डोळे तुमचे जादुगिरी, आमूच्याकडे पाहुं नका ! ध्रु०
तुम्हि जातां मुलखावरि
माझि चिन्ता कोण करी ?
अेकलि मी राहुं कशी ? फार दिवस लावुं नका !"
(अेक प्राचीन पद्य, संहिता प्रतिभापाक्षिकावरून.)

(२) " लग्न नव्हे मरण अुद्या ठरलें तें टळत नाहि. ध्रु०
मातेची धरिलि कास,
परि तुटली तीहि आस;
नवस बोलिले जिवास, अजुनि कसा वळत नाहि ?" (देशा ६९)

(३) " मधुमधुरा मुरलिधरा, आज असें काय गडे ?
लावुनि टक बघतां मुख ? दृष्टिस नव काय पडे ? ध्रु०
नजर तरी जादुगिरी !
आवर, बेभान करी,
राहुं अुभी कोठवरी ?
शिरिं घागर, मनिं खळबळ, न कळत पायिं चाल अडे." १
(गोपाश्रा–विवी ९१)

'कञ्जनयन गोपाल' (विदप ३४), 'कमलनयन गोपाल' (विदप ३५) 'नन्दसुता ओळखितां०' (गोबो १३) आणि 'कालचा गुलाब कुठे' (कावा- ३२) या कविता या मधुमधुराजातींत आहेत.

२४६ 'अरुण' { [ । भृ । भृ ] जीवनलहरी अनेक
{ [ । भृ । भृ । भृ । – ᵕ + ] मदनरङ्ग अेक

(१) " प्रिये पहा रात्रीचा समय सरुनि येत अुषःकाल हा. ध्रु०
थण्डगार वात सुटत,
दीपतेज मन्द होत,
दिग्वदनें स्वच्छ करित **अरुण** पसरि निज महा." १ (किग्र ५११)

(२) " अेकदाच पाहिलें,
पाहिलें तयाक्षणींच आपुली न राहिलें. ध्रु०
ठाअुकें न नांव–गांव,
कळवुं केवि हृदयभाव ?
हें असें अधान्तरीं जिणें न जाय साहिलें." १ (अुपो ७)

(३) " सहज तुझी हालचाल मन्त्रें जणु मोहिते. ध्रु०
सहज चालणेंहि तुझें
सहज बोलणेंहि तुझें
सहज पाहणेंहि तुझें मोहनि मज घालितें. १ " (तासक १६८)

'जोहार' (विक ८१) 'मधुयामिनी' (बाक २५), 'जगाचें गाणें' (गोवा ६०), 'पुनर्विकसन' (गोवा ७७), 'प्रीतीचा वास' (तासक ५८), 'साम्राज्यवादी' (तासक १८१) अित्यादि कविता या अरुण- जातींत आहेत.

(४) " नेत्र अुघडुनी
बघशि कुणा काय जनीं नेत्र अुघडुनी ? ध्रु०
चोहिकडे रम्यपणा
बघुनि तोषवीशि मना;
पद्मिं मधुप, विश्विं अुडुप रुचिर सृष्टि मानिनी." (टेआ १/१९४)

हें पद्यहि या अरुणजातीचेंच आहे. परन्तु ‘भक्तजन सदा०’ या पद्याच्या चालीवर लिहिलेल्या अशा पद्यांच्या कडव्याच्या अन्त्य चरणांत आरम्भीं जे दोन भृङ्ग गण समयक येतात ते पुष्कळदा अधिक मात्रांचे आढळतात; ( ‿ – ‿ ‿ ‿ ) या गणाच्या ठिकाणी ( – – ‿ ‿ ‿ ) अशी रचना आढळते आणि मग आद्यगुरु प्रयत्नें लघु अुचारावा लागतो !

२४७ ‘**शुभवदना**’ { [ । भृ । भृ ] जीवनलहरी अनेक
[ । भृ । भृ । भृ । – + ] परिलीना अेक

( १ ) “श्रीगुरुचें चरणकमल हृदयीं ऽ स्मरावें. ध्रु०

रामदास साङ्गे तुज
अजुनि तरी समज अुमज,
विषयवीष घेअुनिया फुकट कां मरावें !” ( अकक ३/१५१ )

( २ ) “नन्दतनयछन्द मला बाअि लागला गे ! ध्रु०

चहूंकडे कृष्ण दिसे,
बाअि, अितर भान नसे,
रात्रन्दिन हेंचि पिसें लागलें मला गे. १

मन्दहसितलसित वदन,
कुन्दमुकुलललित रदन,
केवळ जणु बाअि मदन, हृदयिं रङ्गला गे !” २ ( खाक ७३ )

( ३ ) रुणुझुणु ये, रुणुझुणु ये झणकारित वाळा !
लुटुलुटुलुटु दुडुदुडुदुडु ठुमकत ये बाळा ! ध्रु०

धुन्दि अजुनि रजनिनयनिं
सावरूनि पदर धरुनि
**शुभवदना** अुडुरदना देअि जाम्भयाला.” १ ( तासक १६१ )

‘प्रबोधन’ ( रेक १/७६ ), ‘अजुनि लागलेंचि दार’ ( तासक ६७ ), ‘मूकसङ्गीत’ ( गिका ९४ ), ‘अजुन’ ( यघ ६४ ), आणि राजकवि चन्द्रशेखरकृत ‘मधुर मधुर हेच झरे’ ( पामा १/६ ) अित्यादि अनेक कविता या शुभवदनाजातींत आहेत.

२४८ '**पुण्डरीक**' { [।भृ।भृ] जीवनलहरी अनेक<br>[।भृ।भृ।भृ।+] धवलचन्द्रिका अेक

(१) " **पुण्डरीक** म्यां वरिला,
याहुनि जरि अन्याला
स्वप्नींही वाहियला नाहि देह हा." (देशाप ६/३)

(२) " प्रिये अवन्तिके, नयनहृदयरञ्जिके! ध्रु०
तू जीवन, तू भूषण,
परमार्थाचें साधन,
आहे मज तुजवाचुन सर्व जग फिकें!" (विक ९३)

(३) " मना काहि तरी शान्ति धरीं चिन्तिं हरी रे! ध्रु०
अपुले हे त्यजुनि ढङ्ग
सतत धरीं सन्तसङ्ग
निशिदिनिं भज पाण्डुरङ्ग,
भवजल तरण्यास असे हीच तरी रे." १ (खाक ७६)

'पाण्डुनृपति०' (किग्र ५३) हें पद्य शिथिल आहे. 'लग्नाला जातों मी०' (किग्र ४५७), 'लक्ष्मीसम चञ्चल०' (देमृ ४३), 'नोहे हा जवन पवन' (देमृ ५५), 'चिमकुला संसार' (कावि ४८), 'हास बालिके!' (माजूस्व ५३) आणि 'सीमा' (कावा ८) अित्यादि कविता या पुण्डरीकजातींत आहेत.

खालील तीन जातींच्या कडव्यांत [।भृ।– ᵕ +] या मात्रावलीचें अग्रेसरत्व आहे.

२४९ '**स्वर्गदेवता**' { [।भृ।– ᵕ +] अनेक<br>[।भृ।भृ।भृ।– ᵕ +] अेक

२५० '**कुसुमबाण**' { [भृ।– ᵕ +] अनेक<br>[।भृ।भृ।भृ।+] अेक

२५१ '**मञ्जुला**' { [।भृ।– ᵕ +] अनेक<br>[।भृ।+] अेक

२४९ '**स्वर्गदेवता**' { [।भृ।– ᵕ +] दोन वा अधिक<br>[।भृ।भृ।भृ।– ᵕ +] मदनरङ्ग अेक

(१) " कोण तू कुठोनि येशि, कां हळूच मन्दिरीं ?
मोहवी मनास रम्य हास्यतेज सुन्दरी. ध्रु०
तूं सती जगांतली
अप्सरा नभांतली
**स्वर्गदेवता** सजून येशि वा धरेवरी. " १ (गिका १३०)

(२) " अन्धकार मातला
वेष्टितसे भूतला
शून्य मना खिन्नपणें सुखदायक जाहला." (बाक ६५)

बालकवीच्या या कवितेच्या ९ कडव्यांपैकी शेवटलीं ३ निराळ्या म्हणजे अरुणजातीचीं आहेत. ' अुघड अुघड दार रे !' (अज्ञा ८३) ही कविताहि स्वर्गदेवताजातीची आहे.

२५० **'कुसुमबाण'** { [ । भृ । – ᵕ + ] दोन वा अधिक
[ । भृ । भृ । भृ । + ] धवलचन्द्रिका अेक

(१) " हृदय साङ्ग चोरिलें कशास सुन्दरी ?
देऽ ! देन देशिं तरी दे तुझें तरी ! ध्रु०
(व) सन्त कोतवाल हा
' सज्ज गे अुभा पहा !
**कुसुमबाण** सोडवीन मी तुझ्या अुरीं. " (तासक ४१)

(२) " हिन्दबन्धुनो, चला करीत हिन्दवन्दना
गौरवूं तिला कृती करून वीरनन्दना. ध्रु०
भक्तिनेच आळवूं
अन्तरांस मेळवूं
वैभवीं विराजवूं करून दूर बन्धना." (गिफ ३५)

२५१ **'मञ्जुला'** { [ । भृ । – ᵕ + ] दोन वा अधिक
[ । भृ । + ] अेक

(१) अुगिच काय बुल्बुला ऽ, शिणविशी गळा ! ध्रु०
अुगिच कण्ठ फोडिशी,

हृदय मात्र फाडिशी,
रमणिवाणि आणिशी,
स्मरणिं **मञ्जुळा.**" ( तासक ४० )

( २ ) " रति खरी न रति तव ती विकृति कामिनी ! ध्रु०
येअुनी क्षणोक्षणीं
जपशि बघुनि लोचनीं,
भासशी सुगुणखनी
द्विरदगामिनी." ( सुमौ ५० )

२५२ '**जीवितेश्वरी**' { [ । – ⏑ – ⏑ । + ] दोन वा अधिक
[ । भृ । भृ । भृ । + ] धवलचन्द्रिका अेक

( १ ) " धाव धाव गा
धाव राघवा
तूजवीण वाटतसे शीण आघवा. १
विषय घोर हे
चोरसे मला
करुनि विकल निखळपणें म्हणाति 'नागवा' ". २ ( विदप ११ )

( २ ) " जीवितेश्वरा,
बोलणें जरा
काय आगळीक होअि, जोडितें करा." ( राम–कि १० )

'प्रतीक्षा' ( यध १४१ ) ही कविता या जीवितेश्वरीजातींत आहे.

## हरावर्तनी

२५३ '**दीपारती**' { [ । – – ⏑ । – – ⏑ । – – ⏑ । + ] दोन वा अधिक
[ । – – ⏑ । – – ⏑ । – – ⏑ । – – ⏑ । – – ⏑ । – – ⏑ । – – ⏑ । + ]

" **दीपारती** घेअुनी दों करीं
देवा, अुभी देवता सुन्दरी
या हिन्दभूची असे अेक आशा, अता सार्थ होवो तुझी वैखरी. "
(अि-मनोमा नोवे–१९३४ )

२५४ ‘ **दिव्याङ्गना** ’ { [ | – – ⏑ | – – ⏑ ] दोन वा अधिक
[ | – – ⏑ | – – ⏑ | – – ⏑ | – + ]

“ तरुणा जिवा, अन्त
हें सत्य अत्यन्त;
कसली वृथा खन्त ? करिं मौज घडिची. ” १
“ स्वप्नांत सुस्नात
**दिव्याङ्गना** कान्त
पाहूनिया भ्रान्त हा जीव झाला. २
कटु मद्य हें गोड,
लागे जिवा ओढ
मिळवील तें जोड दिव्याङ्गनेची. ” ३ ( तासक २०१ )

२५५ ‘ **सुवन्दित** ’ { [ | – – ⏑ | – – ] दोन वा अधिक
[ | – – ⏑ | – – ⏑ | + ] अेक

“ प्रभुचें **सुवन्दित** नाम असो. ध्रु०
मी नग्न आलों
जाअीन नग्न
हा बोध मजला ठसो.
प्रभुनेच दिधलें,
प्रभुनेच नेलें,
तरि दोष प्रभुला नसो “ ( अुस २६८ )

२५६ ‘ **वीरभद्र** ’ { [ – ⏑ – | – ⏑ – | – ⏑ – | –⏑ + ] वरमङ्गला अनेक
[ – ⏑ – | – ⏑ – | – ⏑ – | + ] देव अेक

( १ ) “ डुमडुमत डमरु ये, खणखणत शूल ये,
शङ्ख फुङ्कीत ये येअिं रुद्रा !
प्रलयघनभैरवा, करित कर्कशरवा
क्रूर विक्राळ घे क्रुद्ध मुद्रा ! ध्रु०
पूर्वि नरसिंह तू प्रगटुनी फाडिले

दुष्ट जयिं अन्य गृहिं दरवडे पाडिले
बनुनि नृप तापुनी चण्ड, जन ताडिले–
दे जयांचें तया **वीरभद्रा** !"! १ ( तासक १२७ )

( २ ) "वाऽरे सर्वथा मुक्त झालों. ध्रु०
रुक्मिणीने मला मन्त्र जो कथियला,
जुळुनिया होअिलचि सफल तो चाङ्गला;
काय फसवील ती या नराला !" ( किग्र ५२१ )

## वर्ग ४ था

### विषम जाति

### प्रकार दुसरा

विषमजातीच्या पहिल्या प्रकारच्या व्याख्येंत ज्या विषमजाती बसत नाहीत त्यांचा समावेश या वर्गांत केला आहे.

२५७ '**यक्षपुरी**'
[ प । ᵕ +, अु । प । ᵕ + ] सूर्यकला दोन
[ अु । प । ᵕ + ] पर्वती तीन
[ । प । प । प । ᵕ + ॥ अु । प । ᵕ + ] अेक संयुक्त

" नील नभोमण्डलीं –० अस्फुट **यक्षपुरी** देखिली
धरुनी सुफलावली, डोलती बघ पुढती नारळी
स्वदेहें बाळावर सावल्या
कराया वात्सल्यें वाकल्या,
अैक या सळसळती झावळ्या,
अविरत त्यांची मर्मर ही का हुरहुर हृदयांतली
जरी मी कण्हतों ही आपुली." ( कास ६१ )

२५८ '**झपूर्झा**'
[ । प । – – + ] अचलगति अेक
[ । प ] दोन
[ । प । – – + ] अचलगति तीन
[ । प ] दोन
[ । प । – – + ] अचलगति दोन

“ हर्ष खेद ते मावळले
हास्य निमालें
अश्रु पळाले,
कण्टकशल्यें बोथटलीं,
मखमालीची लव वठली,
काही न दिसे दृष्टीला,
प्रकाश गेला
तिमिर हरपला;
काय म्हणावें या स्थितिला ?
झपूऽर्झा गडे झपूऽर्झा ” ( केक ११२ )

२५९ ‘सदया’
[ – । प । – + ] अुद्धव अेक
[ – । प । – +, – ᴗ । + ] मालिबाला अेक
[ – । प । प । प । प । – + ] भवानी अेक
[ – । प । – +, – ᴗ । + ] मालिबाला अेक

“ मम हृदयीं जन्मा घेअीं,
ये सदया, येथे राहीं, ये प्रभो ! ध्रु०
मी माझें लोपुनि जावो,
जग तुझेंच अवघें होवो ये, प्रभो !

मज म्हणोन कुणि दुर्भागि, बावळा, जोगि, मला क्षिति
नाहि, मला भय नाही,
तू माझा होअुनिं राही हे प्रभो ! ” १ ( अुस ३९८ )

२६० ‘अभिमता’
[ । भृ । भृ ] जीवनलहरी तीन
[ । भृ । भृ । + ] अेक
[ । भृ । भृ । भृ । + ] धवलचन्द्रिका अेक

“ साङ्ग कुठे पाहुं तुला सखि स्वतन्त्रते ?
जनिं विजनीं साङ्ग कुठे रमशि सुव्रते ?
तू धन मम, तूच मान

तू जीवन, तूच प्राण
तव सूचित मज प्रमाण
अजुनि किती अन्त पाहशी ?
हो प्रसन्न मज प्रणता शीघ्र **अभिमते**!" ( टिक २०२ )

## पुरवणी

हरावर्तनी समजाति

७४ अ **देव** [ ।– ᵕ –।– ᵕ –।– ᵕ –।+ ]

" कोणि काही नका शिकवुं आता !
दोष लावूं नका व्यर्थ ताता !
देअि हातें मला तात ज्यासी
लग्न होतांचि तो **देव** मजशी" ( देशा. ८९ )

## वर्ग ५ वा

स्वैरपद्य जाति

स्वैरपद्यासाठीं रा. व्यङ्कटेश शङ्कर वकील यांनी पद्मावर्तनीजातीचा, रा. आत्माराम रावजी देशपाण्डे यांनी अग्न्यावर्तनी जातीचा आणि रा. भवानीशङ्कर पण्डित यांनी भृङ्गावर्तनीजातीचा कसा अुपयोग केला आहे याचें विवेचन पहिल्या अध्यायांत ( पृ ३९–४३ ) सोदाहरण येअून गेलेंच आहे. अग्न्यावर्तनीजातीचा अुपयोग स्वैरपद्यासाठी केल्याचें आणखी अेक अुदाहरण, रा. वामन नारायण देशपाण्डे यांनी आपल्या 'चित्रवेडा' या अप्रकाशित काव्यांतून, कृपा करून पाठविलें आहे तें खाली देतों.

" चित्र आहे निस्तुकच हें बापुडें
हीन कोणी देहधारी कामिनी,
काय नकळे होंहि मतिला माझिया ?
हासतां मग कासया ?
काय परि करुं ?
केवि तरि कथुं ?

चित्र हें; नच देहिनी ही—हें कळूनहि मन्मन
चित्रितेच्या रूपदीप्तिस भाळलें!
शलभ आपण जाहलें!!" ( चित्रवेडाकाव्य )

चरण मुख्यतः [ । ७ । ७ । ५ ] असा असून अर्थानुरोधाने तो लहानमोठा करण्यांत आला आहे.

# अध्याय ७ वा

## छन्दश्छाया

बायकांच्या तोण्डीं असलेलें पुढील परम्परागत गीत पहा :—

तुझा । लाडका ग । यशोदा ऽऽ । माअी,
तुझ्या । हरीने ऽऽ । खाल्लें माझें । दही. ध्रु०
पहिली । बोलली ऽऽ । सुताराची । साळू
तिच्या । अङ्गणीं ऽऽ । खेळतसे । बाळू. १
दुसरी । बोलली ऽऽ । तेलङ्ग्याची । गङ्गा,
तिच्या । अङ्गणीं ऽऽ । घाली हरि । पिङ्गा. २
तिसरी । बोलली ऽऽ । ब्राह्मणाची । अुमा,
तिच्या । अङ्गणीं ऽऽ । खेळे हरि । झिम्मा. ३
चौथी । बोलली ऽऽ । मराठ्याची । राणी,
तिच्या । अङ्गणीं ऽऽ । खेळे चक्र– । पाणी. ४

येथे चरणांतील पहिली टाळी तिसऱ्या अक्षरावर पडते, म्हणजे आद्यतालकपूर्व गण दोन अक्षरी आहे. तथापि दहापैकी तीन चरणांत हा आद्यतालकपूर्व गण त्र्यक्षरी दिसतो.

पहिल्या टाळीनें आरम्भ होणाऱ्या आवर्तनांत, ध्रुवपदाचा पहिला चरण वगळल्यास तीन तीन अक्षरें आहेत नि पुढे द्विमात्रक विराम आहे.

त्याच्या पुढील आवर्तनांत, पहिला चरण वगळल्यास चार चार अक्षरें आहेत. पहिल्या चरणांत त्या ठिकाणीं तीन अक्षरें असून पुढे द्विमात्रक विराम आहे.

तिसऱ्या आवर्तनांत सर्वत्र दोन दोनच अक्षरें आहेत.

हा अेक पद्मावर्तनी छन्द आहे. छन्दांत प्रत्येक अक्षर, मग तें दिसायला लघु असलें तरी गुरु अुच्चारायचें आणि गुरुच समजायचें असतें. सारींच अक्षरें गुरु म्हणजे द्विमात्रक मानायचीं हा छन्दाचा मूलभूत नियम असल्या-

मुळे छन्दांतील पद्मगण हा चार अक्षरांचाच असतो. लघु अक्षरच नाही म्हणून लगक्रमाचा प्रश्नच अुद्भवत नाही. म्हणून छन्दास लगत्वभेदातीत अक्षर-सङ्ख्याक पद्य म्हणतात.

परन्तु प्राचीन रचना सहेतुकपणें रेखीव अशी नाही. तिच्यांत मध्येच अेखादें अक्षर अधिक येतें. तेथे दोन अक्षरें त्वरेने अेका गुरु अक्षराच्या म्हणजे दोन मात्रांच्या कालांत अुच्चारायचीं असतात. हीं दोन्ही अक्षरें लघु असल्यास तीं दोन मात्रांच्या काळांत सहज अुच्चारितां येतात. वरील पद्यांत चरणारम्भीं पहिली, दुसरी, तिसरी हे जे तीन शब्द आले आहेत त्यांतील पहिलीं दोन दोन अक्षरें दोन दोन मात्रांच्या कालांत अुच्चारायचीं आहेत. असें शैथिल्य आधुनिक छन्दोरचनेंत तरी नसावें. छन्द कण्टाळवाणा होअूं नये म्हणून त्यांतील अक्षरांची सङ्ख्या न्यूनाधिक केली पाहिजे असें मुळीच नाहीं. अकारान्त शब्दांतील अन्त्य अकार गाळून अथवा अेक मात्रक अुच्चारून अुपान्त्य अक्षर अनुक्रमें चतुर्मात्रक वा त्रिमात्रक अुच्चारल्याने तेवढें वैचित्र्य आणितां येतें. गाव हा शब्द गाव ऽ असा अुच्चारण्याच्या ठिकाणीं गाऽऽव् अथवा गाऽव असा अुच्चा-रितां येतो. पुन्हा हा भेद वैकल्पिक आणि वैयक्तिक अुच्चारापुरताच असल्याने पद्याच्या स्वरूपांत विकृति कोणतीच होत नाही.

छन्द केवळ अक्षरसङ्ख्याक नसतो. छन्दांतहि लयबद्धता असावी लागते. प्रत्येक अक्षर द्विमात्रक असल्याने छन्द हे पद्मावर्तनी वा भृङ्गावर्तनी असतात; ते अग्न्यावर्तनी वा हरावर्तनी असूं शकत नाहीत. पण छन्दांची मोडणी ही जातिमोडणीसारखीच असते. जातींत जितक्या सशब्द मात्रा असतात त्याच्या अदपट अक्षरें त्या छन्दांत असायचीं. छन्दांत मागे छान्दस वा पुढे छन्द हा शब्द ठेअून जातींचींच नावें छन्दांना दिलीं तर पारिभाषिक संज्ञांची सङ्ख्या तितकीच परिमित राहील. छन्द पादाकुलक म्हटलें की मात्रालेखन [ । प । प ] असेंच होणार; पण अक्षरें मात्र आठच असणार आणि टाळी अर्थात् पहिल्या नि पाचव्या अक्षरावर पडणार. छान्दस रचना ही स्थूल असल्याकारणाने अेकाच पद्याच्या अनेक मोडणी कित्येकदा सम्भवतात. शब्द कोठेहि तुटला तरी कानाला तें तितकें कडू लागत नाही. तथापि छन्दांताहि शब्द भलत्या ठिकाणीं तुटूं नये याविषयी काळजी घ्यायलाच पाहिजे. जातींत जेथे अपरिहार्यपणें यति येतो त्या ठिकाणीं छन्दांतहि यति पाळायलाच हवा.

पद्याचें विषमाक्षर आणि समाक्षर मिळून अेखादा द्व्यक्षरी शब्द नसावा. '। कां लोक धा –। वती असे' यापेक्षा '। लोक कां धा –। वती असें' म्हणणें कानाला अधिक चाङ्गलें लागतें.

मराठींतील अभङ्ग, ओवी, घनाक्षरी अित्यादिकांची रचना छान्दस आहे. खिस्ती अुपासनासङ्गीतांत 'अिङ्ग्रजी चालीवर' म्हणून जीं पद्यें दिलीं आहेत तीं वस्तुतः छन्दोरूप आहेत. संस्कृतांत आणि प्राकृतांत न आढळणारी ही लगत्वभेदातीत छन्दोरचना मराठींत आढळते. अगदी आरम्भापासून आढळते ही गोष्ट चिन्तनीय आहे. ठोकळ मानानें लयाला अनुसरणाऱ्या लोकगीतांपासून छन्दाचा अुगम झाला असावा. शिशुगीतांना म्हणूनच छन्द योग्य वाटतो.

ओवीची रचना अनियमित वाटते. महानुभाव लोकांत शके १५०० च्या मागेपुढें भीष्माचार्य नामक ग्रन्थकारानें आपल्या मार्गप्रभाकर नामक ग्रन्थाच्या ज्ञानखण्डांत ओवीचें पुढील प्रमाणें बान्धलेलें लक्षण विश्वनाथ काशीनाथ राजवाडे यांनी आपल्या मराठी छन्द या पुस्तिकेंत अुध्दृत केलें आहे:—"गायत्री छन्दापासौनि धृतिपर्यन्त। ग्रन्थ वोवियाचे तीन चरण जाणावे निश्चित। प्रतिष्ठेपासौनि जगतीपर्यन्त। चौथा चरण." या लक्षणांत गायत्रीच्या ठिकाणीं सुप्रतिष्ठा आणि प्रतिष्ठेच्या ठिकाणीं मध्यमा अशी सुधारणा राजवाडे यांनी सुचविली आहे. अेकूण काय लेखी ओवीचें स्वरूप फारच अनियमित आहे.

परन्तु ओवी हा गेय पद्यप्रकार होता असें दिसते. सङ्गीतरत्नाकराच्या प्रबन्धाध्यायांतील पुढील अवतरण प्रो. ग. ह. रानडे यांनी माझ्या दृष्टीस आणिलें आहे:—

" खण्डत्रयं प्रासयुतं गीयते देशभाषया
ओवीपदं तदन्तेचेदोवी तज्ज्ञैस्तदोदिता
त्रयाणां चरणानां स्युरेकाद्यावृत्तितो भिदाः
आदिमध्यान्तगैः प्रासैरेकाद्यैश्च पदे पदे
छन्दोभिर्बहुभिर्गेया ओव्या जनमनोहराः
सानुप्रासैस्त्रिभिः खण्डैर्मण्डिता प्राकृतैः पदैः"

ज्या गेय ओव्या आजीबाअींच्या आणि मुलीबाळींच्या तोण्डून अद्यापि अैकायला मिळतात त्यांतील शैथिल्य मर्यादित दिसतें. आणि त्या ऐकून ज्या

ओव्या रचण्यांत येतात त्यांत तें शैथिल्यहि येतें. या ओव्यांचे दोन प्रकार कल्पितां येतील. दोन्ही प्रकारांत चार चार चरण असले तरी पहिल्या प्रकारांत चाऱ्ही चरण जितपत सारखे असतात तितपत सारखे दुसऱ्या प्रकारांत पहिले तीनच चरण असतात आणि चौथा चरण तोकडा चार-अक्षरी असतो. हे जे चरण जवळ जवळ सारखे असतात ते सहा-अक्षरी सात-अक्षरी वा आठ-अक्षरी असतात. चरण सात-अक्षरी वा आठ-अक्षरी असल्यास आवर्तनारम्भ अनुक्रमें दुसऱ्या वा तिसऱ्या अक्षरापासून होतो.

१ ल्या प्रकारच्या ओवीचीं काही अुदाहरणें

(१) "। शितं तिथं । भुतं
घरीं । अेक गज –। बज
बो –। बडा बोल । नाही
नाही । कानीं कुज –। बूज." (तासक १९४)

(२) "। भ्रताराच्या । राज्यीं
अुणें । ठेवीना रे । देव
। बहिणीच्या । मनीं
चो –। ळीची आशा । ठेव." (तासक १९६)

(३) अु –। चकी लागे । माय,
काही । कल्याने रा –। हीना;
का –। ढिशी आठ –। वणी ?
सुखी । माय, तुझी । मैना." (तासक १९५)

२ ऱ्या प्रकाराचीं काही अुदाहरणें

(१) "। ये ग ये ग । गाअी
बा–। ळाला दूदू । देअीं,
पर –। तोनी राना । जाअीं
। चरायाला. "

(२) "। माझें मोठें । घर
केर । लोटितां लो –। टेना
सभा । बैसलीं अु – । ठेना
। भाअूजींची " (दालो २/६५)

(२) "पाखरांची शाळा भरे पिम्पळा –० वरती
चिमण्यांचीं पोरें भारी गोङ्गाट –० करिती.
अुतरतें अून, जाते टळूनी –० दुपार
पारावर जसा यांचा भरतो –० बाजार." ( पारा ६६ )

मायदेवकृत 'गोकुळ' (माभा ७४) या कवितेची रचना शिथिल आहे.

५ **लवङ्गलता छन्द** [।प।प।प।– –] १४ अक्षरें

( १ ) "सौरी झालें जनीं
राम केला धनी. ध्रु०
शान्तिगुन्ती घेअुन् हातीं भक्तिचोळी ल्याली,
मीतूपण ठावें नाही विसरून गेली.
कर्म नेणें धर्म नेणें, नेणें आम्ही काही
ज्ञानदेव म्हणे आम्हां येणें जाणें नाही." ( ज्ञापम १/६ )

( २ ) "येअीं गा तू येअीं गा तू पण्ढरीच्या राया
तुजवीण शीण वाटे, क्षीण झाली काया,
याति हीन मति हीन, कर्म हीन माझें;
दीननाथ दीनबन्धु नाम तुम्हां साजे.
विटेवरी अुभा नीट कटीवर कर,
तुका म्हणे आम्हां हेचि ध्यान निरन्तर." ( तुका–पस १/८१ )

( ३ ) "ये ग ये ग चिअू. ध्रु०
हात हलवून तुला किती वेळा बाहूं ? १
तुझ्यासाठी कापसाचें घर केलें मअू." २
( मागत्र्यं–आमा जुलै १९३६ )

ज्ञानेश्वर पृ. ७७, पद्य ३१ वें (चित्राशाळा प्रत), तुकाराम (२/१५०, अभङ्ग क्रम २४९९–२७५२ अिंदुप्रकाश गाथा. ), 'रूपगर्विता' ( देवाना-कार ४०/७ ) 'सुना, सुना' ( माअ ८ ), 'वाघ्याचें गाणें' ( स्नेप्र १७ ) अित्यादि गीतें या छन्दांत आहेत.

**६ शुक्रकला छन्द** [ । प । – –, – – । प । – – ] १४ अक्षरें

" तरीच् मेशी बोल पोरा जिव्हाळ्याची ओल.
मशी घेतां भास जीवा, मीतूपणा नास.
मजसवें खरा पण जाअूं नेदी घरा.
आमुचिये रङ्गीं दुजें तगेना ये सङ्गीं.
तुक्यासवें भास हरी जीवा करी नास." ( अभङ्ग १५४ वा )

**७ दयिता छन्द** [ । प । – – – ऽ ऽ । प । – – ] १३ अक्षरें

" अेकान्तीं जा सकाळीं–०तसा दुपारींही
तसेंच सन्धिकाळीं–०फिरून रात्रींही;
मनांतून टाकूनी–०विषयवासना
विनम्रता धरुनी–०करीच प्रार्थना." ( अुस ४२८ )

**८ चन्द्रकान्त छन्द** [ । प । प । प । – ] १३ अक्षरें

( १ ) " भज रे मना रे बा रे भज रे मना
रामकृष्ण वासुदेव भज रे मना
आता काय नरदेह येअील पुन्हा ! " ( प्राचीन पद्य )

( २ ) " अखण्डित असावेसें वाटतें पायीं.
साहोनी सङ्कोच ठाव थोडासा देअीं.
असो नसो ठाव आलों तुझिया ठायां.
पाहें कृपादृष्टी मज पण्ढरीराया !
तुका म्हणे आम्हीं तुझीं वेडीं वाकडीं,
नामें भवपाश हातें आपुल्या तोडीं." ( तुकाराम पृ. १८७ )

( ३ ) " बघा माझी बेबी किती आहे तरी गोड्
अुतर ना खाली बेबी, जरा तरी सोड्. " ( माअ ११ )

श्रीयुत वामन नारायण देशपाण्डे यांचें ' कपटवेष ' हें नाटक याच छन्दांत पण निर्यमक आहे. आरम्भींच्या ओळी अशाः—

रमणी—" अुषे, ठेव आवरून पूजासाहित्य.
झाली बाअी यथासाङ्ग पूजा अवघी
सन्ध्ये, सार वाती जरा समअींतल्या

अुषा— निकें महाराज—
रमणी— मूर्खे, वोसणशी का ?
महाराज गे मी आहे की महादेवी."

९ **दोहा छन्द** [।प।---ऽऽ।प।+] १२ अक्षरें

" गृहाप्रति ममता - ० देअी शोभा फार्
प्रेम तेथे वसतां - ० सुख नान्दणार्
शान्ति तेथे राहती
तृप्ति तेथे नान्दती
वेळ वेगें क्रमती - ० सर्व साधणार् १
गृहीं जया ममता - ० क्रोध न तिथे
प्रेम गृहीं वसता - ० न हेवा तिथे
झोपडींत नान्दलों
दुक्खहानि पावलों
प्रेम बद्ध राहिलों - ० सर्व साहवे ". २ ( अुस ४५२ )

या छन्दाच्या कडव्यांत अन्तरा आहे.

१० **चक्रपाणि छन्द** [--।---ऽऽ।प।--] ११ अक्षरें

" पहिली बोलली - ० सुताराची साळू
तिच्या अङ्गणीं - ० खेळतसे बाळू
दुसरी बोलली - ० तेलङ्ग्याची गङ्गा
तिच्या अङ्गणीं - ० घाली हरि पिङ्गा
तिसरी बोलली - ० ब्राह्मणाची अुमा
तिच्या अङ्गणीं - ० खेळे हरि झिम्मा
चौथी बोलली - ० मराठ्याची राणी
तिच्या अङ्गणीं - ० खेळे **चक्रपाणी** " ( प्राचीन पद्य )

११ **वंशमणि छन्द** [।प।प।--] १० अक्षरें

" निखळून गगनांमधून
पडतां हें वेगें कोसळून

कोणी तरी अदृश्यांचि कर
खाली खाली ओढी अनिवार ”

( देवाना–रमा ८।२ )

१२ पादाकुलक छन्द [।प।प] ८ अक्षरें

( १ ) “ कान्हा वाटे देव भेटे
हातीं पायीं तोंचि दाटे.
ओळखिला देव राजा,
सर्व शोक गेला माझा.
समसङ्गें सङ्ग गेला
रङ्गेवीण रङ्ग केला. ” ( केस्वा–पस १/२११ )

( २ ) “ अैशी अैकोनिया वाणी
नेत्रानें अुघडी राणी,
वाटे मनास नीरोषा
पावला भूपति तोषा ”. ( मोसारा २/७ )

( ३ ) “ सेवितां श्रीगुरुकुळ
ब्रह्म त्रैलोक्य गोकुळ
दासपुत्र अनुकूल
आहे आहे नाही नाही.” ( अक १३ )

( ४ ) “ मिठी हातां हातीं पडे
दिठी दिठीवरी जडे
अपुल्या ग हृदयाचे
सुरू झाले हे पवाडे.
मधुरात ही चान्दणी
खुले मोगरा अङ्गणीं
परिमल दरवळे
मन्द वायु श्वासांतूनी. ” ( पगन–वामा ५/१ )

१३ अचलगति छन्द [ । प । – – – ] ७ अक्षरें

( १ ) " काय साङ्गो तूज गा
अन्तरींचें गूज गा ?
मोलें हाता येअीना,
बोलें प्राप्त होअीना;
द्वैतसङ्ग साण्डूनी
राहे तूंचि माण्डूनी." ( केस्वा-पस १/२०७ )

( २ ) " देवस्तुति वाढवा
त्याची दया गाजवा
अीश्वराची करुणा
सर्वकाळ सरेना. " ( अुस ३१ )

'भातुकलीचें गाणें' ( माजूस्व १०८ ) 'आभाळाच्या अङ्गणीं' (पचचा) आणि 'सुशे सुशे अूठ ग' ( माअ १ ) या कविता या छन्दांत आहेत.

१४ देवी-वर छन्द [ – – ! प । – – ] ८ अक्षरें

( १ ) " रूप पाहतां लोचनीं
सुख जालें वो साजणी
सर्व सुखाचें आगर
बाप रखमादेवी-वर " ( ज्ञानदेव )

या छन्दांत पहिल्या दोन अक्षरांचा गण आद्यतालक पूर्व असल्यानें त्याच्या अन्तीं बहुशः शब्द पुरा व्हावा लागतो. अभङ्गरचनेंत हा गण कित्येकदा मध्येच गाळलेला दिसतो.

( २ ) " घेअी घेअी माझे वाचे,
गोड नाम विठोबाचें.
तुका म्हणे जीवा,
नको सोडूं या केशवा. "

( ३ ) " शुद्ध बीजा पोटीं
फळें रसाळ गोमटीं.

मुखीं अमृताची वाणी
देह वेचावा कारणीं.
सर्वाङ्गीं निर्मळ
चित्त जैसें गङ्गाजळ.
तुका म्हणे जाती
ताप, दर्शनें विश्रान्ती."

( ४ ) "नको देवा कधी देऊं
कुणा परतन्त्र जिणें
त्याच्याहून दारोदारीं
बरें भिक्षान्न सेवणें." ( कावि ८८ )

( ५ ) "माझ्या छकुलीचे डोळे
दुध्या कवडीचे डाव
'बाअी कमळ कमळ !'
गोड चिडीचं ग नाव." ( कोल ५६ )

या छन्दांत त्रिपद्यांची आवलि रचणें बरेंच कविप्रिय झालें आहे.

( ६ ) "आकाशींच्या अन्तराळीं
तारकांना तेज चढे
तुझी माझी प्रीति जडे." ( अफु ६१ )

१५ अुद्धव छन्द [ – । प । – – ] ७ अक्षर

( १ ) "दिवस मावळूं दे,
विझूं दे निमिषांत
प्रकाश दिवसाचा
वाढत्या तिमिरांत." ( देवाना–विवी १३७ )

( २ ) "कासया घोङ्गावून
स्फुन्दशी मरुद्गणा ?
चहाळ लागतांच
दचके माझा कान्हा."
( देवाना–रमा मे–जून १९२९ )

**१६ शुद्धसती छन्द** [ । प । – – ] ६ अक्षरें

( १ ) " आसवांच्या माळा
साठवूं या किती ?
घालाया त्या गळां
वाट पाहूं किती ?
दीप पाजळिला
अखण्ड ही वात
धीर दे ये तिला,
वाहे झन्झावात. " ( देकु–यमा १७/१८ )

'कमी आणि ठमी' ( माअ २४ ) 'डोला बाअी डोला !' ( माजूस्व १५४ ) आणि 'बोकोबा' ( माशि ४ ) या कविता याच छन्दांत आहेत. या छन्दांत अन्त्यावर्तनांत जीं दोन अक्षरें असतात त्यांचा बहुशः अलग शब्द असल्याने तो पुनरुक्त करितां येतो. परन्तु तेवढ्याने छन्द निराळा होत नाही.

( १ ) " आहे बरें आअी आअी
रडूं नको काही काही
घालितें मी तोतो तोतो
करितें मी जोजो जोजो " ( माशि ५ )

**१७ गजवदन छन्द** [ । प । – – ऽ ऽ ऽ ऽ । प । – – ] १२ अक्षरें

हा छन्द शुद्धसतीछन्दाच्या द्विरावृत्तीने होतो.

( १ ) " जाडीचें घोङ्गडें –० येव्हढीये राती
कानींची कुण्डलें –० करी जग ज्योती
होय न हो अैसा –० संशय गमला
निर्धारितां विश्व –० व्यापक देखिला
हृदयमन्दिरीं –० दाटोनी धरावा
ही च खूण साङ्गे –० भानुदास देवा. "

( तुकारामतात्यासम्पादित अेकनाथ गाथा पृ. १४१ )

( २ ) " गजवदना रे –० गजवदना रे
नमितों तुजला –० गजवदना रे
मध्वनाथचित्तीं –० वाटे तुझी खन्ती
येशी धावोनिया –० गजवदना रे. " ( ममुक २ )

( ३ ) " यज्ञ शम्भरावा –० होतांच पुरता
गमे भूपा झाली –० जन्म सफलता
कुणा दे दक्षिणा –० कुणा देअी भूमी
याचकां सन्तुष्ट –० करी अन्तर्यामीं
घडविली तेणें –० यज्ञ पुरुषाची
कलाकुसरीची –० प्रतिमा सोन्याची. "
(देवाना–त्रिमा १/९)

( ४ ) " आलेलें भरासी –० देवा रे कणीस
मोडूनी दयाळा –० लाविसी भिकेस
मळा पिकविला –० माझ्या भावनेचा
बिन्दु बिन्दु माझ्या –० गाळून श्रमाचा "
( पा–फ ३० )

**१८ भुवनसुन्दर छन्द [ – – ! प । – ] ७ अक्षरें**

( १ ) " नाना बाहुली माझी
बघा कोनाड्यामाजीं
तिला पिसांची गादी
तिची रेशमी साडी." ( माजूस्व १०८ )

( २ ) " बघ चान्दोबा आअी
माझ्या सङ्गती येअी;
बिम्ब आभाळीं हाले
माझ्या सङ्गती चाले. " ( गिका १० )

**१९ पिशङ्ग छन्द [ । प । – ] ६ अक्षरें**

( १ ) " दृश्यातीत रे
सदोदित रे

भगवन्त रे
नान्दे नित्य रे
रूपें वीण रे
परिपूर्ण रे
नारायण रे
आहे जाण रे " ( केस्वा—पस १/१५० )

या छन्दाची मोडणी [ । भृ । — — ] अशीहि होअील, मात्र त्या मोडणीला सहेतुकपणें अनुसरून रचना केल्यास शब्द निराळ्या रीतीने बसतील. अुदाहरणार्थ ' अिवला झरा ' ( देनाघ—ओ ६ ) ही कविता पहा.

' काअू काअू गे !' ( माजूस्व ११९ ) ही कविता या छन्दांत आहे.

२० " **आन्दोलन** " छन्द [ । प । — ऽऽ ऽऽ ऽऽ ! प । — ]

( १ ) " देव घ्या कोणी देव घ्या कोणी
आयता आला घर पुसोनी
देव नलगे देव नलगे
सांठवणेचे रुघले जागे
दुबळा तुका हा भावेंविणे
अुधारा देव घेतला रिणें. " ( तुकाराम पृ. ३५८ )

( २ ) " ताअी गुणाची माझी छकुली
झोका दे दादा म्हणूं लागली.
साम्भाळ ताअी फान्दी वाकली
दोन्ही दोरांना गच्च आवळी
जो जो गे जो जो ! ( दक ६२ )

( ३ ) " तीन चाकांचा गाडा रङ्गीत
बाळ अैटीने नेअी रेटीत
चौंफेर हिण्डे खेळत हसे
दृष्टि त्यावर ठरत नसे "

( मञ्जुबाळ—आमा जुलै १९१३ )

'प्रभुसहवासार्थ विनन्ती' ( अुसं ४३६ ) आणि गोपीनाथकृत 'आमची अिन्दु' ( गोदू ७ ) या कविता आन्दोलन या छन्दांत आहेत. पुढे पहा.

२१ **पद्म छन्द** [ । प ] ४ अक्षरें

" काळा काळा
मट्ट्या आला
नीज बाळा
लाव डोळा." ( पचचा ४० )

२२ '**विठ्ठल**' छन्द [ । – – – ] ३ अक्षरें

( १ ) " जीव तू
प्राण तू
आत्मा तू
विठ्ठला." ( नामदेवगाथा पृ. ७१ )

( २ ) " ये काअू
घे खाअू
खा दाणा
वाटाणा." ( पचचा २६ )

भृङ्गावर्तनी

२३ **दासी छन्द** [ । भृ । भृ । भृ । भृ ] १२ अक्षरें

" तू प्रिय, हे प्रभु, तू प्रिय अपार
तू प्रिय, हे येशु, त्वां केला अुद्धार
मला तू सुप्रिय, हें कैसें दावीन ?
सम्पूर्ण शक्तीने मी तुला स्तवीन !" ( अुस ३४२ )

२४ **परिलीना छन्द** [ । भृ । भृ । भृ । – – ] ११ अक्षरें

( १ ) " अैसा गे माय ऽऽ कैसा हा योगी
जे ठायीं जन्मला तें ठाय भोगी. ध्रु०
आचार साण्डोनी झालासे भ्रष्ट
मावशीसी जेणें लाविला पाट." ( ज्ञा–पस १/२।)

( २ ) " ज्याचा तो जाणे ऽऽ ज्याचा तो जाणे
जाणीव निमाली त्यासीच बाणे
जनीं जनार्दन जाणोनि वागे
पदोपदीं त्यासि समाधि लागे
स्वसुखसागरीं हरपे चित्त
ठायींच्या ठायीं ऽऽ पूर्ण निवान्त." ( केस्वा—पस १/२११ )

( ३ ) " स्वागताच्या केला अङ्गणीं थाट
बघत बैसलें तुझीच वाट
आशेसम अुन्च तरूची शाखा
तिच्या खाली बघ बान्धिला झोका
सभोंती शीतल सावली दाट." ( गां—यमा ३८ )

( ४ ) " अेकत्र गुम्फून जीवन—धागे
प्रीतीचें नर्तन नाचलों मागे,
अेकटा अुभा मी तेथे
भोवती शोधीं प्रियेतें;
न दिसे कोठे; का सोडून गेली ?
लोपते का कधी प्रीति अुदेली ? " ( माजूस्व ७९ )

**२५ जीवनलहरी छन्द** [ । भृ । भृ ] ६ अक्षरें

( १ ) " धडाड धडाड
खडाड खडाड
धावते ही गाडी
केवढी धडाडी ! " ( माजूस्व १११ )

'हें कोण गे आअी ?' ( तासक ८० ) आणि 'वाघाची मावशी !' ( माशि ७ ) या कविता या छन्दांत आहेत. तिसऱ्या अक्षरानन्तर द्विमात्रक विराम घेतला तर छन्द पद्मावर्तनी होअील.

( २ ) " नदीच्या ऽऽ पैलाड
दामाजी ऽऽ सोनार " ( भुलाबाअीचें गाणें )

याच्या पुढील ओळी

" त्याने घडविला
साखळ्यांचा जोड "

यांत तिसऱ्या अक्षरानन्तर यति नसल्याने त्या

। त्याने घड –। विला
। साखळ्यांचा । जोड

अशा म्हणाव्या लागतात. हे चरण अर्थातच [ । भृ । भृ ] या छन्दांत बसूं शकत नाहीत. त्या शुद्धसती छन्दाच्या आहेत.

**२६ निर्झरगीत छन्द** [ । भृ । – – ऽ ऽ । भृ । – – ]

" अविला झरा गायन गात
चान्दण्यासवें हासली रात
हालेना जरा वेलींचें पात
निजली धरा निजलें रान. "

( देनाघ–ओ ६ )

या छन्दाशी मागील आन्दोलनच्छन्द अवश्य ताडून पहावा.

## वर्ग २ रा

## अर्धसम छन्द

### पाद्मवर्तनी

**२७ 'प्रसाद' छन्द** { [ – – – ऽ ऽ । – – –, – । – – – ऽ ऽ । – – – ]
[ प । प । – – – ऽ ऽ । – – – ] चक्रपाणि

पोर ही –० सानुली की सोन्याची –० बाहुली,
देव हिच्यावर ठेवो मायेची –० साउली.
सुन्दर –० हसते नि मोहक –० रुसते,
ठेपराअीने ही कशी चालते –० बसते !
बोबडे –० बोलते नि हृदय –० खोलते,
मन माझें बोबड्या या बोलांनी –० डोलतें.
साधेच कपडे ही घालूनी –० बागडे,
गौरीहून ज्याला त्याला परी ही –० आवडे.

या हो या –० पाहुणे या नवे या, –० या जुने
भण्डाऱ्याचा **प्रसाद** घ्या, काहीही –० ना अुणें. ( २७० )

२८ **दिव्यप्रभा छन्द** { [ । प । प । प । – – – ] १५ अक्षरें
{ [ । प । प । – – – ] ११ अक्षरें

" पुन्हा अुठण्याच्या काळीं देह आत्मा जडणार्
दुक्ख रडणें की कष्ट न होणार्
शीणलेल्या शरीराला तै विसावा मिळूनी
अन्तीं येअी **दिव्यप्रभा** फाकूनी. " ( अुस १४७ )

२९ **रक्षा छन्द** { [ । प । प । प । – – ] १४ अक्षरें
{ [ । प । – – ] ६ अक्षरें

" नाव तुझें अैकूनिया दयाळा रङ्क मी
आलों तुझ्या धामीं !
दारीं याचकांची दाटी भिनली अपार,
देणग्यांचा वर्षाव तू करिशी त्यांवर
मुखीं त्यांच्या चाले तुझा जयजयकार
निनादे अम्बर.
मीही तुजपुढें अुभा राहिलों येअून
करांतें जोडून." ( देवाना–विविधविस्तारविशेषाङ्क १९३२ )

३० **मूढा छन्द** { [ । प । – ] ५ अक्षरें
{ [ । प । प । प । – ] १३ अक्षरें

( १ ) " या ऽऽ बाअी या
बघा बघा कशी माझी बसली बया
अैकू न येते
हळुहळू अशी माझी छबी बोलते.
डोळे फिर्वीते
टुलुटुलू कशी माझी सोनी बघते.
बघा बघा तें
गुलुगुलू गालांतच कशी हसते.

मला वाटतें
हिला बाअी सारें काही सारें कळतें." (दक ६५)

३१ **मृत्युदरी छन्द** { [ । प । प । प ] १२ अक्षरें
[ । प । प । – – – ] ११ अक्षरें }

(१) "प्रभु रे ऽऽ मला असे गुण लाव लाव रे ! ध्रु०
नीति, दया, प्रीति, नम्रताहि भीति,
यांचा मला पडो खरा डाव रे. १
शास्त्र, भक्ति, स्तुति कीर्तनावडी ती,
यांची मला सुटो बहु हाव रे. २
**मृत्युदरींतून** पार नेअूनिया
देशी अन्तीं निजपदीं ठाव रे." ३ (अुस ४१५)

३२ **तेजस्वी छन्द** { [ । प । प । – – – ]
[ । प । प । – – ] }

"**तेजस्वी** तार्‍या, तू ये अुदयाला
दूर करावा निबिड अन्धार्
वाट येशूची दिसावी आम्हांला
दृष्टी पडावा तो जगदुद्धार्.
आम्ही जगाच्या राजास अर्पाया
भेटी अमूल्य आणाव्या कीं काय्
ख्रिस्त येशूच्या कृपेला पावाया
चाले कधी न द्रव्याचा अुपाय्
सोनें की रत्नें हीं अर्पणें व्यर्थ
प्रेम अर्पावें हें आवडे फार्
ख्रिस्त गणी की हा श्रेष्ठ पदार्थ
दीनांच्या प्रार्थना प्रिय अपार्." (अुस १३४)

३३ **दीनवत्सल छन्द** { [ । – – – ऽऽ । – – – ऽऽ । – ] ७ अक्षरें
[ – – । – – – ऽऽ । – – ] ७ अक्षरें }

(१) "धावरे धाव आता
**दीनवत्सला** रामा !

संसारसङ्गें दोषी
नित्य गुन्तलों कामा.
तारुण्य–अभिमान,
देहीं भरला ताठा
वैभव–सम्पत्तीचा
अङ्गीं फुटला फाटा" ( अे–पस १/६९ )

( २ ) " काय तें तूज साङ्गों ?
नये साङ्गतां कोणा.
वृत्तीसी ठाव नाही
कैंचा दाखवूं खूणा !" ( केस्वा–पस १/६९७ )

या छन्दांतील ' धाव रे रामराया ' हें रामदासी पद्य सुप्रसिद्धच आहे.

भृङ्गावर्तनी

२४ **"सछिन्न छन्द"** { [ । भृ । भृ । भृ । भृ ] १२ अक्षरें
[ भृ । भृ । – – ] ८ अक्षरें

" मोकळे हाटीं ऽऽ सोडिल्या गाठी
विकऱ्या घातले कण
ज्याचें भाग त्यासी देअूनी वारिले
सारूनि लिगाड दान
खरें माप हातीं घेअूनि बैसलों
मानिती ते चौघेजण
खरें वित्त तेथे आले चोजवीत
गिऱ्हाअीक सन्तजन". ( तुकाराम २ / पृ. ३०९ )

## वर्ग तिसरा

### विषम छन्द

### १ ला प्रकार

३५ **' अग्निमेघ ' छन्द** { [ । प । प । प । – – – ] दोन चरण
[ । प । प । – – – ] अेक चरण

"यात्रिका, प्रभो मला तू या रानांत चालवीं,
आसरा दे दुर्बलाला, भीतिलाहि घालवीं
दिव्य साचें अन्त तूचि पुरवी. १
प्रस्तरा विदारूनीया जीवना आम्हा दावी
अग्निमेघ देऊनिया स्वर्गमार्ग सूचवी
हे समर्था ये तू मला विभवीं." २ (अुस ३२९)

३६ **"जलारोहण"** छन्द { [ ।प।प।प।— — ] दोन वा अधिक चरण
[ ।प।प।प।— — — ] अेक चरण }

"माझी आगबोट चालली दर्यांत ग दर्यांत ग!
मन धावत तरी तव हृदयांत ग. ध्रु०
हळू हळू पाण्यामधी जुनें जग बुडे
निळ्या काळ्या दर्यावर दैव स्वैर अुडे
तुझ्या चिन्तनाने दिल तटीं धडधडे
वर खाली लाटेवरी हेलकावे खात ग" १ (बोप्र ४१)

३७ **श्यामाराणी** छन्द { [ ।प।प ] दोन वा अधिक चरण
[ ।प।प।प।— — — ] अेक चरण }

(१) "आम्ही जाणावें तें काअी
तुझें वर्म कोण्या ठायीं
अन्तपार नाही नाही अैसें श्रुति बोलती." (ज्ञानदेव)

(२) "राम आकाशीं पाताळीं
राम नान्दे भूमण्डलीं
"रामयोगीयांचे मेळीं सर्व काळ तिष्ठत" (रामदास)

पुढील पद्यांत ध्रुवपद निराळें आहे.

(३) "भक्तांचिया काजासाठीं
साधूंचिया प्रेमासाठीं सोडिली मी लाज रे ध्रु०
वेडीं गौळियांचीं पोरें
त्यांचें ताक प्यालों बारे!
खातां भिल्लिणीचीं बोरें अुच्छिष्टाचें चोज रे १" (भमाप्र ७५)

ज्याला घनाक्षरी वा हिन्दींत कवित्त म्हणतात तो हाच छन्द होय.

३८ स्मर छन्द { [ । प । प ] दोन वा अधिक चरण
[ । प । प । प । – – ] अेक चरण

( १ ) " तुझ्यावीण अन्तरींची प्रतिभा फुलेना ध्रु०
दाटे हुरहूर मनीं
सूर लागेना कवनीं,
अैकूं ये ना वीणाध्वनी
सारङ्गीची तार तारेसङ्गती जुळेना ! " ( गिफ २ )

( २ ) " आता फार विरहाचे दिवस कठिण !
रङ्ग–पञ्चमीचा आला नवलाचा सण. ध्रु०
वसन्ताची शोभा थाटे,
वेलियाचा बन्ध सुटे,
शशिबिम्ब नभीं नटे, मन्मथाचे बाण. १

चोहीकडे रसरङ्ग –
अुत्सवांत जन दङ्ग,
प्रणयिनी प्रियासङ्गं करी नृत्य–गान. २

माझ्या जीवलग जीवा,
मज भेटशील केव्हा ?
आळवीत जीवाभावा वाचवी रे प्राण ! " (बो-विमा ३/८)

'दग्धपक्षपतङ्ग' ( माजूस्व १४२ ), 'क्षुद्र जीवनजन्तूस' ( यग २२ ), 'गुन्हेगारीण' ( यग ६१ ), 'जगराहाटी' ( यग १२२ ), अित्यादि कविता याच स्मरछन्दांत आहेत.

३९ अञ्जनी छन्द { [ । प । प ] दोन वा अधिक चरण
[ । प । प । प । – ] अेक चरण

( १ ) " अुगवती ज्या सुरजा
नवरत्नें बान्धूं पूजा
मुगुटीं भाव पैं दुजा, अुपमा नाही.

पुण्डलीकाचेनी भावें
श्रीविठ्ठल येणें नावें
भानुदास म्हणें दैवें जोडिलें आम्हा."
भानुदास अभङ्ग (श्री अेकनाथ गाथा पृ. १३७)

(२) "कोठे हो कोठे
बाळ यशोदे ?
म्हणे पूतना आणू येथे मला पाहूं दे. ध्रु०
काय साङ्गों ? मनामाजी
आनन्द कोन्दला आजी
दाटला हो पान्हा, आधी कान्हा पाजूं दे. १

चित्त अुतावीळ झालें
भाग्य माझें फळा आलें
कृष्णासी हें मटामटा दूध घेअूं दे. २

आनन्दनन्दनस्वामी
सर्वसाक्षी अन्तर्यामी
नेणोनी तें म्हणे, आण अङ्कीं ठेवूं दे." (आपूव २१)

(३) "झिम्मा खेळूं ये
झिम्मा नाचूं ये
आकाशींचे तारेसङ्गे झिम्मा खेळूं ये. ध्रु०.
चान्दण्याच्या चन्द्रज्योति
हिमगिरी चकाकती,
हासऱ्या त्या ज्योतीसङ्गे झिम्मा खेळूं ये." १

(सरद—मशा १/१११)

(४) "प्रिय प्रभु येशु ख्रिस्ता
थारा मिळेना जन्मता
मालक् सृष्टीचा असतां अरे रे रे रे !

किती विव्हळ तो झाला !
घाम रक्ताचा वाहीला,
बार्गी किती शोक केला अब ब ब ब !" ( अुस ८१ )

४० **प्रसन्ननयना छन्द** { [ । प । प ] दोन वा अधिक चरण
[ । प । प । - - - ] अेक चरण }

" हे बान्धू अिच्छी मातें आजी आताता ध्रु०
भारी बळ याला आजी
फावले अङ्गाला काजी
राजीव रे या समाजीं आताता." १ ( आगो ३७ )

४१ **रामरसायन छन्द** { [ । प । - - - ] दोन वा अधिक चरण
[ । प । प । प । - - - ] अेक चरण }

( १ ) " अर्जुना, तू जाण रे
होशी बा सुजाण रे
विश्व नाही मीच आहे सख्या, तुझी आण रे." १
( वामन भयाप्र ६९ )

( २ ) " क्षीरसिन्धुवासी रे
लक्ष्मी त्याची दासी रे
अर्जुनाचीं घोडीं धूतां लाज नाही त्यासी रे."
( श्रीस्वा-पस ३/८० )

( ३ ) " राहे ऋषिराय हो
तेथे अुणें काय हो ?
निशिदिनीं सेवा करी दुर्योधन राय हो." ( पास्था ८ )

( ४ ) " बोल राघू बोल रे
काही तरी बोल रे
मन तुझें माझ्यापाशी थोडें तरी खोल रे." ( कु-विमा १/५ )

४२ **परात्परकरुणा छन्द** { [ । प । - - - ] दोन वा अधिक चरण
[ । प । प । प । - ] अेक चरण }

" ध्यातां सुतकामिनी
जातां दिनयामिनी
घडी अेक तरी मनीं आठवा राम." ( वाग्र ४/२३३ )

**४३ वनगमन छन्द** { [ । प । — — — ] दोन वा अधिक
[ । प । — — ] अेक }

" या रानांतूनी जातां
त्या सुरम्य भूप्रान्ता,
बापा तू धरी हाता
चालवी चालवी. १
शोषें मी माराराती
पाहीं रम्य तें पाणी,
गोडी बा तया आणी
चालवी चालवी." २ ( अुस ३३२ )

**४४ शरदिन्दु छन्द** { [ । प । — — — ] दोन वा अधिक चरण
[ । प । — ] अेक चरण }

( १ ) " शरदिन्दु यामिनी
वेणुरत कामिनी
जाती गणगामिनी
हरिकारणें.
कामें सर्व सोडिती,
आर्यमार्ग मोडिती
गृहपाश तोडिती
प्रेमें हरिच्या." ( वाग्र ४/२३५ ) रासक्रीडा

( २ ) " अेकी नाकीं बाळिया
कानीं मोती ल्यालिया
त्याही नाही राहिल्या
पावल्या तेथे.

पाङ्घरुणें नेसल्या
नेसणीं पाङ्घुरल्या,
त्याही नाही राहिल्या
पावल्या तेथे." ( ममुक ६४ )

'कान्होबाची सङ्गती' हें विष्णुदास नाम्याचें पद्य ( पस २/५४ ) याच शरदिन्दुछन्दांत आहे.

४५ गया छन्द { [ । प । – – ] दोन वा अधिक चरण
[ । प । प । प । – – ] अेक चरण

( १ ) "अगा जनावना
प्रभो महामना
दयाघना तुझ्या विना पटेन मी कुणा!" १ (अुस ९८)

( २ ) "ओझें डोअीवर
चाले भरभर
बळकट बान्धियेलें बाळ पाठीवर.
भुकेलें तान्हुलें
रडाया लागलें
'अुगी अुगी!' म्हणत ती माता वाट चाले."(सपाजि-सुगी ४७)

४६ "पुष्पगुच्छ" छन्द { [ – – । प । – – ] तीन चरण
[ – – । – – ] अेक चरण

( १ ) "फूलफूल घोसाळिये
फूल गेलें ग घोसांत
तुझें सासर देशांत
अम्बूबाअी." ( दालो २/६५ )

( २ ) "वर्षा वर्षतो ग दारीं,
न्हाअू घाली अवनीला
सुधादृष्टि तुझी मला
सख्या जैशी. १

डोलडोलती या वेली
मन्द सजल पवनें
जेवि तुझ्या निःश्वासाने
झुलते मी. २

हासहासती हीं फुलें
दवबिन्दूंच्या मोत्यांनी
आणि तुझ्या प्रेमाश्रूंनी
गाल माझे. ३

तरुतरूंच्या कोटरीं
पाखरें हीं विसावलीं
जेवि तुझ्या वक्षस्थलीं
अुदारा, मी.” ४ (पप–स्फुमा क्रमाङ्क ३८)

( ३ ) “ अुभी झोपड्याच्या दारीं
तिन्ही सान्जा झाल्या तरी
कां न येअी बाअी स्वारी ?
कुठे पाहू ? ” ( मना–वामा ५/२ )

४७ ‘तुलसी छन्द’ { [ – । प । – – ] तीन चरण
[ – – । – – ] अेक चरण

( १ ) “ कावळा काका करी
घराच्या आढ्यावरी
पाहुणा घोड्यावरी
भाअूराया. ” ( दालो २/६५ )

( २ ) “ पहिली माझी ओवी
पहिला माझा नेम
तुळशीखाली राम
पोथी वाचे.” (प्राचीन लोकगीत )

( ३ ) " अैकाया रात्रीं गोड
जेधवा रातकिडे
गातात चोहीकडे
जनीं वनीं. " ( देवाना–वामा ४/४ )

या कवितेची आणि 'कोणासाठी' ( सनामा–विभा १/४ ), नि 'आमचें घर' ( माजूस्व ११० ) या कवितांची रचना याच तुलसी छन्दांत आहे.

४८ " **देवद्वार** " छन्द { [ । प । – – ] तीन चरण
[ – – । – – ] अेक चरण

( १ ) " देवाचिये द्वारीं
अुभा क्षणभरी
तेणें मुक्तिचारी
साधियेल्या–" ज्ञानदेव ( भमाप्र १७ )

( २ ) " तू माझी माअुली
मी वो तुझा तान्हा
पाजीं प्रेम पान्हा
पाण्डुरङ्गे.
तू माझी गाअुली
मी तुझें वासरूं
नको पान्हा चोरूं
पाण्डुरङ्गे.
नामा म्हणे होसी
भक्तीचा वल्लभ
मागे पुढे अुभा
साम्भाळिशी." ( भमाप्र ४७ )

( ३ ) " पली माझी ओवी
गाअीन जगत्र
पाहीन पवित्र
पाण्डुरङ्ग " ( तुकाराम )

४९ कालावेग छन्द { [ । प । – ] दोन वा अधिक चरण
[ । प । प । प । + ] अेक चरण

( १ ) " अम्बा पिकतो,
रस गळतो,
कोकणींचा राजा बाअी झिम्मा खेळतो." ( लोकगीत )

## वर्ग चौथा

### विषम छन्द

#### प्रकार २ रा

५० "अुत्सङ्ग छन्द" { [ । प । – – ] अेक चरण
[ । प । प । – – ] अेक चरण
[ । प । प । प । – – ] अेक चरण

" ओसङ्गी बाळक
घेअी आता माय ममताळे
रडून रडून किती शिणले गे डोळे ! १
कामाचा पसारा
अजून का सम्पला न तूझा ?
दृष्टि वाटेकडे लावीतसे बाळ माझा." २

( पगन-पुष्पोद्यान )

५१ " गृहगमन " छन्द { [ । प । – – ] दोन चरण
[ । प । प ] दोन चरण
[ । प । – ] दोन चरण

" ने आम्हांस ख्रिस्ता
दे विश्रान्ति ताता !
वाटे जरी सुख नाही
शान्त येअूं निर्भयेंहि
हस्त धरूनी
नेअी सदनीं. १

वाट ओस जरी
घोर दुष्ट वैरी
  वेढिताती; भीति जावो,
  धैर्य, आस, भाव राहो
शत्रूंमधूनी
जाऊं सदनीं." २ (अुस ३३१)

५२ "साधन" छन्द { [भृ। भृ] दोन
[भृ। –] अेक
[भृ। भृ] तीन
[भृ। –]

"भक्तांनो सिद्ध व्हा
 सर्वत्र गाजवा
   येशूचें काम्;
 वर्णा हो ममता
 निश्चिल सत्यता
 हर्षानें वन्दितां
   गा खिस्तनाम्" (अुस १००)

५३ "कादम्ब" छन्द { [भृ। –] दोन
[भृ। भृ। भृ। –] अेक
[भृ। भृ। भृ। भृ] अेक
[भृ। भृ। भृ। –] अेक

डुलत डुलत हळूच तळ्यांत
नावा या चालत कशा पहा! ध्रु०
    पाय जळीं
    जणु वल्हीं
हळूच वेळल्या माना पहा
मानेचीं सुकाणें रोखून डौलाने
तळ्याच्या काठाने जाति अहा! १

जिथे जिथे
नावा तिथे
तोण्डाने पकवा चालूंच हा!
वायूच्या बाळांस घेअून पाठीस
गातात तयांस गाणीं अहा!" २ (अशोक–बाबोमे ५१/६)

## स्वैरपद्य

### छन्द

रा. वामन नारायण देशपाण्डे यांनी स्वैरपद्यासाठी समावर्तनी पण विषमचरणी छन्दाचा प्रयोग केल्याचें पुढील अुदाहरण त्यांच्या अप्रकाशित 'रूपमती' काव्यांतून पुढे दिलें आहे.

" प्रणय सङ्गीत पहा रोमरोमीं भरून माझिया राहे;
वीणाच्च देहाची बने विचित्र ऽऽ तारा कचरूप तीज!
प्रणयाचे बोल त्या तारांमधून सदा झङ्कारती सदा हुङ्कारती
परिसाया येती जरी परिसिले प्रीतीच्या कानांनी तेऽऽ
दुज्यालागी परी ते दिव्य निस्वन कोठून अैकणें!—अैकून डोलणें!
वाटेल त्या प्रती अुरेल सम्प्रती ऽऽ सारी नीरवता—सारी मौनता"ऽऽ

(सपा–दसरा अङ्क १९३६)

या पद्यांत प्रत्येक चरणांत षण्मात्रक ७ आवर्तनें आहेत. अन्त्य आवर्तनांत निरनिराळ्या चरणांत निरनिराळ्या सशब्द मात्रा आहेत. त्यामुळे विरामाचा काल न्यूनाधिक झाला तरी वाचकाचा घोटाळा होत नाही. तथापि २ च्या आणि ६ व्या चरणांत चौथ्या आवर्तनांत मध्येच अेक अक्षर अुणें करून द्विमात्रक विराम घेतलेला आहे. हा विराम जर अवग्रहचिन्हांनी लिहून दाखविलेला नसला तर मात्र वाचक अडखळण्याचा बराच सम्भव आहे.

---

अध्याय ८ वा

# छन्दःशास्त्राचा त्रोटक इतिहास

## १ पिङ्गलाचीं छन्दःसूत्रें

छन्दःशास्त्राचा पाया कोणीं घातला हें निश्चयाने साङ्गतां येत नाही. 'छन्द' या शब्दाप्रमाणेच '**पिङ्गल**' हें नांव प्राचीन काळापासून प्रसिद्ध आहे. परन्तु छन्दःसूत्रांचा कर्ता म्हणून जो पिङ्गल आपल्या परिचयाचा आहे त्याच्यापूर्वी काश्यप, सैतव, रात, माण्डव्य हे छन्दोविवेचक होऊन गेले असें पिङ्गलाच्याच ७।९–१०, आणि ७।३४ या सूत्रांवरून कळतें. त्यांच्या कृती उपलब्ध नाहीत. पिङ्गलाचें छन्दःशास्त्र मात्र प्रसिद्ध आहे. पिङ्गलाने केवळ सूत्रें दिलीं आहेत आणि तीं पाणिनीच्या अष्टाध्यायीप्रमाणे आठ अध्यायांत विभागलेलीं आहेत. वैदिक छन्द, तनुमध्या या षडक्षरी वृत्तापासून चण्डवृष्टिप्रपात या सत्तावीस-अक्षरी दण्डकापर्यंत काही लौकिक वृत्तें, आणि वैतालीयादि काही अर्धवट जाती यांचा विचार पिङ्गलाने केला आहे. इतर दण्डकांची बोळवण तो 'शेषः प्रचित इति' ( पि ७/३५ ) या एकाच सूत्राने करतो. जीं वृत्तें नामनिर्देशाने प्रसिद्ध नव्हतीं पण प्रयोगरूपाने आढळलीं त्यांचा परामर्श त्याने गाथाप्रकरणांत घेतला आहे; परन्तु प्राकृतांतील पद्यांचा त्याने विचार केलेला दिसत नाही; आणि त्याच्या व्यतिरिक्त कोणींहि वैदिक छन्दांचा विचार केला नाही.

पिङ्गल हा छन्दःशास्त्रांतील आद्य सूत्रकार दिसतो. त्र्यक्षरी गणांना म–य–र–स–त–ज–भ–न, नि लघुगुरूंना ल–ग संज्ञा देऊन, आणि यतिस्थानें साङ्गण्यासाठीं चारपांच इत्यादि अङ्कांसाठी समुद्रकामशरादि संज्ञा योजून त्याने वृत्तांचीं लक्षणें सूत्रबद्ध करून टाकिलीं. या सूत्रांवरून वृत्तांतील अक्षरांची सङ्ख्या, लगक्रम आणि यति यांचा अचूक बोध होतो; जसें, "शिखरिणी य्मौ न्सौ भ्लौ ग् ऋतुरुद्राः" ( पि ७।२० ). पिङ्गलापूर्वी यति मानीत नसत याचा अर्थ पादान्तर्गत यति मानीत नसत एवढाच केला पाहिजे. पादान्त्य यती-

विषयी प्रश्नच उपस्थित होऊं नये. त्यामुळे 'अत्र पादान्ते यतिः' असें जेव्हा हलायुध भाष्य करितो तेव्हा हसूं येतें. पादान्तर्गत यतीविषयी पिङ्गलाचें म्हणणें अनेकदा सूचक असलें तरी त्याच्या विवेचनांत धरसोड आढळते; आणि गजविलसित, वरतनु, शैलशिखा, कोकिलक, इत्यादि कित्येक वृत्तांत त्याने साङ्गितलेले यती अस्वाभाविक वाटतात. यतिप्रकरणीं पिङ्गलाचें मत प्रमाण मानिलें पाहिजे असें नाही.

पिङ्गलाने वृत्तांचा क्रम चरणांच्या दीर्घतेप्रमाणे लाविलेला दिसतो आणि हीच पद्धत पुढे सर्वत्र आढळते. त्याने केवळ प्रसिद्ध वृत्तांचाच सङ्ग्रह केला आहे असें म्हणावें तर तत (पि ६/३४), वाहिनी (पि ६/४२) इत्यादि वृत्तांचा तो समावेश करतो. वाहिनीवृत्ताला तर चालच लागत नाही. उलटपक्षीं ज्या वियोगिनीवृत्तांत अश्वघोषाने सौन्दरनन्द काव्यांत एक सर्ग लिहिला आणि कालिदासाने 'रतिविलाप' आणि 'अजविलाप' लिहिले त्या वृत्ताचा पिङ्गलाला विसर पडलेला पाहून आश्चर्य वाटतें. मालभारिणीचाहि त्याला असाच विसर पडला आहे. नाराचक आणि विस्मिता या वृत्तांचीं उदाहरणें अनुक्रमें रघुवंश आणि शिशुपालवध या सुप्रसिद्ध काव्यांत असतांना त्यांचा समावेश तो गाथाप्रकरणीं करतो !

शास्त्रांत एका पारिभाषिक संज्ञेवरून एकाच गोष्टीचा बोध व्हावा; आणि अेका गोष्टीला अनेक पारिभाषिक संज्ञा असूं नयेत हा मूलभूत नियम त्याने पाळिला नाहीं. वृत्त हेंच नांव तो एका वृत्ताला देतो. ज्या वृत्तास तो सहाव्या अध्यायांत चञ्चलाक्षिका (पि ६/३६) म्हणतो त्याच वृत्तास तो गाथाप्रकरणीं गौरी (पि ८/५) म्हणतो, आणि पुन्हा गौरी (पि७/४) या नांवाचें निराळेंच वृत्त तो सातव्या अध्यायांत साङ्गतो ! एखादी पारिभाषिक संज्ञा सबळ कारणावांचून पालटूं नये, पण ज्या वृत्ताला काश्यप सिंहोन्नता म्हणे, नि सैतव उद्धर्षिणी म्हणे त्या वृत्ताला पिङ्गलाने वसन्ततिलका कां म्हणावें याला त्याच्याजवळ काही कारण नाही.

मूळ वृत्तें निर्माण कशीं झालीं आणि त्यांना नांवें कशीं पडलीं हें पिङ्गलाने साङ्गितलें असतें, आणि प्राचीनतम वा सुप्रसिद्धतम अुदाहरणें लेखकांच्या नांवांसह दिलीं असतीं तर तो वृत्तान्त अत्यन्त महत्त्वाचा झाला असता. पण त्याने सूत्रें रचण्यापलीकडे काही केलें नाही. छन्दोरचना म्हणजे सामान्यतः

लयबद्ध अक्षररचना होय, ही मूलभूत गोष्टहि त्याच्या ध्यानांत आली नाही. चौदा लघू आणि एक गुरु मिळून होणाऱ्या एकाच लगावलीपासून यतिभेदाने मणिगुणनिकर, चन्द्रावर्ता आणि माला अशीं तीन भिन्न वृत्तें सिद्ध होतात ( पि ७/११–१३ ) हें त्याच्या ध्यानांत येऊनहि तीं वृत्तें अष्टमात्रक, सप्तमात्रक आणि षण्मात्रक आवर्तनांच्यामुळे भिन्न भिन्न होतात ही कल्पना त्याला सुचली नाही. ही कल्पना त्याला सुचती तर त्याचा जातिविचारहि सखोल आणि शास्त्रशुद्ध झाला असता. तथापि पिङ्गल हा एका प्राचीन आणि प्रचलित अशा त्रिकावलम्बी सम्प्रदायाचा संस्थापक आहे याविषयी शङ्का नाही.

छन्दःसूत्रकार पिङ्गलाचा काल ठरविणें हें संस्कृतज्ञ पण्डिताचें काम आहे. पण अेक गोष्ट येथे दाखवून ठेवणें अगत्याचें आहे. गाथाप्रकरणीं अतिशायिनी आणि विस्मिता या दोन वृत्तांचीं लक्षणें दिलीं आहेत. अतिशायिनी आणि विस्मिता हीं नांवें अनुक्रमें शिशुपालवधांतील ( ८/११ ) आणि ( २०/७९ ) या श्लोकांवरून सुचलीं असावींत हें अुघड आहे. तसें असल्यास पिङ्गल माघानन्तर झाला असें मानिलें पाहिजे, पण हें खरें वाटत नाहीं. तीं सूत्रेंच पाठीमागून कोणीतरी घुसडून दिलीं असण्याचा सम्भव आहे. हलायुधाने दिलेल्या साऱ्या अुदाहरणांचे अुगम सापडले तर छन्दःसूत्रकार पिङ्गलाचा काळ निश्चित करावयाला काही साह्य होईल.

## २ भरताचें नाट्यशास्त्र

नाट्यशास्त्राचा कर्ता **भरतमुनि** हा पिङ्गलाच्या सम्प्रदायाहून निराळा असा जो सम्प्रदाय आहे त्याचा आद्य नसला तरी बराच प्राचीन असा आचार्य आहे. दुर्दैवाने नाट्यशास्त्राची अुपलब्ध असलेली आवृत्ति ही अुघडपणें वाढविलेली आहे आणि अशुद्धहि आहे. अर्थातच तिच्यावरून काही अनुमान काढावयाला ती तितकी विश्वसनीय नाही. अुदाहरणार्थ, मदनवती ( ४६८ ) हे वृत्त काव्यमाला आवृत्तींतच आहे; तर चित्तविलासित ( ६०९ ) हें गायकवाडी आवृत्तींतच आढळतें. पुन्हा नाट्यशास्त्राच्या काव्यमाला आवृत्तींत ( १५।३२ ) शालिनी वृत्तांत यति साङ्गितलेला नाही; पण चौखम्बा आवृत्तींत ( १६।३६ ) तो साङ्गितलेला आहे. आणि भरत हा तर यति न मानणाऱ्यांपैकी होता असें स्वयम्भूचें वचन आहे. यति न

मानणें हा प्राकृत सम्प्रदाय असावा. अवितथादि गेय वृत्तें जेव्हा प्राकृत काव्याच्या द्वारा परिणत होऊन संस्कृतांत आलीं तेव्हा पिङ्गलादि छन्दःशास्त्र-कारांस आवर्तनाची कल्पना नसल्याने त्यांचा घोटाळा अुडाला. त्याचप्रमाणे त्र्यक्षरी गणांचें विवेचन नाट्यशास्त्रांत कां असावें कळत नाही, कारण भरत त्या परिभाषेचा उपयोग वृत्तलक्षण साङ्गतांना करीत नाही. तो वृत्तविचार दोन ठिकाणीं करतो; प्रथम सुपरिचित वृत्तांचा १६ व्या अध्यायांत आणि नन्तर ध्रुवांच्या निमित्ताने गेय वृत्तांचा ३२ व्या अध्यायांत. ३२व्या अध्यायांत तो प्राकृत अुदाहरणें देतो. पण प्राकृत जातींचा विचार तो मुळीच करीत नाही.

भरताची वृत्तलक्षण साङ्गण्याची पद्धति प्राथमिक अवस्थेंतील दिसते, म्हणून भरत हा पिङ्गलाच्या पूर्वीचा असावा अशी शङ्का येते. अमुक अितक्या अक्षरांच्या चरणांतील अमुक अमुक अनुक्रमांचीं अक्षरें गुरु आणि अुरलेलीं सारीं लघु अशा रीतीनें लक्षण अेक वा दोन अनुष्टुभ् श्लोकांत साङ्गितलेलें असतें जसें,

आद्यात्पराणि पञ्चैव द्वादशं सत्रयोदशम् ।
अन्त्यं सप्तदशे पादे शिखरिण्यां गुरूणि च ॥ ( भ १६।७६ )

काही वृत्तांचीं लक्षणें त्या त्या वृत्तांत ग्रथित केलेलीं आढळतात; ही सुधारणा मागाहून मूळांत कोणीतरी दुसऱ्याने केली असावी. लक्षणामागून त्या वृत्ताचें अुदाहरण दिलें असून अुदाहरणाच्या चौथ्या चरणांत वृत्ताचें नांव ग्रथित केलेलें असतें. जसें,

महानद्याभोगे पुलिनमिव ते भाति जघनं
तथाऽऽस्यं नेत्राभ्यां भ्रमरसहितं पङ्कजमिव ।
तनुस्पर्शश्चायं सुतनु सुकुमारो न परुषः
स्तनाभ्यां तुंगाभ्यां शिखरिगिनिभा भासि दयिते ॥ ( भ १६-७७)

अुदाहरणें बहुशः अशीं शृङ्गारिक आहेत.

भरताने दिलेल्या वृत्तांत दोन वृत्तें विचारणीय आहेत. तीं पिङ्गलाने दिलेलीं नाहीत पण त्यांचीं अुदाहरणें दुर्मिळ असलीं तरी तीं सुप्रसिद्ध वाङ्मयांत आहेत. हीं दोन वृत्तें म्हणजे मेघमाला नि शरभललित हीं होत. मेघमालावृत्ताचें अुदाहरण भासाच्या प्रतिमानाटकांत ( ३।३ ) आहे आणि शरभललित वृत्ताचीं

दोन अुदाहरणें अश्वघोषाच्या सौदरनन्द काव्यांत (१२-४२, १३-५६) अशीं आहेत. पुन्हा सिंहरेखा नांवाचें जें वृत्त भरत देतो तें पिङ्गल देत नाही पण या वृत्तांत तर महाभाष्यांतील (खंड १, पृ. ५०२) दोन कारिका आहेत. अिन्द्रवंशा वृत्त भरत देत नाही ही गोष्टहि विचारणीय आहे; कारण अिन्द्रवंशा वृत्तांत रचना फार अुशीरा होअूं लागली.

भरताविषयी आणखी एक चिन्तनीय गोष्ट अशी कीं जीं वृत्तें प्रमाणिका, विद्युन्माला, द्रुतविलम्बित, भुजङ्गप्रयात, स्रग्विणी, रुचिरा, मालिनी, हरिणी, मन्दाक्रान्ता, पृथ्वी आणि कुसुमितलतावेल्लिता या नांवांनी सुप्रसिद्ध आहेत त्यांना नाट्यशास्त्रांत अनुक्रमें मत्तचेष्टित, विद्युल्लेखा, हरिणीप्लुता, अप्रमेया, पद्मिनी, प्रभावती, नान्दीमुखी, वृषभललिता, श्रीधरा, विलम्बितगति आणि चित्रलेखा हीं नांवें आहेत. पण भरत वसंततिलका हें नांव मात्र ग्राह्य मानतो; सिंहोन्नता वा उद्धर्षिणी या प्राचीन नांवांपैकी एखादें नांव तो देत नाही!

## ३ वराहमिहिराची बृहत्संहिता

आपल्या बृहत्संहिता या विविधविषयात्मक ग्रंथाच्या १०३ व्या ग्रहगोचर-नाम अध्यायांत **वराहमिहिराने** 'श्रुतिसुखदवृत्तसङ्ग्रह' केला आहे. वृत्त हा काही या अध्यायाचा विषय नाही. पण प्रतिपाद्य विषयाची माण्डणी सहेतुकपणें विविधवृत्तांत केली असून त्या त्या श्लोकांत वृत्ताचें नांव ग्रथित केलें आहे.

शार्दूलविक्रीडित हें नांव मात्र सम्पूर्ण ग्रथित करण्यांत आलें नाही, वराह-मिहिर शार्दूल म्हणतो. तथापि हा वराहमिहिराचा व्यापार आश्चर्यकारक आहे यांत शङ्का नाही. ज्या वृत्तांना पिङ्गल प्रमाणिका, दोधक, वरतनु वातोर्मि, हरिणी, पृथ्वी आणि अवितथ म्हणतो त्यांना अनुक्रमें वराहमिहिर हा स्थिर, दोथक (हें केवळ सार्थ शब्दरचनेसाठी असेल), मालती, ऊर्मिमाला, वृषभ-चरित, विलम्बितगति आणि नर्कुटक म्हणतो. वृषभचरित आणि विलम्बितगति या दोन नांवांपुरता तो भरताचा सम्बन्धी आहे. पिङ्गलाने न साङ्गितलेलीं अशीं प्रसभ, अनवसिता, द्रुतपद, ललितपदा, लक्ष्मी आणि समदविलासिनी हीं वृत्तें तो नवीन देतो. पण ग्रन्थांत इतरत्र त्याने मोटनक (वबृ ४६।२६), शुद्धविराट् (वबृ ५।३८), विद्युन्माला (वबृ ६८।२७), रुक्मवती (वबृ ६३।२) आणि तोटक (वबृ ४६।११) हीं वृत्तें वापरलीं असून त्यांचा समा-

वेश तो या अध्यायांत करीत नाही. त्याचप्रमाणे ( वब्रृ ३३।२५।२८ ) हे श्लोक सुकामिनी वृत्तांत (।–ᴗ–ᴗ।–ᴗ–) असून, ( वब्रृ ३३।२९ आणि ३६।८ ) हे दोन श्लोक [।ᴗᴗᴗᴗ––।ᴗᴗ–––] या वृत्तांत असून त्यांचा उल्लेख कोणत्याहि छन्दःशास्त्रज्ञाने केलेला नाही. दण्डकाचींहि त्याचीं तीन उदाहरणें ( वब्रृ १२।६,८८।१,१०३।६१ ) असून त्याच्या तिसऱ्या म्हणजे सानन्द दण्डकाच्या एका चरणांत १०२ अक्षरें आहेत ! वराहमिहिराच्या बृहज्जातकांतील ( २३/४ ) हा श्लोक [––ᴗ–!ᴗᴗᴗᴗ–ᴗ–ᴗ––] या अभिनव वृत्ताचा आढळतो; तसेंच ( २८/३ ) या शालिनी वृत्तांतील श्लोकाच्या ‘ निर्याणं स्यान्नष्टजन्मदृक्काणः ’ या दुसऱ्या चरणांत ऋकारयुक्त व्यञ्जनापूर्वील अक्षरास गुरुत्व आलें आहे ही गोष्ट चिन्तनीय आहे.

## ४ अग्निपुराण

आग्निपुराण या ग्रन्थाच्या ३२८–३३४ या अध्यायांत छन्दोविवेचन आहे. पिङ्गलोक्त परिभाषेचा अवलम्ब आहे. विशेष काही नाही. मुद्रित आवृत्तींत अशुद्धें फार आहेत.

## ५ कालिदासकृत श्रुतबोध

श्रुतबोध या पुस्तिकेंतील विसावा म्हणजे अिन्द्रवज्राविपर्यांचा श्लोक हलायुधाने ( पि ९८ ) अुध्दृत केला आहे त्यावरून श्रुतबोध हलायुधाच्या पूर्वीचा असला पाहिजे. या बेचाळीस श्लोकांच्या ग्रन्थाचा कर्ता कालिदास हा रघुवंशकार कालिदासाहून वेगळा असावा. हा पिङ्गलोक्त परिभाषेचा अुपयोग करीत नाही. हा भरताच्याच पद्धतीचा अवलम्ब करितो; पण वृत्तलक्षण अनुष्टुभ् श्लोकांत न साङ्गतां त्याच वृत्तांत माण्डतो; आणि यतिहि साङ्गतो.

यदि प्राच्यो ह्रस्वः कमलनयने पञ्च गुरव–
स्ततो वर्णाः पञ्च प्रकृति सुकुमाराङ्गि लघवः ।
त्रयोऽन्ये चोपान्त्याः सुतनु जघनाभोगसुभगे
रसैरुद्रैर्यस्यां भवति विरतिः सा शिखरिणी ॥ ( श्रुबो ३९ )

यति (‘रसैरुद्रः’) मात्र पिङ्गलोक्त परिभाषेने साङ्गितलेला आहे. याच सुधारलेल्या पद्धतीचा अवलम्ब नाट्यशास्त्राच्या अपलब्ध आवृत्तींत अनेक ठिकाणीं आढळतो.

श्रुतबोधांत प्रमाणिका, रुक्मवती आणि लक्ष्मी या वृत्तांना अनुक्रमें नगस्वरूपिणी, चम्पकमाला आणि प्रभावती हीं नांवें दिलीं आहेत; आणि अक्षरपङ्क्ति [ ।–ᵕ ᵕ – – ] हें पञ्चाक्षरी ऱ्हस्व वृत्तहि साङ्गितलें आहे. श्रुतबोधकाराने जातींचा विचार मुळीच केला नाही.

## ६ विरहाङ्काचा वृत्तजातिसमुच्चय

**विरहाङ्का**चा वृत्तजातिसमुच्चय हा ग्रन्थ प्रो. हरि दामोदर वेलणकर यांनी सम्पादून प्रस्तावना आणि टीपा यांसह प्रकाशित केला आहे. विरहाङ्क हा नवव्या वा दहाव्या शतकांत, कदाचित् त्याच्या आधीच होऊन गेला असावा असें सम्पादकांचें मत आहे. याने मुख्यत्वें प्राकृतांतील जातींचें विवेचन प्राकृतांत* केलें आहे. परन्तु ५ व्या नियमांत याने संस्कृतांतील पन्नास वृत्तांचें विवेचन संस्कृतांत केलें आहे आणि ६ वा नियम प्रस्तारप्रकरणीं व्ययित केला आहे. हा यति मानीत नाही; त्र्यक्षरी गणांचा उपयोग करीत नाही. हा एक विशिष्ट परिभाषा योजितो; वृत्ताचें लक्षण त्याच वृत्तांत साङ्गतो, जसें,

सुरेन्द्रेभं कर्णं चरणपटहं चन्द्रवदने
प्प (?) यस्मिंल्ललितगमने पश्यसि पुनः ।
नियुक्तं केयूरं मरकतयुतं भावसहितं
ध्वजश्चान्ते यस्या सुतनु कथिता सा **शिखरिणी** ॥ (वित्र ५।३५)

सुरेन्द्रेभ ( ᵕ – – ), कर्ण ( – – ), चरण ( – ᵕ ᵕ ), पटह ( ᵕ ᵕ ᵕ ), केयूर ( – ), मरकत ( – ), भाव ( ᵕ ᵕ ), ध्वज ( ᵕ – ) या परिभाषेने हें वृत्तलक्षण साङ्गण्यांत आलें आहे.

लघुतम वृत्तांत हा गौ ( – ) हें एकाक्षरी आणि नौ ( – – ) हें द्व्यक्षरी वृत्त देतो. दण्डक तो या संस्कृत वृत्तांत देत नाही; चौथ्या नियमांत देतो. त्याने दिलेला श्लोक ( वित्र ४।४६ ) हा व्यालदण्डकाचा आहे. उपजातीला विरहाङ्क **मिश्र** म्हणतो. वृत्तांना नवीन नवीन नांवें देऊन घोटाळा वाढविण्याचें स्वात-

---

* याव्यतिरिक्त प्राकृत पद्यप्रकारांचेंच विवेचन करणारे दोन ग्रन्थ प्रो. वेलणकर यांनी सम्पादून प्रकाशित केले आहेत; ते नन्दिताढ्यकृत गाथालक्षण आणि रत्नशेखरकृत छन्दःकोश हे होत.

न्त्यहि तो दवडीत नाही. वंशस्थ, प्रहर्षिणी, रुचिरा, वीरललिता, सुवदना अित्यादि वृत्तांना तो अनुकमें वसन्तमञ्जरी, मयूरपिच्छ, सदागति, प्रमुदिता, वृत्त अशीं नांवें देतो. श्यामा, गुर्वी, कुसुम आणि हयलीलाङ्गी हीं वृत्तें तो नवीन साङ्गतो.

दोहाजाति ही विरहाङ्क अितर छन्दःशास्त्रकारांप्रमाणें तेरा आणि अकरा मात्रांची न मानितां चौदा आणि बारा मात्रांची मानितो त्या अर्थी पादान्तीं येणारे लघू दिसायला लघु असले तरी अुच्चारतः गुरु होत असल्याने त्यांना तो गुरु मानतो हें अुघड आहे.

## ७ जयदेवकृत छन्दोवृत्ति

छन्दोवृत्ति हा जयदेवाचा ग्रन्थ असून त्यावर हर्षटाची विवृति आहे. हा यतिवादी होता. 'विरामे यतिरिति' असें हा १ ल्या अध्यायाच्या शेवटीं म्हणतो. नर्कुटक हें वृत्तनाम प्रथम जयदेवाने दिलें असें हेमचन्द्र म्हणतो आणि विरहाङ्क हा नर्कुटक हेंच नांव देतो त्याअर्थी जयदेव हा विरहाङ्कापूर्वी झाला असावा असें प्रो. वेलणकर म्हणतात. परन्तु नर्कुटक हें नांव वराहमिहिराने दिलें आहे; त्याच्या आधी तर जयदेव होऊन गेला नाही ना ? आणि पुन्हा हेमचन्द्र हा 'नर्कुटकमिति जयदेवः,' एवढेंच म्हणतो. याचा अर्थ नर्कुटक हें नांव प्रथम जयदेवाने दिलें असा होअूं शकत नाही.

## ८ स्वयम्भूच्छन्द

'स्वयम्भूच्छन्द' हा ग्रन्थहि प्रो. हरि दामोदर वेलणकर यांनीच सम्पादून प्रकाशित केला आहे. त्यांच्या मतें हा जैन छन्दःशास्त्रकार आधींत आधी १० व्या शतकांत होऊन गेला असावा. प्राकृत जाति आणि प्राकृत काव्य यांच्या दृष्टीनेहि हा ग्रन्थ फार महत्त्वाचा आहे. दुर्दैवाने हस्तलिखिताचीं पहिलीं काही पानें गहाळ झाल्याने अतिजगती वर्गातील रुचिरा आणि कनकप्रभा (या वृत्ताला तो नन्दिनी म्हणतो) हीं दोन वृत्तें वगळल्यास चौदा-अक्षरी वृत्ता-पर्यन्तचा सर्व वृत्तांचा वृत्तान्त नष्ट झाला आहे. तथापि याने दिलेल्या विषम अर्धसम आणि सम वृत्तांची सङ्ख्या काही लहान नाही. पुढे हेमचन्द्राच्या छन्दोनुशासनांत आढळणारीं कितीतरी नवीन वृत्तें स्वयम्भूच्छन्दांत प्रथम पहायला मिळतात. हा वृत्तलक्षण प्राकृतांत साङ्गून नांवहि प्राकृतांतच देतो. मात्र तें लक्षण त्याच वृत्तांत रचिलेलें असतें; जसें—

“पछा दोप्पा चंसो मुहलति गुरू सव्वपरला
गआरन्तो सेसो हुवइ चलणे सा सिहरिणी.” (स्वछ १।५६)

या ग्रन्थाचा एक विशेष असा आहे की यांत वृत्तांचीं उदाहरणें स्वतः छन्दःशास्त्रकाराने रचून घातलेलीं नसून तीं कवींनी रचिलेल्या प्राकृत काव्यांतून निवडलेलीं असून कोणता श्लोक कोणाचा हें साक्षेपाने साङ्गितलेलें आहे. पिपीलिका, माला इत्यादि क्लिष्ट वृत्तांत निरनिराळ्या कवींनी लिहिलेलीं पद्यें पाहून प्राकृत काव्यवैचित्र्याची चाङ्गली कल्पना येते.

स्वयम्भू यति मानीत नसल्याने जें पिङ्गलाचें अपवाहक वृत्त यतिदृष्ट्या भृङ्गावर्तनी म्हणजे षण्मात्रक आवर्तनाचें [ । – – – । ˘ ˘ ˘ ˘ ˘ ˘ ! ˘ ˘ ˘ ˘ ˘ ˘ । ˘ ˘ ˘ ˘ ˘ ˘ । ˘ ˘ – – । – ] वाटतें तेंच स्वयम्भूच्या मतें पद्मावर्तनी म्हणजे अष्टमात्रक आवर्तनाचें [ । – – – ˘ ˘ । ˘ ˘ ˘ ˘ ˘ ˘ ˘ ˘ । ˘ ˘ ˘ ˘ ˘ ˘ ˘ ˘ । ˘ ˘ – – – – ] होतें. पहा

अववाहं सुद्धसहावस्स
फुल्लेलावणपसरिअपरिमलपरिपिहिअसअल भुअणाभोओ
माअद्धुग्गअसुमणसकुवलअवणकमलपसरिअरआमोदो ।
अच्चन्तं पिअपरहुअमहुअर महुरअरर इअरवसंगीओ
अव्वो कस्सव ण हरइ मणहर मलअगिरिसुरहि सिहरुद्देसो ॥

## ९ हलायुधाची वृत्ति

मृतसञ्जीविनी ही पिङ्गलाच्या छन्दःसूत्रावर **हलायुधाची** वृत्ति आहे. हलायुध हा दहाव्या शतकांत होऊन गेला असावा. ‘वरतनु सम्प्रवदन्ति कुक्कुटाः’ या महाभाष्यांत आढळणाऱ्या स्फुट चरणाची समस्यापूर्ति ज्या श्लोकांत केली आहे आणि जो श्लोक कुमारपालाचा आहे असें क्षेमेन्द्र म्हणतो तो श्लोक वरतनुवृत्ताचें अुदाहरण म्हणून हलायुधाने अुद्धृत केला आहे.

हलायुधान कालिदास, माघ अित्यादि अनेक कवींच्या ग्रन्थांतून अुदाहरणें दिलीं आहेत. पण प्रत्येक अुदाहरण कोठून घेतलेलें आहे हें जसें स्वयम्भू साङ्गतो तसें हलायुध साङ्गत नाहा. बहुशः हीं निवडतांना वृत्ताचें नांव कोठे तरी–श्लोकांत चौथ्याच चरणांत असें नव्हे–येतें ही अेकच गोष्ट त्याने लक्षांत घेतलली दिसते.

छन्दःसूत्रांच्या मागून काही शतकांनी हलायुधाने ही वृत्ति लिहिली, पण मध्यन्तरीं जीं नवीन वृत्तें निर्माण झालीं त्यांची पुरवणी त्याने पिङ्गलाच्या वृत्तसङ्ग्रहाला जोडली नाही. ज्या गाथाप्रकरणांत शिशुपालवधांतील श्लोकावरून सुचलेल्या अतिशायिनी नि विस्मिता या दोन वृत्तांचा समावेश आहे त्याच प्रकरणांत त्याच काव्यांतील 'कुटजानि वीक्ष्य शिखिभिः शिखरीन्द्रं' (शिशु ६।७३) या श्लोकावरून सुचणाऱ्या 'कुटजा' वृत्ताचा समावेश कां नाही ही शङ्का हलायुधाला येअू नये याचें आश्चर्य वाटतें.

पिङ्गलाने जेथे यति साङ्गितला नाही अशा पुष्कळ वृत्तांत 'इत्याम्नायः' म्हणून हलायुध यति साङ्गतो. कुमारललिता वृत्तांतच यतिभेदाचें म्हणून 'इदं वदनपद्मं' हें अुदाहरण देऊन 'द्वाभ्यां पञ्चभिश्च यतिमिच्छन्ति' असें तो म्हणतो. वस्तुतः पिङ्गल जसा यतिभेदाने मणिगुणनिकर, चन्द्रावर्ता, माला असे वृत्तभेद करतो तसा वृत्तभेद हलायुधाने मानून या वृत्ताला निराळें नांव देण्याची आवश्यकता त्याने कां प्रतिपादूं नये ? तसेंच श्रुतबोध त्याच्या परिचयाचा होता कारण इन्द्रवज्राचीं जीं तीन उदाहरणें हलायुध देतो त्यांतील पहिलें श्रुत-बोधांतीलच आहे. पण श्रुतबोधकार

"इन्द्रियबाणैर्यत्र विरामा
सा कथनीया चम्पकमाला" (श्रुबो १५)

म्हणून यति साङ्गत असतांना पिङ्गलाने यति कां साङ्गितला नाही याचा हलायुध विचारच करीत नाही. "पादतले पद्मोदरगौरे" म्हणून ज अुदाहरण हलायुध देतो त्यांत यति पाळलेला नाही हें एक कारण असूं शकेल.

## १० अुत्पलाची विवृति

भट्ट अुत्पल हा दहाव्या शतकांतच होऊन गेला. याने बृहत्संहितेवर जी विवृति लिहिली आहे तिच्यांत १०३ व्या अध्यायावरील टीकेंत पिङ्गलाच्या पद्धतीची सुधारणा आढळते. वृत्ताचें लक्षण पिङ्गलाच्याच परिभाषेने साङ्गि-तलेलें आहे परन्तु तें सूत्र त्या वृत्ताचा एक चरण होअील असें रचिलें आहे. जसें, "लक्ष्मीरियं तभसजगैरुदाहृता" वा "द्रुतपदं नभजयैः कथितं तत्". या सुधारलेल्या पद्धतीचीं सूत्रें पुढे केदारभट्टादि छन्दःशास्त्रकार आणि मल्लिनाथादि टीकाकार देतात.

## ११ क्षेमेन्द्रकृत सुवृत्ततिलक

क्षेमेन्द्रकृत सुवृत्ततिलकांत बहुतेक ठळक वृत्तांचाच विचार केला आहे; तथापि तनुमध्या, कुमारललिता, भुजगशिशुसृता या क्षुद्र वृत्तांना आरम्भीं तो स्थान देतोच. पण या ऱ्हस्व वृत्तांविषयी तो म्हणतो,

" न षट्सप्ताक्षरे वृत्ते विश्राम्यति सरस्वती
भृङ्गीव मल्लिकाबालकलिकाकोटिसङ्कटे " ( क्षेसु २।२ )

हें त्याचें म्हणणे मोठ्या गमतीने पटतें.

सुवृत्ततिलकाचे तीन विन्यास आहेत. पहिल्या विन्यासांत ठळक वृत्तांचीं लक्षणें पिङ्गलोक्त पद्धतीने पण अनुष्टुभांत दिलीं असून नन्तर स्वरचित अुदाहरणें भरताप्रमाणे दिलीं आहेत. दुसऱ्या विन्यासांत निरनिराळ्या वृत्तांत अक्षररचना कशी असावी हें साङ्गितलें आहे; आणि गुणदोषप्रदर्शनासाठी निरनिराळ्या कवींच्या कृतींतून त्याने अुदाहरणें दिलीं आहेत. तो स्वतःचीहि चूक दाखवायला भीत नाही; तथापि अेकन्दरीने पहातां क्षेमेन्द्राची ही विचारसरणी विचित्र आणि निराधार वाटते.

तिसऱ्या विन्यासांत तो कोणतें वृत्त कोणत्या विषयाला वा रसाला योग्य होअील हें साङ्गतो; अुदाहरणार्थ,

" साक्षेपक्रोधधिक्कारे परं पृथ्वी भरक्षमा
प्रावृट्प्रवासव्यसने मन्दाक्रान्ता विराजते " ( क्षेसु ३/२१ )

हें त्याचें म्हणणें पटत नाही. या विन्यासांत शेवटीं कोणतें वृत्त लिहिण्यांत कोणाचा हातखण्डा होता हें क्षेमेन्द्राने साङ्गितलें आहे; परन्तु हेंहि समाधानकारक वाटत नाही. तो म्हणतो,

" सुवशा कालिदासस्य मन्दाक्रान्ता प्रवल्गति
सदश्वदमकस्येव काम्बोजतुरगाङ्गना. " ( क्षेसु ३/३४ )

परन्तु कालिदासाचें सरस पद्यप्रभुत्व मेघदूतांत तेवढें दिसतें आणि रघुवंशाच्या निरनिराळ्या वृत्तांत लिहिलेल्या सर्गांत दिसत नाही असें थोडेंच आहे! अजविलाप ज्याने वाचला आहे तो कालिदासाला वियोगिनीवृत्त विशेष सरसतेने पेलतां आलें नाही असें म्हणूं शकेल काय ?

## १२ नागवर्माचा छन्दोम्बुधि ( कानडी )

ख्रिस्तशके १००० च्या अलीकडे पलीकडे कर्नाटकांत **नागवर्म** नांवाच्या छन्दःशास्त्रकाराने छन्दोम्बुधि नांवाचा ग्रन्थ लिहिला. या ग्रन्थाची डॉ. किटेल्ने

नागवर्मन् छन्दस्सु या नांवाने आङ्ग्ल-कानडी आवृत्ति काढलेली आहे. म्हैसूरच्या काव्यकलानिधिग्रन्थमालेने हा ग्रन्थ छन्दोम्बुधि या नांवाने प्रकाशित केला आहे. नागवर्म हा स्वतन्त्रपणें यति साङ्गतो. रथोद्धतेंत तो सहाव्या अक्षरानन्तर यति साङ्गतो पण स्वागता वृत्तांत तो तसा यति साङ्गत नाही. त्याने काही वृत्तें नवीन दिलीं आहेत. अङ्गरुचीत्यादि त्याने दिलेलीं काही वृत्तें छन्दोनुशासनांत हेमचन्द्र देतो. परन्तु हेमचन्द्र त्याचा नांवाने अुल्लेख कां करीत नाही कळत नाही. नागवर्म पिङ्गलोक्त गणपद्धतीचाच उपयोग करतो.

## १३ हेमचन्द्राचें छन्दोनुशासन

छन्दोनुशासन या ग्रन्थांत **हेमचन्द्राने** वृत्तजातींचा मोठाच सङ्ग्रह करून ठेविला आहे. हा सूत्रपद्धतीचाच अवलम्ब करतो; जसें, "मत्नायिः कुसुमितलतावेल्लिता ङ्चैः" यगण लागोपाठ तीनदा येतो म्हणून यकार तिसऱ्या स्वराने युक्त आहे. कपासून ङ् हें पाचवें नि च हें सहावें अक्षर आहे, तेव्हा "ङ्चैः" ने या वृत्ताचे यतीने पहिला पांच अक्षरांचा नि दुसरा सहा अक्षरांचा असे तुकडे पडतात असा बोध होतो. सूत्रपद्धतींत असा थोडा निराळेपणा आणि वृत्तजातिसङ्ग्रहाचा मोठेपणा याव्यतिरिक्त छन्दोनुशासनांत विशेष कांही नाही. हेमचन्द्र सामान्यतः स्वरचित उदाहरणें देतो. तो मोठा सङ्ग्राहक आहे. वृत्तांना त्याने दिलेल्या नांवांहून निराळीं नांवें असल्यास तीं तो नोन्दून ठेवितो. क्वचित् प्रसङ्गीं तीं नांवें कोणीं दिलीं आहेत त्यांचींहि नांवें तो देतो. अशा रीतीने त्याने भरत, जयदेव, स्वयम्भू यांच्या नांवांचा उल्लेख केला आहे.

दोहाजातीचें लक्षण साङ्गतांना तो विरहाङ्काप्रमाणें मत देतो.

## १४ कविदर्पण

कविदर्पण हाहि ग्रन्थ प्रो. वेलणकर यांनीच सम्पादून प्रकाशित केला आहे. या ग्रन्थाचा कर्ता कोण हें समजत नाही. कविदर्पणकाराने प्राकृतांत विशेषतः अपभ्रंश जातींचें विवेचन केलें आहे. हा हेमचन्द्राचा अुल्लेख करतो त्या अर्थी तो हेमचन्द्राच्या मागून होऊन गेला असावा. त्याने चतुथ अुद्देशांत कांही वृत्तांचें विवेचन केलें आहे. स्वयम्भूप्रमाणे हा वृत्तांचीं नांवें आणि लक्षणें प्राकृतांत देतो. "रसेहिं निदिट्ठा यमनसभला गो सिहरिणी" असें तो शिखरिणीचें लक्षण देतो. यावरून लक्षणसूत्र साङ्गतांना तो अुत्पलाचें अनुकरण करितो असें दिसतें.

## १५ केदारभट्टप्रणीत वृत्तरत्नाकर

छन्दःशास्त्रावरील महत्त्वाचा आणि टीकाकारांना सुपरिचित असा ग्रन्थ म्हटला म्हणजे केदारभट्टप्रणीत वृत्तरत्नाकर हा होय. या ग्रन्थाचा रचनाकाल खिस्तशके १२०० पूर्वीचा असावा असें दिसतें.* याचे सहा अध्याय आहेत. १ ल्या अध्यायांत अक्षरगणयति अित्यादिकांविषयी विवेचन अनुष्टुभ् छन्दांत आहे. २ ऱ्या अध्यायांत जातिसदृश पद्यप्रकारांविषयी विवेचन आहे. ३ ऱ्या अध्यायांत अेकाक्षरी वृत्तापासून दण्डक धरून शेंसवाशेंच समवृत्तांचीं लक्षणें, अुत्पलाने अुद्धृत केलेल्या सूत्रांसारख्या सूत्रांनी साङ्गितलीं आहेत. ४ थ्या अध्यायांत अर्धसमवृत्तांचीं लक्षणसूत्रें दिलीं आहेत. ५ व्या अध्यायांत विषमवृत्तें साङ्गितलीं असून सहाव्या अध्यायांत प्रस्तार-विषय विवेचिला आहे. प्राकृत पद्यप्रकारांकडे केदारभट्टाने पूर्ण दुर्लक्ष केलें आहे. हा पिङ्गलानुयायी आहे, पण हा पिङ्गलाच्या कनकप्रभा आणि वरसुन्दरी या वृत्तांना मञ्जुभाषिणी आणि अिन्दुवदना म्हणतो; आणि मञ्जुभाषिणी नि अिन्दुवदना या नांवांचीं निराळींच वृत्तें हेमचन्द्राने साङ्गितलीं असतांहि, कनकप्रभावृत्ताला मञ्जुभाषिणी आणि वरसुन्दरी वृत्ताला अिन्दुवदना हींच नांवें रूढ झालीं आहेत असें काव्यटीकाग्रन्थांवरून दिसतें. पणव आणि पञ्चचामर यांचीं लक्षणें वृत्तरत्नाकरांत निराळींच म्हणजे “ म्नौज्गौचेति पणवनामकम् ” ( क ३।२२ ) आणि “ जभौ जरौ वदन्ति पञ्चचामरम् ” ( के ३।६७ ) अशीं आढळतात !

केदारभट्ट हा मेघवितान, अनवसिता, द्रुतपदा, लक्ष्मी, वीरललिता, समद-विलासिनी, सुवृत्ता ( विस्मिता ) हीं वराहमिहिराने दिलेलीं वृत्तें देत नाही; तसेंच पिङ्गलाने दिलेल्या वृत्तांपैकीं विलासिनी, ( सुर ) ललना, तत, कान्तोत्पीडा, वाहिनी, गौरी, कुटिला ( हंसश्येनी ), शैलशिखा, अतिशायिनी, विबुधप्रिया, नाराचक, विस्मिता आणि शशिवदना हीं वृत्तें देत नाही ! अुपेन्द्रवज्रा, प्रहर्षिणी वंशपत्रपतित या तीनच वृत्तांचीं केदारभट्टाने दिलेलीं सूत्रें अुत्पलाने दिलेल्या सूत्रांसारखीं आहेत. बहुतेक सूत्रें स्वतन्त्रपणें रचिलेलीं दिसतात.

केदारभट्ट वियोगिनीवृत्त देत नाही. आपल्या कुमारसम्भवावरील टीकेंत ( ३।६ ) “ विषमे ससजा गुरुःसमे सभरा लोऽथ गुरुर्वियोगिनी ” असें सूत्र अुद्धृत करून एका सुप्रसिद्ध वृत्ताचा छन्दःशास्त्राच्या अितिहासांत प्रथम अुल्लेख

* P. K. Gode's Date of Vrttaratnākara, Annals B. O. R. I. XVII, PP. 398.

मल्लिनाथाने केला आहे. हें आता सुपरिचित झालेलें नांव त्याला कोठून मेळालें? क्षेमेन्द्रहि या वृत्ताला विसरतो. हेमचन्द्र प्रबोधिता आणि प्राकृत पिङ्गल सुन्दरी अशीं निरनिराळीं नांवें देतात. हें नांव अेखाद्या दाक्षिणात्य छन्दःशास्त्रकाराने दिलेलें असावें. मन्दारमरन्दचम्पूचा कर्ता मात्र वियोगिनी हें नांव योजितो.

वृत्तरत्नाकरावर भट्टरामेश्वरसूनु भट्टनारायण या महाराष्ट्रीय पण्डिताची टीका आहे. ही मूळ ग्रन्थाला पूरक आहे. भट्टनारायण हा आपल्या तिसऱ्या अध्याया-वरील टीकेंत एका वर्गातील केदारभट्टाने साङ्गितलेल्या वृत्तांचें विवेचन झालें की त्या वर्गातील नवीन वृत्तांचीं लक्षणें केदारभट्टाच्याच पद्धतीने साङ्गतो. हीं नवीन वृत्तें वृत्तरत्नाकर-परिशिष्टांतील म्हणून परिचित आहेत. यांपैकी बहुतेकांचा समावेश काव्यतीर्थ रामधनभट्टाचार्य यांनी सम्पादिलेल्या छन्दोमञ्जरीच्या आवृत्तींत केलेला आहे.

## १६ प्राकृत पैङ्गल

प्राकृत पैङ्गल हा वृत्तरत्नाकरानन्तरचा एक महत्त्वाचा आणि सुपरिचित ग्रन्थ आहे. याचा छन्दःसूत्रकार पिङ्गल याच्याशीं कांही सम्बन्ध नाही. कोणताहि पद्यप्रकार असो ‘पिङ्गल असें म्हणतो’ म्हणून तो साङ्गण्याची पद्धतच पडली असावी. याचे दोन परिच्छेद असून प्रथम परिच्छेदांत जातिसदृश पद्यप्रकारांचें विवेचन असून दुसऱ्या परिच्छेदांत वृत्तविवेचन आहे. हीर ही जाति नसून वृत्त आहे, पण याचा समावेश प्रथम परिच्छेदांतच केलेला आहे. हा ग्रन्थ स्वयम्भूच्छन्द आणि कविदर्पण याप्रमाणे सर्वस्वी प्राकृतांत आहे. कित्येक श्लोकांतून हम्मीर राजाचा अुल्लेख येतो. मेवाडच्या या रजपूत राजाच्या राजवटीचा आरम्भ खिस्तशके १३०२ मध्ये झाला असल्यामुळे प्राकृत पैङ्गलाचा काल १४ व्या शतकाच्या मागे नेतां येत नाही. या ग्रन्थांत कर्पूरमञ्जरी नाटकांतील काही श्लोक आहेत. शालिनी वृत्ताला अुदाहरण कर्पूरमञ्जरींतील घेतलें आहे; पण ‘चउरंसा’ या दुर्मिळ वृत्ताला त्याच नाटकांतील “दिसबहुतंसो” हें अुदाहरण घेतलेलें नाही. अुदाहरणें बहुशः सयमक आहेत आणि तीं बहुशः ग्रन्थकाराने स्वतः रचून घातलेलीं नाहीत असें म्हणतात. या गोष्टी चिन्तनीय आहेत. प्राकृत पैङ्गलाची रचना

एका लेखकाच्या हातून झालेली नसेल, आणि वेळोवेळीं या ग्रन्थांत भर पडत आली असेल, असेंहि या ग्रन्थाविषयी एक मत आहे.

अुपजातींचे चौदा प्रकार कल्पून त्यांना नांवें दिलेलीं ( प्रापै २।१२१ ) प्रथम प्राकृत पैङ्गलांतच आढळतात.

वृत्तलक्षण साङ्गतांना या ग्रन्थांत विरहाङ्काच्या पद्धतीसारख्या प्राकृत पद्धतीचा अवलम्ब केलेला आहे. शालूर, नरेन्द्र, गीता, मालाधर, निशिपालक इत्यादि वृत्तें प्रथम प्राकृत पैङ्गलांतच आढळतात; पण आश्चर्याची गोष्ट ही की शिखरिणी वृत्ताला यांत थारा नाही ! स्वतःचीं नवीन नांवें वृत्तांना देऊन घोटाळा वाढविण्याचें कार्य प्राकृत पैङ्गलानेहि केलें आहे; आणि दोधक नि शार्दूलविक्रीडित या वृत्तांचींच लक्षणें पुन्हा एकदा निराळ्या शब्दांनी साङ्गून त्या वृत्तांना अनुक्रमें बन्धु आणि ‘ सद्दूलसट्टा ’ म्हटलें आहे ! प्राकृत उदाहरणें पाहतां अन्तर्गत यमकांवरून यतिविवेचन करायचें अवश्य सुचायला हवें होतें पण तें झालें नाही. त्यामुळे अुदाहरण पाहतां ज्या ब्रह्मरूपकाची मोडणी प्राकृत पैङ्गलांत ( प्रापै २।१७५ ) [ –।– – – – –।– – – – –।– – – – –।– – – –।] अशी स्पष्टपणें दिसते त्याच वृत्ताची मोडणी प्राकृत पैङ्गलावर आधारलेल्या वाणीभूषणांत [।– – – – –।– – – – –।– – – – –।– – – – –] अशी आढळते !

## १७ गङ्गादासकृत छन्दोमञ्जरी

गङ्गादासकृत छन्दोमञ्जरी हा ग्रन्थ वृत्तरत्नाकरासारखाच सुपरिचित आहे. अुद्गता, भुजङ्गप्रयात, मणिगुणनिकर, शालिनी नि रुचिरा या वृत्तांची लक्षणसूत्रें गङ्गादासाने अुत्पलावरून घेतलेलीं दिसतात. काही लक्षणसूत्रें केदारभट्टाचींच घेतलेलीं आहेत. कांही त्यानें स्वतः रचलेलीं आहेत. केव्हा केव्हा मूळ सूत्रांत थोडी सुधारणा करून तो तें घेतो. या ग्रन्थाचे सहा स्तबक आहेत. याच्या सहाव्या स्तबकांत तीन गद्यप्रकार वर्णिले आहेत हा या ग्रन्थाचा विशेष होय.

“ अकठोराक्षरं स्वल्पसमासं ‘चूर्णकं’ विदुः।
तत्तु वैदर्भरीतिस्थं गद्यं हृद्यतरं भवेत्॥
भवे‘दुत्कालिका’प्रायं समासाढ्यं दृढाक्षरं।
वृत्तैकदेशसम्बन्धाद् ‘वृतगन्धि’ पुनःस्मृतम् ”॥

ापुढील छन्दःशास्त्रावरील ग्रन्थ फारसे महत्त्वाचे नाहीत. ते प्राकृत पैङ्गल वा ृत्तरत्नाकर यांवर आधारलेले दिसतात. दामोदरमिश्रकृत वाणीभूषण हा ग्रन्थ ाकृत पैङ्गलावर आधारलेला आहे. प्राकृत पैङ्गल यतिवादी नाही. पण ाकृत पैङ्गलांत नसलेल्या शिखरिणी वृत्तांत मात्र दामोदरमिश्र यति साङ्गतो. ृत्तसार, छन्दःकौस्तुभ या नांवाचे ग्रन्थ आहेत असें पिङ्गलावर पण्डित केदारनाथांनी ज्या टीपा दिल्या आहेत त्यांवरून कळतें. पण हे ग्रन्थ माझ्या वलोकनांत आलेले नाहीत.

## १८ श्रीकृष्णकवीचा मन्दारमरन्दचम्पू

**श्रीकृष्णकवि**विरचित मन्दारमरन्दचम्पूच्या पहिल्या बिन्दूंत कांही वृत्तें ाङ्गितलीं आहेत. अिन्द्रवज्रा, अुपेन्द्रवज्रा, वंशस्थ, हंसी अित्यादि वृत्तांत हा ति साङ्गतो. यति नसल्यास ती गोष्ट मोघम न ठेवतां 'पादमध्ये यतिर्नहि' असेंहि स्पष्ट साङ्गतो. मराठींत ज्याला कामदा वृत्त म्हणतात पण ज्याच्या ांवाचा अुगम सापडत नाही त्या वृत्ताला हा मरालिका म्हणतो. अुदाहरणें ारच थोड्या वृत्तांचीं दिल्यामुळे मुद्रणदोष हुडकून काढणें अशक्य झालें आहे. "आन्दोलिका ततरगाः सायकैः सायकैर्यति" (ममच १६) या लक्षणांत पहिला गण त नसून ज असावा असें वाटतें. पण निर्णय करून ्यायला काही मार्ग नाही. "मो लौ यौ यः कुसुमितलता भूतर्त्वगैर्यतिः" (ममच १८) या लक्षणांत 'लौ'च्या ठिकाणीं 'त्नौ' पाहिजे हें अक्षरसङ्ख्या ति आणि मोडणी ध्यानांत घेतल्याविना कळत नाही. या अडचणीमुळे वेश्याप्रीति, चेटीगति, बालिका इत्यादि वृत्तांची रचना नीट समजत नाही.

छन्दःशास्त्रावरील मराठी ग्रन्थ

## १९ निरञ्जनमाधवाची सद्वृत्तमुक्तावली

**निरञ्जनमाधवान** सद्वृत्तमुक्तावली नांवाची जी पुस्तिका लिहिली आहे ती महाराष्ट्रकविमासिकांतून प्रकाशित झाली आहे. तिचें लेखन शके १६३० मध्ये प्रतिपदेला समाप्त झाल्याचें वृत्तलेखकाने शेवटीं ग्रथित करून ठेविलें आहे. निरञ्जनमाधव हा वृत्ताला 'व्यक्ति' म्हणतो आणि "जातिव्यक्तिद्वयामध्ये छन्दःशास्त्र विरूढलें" असें साङ्गतो. मराठींत लगत्वभेदातीत जी पद्यरचना रूढ आहे तिचा विसर त्याला व्हायला नको होता. परन्तु अेकन्दरीने पाहतां छन्दावर

लिहिणारांची प्रवृत्ति स्वतन्त्र दिसतच नाही. नवीं नवीं नावें देण्यामध्ये असेल तें स्वातन्त्र्य व्यायित होओी. कनकप्रभा, विबुधप्रिया इत्यादि वृत्तांना निरञ्जनमाधव मत्तहासिनी, मल्लिका हीं नांवें देतो, पण आधार देत नाही. एखाद्या दाक्षिणात्य छन्दःशास्त्रकाराचा त्याला आधार असावा; कारण विबुधप्रिया वृत्ताला नागवर्म मल्लिकामाला म्हणतो आणि मन्दारमरन्दचम्पूचा कर्ता कृष्णकवि हा मल्लिका म्हणतो. पण अमृतध्वनि वृत्ताला मन्दारमरन्दचम्पूकार मत्तेभ म्हणत असतांहि निरञ्जनमाधव कल्पलतिका हें नांव देतो. मधुमती, कमला, भामिनी, सहदळा (?), कनकलता, मदनसायक, हेमकला, कामकला आणि सुधा हीं नऊ वृत्तें तो नवीनच देतो; पण आधार साङ्गत नाही.

महाराष्ट्रसारस्वतकार म्हणतात, "जुन्या कवींपैकी निरञ्जनमाधव ( सद्वृत्त-मुक्तावलीकार ), रङ्गनाथ कावेरीकर ( वृत्तसुधाकार ), मुकुन्द ( छन्दोरत्नाकरकार ), विठ्ठल ( विद्वज्जीवनकार ? ) वगैरेंचे * ग्रन्थ हल्ली आपणांस उपलब्धहि आहेत पण त्या सर्वांत, नव्हे, आजमितिपर्यन्त छन्दःशास्त्रावर रचलेल्या सर्व मराठी ग्रन्थांत छन्दोमञ्जरीइतका सुन्दर ग्रन्थ अेकहि नाही."

## २० रामचन्द्र दैवज्ञाची छन्दोमञ्जरी

**रामचन्द्र** जोशी याने छन्दोमञ्जरी नांवाचा जो विस्तृत ग्रन्थ केला आहे तो वे. रङ्गाचार्य रड्डी शास्त्री यांनी सम्पादून प्रकाशित केला आहे. हा ग्रन्थ रामजोशाने नव्हे तर रामचन्द्र दैवज्ञ याने रचिला आहे. या ग्रन्थांत मात्रापद्यांचा विचार केलेला नाही. वृत्तांचीं अुदाहरणें मात्र सरस आहेत. हीं अुदाहरणें रचतांना चौथ्या चरणांत वृत्ताचें नांव तर ग्रथित केलें आहेच परन्तु गणवाचक वर्ण पद्यांतील प्रथम चरणांत गणारम्भीं कोणींहि आजपर्यन्त आणून दाखविले नाहीत. ती बिकट कामगिरी रामचन्द्र दैवज्ञाने करून दाखविली आहे. यापलीकडे या ग्रन्थांत विशेष काही नाही.

## २१ वृत्तदर्पण

**परशुराम तात्या गोडबोले** यांचें वृत्तदर्पण हें शालेय पुस्तक सुपरिचितच

---

* महाराष्ट्र सारस्वताच्या १ ल्या आवृत्तीच्या शेवटीं जी ग्रन्थसूची दिली आहे तिच्यांत प्राणकृत 'बावनी छन्द' आणि गिरिधरकृत 'छन्दोरामायण' हीं दोन ग्रन्थांचीं नांवें अधिक आढळतात.

आहे. या पुस्तकाची खिस्तशके १८६६ मधली आवृत्ति ( दुसरी ) माझ्याजवळ आहे. छन्दोमञ्जरींतून बरींच उदाहरणें वृत्तदर्पणांत घेतलीं आहेत. परशुराम तात्यांनीहि वियोगिनी वृत्त दिलें नाही ! पण अभङ्ग, ओवी, घनाक्षरी, दिण्डी, साकी यांचा परामर्श घेतला आहे. कामदा, शुद्ध कामदा, ललित, मन्दारमाला आणि अमृतध्वनि हीं नांवें प्रथम या ग्रन्थांत आढळतात. सम्प्रदायाप्रमाणे हीं नांवें कोठून घेतलीं हें साङ्गितलें नाही. यूथिका, विभावरी हीं वृत्तें प्रथमच येथे भेटतात. यूथिका नांव चालेल पण विभावरी नांवाचें एक वृत्त हेमचन्द्राने पूर्वींच साङ्गितलें असल्यानें तें नांव निराळ्या वृत्तासाठी योजणें चुकीचें आहे. वृत्तदर्पणकार मदिरावृत्ताला अुमा म्हणतात आणि हेमकला वृत्ताला मदिरा म्हणतात. सवाअि ही मोघम संज्ञा त्यांनी दोन भिन्न वृत्तांना लाविली आहे. "प्राकृत लोक न जाणचि मूळ, अुगेंचि हिला कथितात सवाअी" असें निरञ्जनमाधव म्हणतो तें काही खोटें नाही. सुबोध आणि अेकमेवाद्वितीय शालेय पुस्तक म्हणूनच वृत्तदर्पण हें अितकें सुपरिचित झालें आहे की सामान्यतः बोलतांना छन्दःशास्त्रविवेचन करणाऱ्या कोणत्याहि पुस्तकाला वृत्तदर्पण म्हणतात.

## २२ राजवाडेकृत मराठी छन्द

सुप्रसिद्ध अितिहाससंशोधक **विश्वनाथ काशिनाथ राजवाडे** यांचा मराठी छन्द हा निबन्ध स्वतन्त्र पुस्तकरूपाने प्रकाशित झाला आहे. यांत त्यांनी चूर्णिका, सवाअी, छप्पा, साकी, दिण्डी, घनाक्षरी, कटाव, अभङ्ग आणि ओवी या मराठी छन्दांचें विवेचन करण्याचा प्रयत्न केला आहे. राजवाडे यांनी काही कल्पकता दाखविली असली तरी त्यांचें विवेचन साधार, सोपपत्तिक आणि निर्णायक वाटत नाही. कामांत निष्काळजीपणाहि झाला आहे. दुसऱ्या परिच्छेदांत चूर्णिकेचें जें लक्षण प्राकृतपिङ्गलांतील म्हणून देण्यांत आलें आहे तें वस्तुतः गङ्गादासाच्या छन्दोमञ्जरीच्या सातव्या स्तबकांतील आहे. सवाअी हा शब्द फार्सी असून त्याचा अर्थ 'सारखा' असा आहे हृ त्यांचें विधान खरें नाही. सवाअी हा शब्द प्राकृत पैङ्गलांत आल्याचें ते लिहितात, पण प्राकृत पैङ्गलांत हा शब्द नाही असें प्राकृत शब्दसूचीवरून दिसतें. तसेंच शक्करी आणि साकी यांचा जोडून दिलेला सम्बन्ध केवळ काल्पनिक आहे. घनाक्षरीचा विचार करतांना तो छन्द लगत्वभेदातीत आहे हें ध्यानांत न

आल्याने त्यांचें विवेचन निष्कारण पाल्हाळिक आणि मूलतः सदोष झालें आहे. तथापि अेकन्दरीने पाहतां छन्दःशास्त्राच्या अितिहासांत, ज्यांत स्वतन्त्रपणाने बुद्धि चालविण्याचा प्रयत्न करण्यांत आला आहे असा हा पहिलाच ग्रन्थ आहे.

## २३ छन्दोलङ्कार

साहित्यकुसुमाञ्जलि अथवा छन्दोलङ्कार नांवाचा एक ग्रन्थ रा. **गणेश विष्णु देशपांडे** म्हणजे श्रीगङ्गाधरदास वडकशिवालेकर यांनी लिहून ख्रिस्तशके १९१२ मध्ये प्रकाशित केला आहे. याच्या पूर्वार्धांत छन्दोविवेचन असून त्याला छन्दोगङ्गाधरी असें नांव लेखकाने दिलें आहे. हा भाग सविस्तर असून फटके, कटाव, लावण्या, पदें इत्यादि पद्यप्रकारांची पुसट ओळख करून दिली आहे. मराठी ग्रन्थांत हें पुस्तक अत्यन्त व्यापक आहे. पद्याला लयबद्धतेची आवश्यकता आहे या गोष्टीची जाणीव याच ग्रन्थकाराला प्रथम झालेली दिसते. तो म्हणतो " छन्द अगर वृत्तें यांना ताल व सूर यांचें साहाय्य पाहिजे असल्याने प्रस्ताराने सिद्ध होणाऱ्या असङ्ख्य वृत्तांपैकी जीं वृत्तें ताल व सूर यांवर म्हणतां येतील त्यांना पद्य म्हणावें; आणि जीं तशीं सहसा म्हणतां येणार नाहीत त्यांना गद्य म्हणावें हें उत्तम. मग गद्यामध्ये सरळ असणारी वाक्यरचना त्यांत असो वा नसो " ( पृ ६ ). पण या धोरणाने छन्दःशास्त्राची पुनर्घटना करण्याचें कार्य केलें पाहिजे हें त्याला सुचलें नाही. या ग्रन्थाला योग्य प्रसिद्धि मिळालेली नाही.

या अितिहासांत आणखीहि दोन ग्रन्थांचा अुल्लेख केला पाहिजे.

## २४ छन्दःप्रभाकर

छन्दःप्रभाकर हा ग्रन्थ हिन्दींत असून तो साहित्याचार्य रायबहादुर जगन्नाथ प्रसाद, विलासपूर, यांनी लिहून आपल्याच ' जगन्नाथ ' छापखान्यांत छापून प्रकाशित केला आहे. ख्रिस्तशके १९३१ मध्ये प्रसिद्ध झालेली या ग्रन्थाची आवृत्ति ही ७ वी होय. यावरून या पुस्तकाच्या प्रसाराची कल्पना होअील. अितरत्र माझ्या पहाण्यांत न आलेलीं किती तरी वृत्तें या ग्रन्थांत आहेत. परन्तु हीं वृत्तें आणि त्यांचीं नांवें कोठून घेतलीं, त्यांचीं अुदाहरणें कोणत्या ग्रन्थांत आहेत या गोष्टींविषयी कांहीच स्पष्टीकरण नसल्याने त्यांचा सङ्ग्रह करणें अुचित वाटलें नाही. यांनी परिशिष्टांत अरबी-फार्सी वृत्तांचा विचार केला आहे.

परन्तु बहूरि रजझूला ते हरिगीता म्हणतात हें चुकीचें आहे. हरिगीता हें वृत्त नाही. ती जाति आहे.

## २५ रणपिङ्गल

वृत्तांचा सर्वांत मोठा सङ्ग्रह रणछोडभाअी अुदयराम यांच्या गुजराथी रणपिङ्गल या ग्रन्थांत आहे. त्यांनीहि अरबी-फार्सी वृत्तांचा समावेश आपल्या ग्रन्थाच्या अेका भागांत केला आहे. ग्रन्थारम्भीं छन्दोविषयक ग्रन्थांची एक नाममाला दिली आहे; पण ते ग्रन्थ कोणत्या भाषेंतले आहेत, कितपत साधार आणि विश्वसनीय आहेत, याची कोठे चर्चा केलेली नाही. वृत्तें देतांना केव्हा केव्हा अमुक ग्रन्थांत अमुक नांव आहे अशी मोघम नोन्द केली आहे. सङ्ग्राहकता हा एकच गुण या पुस्तकाचा आहे असें म्हणतां येअील.

छन्दःशास्त्राचा हा गेल्या १५०० हून अधिक वर्षांचा अितिहास पाहिला की एक प्रकारचें असमाधानच वाटतें. पद्य म्हणजे लयबद्ध अक्षररचना होय या मूलभूत सिद्धान्ताच्या जवळ जवळ येऊन छन्दःशास्त्रकार पुन्हा रुळलेल्या मार्गाने जातात. छन्दःशास्त्राची पुनर्घटना करण्याचा प्रयत्न कोणी करित नाही. कोणी थोडीं वृत्तें देतो, कोणी पुष्कळ वृत्तें देतो. लक्षण साङ्गण्याची कोणी त्रिकावलम्बी पद्धत घेतो तर कोणी विशिष्ट परिभाषा निर्माण करून त्या भाषेने साङ्गतो, यापलीकडे त्यांच्या कृतींत भेद नाही. कोणी दुसऱ्यांनी रचिलेलीं अुदाहरणें देतात, कोणी स्वतः रचून तीं घालतात. पण वाङ्मयाचें मन्थन करून छन्दःप्रकार कसे परिणत होत आले याचें विवेचन कोणी करीत नाही. आधार देण्याची बुद्धि तर कोणालाच होत नाही. ज्या सामग्रीवरून अेखादा सिद्धान्त ठरवायचा वा दुसऱ्याचा सिद्धान्त पारखायचा तीच पुढे नसल्याने त्या सिद्धान्ताची चर्चा होअूं शकत नाही.

## २६ छन्दोरचना

प्रस्तुत ग्रन्थाने वर दाखविलेल्या अुणीवा दूर करण्याचा प्रयत्न केलेला आहे. पद्यरचना ही वृत्तजातिछन्दःस्वरूप अशी त्रिविध आहे हें मी शोधून विस्ताराने दाखवून दिलें आहे, आणि पद्य म्हणजे लयबद्ध अक्षररचना होय हा छन्दोलङ्कारकारास प्रथम सापडलेला पण मलाहि स्वतन्त्रपणें सुचलेला सिद्धान्त मी सर्वत्र लावून दाखविला आहे. यासाठी पद्याचे पद्मावर्तनी,

अग्न्यावर्तनी, भृङ्गावर्तनी आणि हरावर्तनी असे चार भेद कल्पिण्यांत आले आहेत. वृत्तप्रकरणीं प्राचीन छन्दःशास्त्रकारांनी दिलेल्या वृत्तांचा आणि लक्षण-सूत्रांचा या ग्रन्थांत समावेश आणि अुल्लेख केलेला असून त्यांचें वर्गीकरण प्राचीन पद्धतीने अक्षरसङ्ख्येप्रमाणे न करितां मोडणीच्या साम्याप्रमाणे अभिनव पद्धतीने केलेलें आहे. नावांचा माजलेला घोटाळा जवळ जवळ नाहीसा केला असून वाङ्मयाचें मन्थन करून वृत्तांचीं प्राचीन आणि दुर्मिळ अशीं अुदाहरणें दाखवून दिलीं आहत. या मन्थनांत जीं वृत्तें नामनिर्देशाने प्रसिद्ध नव्हती पण प्रयोगरूपानें आढळलीं त्यांचा पूर्ण परामर्श घेतला आहे.

जातिविषयक आणि छन्दोविषयक चर्चा करणारीं प्रकरणें हीं सर्वस्वी स्वसंशोधित आणि स्वरचित आहेत.

जेथे जेथे आधार सापडला तेथे तेथे तो दिला आहे. आधार गावला नाही तेथे तसें स्पष्ट साङ्गून टाकिलें आहे. त्यामुळे ज्यांना माझी विचारसरणी पटत नसेल त्यांना सुद्धा सारी सामग्री अभ्यासासाठी अुपलब्ध करून ठेविली आहे. माझ्या हातून झालें तें मी केलें आहे. कन्नड कवि लक्ष्मीश याच्या जैमिनीभार-तार्ची रचना मला वाचून पहातां गद्यस्वरूप वाटली परन्तु अैकून पाहतां ती जातिस्वरूप असून तींत रगणाचीं आवर्तनें आहेत. अशा काही चुका या ग्रन्थांत होअून गेल्या असतील. पाठीमागून येणारे छन्दःशास्त्रज्ञ असले दोष काढून टाकितील आणि ज्ञानांत अधिक भर घालतील. कालाप्रमाणेच शास्त्र अनन्त आहे. तो अन्त पाहण्याची आशा मर्त्याला कशाला ?

नामें ‘ माधव जूलियन् ’ रचुनि जो काव्यें मराठी नवा
साहित्यीं पटवर्धनद्विजकुल प्रख्यातितें पोचवी;
फार्सीकोशहि अैतिहासिक रची अन् त्याचिया मागुनी
तो छन्दोरचना रचूनि विनयें दावी जनांना गुणी.

समाप्त

# पद्यप्रकारनामसूची

वृत्ताच्या पुढे दिलेला आकडा वृत्तविस्तारांतील वृत्तानुक्रमाचा असून जाति आणि छन्द यांच्या पुढील आकडा पृष्ठाङ्काचा आहे.

# परिशिष्ट २ रें

# लेखकनामसूची

ऐखाद्या लेखकाचीं अवतरणें वा त्याचे उल्लेख ऐखाद्या पृष्ठावर अनेकदा असले तरी या सूचींत त्या पृष्ठाचा आकडा ऐकदाच दिलेला आहे. जेथे लेखकाचे नाव ठाऊक नाही तेथे अनामकांची सूची ग्रन्थशः आरम्भींच दिली आहे. छन्दःशास्त्रकारांचे अुल्लेख विशेषतः वृत्तविस्तारांत असङ्ख्य असल्याने ते येथे दिलेले नाहीत.